श्री.

# महाराष्ट्र इतिहास.

## संकेत.

श्रीमत्समर्थसज्जन—,
हृन्मेरूशिरःप्रतापगडरचित्या ।
नाति रामदासशिवपर्दि,
स्वधर्मभूरति महारथी खचित्या ॥ १ ॥

महाराष्ट्राचा इतिहास अजून सिद्ध करावयाचा आहे. त्याला साधनीभूत जीं जुनीं राजकीय व धार्मिक व्यवहाराचीं, ( त्या त्या बाबतींतील पुढाऱ्यांची ते ते व्यवहार त्यांच्या हातून घडत असतांना एकमेकांनीं एकमेकांस लिहिलेलीं ) अस्सल पत्रें तीं, सध्या कोठें सुप्रसिद्ध स्वेतिहाससंशोधक रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, मयूरभक्त लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांसारखे पदवीधर, तसेच रा. दत्तात्रय बळवंत पारसनीस ब्रह्मेंद्र स्वामीचे चरित्र लिहिणारे असे कित्येक सद्गृहस्थ अधिकउणें प्रयत्न करीत आहेत तेव्हां, उपलब्ध होऊं लागलीं आहेत. त्या सर्व उपलब्ध व उपलभ्य साधनांचें जेव्हा प्रकाशन होईल तेव्हां महाराष्ट्राचा—आपल्या प्रिय देशाचा व पूज्य पूर्वजांचा-खरा खरा इतिहास—" धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं । पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥"—ह्या आपणांकडील अत्युदात्त व्याख्येशीं जुळणारा असा कोणा तरी अर्थात् स्वभूमि, स्वभाषा, स्वजन आणि स्वधर्म यांस वाहिलेल्या स्वजनोत्कर्षेच्छू महापुरुषाकडून लिहिला जाणे शक्य होणार आहे अशी आमची दृढ समजूत आहे. तिला अनुसरूनच सद्यःस्थितींत आह्मी महाराष्ट्र इतिहासाची साधनें जशीं जशीं तीं आमच्या हातीं येतील तशीं तशीं छापून प्रसिद्ध करण्याचें आपलें कर्तव्य समजून करीत आहों. हीं साधने अश्रांत परिश्रमाने कधीं उकिरडयांतून तर कधीं उकिरडेवजा

शाळेच्या जुन्या वाड्यांतील तळघरांतुन अथवा कधींही वापरांत नसणाऱ्या तिसऱ्या, चवथ्या मजल्याच्या माळ्यांवरून–उन्हाळ्यांतील कडक ऊन, पावसाळ्यांतील पाऊस व हिवाळ्यांतील थंडीचे कडके खाऊन कडकून, भिजून आणि फिरून आकर्षून—केरकचरा व वाळवी यांच्या अखंड मैत्रींत 'कालोह्ययं निरवधिर्विपुलाचपृथ्वी' ह्या भवभूतीच्या उक्तीवर विश्वास टाकून बसलेलीं अशीं रा रा विश्वनाथ काशीनाथ राजवाडे बी ए ह्यासारखे पदवीधर उजेडांत आणीत आहेत, त्यांना अभ्यंगस्नानें घालीत आहेत, त्यांचे रोगग्रस्त भाग प्रसंगीं कळकळीच्या मवाळीनें सुसह्य होणाऱ्या शस्त्रधारांनीं कापून काढून निराळे करीत आहेत, कित्येक ठिकाणीं मलमें लावीत आहेत, तर कित्येक ठिकाणीं नवे अवयवही कृत्रिम तऱ्हेनें बनवून चिकटवीत आहेत व जुन्यांस रजा देत आहेत ह्या सर्व गोष्टी केवळ कविकल्पना वाटण्याचा पुष्कळ संभव आहे परंतु ज्यांनीं रा राजवाडे ह्यासारख्यांस सांपडलेले पत्रांचे गठ्ठे स्वतां पाहिले आहेत त्यांस तसें वाटण्याचें कांहीं एक कारण नाहीं आम्हीं सध्यां येथें जीं कांहीं दहा पांच पुस्तकें आणिलीं आहेत त्यांतील तीन चार पुस्तकें वाळवीनें इतकीं खाल्लीं आहेत, कीं त्या वाळवीच्या कित्येकांच्या मृत शरीराची माती त्या पुस्तकांत भिनून एकंदर पुस्तकांची माती—कां? दगडी पाटीच बनली आहे अशा स्थितींत असलेलीं हीं पुस्तकें फिरून वोळखीं करावयास प्रथम त्यांस युक्तीनें वाफारा द्यावा लागतो हा वाफारा देतांच त्या प्रस्तराचे पापुदरे कांहींसे सुटे होतात ते तसे सुटे झाल्यानंतर स्त्रियांच गर्भाशयांतील शस्त्रक्रियेच्या प्रसंगीं जितक्या हलक्या हातानें आणि काळजीपूर्वक काम करावें लागतें त्यापेक्षांही अधिक हलक्या हातानें आणि कळकळीनें त्या प्रस्तरप्राय पुस्तकाचें एक एक पृष्ठ सोडवावें लागतें अशीं हीं सोडविलेलीं पृष्ठें फिरून चिकटूं नयेत

म्हणून त्याच्यामध्यें एक एक टिपकागदाचें किंवा साध्याही कागदाचे पृष्ठ घालून ठेवावे लागतें. इतकें करूनही हीं पृष्ठें आपलें सर्व हृद्गत बोलून दाखविण्यास समर्थ होत नाहीत, इतकेंच नव्हे, तर कित्येक अगदीं निरक्षर म्हणजे मुकीं झालेलीच जेव्हा ओळखून येतें तेव्हा मनाला किती उदासपणे वाटत असेल याची कल्पनाच करणें बरें! कारण ह्या पृष्ठांचें सर्व तोंड मुख्यत्वें जिव्हा म्हणजे अक्षरपट्टिका वाळवीनें साफ आमूलाग्र ग्रासून टाकलेली असते. आम्हीं नव्या छापण्यास आरंभ केलेल्या पत्रव्यवहारांतील शके १७१४ किंवा इ. स. १७९२ सालच्या पुस्तकाची वरीलसारखीच दशा आहे. तें कांहींच बोलू शकत नाहीं. आणि म्हणूनच आम्हास शके १७१५ च्या वैशाखापासून आरंभ करावा लागत आहे. वास्तविक खडर्याच्या लढाईला झालेलें मूळ कारण शके १७१५ च्या पूर्वकालांतील असल्यामुळें त्याचा वास्तविक बोध करून देणें हें काम ह्या मुक्या झालेल्या पुस्तकाकडे होतें. परंतु आज तरी त्याला बोलकें करण्याचे आमचे सर्व उपाय खुंटले आहेत तथापि निराश न होता आम्ही आपलें काम अजून चालूच ठेविलें आहे. ईश्वरेच्छेनें यश येताच तें जें काय बोलेल तें महाराष्ट्रबांधवास आम्ही ऐकवूंच.

आमच्याजवळ असलेले सर्व कागद रा. गोविंदराव कृष्ण काळे यांच्या वारनिशीचे होत. हे गोविंदराव कृष्ण काळे निजामाच्या दरबारीं पेशव्याचे वकील असत. हे एक उत्तमापैकीं मुत्सद्दी राज्यकार्यधुरंधर पुरुष होते. ह्याची खात्री वाचकास त्यांच्या छापल्या जाणाऱ्या पत्रांवरून सहजच होईल. रा. गोविंदराव भगवंत हे रा. गोविंदराव कृष्ण यांचे पुण्यास सरकारी फडांत असलेले विश्वासपात्र कारकून होत. रा. गोविंदराव कृष्ण यांचा आमच्याजवळ असलेला पत्रव्यवहार तीन मुखांचा आहे. पहिला 'सरकारी, माधवराव नारायण

( पंत प्रधान ) यांस', दुसरा सरकारी, 'नाना ( फडणीसास ) स,' आणि तिसरा खासगी, 'गोविंदराव भगवंत यांस' हा तिन्ही मुखांचा पत्रव्यवहार एकाच खड्यांच्या लढाईसंबंधी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष चाललेल्या कारस्थानांचा द्योतक आहे त्यामुळे एकाच मितीची त्याच त्याच बाबतीची पत्रें गोविंदराव कृष्ण यांची माधवराव नारायण पंतप्रधान, नाना फडणवीस आणि गोविंदराव भगवंत या तिघांस गेलेली पाहावयास सांपडून या त्रिवर्गांची परस्पर नाती, यांची व्यक्तिनिष्ठ व अन्यसापेक्ष धोरणें, त्याचप्रमाणे त्यावेळीं नुकतीच आरंभ त्यांत येऊ पाहत असणारी इंग्रजी सत्ता ह्मणजे तराजूनें तरवारीच्या साहाय्यानें मांडलेल्या बुद्धिबळाचा डाव आपणांस कसा काय फळेल किंवा नफेल याबद्दलचें या मराठी राज्यकार्यधुरंधराचे संशय इत्यादिकांचें वाचकांस चांगलेंच दर्शन घडेल त्याचप्रमाणें मराठे सरदारांत यावेळीं परस्परांविषयीं कितपत स्नेहबुद्धि वसत होती, त्यांचें आपल्या स्वामीसंबंधी कितपत प्रेम होतें आणि या प्रसंगीं ह्मणजे खड्यांच्या लढाईंत त्यांना एक ठिकाणीं आणण्याचें काम कोणा राज्यकार्यधुरंधरानें आपल्या चातुर्यानें साधलें हें पाहणेंही मोठें कौतुकास्पद असून तितकेंच बोधप्रदही आहे त्याविषयीं आह्मी आपले ग्रह हा पत्रव्यवहार बराचसा छापून झाल्यावर निश्चयात्मक असे लोकांपुढें स्वतंत्र प्रस्तावनारूपानें मांडणारच आहों तेव्हां सध्यां अधिक कांहीं लिहित नाहीं मात्र हा पत्रव्यवहार अव्याहत छापून निघण्याचें काम फार खर्चाचें व श्रमाचें आहे पैकीं श्रम आमच्याजवळ आहेत परंतु द्रव्य आमच्या महाराष्ट्र बांधवांनींच सरदींत सवड काढून पुरविलें पाहिजे वार्षिक खर्च केवळ छापण्याचा निघाला ह्मणजे हें काम पडू न देण्याचें आह्मी आनंदानें अभिवचन देतों कोणी उदार आत्म्यानें जर दहा, वीस, पंचवीस, पन्नास असे रुपये बुद्धीत खर्चास लागत दिले तर त्यांचा आह्मी मोठ्या आनंदानें स्वीकार करू, व प्रत्येक तीन रुपयांस एक प्रमाणें त्याची इच्छा असेल तर मासिक

पुस्तकाऱ्या प्रती त्याला पाठवू. अशा आश्रयदात्यांच्या उदारपणानें ऐतिहासिक पुरुषाचे हस्तलेखही प्रकाशलेखनद्वारा आह्मी वाचकांस देऊं. आमच्याजवळ श्रीशिवाजी, संभाजी, शाहू, नानाफडणवीस, बापू गोखले, परशुरामभाऊ पटवर्धन, महादजी, मल्हारवा इत्यादि अनेक जवळ जवळ दीडदोनशें निरनिराळ्या ऐतिहासिक पुरुषाचे हस्तलेख आहेत.

असो. काव्येतिहाससंग्रहाच्या मागे जवळ जवळ वीस वर्षांनीं हा स्वेतिहाससाधनप्रकाशनाचा उद्योग होत आहे. काव्येतिहाससंग्रहानेंच प्रथम आमचा इतिहास विदेशियानीं लिहिलेल्या स्वरूपात सत्यापासून किती दूर आहे याची थोडीशी कल्पना करून दिली. त्यावर आजपर्यंत मूळ कागदपत्रांचें यथाकालप्राप्तसाधन घेऊन कित्येकांनीं नाना फडणवीस, महादजी सिंदे, मल्हारराव होळकर अशांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. त्या चरित्रलेखांनींही आमचा इतिहास अजून केवळ किती अंधुक आणि अपुरा आहे हे अधिक स्पष्टपणें प्रत्ययास आणले. साराश, स्वेतिहासाचीं साधनें त्यांच्या मूळ स्वरुपांत उजेडांत येण्याची अवश्यकता मराठी वाचकांपैकीं प्रत्येक प्रौढ व विचारी गृहस्थाच्या अंतःकरणात आतां चांगलीच बिंबली आहे. तेव्हा काव्येतिहाससंग्रहाप्रमाणें सध्याच्या वाढत्या प्रमाणावर असणाऱ्या आमच्या वाचनाभिरुचींत ग्राहकांच्या अभावामुळे हा आमचा प्रयत्न अर्धवट राहण्याची पाळी न येईल अशी बरीच उमेद आहे. ती ईश्वराच्या प्रेरणेने महाराष्ट्र वाचक सफल करोत हेच त्या दयावनाजवळ मागणें आहे.

संपादकीय कर्तव्यास मुख्यतः रा. रा. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, वामन रामचंद्र जोशी, आणि नारायण कृष्ण गद्रे, ह्या तिघांनींच जरी बांधून घेतले आहे तरी रा. रा. पद्मनाभ भास्कर शिंगणे बी. ए. एल्. एल्. बी. आणि कृष्णलाल मोहनलाल जव्हेरी एम् ए. एल्. एल्. बी. ह्या गृहस्थाचें ह्या पहिल्या अंकापासूनच त्रिवर्गसंपादकास पूर्ण साहाय्य आहे. विशेषतः ह्या

अंकांतील व पुढेंही मधून मधून येणाऱ्या फारसी पत्रांचें लिप्यंतर आणि मराठी भाषानुवाद करण्याचे कामीं रा रा कृष्णलाल मोहनलाल जव्हेरी एम् ए एल् एल् बी ह्या गृहस्थांचें जर संपादकांस साहाय्य मिळालें नसतें तर फारसी भाग सध्यां तरी तसाच ठेऊन पुढें जावें लागतें कारण जशी सध्याच्या मराठी जाणणारांस जुनी पत्रव्यवहाराची भाषा अगदीं अपरिचितत्वामुळें दुर्बोध होते त्याचप्रमाणें जुनी फारसी पत्रेंही दुसरी भाषा फारसी घेऊन बी ए ची परीक्षा उत्तीर्ण झालेल्यासही फारच दुर्बोध होते असा आमच्याच मित्र मंडळींतील कांहीं फारशी पदवीधरांना आम्हीं तीं पत्रें दाखविलीं तेव्हां त्यांस अनुभव आला सारांश रा. रा जव्हेरी यांचें साहाय्य फारच मोलाचें झालें आहे, आणि तें त्यांनीं केवळ निरपेक्षबुद्धीनें व अत्यंत उत्सुकतेनें केलें आणि पुढेंही ते तसेंच वेळोवेळीं करणार आहेत ह्याबद्दल त्यांचे संपादकावर अति उपकार होत आहेत ह्या शिवायही संपादकांस नामदार दाजी आबाजी खरे बी ए एल एल् बी रा रा सदाशिव रामचंद्र वखले बी ए एल एल् बी इत्यादि बरेच विद्याव्यासंगी गृहस्थ कोणत्याही प्रसंगीं साहाय्य करण्यास उत्सुक आहेत ह्यामुळें संपादकांस उत्तेजन येत आहे सारांश महाराष्ट्र इतिहास मासिक पुस्तकासंबंधीं संपादकीय कर्तव्य शक्य तितकें उत्तम होण्याची व्यवस्था कशी आहे हें वाचकांस आतां जास्त स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता नाहीं

महाराष्ट्र इतिहासाच्या प्रत्येक अंकांत ४८ पानें पत्रें इत्यादिकांस दिलीं जातील, व उरलेल्या आठ पानांत मराठी पुस्तकांची पोंच व अभिप्राय सिवाय्त ऐतिहासिक पुस्तकांचें सावार व सोपपत्तिक परीक्षण करण्याचें योजिलें आहे प्रसंगविशेषीं आपल्या इतिहासाचें विवेचन करणाऱ्या आंग्लादि परभाषेंतीलही पुस्तकांची चांचणी घेऊन त्यांची वाचकांस ओळख

करून यानपानें कामही यथावकाश करावें असें मनांत आहे. आश्रय चांगला मिळाल्यास ऐतिहासिक स्थळांचेंही सचित्र वर्णन करण्यास ठीक पडेल.

## महाराष्ट्र बांधवांस विनंति.

आह्मांजवळ जरी सध्या सुरू केलेलें ४८ पृष्ठांचें मासिक पुस्तक दहा पंधरा वर्षे चालेल इतके कागदपत्र आहेत तथापि महाराष्ट्रांतील अनेक इतिहासप्रसिद्ध पुरुषांच्या वंशजांपाशीं व आश्रितांच्या घरीं महाराष्ट्राच्या इतिहासाची पुष्कळ सामग्री इतस्ततः माळ्यावर किंवा तळघरांत फुकट रद्दी ह्मणून पडलेली असते, असा आमचा अनुभव आहे. तर तसल्या जुन्या अव्याहत परंपरेच्या सरदारांनीं आपलीं तळघरें, अंबारें आणि माळे वगैरे शोधून किंवा कित्येकांच्या घरीं पिढ्यानुपिढ्या बंद असणाऱ्या पेट्या शोधून महाराष्ट्राच्या इतिहासास उपयोगी पडणारे कागदपत्र कृपा करून आह्मांकडे पाठवावे. आह्मी अशा गृहस्थांस त्यांचे मूळ कागद नकला करून घेऊन परत पाठवूं आणि छापिल्यावर त्यांच्या दोन दोन प्रतीही त्यास पाठवूं. आमची ही विनंति फुकट जाणार नाहीं आणि महाराष्ट्र इतिहासाच्या साखळीचे मधलेच चुकलेले दुवे लवकरच जागच्या जागीं येऊन महाराष्ट्राचा सुसंगत इतिहास दहाबारा वर्षांच्या आंत लिहितां येणें शक्य होईल अशी फार उमेद आहे. तर लोकांनीं प्रयत्नपुरस्सर आह्मांस चहूंकडून कच्चीं साधनें ह्मणजे कागदपत्रें पुरवावींत इतकेंच त्याजपुढें पदर पसरून आमचें मागणें आहे.

मिति वैशाख शुद्ध १ शके १८२६.

1904 संपादक.

महाराष्ट्र इतिहास.

श्री.

# दुसऱ्या बाजीच्या राजवटीच्या आरंभाचीं कांहीं विश्वसनीय टिपणें.

---

शके १७१८ नलनाम संवत्सरे सुन्सन सब्रातेन मया, व आलफ, सन १२०६, संवत १८५३, राजशक १२३, इसवी १७९६ व १७९७.

१ बाळोबा पागनीस निसबत शिंदे याणी विच्यार केला कीं नाना निघोन गेले. बाजीरावसाहेब याचा [illegible] नाहीं व हे राज्याचे उपयोगीही नाहीं व नाना बाहेर असतां आपण बंदोबस्त करूं म्हटलें तरी आपले विचारांत भोसले, होळकर वगैरे सरदार व मुत्सद्दी येणार नाहीं. हें प्रकर्ण सारे असेच ठेऊन हिंदुस्थानात जावे तरी नाना सरदारी बुडवीतील, तेव्हा कोणीतरी श्रीमताचे दवलतींतील पुढे करून त्याचे माथा कारभार ठेऊन आपण कांहीं जाहागीर व खर्चास घेऊन येश मिळवावे अशी तजवीज करूं लागले. तेव्हां बहिरोपंत मेहदळे व रावोपंत थत्ते याचे मार्फतीने परशुरामभाऊ याशीं बोलणे लाविले. तेव्हा परशरामभाऊ यानीं सांगितले कीं बाजीरावसाहेब कोणाचे विचारात चालतील न चालतील ही तुमची खातरजमा झालीच आहे. याजकरिता आह्मी या कामात येत नाहीं व आह्मीं सरदार; कारभार आमच्यानें होणार नाहीं. नाना बाहेर आहेत त्यांस तुमचा भरवसा नाहीं, व सर्वांचें लक्ष माधवरावसाहेब याचे वंशाकडे व नानाकडे आहे. तेव्हा कोणी अनुकूल होणार नाहीं. याजकारिता बाजीरावसाहेब यांस अटकाव करून चिमणाजी आप्पास, माधवरावसाहेब यास दत्तक दिल्हे तरी सर्वांचे एक लक्ष होईल असें परशराभाऊ यांचे बोलणे नानाचे रुकाराने पडले. त्यावरून बाळोबा पागनीस यांणीं विच्यार केला कीं उभयतास त्याचे हवालीं केले तरी आपले हातीं काहीं राहात नाही; याजकारितां बाजीराव साहेब यास अटकाव करून आपले जवळ ठेवावें आणि चिमाजीअप्पा यांस परशुरा-

मभाऊ याचे हवाली करावें, असें ठरवून पागनीस यांणीं परशरामभाऊ यांस सांगितलें कीं बाजीराव साहेब यांस आह्मीं लष्करांत अटकावून ठेवितों आणि चिमाजी अप्पा यास तुमचे स्वाधीन करितों, तुह्मी येसूदाबाईचे मांडीवर देऊन दत्तविधान करून चिमणाजी माधव करावें ह्मणजे सर्वांचे मनोदयानरूप होऊन सारे अनुकूळ होतील, तेव्हां ही गोष्ट परशरामभाऊ यांणीं कबूल केली आणि बाहिरोपंत मेहदळे यांस सातान्यास नानाकडे पाठवले आणि सांगितलें कीं अशी मसलत होत आहे, आपण यास रुकार देऊन वस्त्रें देवावीं आणि आपण मेणवलीस यावें, बाळोबा तात्या व भाऊ यांची आपली सपनाई होऊन आपली खातरजमा जाली ह्मणजे पुण्यास यावें असें बोलणें झालें त्यावरून मेहदळे याजवर नानाची मर्जी रुष्ट जाली नानानीं विचार केला कीं शिंदे व परशरामभाऊ एक जाले व माधवरावसाहेब यांस दत्तक होणार तेव्हां सान्यांचें लक्ष तिकडे लागेल ये वेळेस रुकार न दिल्हा तरी आपले माथां अपेश येईल असें समजून वस्त्रें द्यावयास साता न्यास बाबूराव आपटे होते त्यांस सांगून आपण वाईस येऊन राहिले या जीराव साहेब यांस हातीं न घेता दत्तविधान केलें हें भाऊचें नानाचें यां कडे येण्याचें कारण

१ वैशाख शु॥ १२ सोमवार छ १ जिल्कादी बाजीरावसाहेब यास शिंदे यांणीं फौजेंत अटकाव करून चिमणाजी अप्पा यांस परशरामभाऊचें हवाली केलें. त्यांणीं जबरदस्तीनें पालखित घालोन पुण्यास आणिलें आणि त्रिंबकराव अमृतेश्वर आपटे यांस सातान्यास पाठवून शाहूराजे याजपासून वस्त्रें व शिकेकटार आणिली आणि वैशाखवद्य ४ बुधवार छ १७ जिल्कादी पुण्यांतील वाड्यांत दयलतराव शिंदे येऊन चिमणाजी अपा यांचें दत्तविधान जालें दत्तविधानाचा शास्त्रार्थ महादेव दीक्षित आपटे व यज्ञेश्वर शास्त्री द्रविड यांणीं सांगितला दत्तविधान जाल्यावर दरबार जाला. सारे सरदार, मुत्सदी, वकील जमा होऊन चिमणाजी माधवराव यांस पेशवाईची वस्त्रें दिल्हीं चुलते असतां पुतणे यांस दत्तक दिल्हें हें चांगलें जालें नाहीं असें लोक बोलत

होते. परशुरामभाऊ यांणी च्यार लक्षांची जहागीर शिंदे यांस द्यावयाची ठरविली.

चिमाजी अप्पा यांस वस्त्रे जाल्यावर नानास; पुण्यास येण्याविशीं बाळोबा पागनीस यांचा दकार घेऊन परशरामभाऊ याणीं सांगून पाठविले. त्यावरून नानांचे बोलणे पडले कीं भाऊनी आपले चिरंजिवास येथे पाठवावें. त्याजवळ बोलणे होऊन ठरेल तसें करावयास येईल ह्मणोन सांगितले; त्याजवरून परशरामभाऊ यांणीं आपले चिरजीव हरी परशराम यास नानाकडे रवाना केले. त्यांणीं सडे जावे. ते पाच हाजार फोजेनिशी शिरवळास गेले, त्याजवरून नानाचे मनांत फौजेसुद्धां येतात तेव्हा काहीं दगा करावयाची मसलत दिसती असा अदेशा आला, व बाबा फडके यांणींही सागून पाठविले कीं आपण करणें तें सावधगिरीनें करावे, व आणखीही लोकानीं बातमी सागितली त्याजवरून वैशाख वद्य ३० छ. २८ जिल्कादी मुहूर्त न पहातां तेथून सडे निघोन प्रतापगडास गेले आणि वाटबद्या करून माहाडास गेले.

१ नाना निघोन गेले ही बातमी येतांच बाळोबा पागनीस याणीं परशरामभाऊस सागितले कीं नानास धरावयास पलटण देतों. तुह्मीं आपलीं फौज पाठवून नानास धरावे, तेव्हा भाऊनी सागितले. कीं तूर्त असे करावयाचे नाही. नाना अनकुळ नच होते तरी मग तसें करू असें सागितले, परंतु नानाचे भाऊचे दिवसेनदिवस वाकडेपणा वाढत चालला त्याजवरून परशरामभाऊ याणीं नानाचे वाडे व सरजाम जप्त केलें.

१ शिंदे यास खर्चास ऐवज द्यावयाकरितां परशरामभाऊ यांणीं कर्जपट्टी शेहरांत केली.

१ शिंदे याचे लस्करची लाही वगैरे मुलकांत होऊन रयतेस उपद्रव फार होऊं लागला.

१ परशरामभाऊ याणीं—मोकळे करून खरड्याचे स्वारीस ऐवज नबाब यांचे सरकारांतून ध्यावयाचा ठरला त्यापैकीं येणे राहिला तो ध्याव-

याचा ठरविला मोकळे होऊन गुळ टेंकडीजवळ राहिले त्याणें आपले जवळ हैद्राबादेहून कांहीं फौज आणविली व कांहीं पुण्यात नवी ठेविली त्या फौजेंत हुजरातचे फौजेचे लगतांची फौज नारोपंत चक्रदेव यांणीं फार पाठविली

१ नाना माहाडास गेल्यावर त्यांणीं मसलत केली

१ रायगड वगैरे किल्ले लक्षांत राखोन किल्ल्यांचा बंदोबस्त केला

१ रायाजी पाटील यांचे हातून दवलतराव शिंदे यांशीं राजकारण करून फारनीस यास कैद करावें आणि बाजीरावसाहेब यास मोकळें करावें, शिंदे यांणीं फौजेसुद्धां हिंदुस्थानांत जावें म्हणजे दाहा लक्षांची जाहागिर व नगरचा किल्ला द्यावा असें केलें, त्यावरून राज्यकारण जमलें

१ नवाबाजवळ गोविंदराव काळे याचे बोलणें केलें कीं नाशारीनमुलुख यास सुचना जाऊन त्यांणीं आमचे लक्षाप्रमाणें चालावें, व आमचे राज कारणास अनुकूळ असावें बाजीरावसाहेब राज्यावर आले म्हणजे खड्यांचे स्वारीस जो मुलुख घेतला आहे तो परत देऊ व ऐवज येणें ठरला आहे तो सोडून देऊं असें ठरल्यावरून ते नानाचे राजकारणास अनुकूळ होऊन नाशारीनमुलुख यांस नानाचे लक्षान चालण्याविशीं सूचना केली, त्याजवरून नाशरीन यांणीं परशरामभाऊ यास धावयाकरितां ऐवज परढयास आणविला होता तो परढयास तसाच ठेविला, दिल्हा नाहीं

१ बाबा फडके यांजकडे ऐवज पाठऊन हुजरातचे फौजेस खर्चास धासून देऊन फौज त्याणीं आपले लक्षांत लाऊन घेतली

१ बाजीरावसाहेब शिंद्याचे तरकरांत होते, त्यास ऐवज खर्चास पाठविला त्यांचे लक्ष आपल्याकडे होतें तें दृढ करून घेतलें बाजीरावसाहेब यांणीं आपले घडांत दोन हजार लोक जमा केले

१ मानाजी फाकडे बाजीरावसाहेब यांचेजवळ शिंदे यांचे तरकरांत होते, त्यांस खर्चास पाठविलें त्यांणीं कांहीं लोक आपले जवळ जमा केले

१ शिंदे यांणीं पागनीस यास कैद करावे, व बाबा फडके यांणी परशरामभाऊ यास कैद करावे असा संकेत होऊन श्रावण वद्य ८ छ. २२ सफरी शिंद्याची फौज तयार जाली व फडके याजवळ हुन्नजरातची फौज तयार होऊन आली, इतकि यांत पागनीस सावध होऊन त्याणीं आपले लष्करचा बंदोबस्त केला व परशरामभाऊ हुशार जाले. त्याजवरून फडके यांची फौज माघारी गेली. नंतर परशरामभाऊ याणीं फौज व पागेचे सरदार यांस गोडी व जरब देऊन फोडाफोड केली आणि बाबा फडके यास भाद्रपद वद्य १२ बुधवार छ. २९ रबीलावली कैद करून चाकेण किल्ल्यात पाठविले; घराची जप्ती केली; नारोपंत चक्रदेव पळोन गेले; ते मशरीन याचे लष्करांत जाऊन काठीकर, शिलेदार याचें गटात राहिले. मालोजी घोरपडे व निळकंठराव परभु, परशरामभाऊ याचे लक्षात आले नाहींत सबब त्यांचें घराचे आसपास चौक्या ठेऊन धरावयाची मसलत केली परंतु ते आपले मजबुदीने राहिले; आणि फौजसुद्धा निघोन वाई प्रांती गेले.

१ शिंदे याचे फौजेत फितूर जाला. बाजीरावसाहेब याजवळही लोक जमा जाले, व मानाजी फाकडेही लोक जमा करू लागले; तेव्हा कोणे वेळेस बाजीरावसाहेब यास काढून नेतील हा भरवसा बाळोबा पागनीस यास पुरेना. याकारिता बाजीराव साहेब याचे तीन दिवस पाणी बंद करून त्याचे वाडात लोक होते ते काढून देऊन बाजीरावसाहेब यास हिंदुस्थानात पाठविण्याकारिता रवाना केले, ते केसो गोविंद याचे बेलापूर पावेतो गेले.

१ मानाजी फाकडे याचे भोवते पलटण तोफा ठेऊन त्याचे पाणी बंद करून त्यास काढून दिल्हे, ते वाई देशीं जाऊन फौज जमा करून राहिले. मालोजी घोरपडे व निळकठराव परभु, अगोदर गेलेच होते. व वज्याबा शिरवळकर यास माहाडाहून नानानी वाई प्रांतीं पाठविले, ते सारे एक होऊन फौज जमा केली. खर्चास देत होते.

१ भोसले यास नानानीं माघारें आणविलें येणेंप्रमाणें नानानीं माहा डास राहून मसलत केली

---

१०

१ नानाचे राजकारण सिद्ध होऊन अश्विन वद्य १२ गुरुवार छ० २९ रविलाखरी चिमणाजी माधवराव भाद्यांत असतां शिंदे यांणी बाळोबा पाग नीस यांस कैद करून चक्रदेव याजबरोबर शिंदे, मशरीन मुलुख यांची फौज येऊन, परशरामभाऊ यास जाग्यावर धरावें असा नारोपंत चक्रदेव यांचा बेत होऊन, परशरामभाऊ वैद्य (मास?) नारोपंत चक्रदेव याणी चिठ्ठी पाठविली ती जासुदानें चुकून परशरामभाऊ पटवर्धन यांस दिल्ही पाहून ते सावध होऊन अप्पासाहेब यांस बरोबर घेऊन विठ्ठलवाडीकडे गेले, तिकडून जुन्नरास गेले, घाटेस घोडनदीचे काठीं——कुळकर्णी यांचे घरीं अप्पासाहेब यास लाही पीठ घेतलें त्या कुळकर्ण्यास शंभर रुपयांची जमीन द्यावयाचा करार केला होता परंतु ती पावली नाही नारोपंत चक्रदेव, परशरामभाऊचे मागें जुन्नरास गेले तेथें परशरामभाऊ अप्पासाहेबसुद्धां किल्ल्यावर जाऊन राहिला खालीं नारोपंत चक्रदेव फौजसुद्धां गेले तर दुसरे रोजीं चक्रदेव याणीं बाण किल्ल्यावर लाविले ते बाण जेथें घोडी फार होती त्यांत पडल्या मुळें बहुत हवालदिल होऊन बोलणें लाऊन अप्पासाहेब यांस चक्रदेव यांचे हवालीं केलें आणि अनंतराव रास्ते यांस जामीन देऊन परशरामभाऊ त्यांचें हवाली जाले रास्ते यांणी त्यास भीमातिरीं मांडवगण फुराट्याचे आडे तेथें नेऊन ठेविले, अप्पासाहेब यांस चक्रदेव यांणीं पुण्यांत मांवत्रद्यास आणून ठेविलें छ १७ जमादिलाखेल कार्तिक वद्य ४ शुक्रवार, राघोपंत यांस कैद करून किल्ल्यावर ठेविले

१ अप्पासाहेब व परशरामभाऊ पुण्याहून निघोन गेले नंतर तेच वेळेस त्रिंबकराव नारायण परचुरे कोथरुडचे बागेंत होते त्याणी येऊन पुण्याचा बंदोबस्त केला महिपतराव मेंहदळे सापडले त्यांची बेहुरमत केली, त्यास व

त्याचे पुत्र अन्याबा यांस धरून कैद केले व परशरामभाऊ यांजकडील लोकास धराधर फार केली, कैदेत ठेविले, त्यांची घरें लुटून सरकारांत आणिलीं; शहर हावालदील जाले.

१ श्रीमत बाजीरावसाहेब हिंदुस्थानांत रवाना केले, ते केसो गोविंद याचे बेलापुरापर्यंत गेले होते, त्यास शिंद्याने आपले लष्करांत माघारे आणिले. येते समई कोरेगावचे मुक्कामीं बाजीराव साहेब छ, १४ जमादिलावली येऊन तेथून नाना फडणीस यास चिठ्ठी पाठविली. तिची नक्कल राबिसन साहेब याचे कागदात सापडली. त्यातील मजकूर की आमची स्वारी कोरेगावास आली, तुमचे येणें न जाले त्यांस पुण्यानजीक येऊन राजश्री दवलतराव शिंदे, अलीजा बाहादूर व अजमल उमराव बाहादूर यासुद्धां भेटीस येणे. दुसरे सरकारचें हिताकारिता तुमचे वचन ज्याशीं गुंतले असेल तें वचन सरकारचें गुतलें. खातरजमेने लौकर यावे. आपले विद्याराखेरीज काहींएक वडावयाचे नाही. याप्रमाणे चिठ्ठी पाठविली.

१ अमृतरावसाहेब पुण्यास आणिले.

१ बाबा फडके चाकणेस होते ते पुण्यास आले.

१ श्रीमंत बाजीरावसाहेब, चिमणाजी अप्पा, अमृतराव साहेब यांच्या भेटी मूंढव्याचे मुक्कामीं जाल्या. कार्तिक वद्य ७ सोमवार छ. २० जमादिलावल.

१ नाना फडणीस याशीं शिंदे अनकूळ जाल्यामुळे त्याचे राजकारण सिद्ध झाले. व बाजीरावसाहेब याची चिठ्ठी गेल्यावरून नाना फडणीस जलदीनें माहाडाहून निघोन पुण्यालगत यरंडवणे येथे येऊन मुक्कामास आले. बाजीरावसाहेब याचा भरवसा नाहीं, याजकारिता मशारीनमुलुख यास दरम्यान घेऊन नवाई यास बाजीरावसाहेब याची चिठ्ठी देविली; त्याचा मसुदा राबीसन साहेब याजवळचे कागदांत सांपडला. त्यातील मजकूर कीं बाळाजी जनार्दन फडणीस यांस आम्हाकडून त्याचे ज्यानास व हुर्मतीस अपकार होईल येविशी त्यास संशय; यास्तव मशारनिल्हेची खातरजमा

आह्मीं आपल्याकडून फरविली त्याप्रमाणें आपण केली त्यांस बाळाजी जनार्दन याजकडून आमचे जातीस व दौलतीस व पंत प्रधानीस व खावंद-गिरीस व तेज्यास समाम्र अंतर वाकडे होऊं नये पंत——आम्हा जवळ असेल अथवा सोईस न पडल्यास स्नानसंध्येस नेमाप्रमाणें निरोप दिल्हा जाईल त्यांचे ज्यानास व माळास व दुर्मतीस सवाम्र वाकडे होणार नाहीं व चित्तात येणार नाहीं त्याजवरून नानाची खातरजमा होऊन फार भार त्यांचे विच्यारें होऊं लागला

१ श्रीमंत बाजीरावसाहेब व चिमाजीअप्पा व नाना फडणीस व रघोजी भोसले व दवलतराव शिंदे व तुकोजी होळकर व मशरीनमुलुख, मानाजी फाकडे व घोरपडे, पाटणकर, निंबाळकर, हुजरांत पागेचे सरदार यांच्या भेटी कार्तिक वद्य १२ स जाल्या

१ श्रीमंत बाजीराव रघुनाथ यांस पेशवाईची वस्त्रें आणावयास सातारी यास अवा शल्कर गेले होते त्यांणी वस्त्रें व शिक्केकटार आणिली, तीं मसनदीवर टेऊन मार्गशिर्ष शु॥ ६ सोमवार छ ४ जमादीलाखरी तेरा घटका रात्रीस मुजरे करून घेतली बाजीराव रघुनाथ पंत प्रधान जाले पुढें फाल्गुन अखेरपर्यंत मजकूर जाले ते

१ गोविंदराव गाईकवाड यांस वस्त्रें जाल्याचें पत्र बाजीराव साहेब यांणीं छ २९ जमादिलाखरचें पाठविलें त्यांत छ ४ जमादिलाखरीस वस्त्रें जालीं असें लिहिलें आहे त्या पत्राची नक्कल तात्या मजमदार यांजवळ आहे त्याजवरून

१ बाजीरावसाहेब यांची स्त्री, धोंडोपंत मंडलीक यांची कन्या मृत्यु पावली, तिची क्रिया डेन्यांत लष्करांत पौपमार्शी केली

१ माघ शु॥ ९ गुरुवारीं छ १८ सावाजी बाजीराव साहेब व चिमणाजी अप्पा व अमृतराव व त्यांचे पुत्र विनायकराव व अमृतराव यांची स्त्री अशीं पहाटेस गज

रात्रे वेळेस पुण्यांत शनवारचे वाडयांत दाखल आली. वाडयाभोंवतीं चौकी शिंदे यांजकडील तोफा व पलटणचे लोक होते.

१ बाजीरावसाहेब याचे लग्न फाल्गुन माशीं जाले. कन्या दाजीबा फडके यांची; नाव राधाबाई ठेविले.

१ बाळाजी जनार्दन बुधवारचे चावडीजवळचे वाडयांत यरंडवणें येथून राहिले. कारभार त्याचे विद्यमाने चालला. परशारामभाऊ यांणी कर्जपट्टी लोकावर घातली. हातीं तिचा वसूल चालविला. शिंद्यास पैसा द्यावयाचा होता तो त्यांस देत गेले.

---

५

येणेंप्रमांणें मजकूर जाले.

१ श्रीमंत बाजीराव रघुनाथ प्रधान यास मार्गशिर्ष शु॥ ६ पेशवाईची वस्त्रे होऊन पंत प्रधान झाले, ते समई सरकारची दौलत व मनुष्यें कांहीं होतीं बी॥

१ सरकारचे कारखाने.

१ तोफखाना सखारामपत पानशे व त्याचे पुतणे गणपतराव विश्वनाथ पानशे वगैरे.

| | |
|---|---|
| १ खुद्द सखारामपत. | १ गणपतराव विश्वनाथ. |
| १ माधवराव कृष्ण. | १ जयवतराव |
| २ | २ |

---

४

१ याजकडे होता. दारुगोळा तोफाचे गाडेसुद्धा गोलंदाज, खलासी गाडीवान वगैरे कामगार माणसें व रखवाल्यांचे

गाडदी, खर्चास माहाल व गांवगाडयाचे बैलसुद्धां कारखाना तयार होता

१ पिलखाना

१ सरदार भगवंतपंत दर्शनी १ सरदार अळीमाहात कारभारी रामचंद्रपंत गाडगीळ

---

२

एकूण दोन कारखाने मिळोन हत्तीप्रत अजमासें १०० शमर यांचे चाकरीची माणसें व हत्तीमा सरंमजामसुद्धां तयार

१ उष्टरखाना नि॥ गणपतराव मोरेश्वर सरंमजामसुद्धां ऊंजफर अजमासें १५०० पंघरासें

१ फरासखाना नि॥ राघोपंत अंबीकर याजकडे खावंदांचे स्वारीस डेरे व रावटया वगैरे सरंजाम तयार केला तो, व दळबादळ डेऱ्यासुद्धा सरंजाम कायम

१ शिलेखाना काम सदाशीवपंत वाकणकर यांजकडे

१ नारो शिवराम खाजगीवाले कारभारी, गणेशपंत भटगे याजकडे कारखाने

१ कोठी, २ लकडखाना, ३ इमारत, ४ बागा, ५ पेठा पुण्याच्या, ६ कुरणें, ७ वहीत कोठी, ८ रथखाना, ९ शिकारखाना, १० देवस्थान पर्वती, ११ नळाचा कारखाना, १२ दारूखाना

---

१२

येणेंप्रमाणें कारखाने होते

'१ धडी रामचंद्र नारायण पुसुभा यांजकडे

२ पोते व जामदार खाना शामराव गोविंद पोतनीस यांजकडे.

१ मुत्पाक कोठी, नारो कान्हो ठोसर यांजकडे.

१ जिनसखाना व वैद्यशाळा बाबूराव करमरकर याजकडे.

१ वाकानिसी विठ्ठलराम वाकनीस यांजकडे.

१ पुस्तकशाळा गोविंदपत आपटे याजकडे.

१ न्यायाधिशी व राजाध्यक्षता यज्ञेश्वरशास्त्री द्रविड, अपाशास्त्री याचे बधु यांजकडे.

१ यज्ञशाळा राघो सदाशिव शेवडे.

१ सबनिशी गोविंद हरी बर्वे.

---

१७

येणेप्रमाणें कारखाने होते.

१ पागा १ हुजरात घोडीं अजमासें दाहा हजार १०००० यांचे सरदार, यांचीं नावनिशीं.

१ पागा, हुजूर, हरी इच्छाराम, व लक्ष्मण गंगाधर.

१ पागा हुजूर गोविंदराव सदाशिव.

१ अनतराव बावर.

१ सटवाजी मांजरे.

१ अनंतराव सोमवंशी.

१ व्यकटराव रघुनाथ.

१ वहिरजी मुळे.

१ महिपतराव रघुनाथ; १ जगंनाथ रघुनाथ.

१ वळवंतराव मुंढ; १ भिकाजी जनार्दन; गंगाधर गणेश;

१ वळवतराव नारायण; १ मिरा माहात; १ मर्दुजा माहात:

१ गणेश बाजीराव, १ अवधूतराव सोमवंशी;. बाजीराव गोविद; १ जैतुजी बावर; १ येशवत सूळ; १ गणेश हरी;

१ रामजी फडतें, १ हायबतसिंग कृष्णसिंग, १ राघो गंगाधर, १ माणकाजी भोयटे, १ येशवतराव देव, १ नारायण भिकाजी, १ मानी पायघुडे, १ हनमतराव गावडे, १ सुभाजी बरांडे, १ बळवंतराव सुभाष, १ हायबतराव पलोव,
१ कृष्णाजी नारायण, १ उमाजी थाघ,
१ लक्ष्मणसिंग, १ निळकंटराव जगताप,
१ हैबतराव शंकर, १ पांडुरंग विठ्ठल,
१ रामचंद्र सदाशिव १ महादजी शिंदे,
१ नायजी निंबाळकर, १ सग्याबा निंबाळकर
१ येशवंतराव ताकपीर, १ भास्कर जगन्नाथ,
१ तुको अनंतराव, १ विश्वासराव चिंतामण,
१ चिमाजी जताप, १ रंगो शामराज,
१ विठ्ठल मल्हार, १ सखोजी सूळ,
१ सयाजी मुळे, १ भिवराज यवत,
१ खंडेराव वऱ्हाण, १ पिराजी शिताळे, १ जानराव भोयटे,
१ मुधाजी भोयटे, १ सुभानराव शिंदे, १ आवाजी अनंतराव, १ बिसाजी गणेश, १ गमाजी निंबाळकर, १ अमृतराव गावडे, १ मनसिंगराव जगथाप, १ बळवंतराव नागनाथ इंदापूरकर, १ पर्वतराव भाल्पकर, १ विठ्ठलराव निकम,
१ दौलतराव काटे, १ बळवंतराव थोरात
१ निळकंटराव रामचद्र, १ बापुराव अनंत
१ राघो बापूजी, १ कान्होजी खलहटे,
१ गिरजाजी वरगे, १ जगन्नाथ केशव,
१ बळवंतराव नागनाथ छिमगांवकर
१ रामजी भोयटे, १ दादू माहात, १ धोंडो मल्हार, १ राघोजी पटारे, १ शिवराय फरेकर, १ गोपाळ बापूजी,

१ लक्ष्मण त्रिंबक; १ रंगराव पुरुषोत्तम पानशे; १ रामचंद्र शिवाजी, १ खंडेराव बल्लाळ पुरंधरे; १ चिंतामणराव पांडुरंग; १ माधवराव परशुराम, १ अवधुतराव येशवंत; १ अबाजी कृष्ण शेलुकर; १ अबाजी गणेश बेहेरे. १ परशराम महादेव कुटे; १ धोंडो बल्लाळ गोखले

---

९३

---

## १ सरंमजामी फौजेचे सरदार, थोर लहान.

१ निळकंठ माहादेव पुरंधरे व त्रिंबकराव माहिपत वगैरे पुरंधरे.

२ नरसिंह खंडेराव विंचुरकर.

३ गोपाळराव त्रिंबक राजे बाहादर.

४ खंडेराव त्रिंबक ऐढेकर.

५ पटवर्धन मंडळी परशराम रामचंद्र व रघुनाथराव निळकंठ व चिंतामणराव पांडुरंग वगैरे

७ पांडुरंग बाबूराव बारामतीकर,

८ रघुनाथराव बळवंत नायगावकर.

सिद्धेश्वर माहिपत विनिवाले; कृष्णराव बळवंत ऊर्फ अप्पा बळवंत; अनंत भिकाजी रास्ते; काशिराव गणपत रास्ते; गणपत अनंतराव मेदळे उर्फ अन्याबा बापू; माधवराव रामचंद्र; गणपतराव विश्वनाथ व सखाराम येशवंत पानशे; त्रिंबकराव अमृतेश्वर पेठणे; परशराम पंडित प्रतिनिधी; पथला निसबत बाळाजी जनार्दन; पथला निसबत हरी बल्लाळ फडके; छत्रसिंग व भाऊसिंग टोके; विठ्ठलराव रामचंद्र व बळवंतराव अप्पाजीराव अबीकर; माहिपतराव वगैरे धुमाळ; कृष्णाजी रणदिवे; माहादाजी नाईक निंबाळकर; दवलतराव निंबाळकर; हणमंतराव भोसले जितिकर; मल्हाराव सोमवंशी

हासाजी व गिर्जोजी आठोळे, रामराव चितळकर, कृष्णराव साळुंखे खंडेराव वगैरे सोमवंशी, हैबतराव सोमवंशी, हैबतराव ढमढेरे, नारायणराव ढमढेरे, दादजी वगैरे शिताळे अवसरीकर, खंडेराव वगैरे शिताळे कुरेगांवकर, शिताळे नेहावकर, समाजी व जोत्याजी जाधवराव, जिवाजी आठोळे, अनंतराव थोरात, अमरसिंग जाधवराव मंमाजी गऊत, कृष्णाजी बाबूराव दामाडे, रखोजी वगैरे भोसले साखरीकर, माणिकराव वगैरे घायगुडे, रायाजी जाधव, अनंतराव पोवार, हणमंतराव जाधव भुईजकर, सटवाजी व सुल्तानजी घायभर, जानोजी व प्रीताजी शेकर, शेख महमद, कृष्णराव भगवंत, भोयटे मंडळी नासिराबादकर, खेत्रोजी भोयटे, सखोजी शिर्के, तुकोजी अनंतराव, बळवंतराव व विठ्ठलराव पवार, गोविंदराव व द्वारकोजी पवार, बाळजी व माळजी भोसले, चव्हराव पवार, राणोजी पवार विश्वासराव शिवराव धिराजी पवार, मल्हारजी पवार, तुकोजी व सदाशिव पवार मानाजी फुकडे,

निसबत सर लष्कर

खुद्द अप्पाजी मोरे सर लष्कर, हैबतराव आठोळे, मानाजी व येशवंतराव गाढवे, हणमंतराव आठोळे, हणमंतराव गिन्यानजी आठोळे, बनाजी आठोळे, जिवनसिंग लाडू, जैवतराव माहार्णवकर, मानाजी बळवंतराव देवकांते, सुमानराव वाघमोरे, जिजाजीराव काडे,

---

निसबत फत्तेसिंग भोसले, खुद्द जातेसिंग भोसले, अनंतराव शिर्के, माणिकराव चिमणाजी घायगुडे, अमृतराव अरगर, येशवंतराव पोढरे विठोजी माले, शिदाजी जाधव, तुळजाजी पवार, माधवराव वायने, माळोजी वंडगर, भगवंतराव वंडगर, होनाजी वंडगर, शिवराव वगैरे मोळमकर, संताजी शितोळे, अनंतराव मचाले, रघुनाथराव निळकंठ

---

माधवराव भापकर, मिरखान टोके, मालोजी घोरपडे, रुस्तुमराव जाधव शिंदखेडकर, गोविंदराव निळकंठ, हणमंतराव अदमणे, जानोजी दमदेरे;

गणोजी शिर्के; बोधेमंडळी; रंगराव माहादेव वडेकर; शंकरराव नरसिह वगैरे लेलेमडळी; शिदोजी बाबर; रामजी व विठोजी भाळेराव; आवजी कवडे; हैबतराव खताळ; खडेराव भोसले; गंगाधर शंकर पुरंधरे; बळवंतराव नागनाथ.

---

११०

---

१ मोठे सरदार.

१ दवलतराव शिंदे; अलिज्या भाहादूर; २ काशिराव होळकर; ३ रघोजी भोसले नागपुरकर; ४ समशेर बाहादूर; ५ बुंदले.

---

१ गारदी नेहमी पुणे मुक्कामी चाकरीस अजमासे १०००० दाहा हजार याचे सरदाराचीं नावनिशीं.

१ मुसामोत्रो व मुसाकुरास मुसाजलले; २ मुसावास;
३ मुसापीत, ४ मुसाजरंज, ५ शामिरखान रोहिले;
६ सय्यद अमद अरब नाना फडणस याजकडील;
७ बळवतराव काशि, ८ विनायक नारायण पराजपे;
९ राघो विश्वनाथ गोडबोले

---

९

१ मुत्सदी व कारभारी.

१ नाना फडणीस; २ बाबा फडके; ३ नारोपत चक्रदेव, ४ गोविंदराव काळे; ५ गोविंदराव पिंगळे; ६ गोविंदराव बाजी; ७ बहिरो रघुनाथ मेहदळे; ८ अबा शेलूकर; ९ राघोपत गोडबोले; १० दादा गद्रे; ११ महिपतराव चिटणीस; १२ नारो निळकंठ मजमदार; १३ गोपाळराव मुनशी; १४ चिंतोपंत देशमुख; १५ त्रिंबकराव ,, ;

१६ भस्या गुरुजी, १७ बापुजी वल्लाळ लेले; १८ माऊ सरजामी, १९ गोविंदपंत आपटे, २० विठ्ठलपंत वाकनीस, २१ तिमाराव पारसनीस, २२ पांडुरंगपंत ढमढेरे; २३ बन्याबा शिरोळकर, २४ शिवरामपंत थत्ते, २५ सदाशिव भट दिवाणजी, २६ मोरोपंत गडबोले, २७ गणेशपंत मटांगे निवसत खाजगी, २८ रामचंद्र नारायण तुळशीवाले गवाले, २९ दादो हरी मराठे, ३० चिमणाजी खंडेराव

—

३०

---

१ कारकून अजमासें ५००० असामी

१ निसबत दप्तर हुजुरचे, २ निसबत खाजगीवाले

३ निसबत तोफखाना, ४ निसबत पुणें सुभा, ५ निसबत पागा, ६ निसबत हाशम, ७ निसबत गारदी, ८ निसबत शिलेदार, ९ कारकून शिलेदार, १० माहाला निहायचे, ११ सरंजामी माहाळचे, १२ किल्ले हायचे

—

१२

१ हाशमी लोक पुण्याचे बंदोबस्तास चौकी पाहाऱ्यास, त्याचे काम नारायणराव हाशमनिस व विनायक नारायण आगाशे, अजमासे असामी २०००

१ किता लोक

१ जासूद व बेल्दार बावोपंत अग्नीकर निसबत फरास खाना याजकडे

२ खास बारदार गुणे याजकडे

३ कामाटी व तबेलेदार नारो शिवराम खासगीवाले यांज कडे कारकून गोविंदपंत कामाटी

४ व प्यादे गोविंद हरी सबनिस यांजकडे

५ खासजिलीब अबाजी बल्लाळ ठोसर याजकडे.

६ शहरचे रखवालीस शिपाई व बेरेड काम त्रिंबकराव नारायण परचुरे याजकडे.

---

६

शके १७२१ सिद्धार्थी नाम सवत्सरे, सुरु सन मया तैन व अलफ सन १२०९ संवत् १८५६, राजशक १२६ इसवी सन १७९९ व १८००.

१ चैत्र व॥ २ रविवारीं शकरराव रघुनाथ सचीव भोरास मृत्यु पावले. मरतेसमईं दत्तक पुत्र घेतले त्याचें नाव चिमणाजी शंकर ठेविले. येविषयीं शंकरराव रघुनाथ सचीव याचें पत्र नानास आलें अहे त्याजवरून. छ. १५ जिल्काद.

२ दौलतराव शिंदे यानीं बायाचा समेट व्हावा याकरतां बाळोबा पागनीस व धोंडोबा व बनी मोदी नगरांत कैदेत होते त्यांस नगराहून सोडून आणिलें ते चैत्र वद्य ३ सोमवारीं छ. १६ जिल्कादी वानवडी वाड्यात येऊन भेटले. त्यास वस्त्रें जवाहीर दिले. आणि कारभारात घातलें. नंतर बाळोबातात्या व बाबुराव आंग्रे व आबा चिटणीस त्रिवर्ग मिळून बायाचा समेट करविला. बाया जेजूरी आलीकडे रोज बुधवार भाद्रपद व॥ ७ मीस येऊन राहिल्या. बाळोबा वगैरे वानवडीस आले. नतर बायानीं सांगोन पाठविलें कीं, आमचे जवाहीराचे सजोग आहेत ते आह्मकडे या मुक्कामीं पाठवावें ह्मणजे आह्मी लष्करात येऊं. त्यांजवरून बाळोबा तात्यानीं शिंदे यास सांगुन बायाचे सजोग बायाकडे पाठविले. ते घेऊन बाया कूच करून वानवडीस न येता पैठणबाब गांवचे सुमारें गेल्या. तेव्हां शिंदे यानीं बाळोबा तात्यास विचारलें. त्यानीं सागितले कीं गेल्या तरी चिंता नाहीं. असे बोलोन नारायणराव बक्षी यांस बायाचे लष्करातून बोलावून आणिलें व फौजही फोडून आणिली. बाबूराव आंग्रे याची रवानगी कुलाब्यास करून सारा कारभार पागनीस करू लागले. बाया गगेकडे गेल्या.

३ आप्पा बळवंत चैत्र व॥ १० छ २८ जिल्कादी पुणें येथें मृत्यु पावले मरणसमयीं दत्तक पुत्र घेतला त्याचें नांव बळवंत कृष्ण ठेविलें

४ बडे खानाची चिठ्ठी गोपाळराव भगवंत याचे नांवें आली त्यांत मजकूर कर्णेल साहेब बहादूर याणी सांगितलें आहे कीं दौलतराव शिंदे याजकडील पेंढारी नबाब असफजहा बहादूर याचे तालुक्यांत हंगामाकरतां व शिंदे याचे कारभारी यांचा इरादा ऐकण्यांत येतो कीं नबाबचे तालुक्यांत खटला रहावा नबाब सर्व प्रकार कंपनी सरकारचे सरकतीविषयीं सामील व सराफ आहेत त्यापक्षीं नबाब साहेबाचे मुलूख व महालाचें संरक्षण कंपनी बहादुरचे सरकारास लाजीम आहे त्याचा इतजा काशी मल्हार याचे विद्यमानें दौलतराव शिंदे यास लोक श्रीमंताचे खिजमतीस तवमदारूनमहा सैतक करावी ह्मणोन चिठ्ठी छ ६ जिलहेज सन तिसा ती सैनात—आली तिची नक्कल राबीसन यांचे कागदांत आहे त्यावरून

१ टिपू सुल्तानावर पल्टणीची स्वारी कंपनी सरकार नवाब पेशवे या तिन्ही सरकारानी सरकतीनें केली तेव्हां सहनामा त्यावर टिपू सुल्तान मारेसबंदरचे फराशिसासी मारफत व रिफाकतीचे कौल करार करून त्याची नेमत कुमकेस आणिले व इंग्रजाचे सरकाराशी ल्ढाईचा इरादा ठेवून फौजेची तयारी केली त्याजवरून तिनीशरीक सरकारांतून मसलत करावयाची तदबीर केली त्याप्रकरणीं वकीलाचे जबाबास सवाल आले व जनराळाची व नवाबाची पत्रें आली त्याच्या नकला व तरजुमे वगैरे राबीसन साहेब यानवळचे कागदांत निघाले त्यावरून मसलत प्रकरणीं मजकूर साराश लिहिला आहे

१ कर्णेल प्राल्मर यानी छ १८ जमादी केवल सन तीसातिसैन आश्विन व॥ ५ मीस नाना फडणीस याजकडे येऊन सवाल केले व त्याचे जबाब आले ती कलमें येणेंप्रमाणें—

१ टिपूचे मसलत प्रकरणीं तीन महिने श्रीमंताशी बोलत आहों आपल्यास इनाम असेल आपले सरकारांत घरचे मम्यामुळे याचा विचार कांहीं

दिसत नाहीं. फरासीस टिपू यास सामील आल्यावर मसलत जड पडल्याची तदबीर व्हावी. त्याचे उत्तर नानानी केलें कीं, हें पहिले करारातच आहे. परंतु तिन्ही सरकारची पत्रें टिपूस पाठवावयाचे ठरले होते त्याचे काय झाले? टिपूकडील उत्तर येते ह्मणजे पुढील अर्थ समजतां त्याजवर कर्णेल बोलले हे कलम त्यातून जाब आला नाहीं. जनराकचे ख्यालात असे असेल कीं, अगोदर तयारी करून मग पाठवावे. उत्तर समर्पक न आल्यास विचार करणें तो करावा. उत्तर आल्यावर मग तयारी करण्यास लागावे. तें ठीक नाहीं. असें कियासा वरून दिसते.

२ शिंदे याचे पलटणात फराशीस बहुत आहेत. टिपूशी मसलत याकरता हा आदेशा आहे. हिंदुस्थान दूर असते तर चिंता नव्हती. नबाबाचे सरकारात फराशीस होते. त्याची जेमत नबाबानी आपले आकत्यारात आणून त्यास काढून दिले तेंही आपला निभाव न लगे याजकरता कंपनीचे सरकाराशीं सफाईकरून त्याचे फौजेत राहिले. यावें उत्तर नानाचे आलें कीं शिंदे याचे खानगीचे तरतुदींत आहो.

३ कर्णेल बोलले कीं टिपूकडे श्रीमताची पत्रें जाण्याचा शशीक भारी आहे. असे कलम त्यातून व चिमपटणाहून वातमी आली. बहुशा वकील गेला असेल यावरून सशम आमचे मनात आहे. नानानीं उत्तर केले कीं श्रीमतास विचारून सागूं.

—

३

१ जनरल कलकत्तेकर याचे पत्र पेशवेसरकारांत छ. २२ जमादीला आले त्यात मजकूर. आमचे पत्राचें जाबात मजकूर हा कीं टिपूसुलतान याशीं तिन्ही शीरक सरकारातून करार आले. त्यात खुलष नसता सुलतान मवसुफाकडून हारकत नाहीं. रात आली ताजुक आहे. रयतेची आबादी व मुलखाची नीगा हावजी मजूर खातर असे. सुलतान महसुब यास पत्र लि-

हिण्याची तदबीद व हारीफाचे गैरचाहीस हुशारी व निगाहावची मुनसब टिपूसुल्तान याणीं करारांत खलप आणील्यास तिनी सरकारांत यावें

श्री

१७१९, पिंगलनाम संवत्सरे, सुरुसन, समान तीसैन मया तैन व अलफ, सन १२१०, संवत १८५४, राजशक, १२४ इसवी १७९७ व १७९८

१ नाना फडणीस घराहून कारभार करीत, त्रिंबक नारायण परचुरे यांजकडे तारिख घाळावयाचें काम, नारोपंत चक्रदेव नानाचे व श्रीमंताचे मध्यें जाण्यायेण्यास होतें, व फौजेचें काम त्यांजकडे होतें

२ अमदाबादचा सुभा चिमाजीआप्पा याचें नांवें करून केशव कृष्ण यांजकडे मामलतीचें काम सांगितलें होतें तें दूर करून आबाजी कृष्ण शेलूकर यांजकडे सांगितलें छ. १९ सवाल

३ दादा गद्रे याणीं सदाशिव पेठेंत देवालय मुरलीधराचें बांधले त्याची आर्चा वैशाख शुद्ध १० शनवार छ ८ जिल्कादी केली ते दिवशी मेस्तर बेट याचे पल्टणचे लोकांची व अर्बांची फटफट त्या देवळाजवळ होऊन शेंपन्नास मनुष्यें ठार पडलें नंतर मुसोमोन्रम व शाहामीरखान दरम्यान पडून कज्जा सोडला कज्जाचें कारण विशेष नव्हतें देवाजवळ आरब राहात होते, तिकडून मेस्तर बेण्याचे लोक जाऊ लागले त्यांस आरबानें मना केलें, तें त्यांनीं ऐकलें नाहीं त्याजवरून लढाई सुरू झाली

४ नगरचा किल्ला व दाहा लक्षांची जहागीर शिंदे यास देऊं करून करार नानानी केल्याप्रमाणें त्यास दिली मोरो बाबुराव फडणीस त्या किल्ल्यांत आटकेस होते, त्यास तेथून काढून त्रिंबकास ठेविलें

५ चिमाजीअप्पा याचे दत्तविधान फिरवून चिमणाजी माधवराव होते ते चिमणाजी रघुनाथ केले महादेव दिक्षित आपटे व महेश्वरशास्त्री द्रवीड याणीं दत्तक करावयास शास्त्रार्थ सांगितला त्यांजवर बाजीरावसाहेब यांची बेमर्जी होऊन दरबार मना केला

६ चिमणाजीअप्पाचे पहिलें लग्न छ. १८ जिलकाद वैशाख वद्य ५, मंगळवारीं झालें. मोरोपंत दामले यांची कन्या नांव सिताबाई ठेविलें.

७ रघोजी भोसले सेनासाहेबसुभा आषाढ वद्य ४ गुरुवारीं १८ मोहरमीं नागपूरास जावयाकरता निरोप दिला. सबब गढेमडळ चोरोगडसुद्धां त्यास घ्यावयाचे नानानीं ठरविलें. त्याच्या सनदा पेस्तर स. २७ जिल्हे दिल्या असेत.

८ श्रीधर लक्ष्मण मुनशी व कृष्णराव माधव व रामचंद्रदादा निसबत रघोजी भोसले यास परगाणे जळगाव प्रात वऱ्हाडेपैकीं ढेहे ८ इनाम दिले स. १७ सफर.

९ बाळाजीपत पटवर्धन व भिवजी काळे यास पागा दिल्या.

१० पर्वतीची दक्षणा चार ख्वासे बसून वाटावयास प्रारभ केला.

११ मशिरनि मुलुख यास हैदराबादेस जावयास निरोप श्रीमताचा घेतल्याशिवाय गेले. खरड्याचे स्वारीस नवाबाचे सरकारचा मुलुख घेतला होता तो नानानी बाजीरावसाहेब याजकडून माघारा देविला. रुसकतीवाचून देऊं लागले. त्याचे मनात वाकडेपणा नसावा. दोस्ती साफ चालावी, ह्मणोन सदाशिव माणकेश्वर यास पत्र श्रीमताचे गेलें त्यात लिहिले आहे. मशिरीन मुलुख हैदराबादेस गेल्यावर नुरुदी हुसनखान ऊर्फ बोडखान याचे बधु नवाब निजामजग याचे निसबतीस वीस हजार फौज व पराडानल दुर्ग किल्ले त्याचे हवालीं झाले. सलाबतखान व सुभानखान वगैरे फौज निजाम जंग याचे तेनातेस आली. निमामजग याजवळ नानानीं आपले तर्फे जनार्दन शिवाजी मस्कर व त्रिंबकराव साठे यांस ठेविले. फौजेची छावणी पढरपुराचे आसपास सरहोदवर भीमा पार होती. पुढे नाना फडणवीस मृत्यु पावल्यावर मस्कर यास निजामजंग याणीं कैद केले. पुढे निजामजग यास हैदराबादेस बोलावून घेऊन किल्ल्याची घालमेल केली, व फौज त्याची दूर झाली. महाडास नाना असता गोविंदराव भागवत याचे विद्यमानें चवदा कलमाची याद नवाब यास मखलाशीची करार करून दिली.

त्याजवर नानाचा करार

त्याजवर नानाचा करार करून दिली ची चिट्टी लिहिली त्यांत नव्हता याजकरता रघोत्तमराम यास नानद आणाल तेव्हां करार लिहिलें आहे आहे की जे समयीं तुह्मी या वर आमचे हातचा करार करून देऊं, ती याद सही व मान्य असें यादी हें कराराचें पत्र लिहिल्या नाहीं ह्मणोन दखला वहादर संशय घेतील, यासवर लाखरम पत्र त्याची नकल प्रमाणें आमलांत येईल ह्मणोन छ १७ र कलमाचा तपशील लागला राबीसन साहेब यांजवळचे कागदांत आहे पवद याजपासून पाच कलमाची नाहीं व नाना पुण्यास आल्यावर महिरीन मुलुख नाहीं याद करून वेतली आहे त्याचाही तपशील सांपडे ८ मगळवारीं झाला

१२ तुकोजी होळकर याचा काळ श्रावण व सफर पुढें काशीराव व त्रिया काशीराव होळकर याणी केली छ २ गादीशी वेऊन दाभाडे यां मल्हारराव यांचे बनेना मल्हारराव आपली फौज करतां काशीराव होळकर जवळ राहिले त्याजकडे आंतून नानाचें लक्ष यासर्दा यास दरबार खर्च व याणी दौलतराव शिंदे यांस ऐवज रोख व सुधरावयाचे ठरविलें त्यांज इनाम गांव द्यावयाचे कबूल करून मल्हारराव यास मल्हारराव याणी शिपाय करून शिंदे याणी धरावयास फौज पाठविली, परंतु व॥ ९ ठ २२ रवि गिरी केली जमेत थोडी यांजमुळें मारले गेले माहपाई चाकरीस होता तो छायक त्याजवळ लाख रुपये बोली करून एक शिते ते ठार पडले त्याची ठार पडला आणखी लोक मारले गेले लोणीकर होवर्तमान समजतांच तिणें बापको शितोळे याची लेक लोणीस होती तिला मल्हारराव याची बायको प्राण सोडला यशवंतराव होळकर पळोन गेले कारभारी पुण्यांत येऊन जिजिबाई गरोदर होती त्यास घेऊन मल्हार रामजी पुत्र झाला त्याचें नांव कुमठे यांचे वाड्यांत राहिले जिजीबाई प्रसूत होऊन खंडेराव होळकर ठेविलें ति पोंचवावयास श्रीमंत

१३ गणपतीचा प्रसाद पाड्यांत झाला गणप पापडतारा गेले मार्गे मंदारीत वसून जात होते

१४ कुलाब्याचे संस्थान रघोजी अंग्रे याचे तिर्थरुप येसाजी अंग्रे रेवदड्यास राहात होते. त्याचा दावा संस्थानावर नसता बाबूराव आंग्रे, दवलतराव शिंदे याचे मामा त्या आग त्याने श्रीमताची परवानगी घेऊन, येशवतरावाकडे हरीपंत भावे याजवर बराबर पलटण देऊन कुलाब्याचा किल्ला शिंदे याणी घेऊन बाबुराव आंग्रे यास दिला. राघोजी आंग्रे याचे हवाली केले. त्याणी कैदेत ठेविले. नंतर दसऱ्याचे दिवशीं श्रीमंतानी संस्थानची वस्त्रे बाबुराव आंग्रे यास देऊन वसई सरखले किताब दिल्हा.

१५ परगणे होनगुद माहाल तोफखाना याकडे सरंजामास होता. तें ठाणे घ्यावयाकरितां रायचुराहून मुदगलकर याणीं तोफा व फौज आणविली. सबब धोंडोपत गोखले फौज बाळगून कर्नाटकात होते, त्यास होनगुंदचे कमाविस-दारानीं कुमकेस बोलाविले. त्यावरून गोखले याणी फौजसुद्धां जाऊन मुगदल-करासी लढाई दिली. तोफा पाडाव करून आणिल्या. त्यावरून गोखले यास सर्फ राजीचे पत्र रजबचें पत्र गेले, त्याची नकल चिटणीसाजवळ आहे त्यावरून बाजीरावसाहेब यांचा मिजाज कायम नाहीं. पहिल्याने शिंदे याशी राजकारण केलें नतर पुण्यात नानाची भेट होतांच त्यास मिळोन शिद्यार्शी विघडले. पुढे नाना कारभार करीत असतां त्याजविषयीं अनेक प्र-कारें वाकडेपणा मनात आणू लागले. त्यास अनुमोदन अमृतरावसाहेबाचे पडत गेले. व सर्जेराव घाटगे साह्य मसलतीस झाले. तेव्हा नानास शिंदे याणी कैद करावे असें केले. त्या राजकारणांत नानाचे भरवशाचे यशवंतराव घोरपडे मिळाले. त्यानी शिद्याविषयीं नानाची खातरजमा केली. शिंदे नानाचे घरीं आले. मेजवान्या देऊन सफाई दाखविली. तत्राप नानास भरंवसा न येई. तेव्हा मुकरेसाहेब याजकडून शिंदे याणीं इनाम देऊन लष्करात मेजवानीस यावे असें ठरविले. पौष वद्य १३ रविवारीं छ. १२ रजब शिंदे याचे लष्करांत वानवडीवर मेज-मेजवानीकरतां गेले. तोंपावेतों नानास धरावयाचे शिंदे याणी मुकरेसाहेब यास कळो दिले नव्हते. नाना लष्करात दाखल जाहल्यावर कळविलें, त्यावरून

त्याचें बोलणें पडलें कीं, ही गोष्ट होणार नाहीं तेव्हां दसख्ता शिंदे यांणी मरासद अली वैद्य याजपासून त्याशीं बोलोन रुकार घेतला मुळेसाहेब लाचार होऊन रुकार दिला नंतर नानास व त्यांजबरोबरचे मंडळीस कैद केलें शिवंदिचे लोक काढून दिले व कांहीं पळून आले नानाचे वाडे व सरंजाम वगैरे श्रीमंतानीं जप्त केले सरंजामाच्या जप्तीच्या सनदा मुजुमदार यांचे घरीं बार आहेत, व बाळाजी जनार्दन याचे निष्ठत अतर दिसले सरकार लक्षाची वर्तणूक नाहीं याजकारितां दौलतराव शिंदे आलीजा बहादर यास आज्ञा करून मशारनिल्हे नजरबंद केलें तुह्मास कळावें, आपले स्ने हाचे सिलसिले सरकाराशी पूर्वीपासोन आहे त्याप्रमाणें असावें ह्मणोन पत्र छ १२ रजवान बाजीरावसाहेबांनीं पाठविलीं ती तपशील

१ श्रीमंत महाराज छत्रपति
२ करवीरकर महाराज
३ सेनासाहेब व सुभा
४ गोविंदराव गाईकवाड
५ टिपू
६ माखीट ईमज मुंबईकर.
७ फिरंगी गोंवेकर.
८ जंजीरेकर हाबशी

---

८

सदरहुप्रमाणें यादीची नकल महिपतराव चिटणीस याजवळ आहे, त्याजवरून लिहिलें असे नाना कांहीं दिवस शिंयाचे लष्करांत होते तेथून नगरचे किल्ल्यांत पाठविले

१ नाना, शिंदे यांचे लष्करांत गेल्यावर श्रीमंतानीं बाबा फडके, आप्पा बळवंत नारोपंत चक्रदेव, गोविंदराव पिंगळे व नारो निळकंठ मुजुमदार, त्रिंबकराव परचुरे, नारायणराव वैद्य चिटणीस वगैरे सारे मंडळीस वाड्यांत बोलावून कैद केले

२ कारभार, रावसाहेब यास घेऊन बाजीरावसाहेब जातीनें आपणच करूं लागले. तारिख आपणच घालो लागले. फौजेचे काम बाळाजीपंत पटवर्धन यांजकडे सांगितलें. अमृतरावसाहेब याचे लक्षानें कारभारांत गोविंदराव काळे व शिवराम नारायण थत्ते वागों लागले.

३ परशराम रामचंद्र यांचे सरजामाची जप्ती मोरो बापुजी यांजकडे सांगितली छ १७ रजब.

४ कोंकणचा सरसुभा विनायकराव अमृतेश्वर याचे नांवे करून वस्त्रें दिली छ १० साबान, सरसुभ्याचें काम अमृतरावसाहेब याणीं गणपतराव जीवाजी जोग याजकडे सांगितलें.

५ करवीर महाराज फौजसुद्धां तासगांवास उपद्रव करून कर्नाटकात जाऊन पेशवे यांचे मुलखात ठाणे घेतली लुटले. व वल्लभगड किल्ला घेतला. बेळगांवास उपद्रव केला. त्याजविशी मुरारजी पवार याजबरावर बाजीरावसाहेब याणीं पत्रे करवीर महाराज व रघुनाथराव माने यास पाठविली; त्यांत मजकूर ठाणीं सोडून ध्यावीं व ऐवज घेतला असेल तो माघारा ध्यावा व मुलखास उपद्रव करू नये ह्मणोन छ. १२ साबान सनसमानची पत्रे गेलीं त्याचीं उत्तरें महाराजाची व माने याची आली. त्यात वल्लभगड हवाली करून घ्यावयास कोणी पाठवावा. ह्मणजे त्याचे हवाली करून मुलखास उपद्रव होणार नाहीं ह्मणोन आली. त्याच्या नकला महिपतराव चिटणीस यांजवळ आहेत व करवीकर याची फौज टिपुसुलतान याचे मुलखात जाऊन मेल विदनुर तालुका लुटुन व वरकड तालुक्यांत उपद्रव केला येविषयीं त्यास ताकीद होऊन लूट केली आहे ती ठाणे देऊन पुढे उपद्रव न करीत असे व्हावें ह्मणोन टिपुसुलतान याचें पत्र आलें. त्याचा जाब कोल्हापूरकरांचे सरदारास निक्षून ताकीद रवाना केली. असे ह्मणोन छ. २७ सफर सन तिसांत गेला आहे त्याची नकल महिपतराव चिटणीस याजवळ आहे त्यांजवरून नानाफडणवीस कैद झाल्यावर छ १२ साबानचे पत्र गाईकवाड यांस गेले, त्यांत दुसरा अमलदार अमदावादेस रवाना होत आहे. तोंपावेतो

आबाजी कृष्ण यांजकडील कारकून यांस वसूल घेऊन द्यावा ह्मणोन सदर-हूची नकल चिटणीस यांजवळ आहे त्याजवरून

१ श्रीमंतांचे वाड्याभोंवते पल्टनचे लोक होते ते उठोन गेले छ १ रमजान सरकारचे लोक आबा काळे यांचे निजमतीचे पल्टणचे चौकी पहाऱ्यास बसविले

२ दौलतराव शिंदे याणीं सखाराम घाडगे सरजेराव याचे कन्येशीं लग्न केलें नांव बायजाबाई ठेविलें समारंभ मोठा झाला फाल्गुनमास व बाळाबाई चितोळे यांची कन्या यशवंतरावदाभाडे सेनापति यास दिली. लग्न मार्गेशीर्षमासीं झालें

३ नानाचे निसबतीची मंडळी वाड्यांत कैदेंत होती त्यापैकी त्रिंबकराव परचुरे याणीं बाळोजी कुंजर याचे विद्यमानें आपले जवळचें सारें द्रव्य सरकारांत समजाऊन त्यांपैकी तीन लक्ष रुपये शिपायाकडे रोकड होते ते दिले, आणि श्रीमंताचा निरोप घेऊन फाल्गुन व॥ ६ गुरुवारीं छ. १९ मनाजी काशीयात्रेस गेले खामगावचे अन्नछत्र त्याचे होते त्याची नेमणूक आहे व कल्याणपैकीं त्याचे हुजूरचे दसरचे आसामी बांबदचे दोन हजार रुपये दरसाल त्रिंबकराव जिवंत आहे तो काशीस पाठवावें याचा करार श्रीमंतांनीं करून सनदा दिल्या नानास कैद केल्यावर अमृतरावसाहेब याणीं कारभार करावा असें त्याचें मनांत होतें परंतु दौलतराव शिंदे याचें लक्ष बाजीरावसाहेब याजकडे व बाजीरावसाहेब यांचें मनांत रावसाहेब याणीं मुखत्यारी करावी असें नव्हतें याजमुळें रावसाहेब यांचें मनांत वांकडेपणा येऊन जुन्नराजवळ गणपतिचें दर्शनास जावयाचे निमित्तानें बाहेर डेन्यास फाल्गुन शुद्ध ११ छ १९ रमजानी जाऊन राहिले

श्री

शके १७२२ रौद्रनाम संवत्सर सुहूर सन, इहिदे, मया, सन व अल्फ, सन १२१० संवत अठराशें सत्तावन, १८५७ शक १२७ इसवी सन १८०० व १८०१

१ अमृतरावसाहेब डेरा करावयास श्रावण प्रतिपदेपासून लागले, बाबा

रावसाहेब त्यांजवर देणे करून कारभार कचेरी होऊं लागला. नारोपंत चक्रदेव फडणीसीची तारिख करीत होते चैत्र शु॥ १.

२ अमृतरावसाहेब याणीं वडगावास बारव विहिर केली तिचें उद्यापन वैशाख शु॥ ६ छ. ४ जील्हेजी केलें.

३ नारोपत चक्रदेव व वजाबा शिरवळकर चिमणाजी खंडेराव असे नानास दत्तक पुत्र घ्यावा असे श्रीमताजवळ व शिंदे यांजवळ बोलाने ठरावात आणिले. श्रीमतांचे मनांत नव्हते, परतु चक्रदेव वगैरे यांस कैद करावयाकरतां नाद चालविला. श्रीमंतानी शिंदे यास सकेत करून त्यास वाडयात बोलाविले ते जेष्ठ व॥ ७ सह अष्टमी शुक्रवारीं छ २० मोहरम शिंदे फौजसुद्धां वा-वाडयांत आले. शामीरखान वगैरे फौज चक्रदेव याणीं वाडयांत बोलाविली. शिंदे आल्यावर दत्तकाचे ठरावावयाकरता नारोपंत चक्रदेव, वजाबा शिरवळ-कर, धोंडोपत लिमये, राघोपत गोडबोले, लक्ष्मणपंत चक्रदेव, चिमणाजी खंडेराव असे आत बोलाऊन कैद केलें. ननर शामीरखान यास लोकसुद्धा प्रहर रात्रीस वाडयांतून बाहेर काढून दिले. शिंदे याचे लोक वाडयांत होते.

४ नाना फडणवीस यांचे वाड्यान अरब होते ते न निघत. याकरतां तोफा त्यांचे वाडयास जेष्ठ व॥ ८ शनवारीं लाविल्या. पश्चिमेकडील एक कोपरा जाया झाला व वाडयात गोळे जाऊन पडले. दुसरे दिवशीं जेष्ठ व॥ ९ छ. २२ मोहरम रविवारीं आरब बाहेर गेले. शामीरखान पठाण भवानी पेठेंत होते. त्याजवर तोफा शियाकडून येऊन त्याचे वाडयावर गोळे मारून त्यास लष्करांत नेलें. तेथून काढून दिले जेष्ट व॥ १० सोमवार छ. २३ मोहरम.

५ अमृतरावसाहेब व बाबासाहेब व अप्पासाहेब नानाफडणीस याचे बायकांचे समाधान त्याचे वरीं गेले. जेष्ठ व॥ १४ छ. २७ मोहरम

मोरो बाबुराव फडणीस जुन्नरास येऊन राहिले होते ते आषाढ शु॥ १ छ. २९ मोहरम सोमवारीं पुण्यास आले. गारपिरावर श्रीमत त्रिवर्ग व दौलतराव शिंदे वगैरे एक जागा बसून मोरो बाबूराव येऊन भेटी झाल्या.

शिंदे आपले गांवास गेले मोरो बाबूराव बाबासाहेबांचे मागें अंबारींत स्वरी घेऊन बसले अमृतरावसाहेब व चिमणाजीअप्पा एके अंबारींत होते त्यांचे मागें मोरो बाबुराव यांचे पुत्र बसले अंबारीचे पुढें व बाबासाहेबांचे मागें आम्ही पुरंधरे यांची अंबार, याप्रमाणें स्वारी रवीवाराहून बुधवार पेठेनें बाहा उजवा वालोन वाड्यांत दाखल झाले

६ गोविंदराव कृष्ण काळे कैदेंत होते त्यांस चिट्टी बाजीरावसाहेब याणीं पाठविली कीं, नारोपंत चक्रदेव वगैरे मंडळी यांची चाल आह्मांस दाखवून दवलत करावी नाना फडणीस यास नगराहून आणावयाचें करून त्यांची जरब आह्मांवर ठेवून कामकाज चालूं लागले ती॰ तुमची आमची बोलणीं समक्ष होतच होती सांप्रत या चालिची पराकाष्टा दिसण्यांत आली ती काय लिहावी ? समक्ष बोलण्यांत येईल जेष्ठ व॥ ७ मास मशारनिल्हे आदिकरून चिमणाजी खंडेराव व बज्याबा शिरवळकर वगैरे मंडळी नजरबंद केली नतर दवलतींत दिसावयाजोगा माणूस हुजूर नाहीं तुह्मी पेंचांत, शिंदे याचीं बोलणीं तुह्मांविषयीं तेव्हांची त्यांस कसेंही करून तुमची मुक्तता होय या प्रयत्नांत मी आहेच, दवलतींत माणूस दिसावयाकरितां जुनराहून मोरोबा॰दादा फडणीस यास आज आणून गारपिरावर भेट होऊन खवासीत घेऊन पुण्यास आले तुह्मांस कळावें ह्मणून चिठ्ठी पाठविली त्यांचा मसुद राबिसनसाहेब बहादूर यांचे कागदांत सांपडला त्यावरून

१ नारोपंत चक्रदेव कैद केले ते व बजाबा शिरवळकर व राघोपंत गोडबोले व धोंडोपंत लिमये व लक्ष्मणपंत चक्रदेव एकूण पांच असामी बाळाजीपंत पटवर्धन ग्वामा पागेसुद्धां व भिवजी नाईक अशी बराबर देऊन जुनरास आषाढ शु॥ १२ शीम नेले हाडपसरास पोंहचविलें चिमणाजी खंडेराव प्रतापगडास पाठविले

२ दौलतराव शिंदे यांची ग्वानगी हिंदुस्थानांत करावयाचे ठरविलें त्याजवरून श्रीमंतांचे दौलतीचे बंदोबस्ताची कलमें शिंदे यांजकडून करार

करून घेतला. त्याची याद व शिंदे यांस सरकारांतून ऐवज घ्यावयाचा ठरला त्याची याद रावीसनसाहेब बहादुर याजवळचे कागदांत आहे त्यावरून.

१ श्रीमंतांनीं दौलतीचे बदोबस्त विषई कलमें लिहून याद शिंदे यांजकडे वानवडीस पाठविली त्या कलमावर शिंदे याणीं करार करून याद सरकारांत पाठविली. यादीची तारिख छ. २ सफर आषाढ मास सन मजकूर— कलमें—

१ सरकारचे व जातमुवारकेचे लक्ष सोडून जे असतील त्याचा बदोबस्त मनोदयारूप केला जाईल. त्यास तुह्मी अनुकूल असावे. सदरहु अन्वयें आह्माकडून अनुकूळतेंत कमी होणार नाहीं. येणेंप्रमाणें करार.

२ पुण्यांतील व प्रांतांतील दादी फिर्यादी तुह्माकडे येऊन ताहाकयांत पत्रें व हुजुर चिट्या घेतात त्यास या उपरी कोणी दादी फिर्यादी आल्यास हुजूर पाठवावें. परभारें तुह्मांकडून पत्रें व मसाले वगैरे होऊं नये व हुजुर चिट्याही होऊं नयेत. सदरहु अन्वयें वर्तणुक होईल. हा करार हरएक जाती कामाकरतां तुमची चिठ्ठी हुजुर येऊ नये. सरकारातून विश्वासुक बोलणार त्यांशीं तुह्मी बोलावें. मशारनिल्हे जी हुजुर विनंती करून जाबसाल वाजवी असतीलसे उलगडून घेऊन तुह्मास सांगावें.

सदरहु अन्वये सरकारांतून आज्ञा होईल त्याशी जुजवी जाबसाल असतील ते बोलण्यांत येतील. येणेंप्रपाणे करार.

३ तुमचे खानगीचे खर्चीविषयीं तुह्मी सरकारात विनंती केली याजवरून सरकारचे व तुमचे विचारें सदतीस लक्ष रुपये तुह्मांस द्यावयाचें ठरलें. त्यास यामागें सरकारांतून व सरकारचे कारकून वगैरे यांजपासून ऐवज घ्यावयाचा करार होऊन तुह्मी दस्तऐवज घेतले त्यांपैकीं वसूल पाउन, बाकी राहिली ती याउपरी तुह्मी मागू नये. दस्तऐवज चिठ्या वगैरे असतील ते सरकारांत माघारे घ्यावें.

४ खानगीचे खर्चास सदतीस लक्ष रुपये ठरले त्याप्रमाणें पचवीस लक्ष रुपये तूर्त घ्यावें. त्याची निशा सावकार खुशालचंद याजकडून देववावी

आलाहिदा यादी मुदतीची ठरेल त्याप्रमाणें एक महिन्याचे आंत निशा घ्यावी व बारा लक्षांच्या वराता बाळाजी गोविंद बुंदेले व शिवराम हरी झांशीचे मामलेदार यांजवर करून घ्याव्या यामार्गे सरकारचे कारकुनाचे दस्तऐवज असतील ते शोध करून निघतील ते माघारे दुसरे विल्हेस पडले असल्यास त्याजबद्दल जाबसाल राहिला नाहीं, येणेंप्रमाणें करार.

५ तुम्हांकडील दोन पलटणें व एक हजार फौज हुजुर चाकरीस राहील त्याणीं सरकारचे आज्ञेप्रमाणें चाकरी करावी हुकमात वागावें त्याचे मदत खर्चास पांच लक्ष रुपयांचा वसुली सरंजामकडील दिला आहे

पांच लक्षाचा सरंजाम पल्टणें व फौज राहील त्यास वसूल जमेच्याकडील घ्यावा सरकारआज्ञेप्रमाणें चाकरी करून हुकमांत वागतील येणेंप्रमाणें करार.

६ सरकारांतून तुम्हांस जाण्याविषयीं आज्ञा होईल तेव्हा कांहीं अडचण न घालतां कुच करून जावें आज्ञा झाल्याविरहीत कुच करून जाऊं नये मसलहीनुरूप जाणें राहाणें स्वामीचे सेवकाचे विचारें ठरेल त्याप्रमाणें करण्यांत येईल सरकार आज्ञेप्रमाणें निरोप घेऊं न जाणें झाल्यास कांहीं अडचण घालणार नाहीं येणेंप्रमाणें करार.

७ प्रांतांतील सरकारचे व सरंजामी यांजकडील गांव खेडीं वगैरे येथें तुम्हांकडून व तुम्हांकडील तालुकेदार याजकडून जप्त्या झाल्या असल्यास उठवाव्या व याउपरी होऊं नयेत

सदरहू अन्वयें जप्त्या उठवून देऊं येणेंप्रमाणें करार

८ स्वामीचें यांकडे पहाणार व लक्षांत नाहींत त्याचें पारपत्य स्वामीनी करून निष्कंट करावें आशी सर्व प्रकारें अनुकूल ऐशी तुमची विनंती त्यानें आणि दवलतीचे व जासमुयारकेचे यांकडे पहात असतील व लक्षांत नाहींत व उद्योगींही नाहींत अशांचें पारपत्य व बंदोबस्त सरकारांतून होईल, त्यांस तुमची अनुकूलता असामी आज्ञा होईल तसें करीत जावें, म्हणजे निष्कंट होईल

सरकारचे माकडे पहात असतील व लक्षांत नाहींत त्यांचें पारपत्य

सरकारांतून व्हावे. त्यास सेवकाकडून आज्ञेप्रमाणें अनुकुळतेंत कमी पडणार नाहीं येणेंप्रमाणें करार.

९ सरकार तालुक्यात तुह्माकडील पागे पतगे मनस्वी उपद्रव देऊन खंडण्या वगैरे ऐवज घेतात. तो मना करून, याउपरी सरकार प्रांतांत पागे पतगे वगैरेस निक्षून ताकीद पाठवून बोलवून घ्यावे ह्मणजे सरकारचे लागदार लावणीच्या बंदोबस्ती करतील. तुह्मी निक्षून ताकीद केली असतां उपद्रव करूं लागल्यास त्याचे पारपत्य करावे. पागे पतके व कपुवाले यांचा उपद्रव लागतो त्याचा बदोबस्त आज्ञेवरून होईल. कोणी लबाडी केल्यास पारपत्य करावयास येईल. येणेंप्रमाणें करार.

१० सरकारचे मातबर व महान सरदार वगैरे व पर दवलतदार यांजकडून सरकारचा ऐवज वगैरे जवासाल उलगडून ध्यावयाचें तें कराराप्रमाणें त्यांजपासून सरकारांतून उलगडून घेतले जातील. कोणी दिकत केल्यास जरब देऊन कामे उगवलीं पाहिजे. त्यांस तुह्मीं अनुकूळ असावे.

वाजवी ऐवज सरकारचा येणे वगैरे जावसाल असता कोणी दिकत करील त्याजवर जरब देऊन उलगडून ध्यावे येविपयी शेवकाकडून अनुकूळता होईल येणेंप्रमाणे करार.

११ जात मुबार केले दवलतीचा बदोबस्त करून सर्वावर दाब व तेज असावे हें तुमचे मानस. त्यास जात मुबारकेकडून दवलतीचा बदोबस्त होण्यास तुमची अनुकूळता पाहिजे तशी सबाह्याभ्यांतर कायम असावी. हार कोणाचे समजाविल्यावाचून संशय घेऊन, दरम्यान कलुष तुह्मी चित्तांत आणूं नये. कोणी कांहीं समजाविल्यास हुजूर विनंति करून स्वच्छता वरचेवर करून घेत जावी. प्रांतांतील तुह्मी उपद्रव व पत्रे व चिट्टया मसाले मना केले ह्मणजे दाब व तेज तुमचे मनोदयानुरुप निदर्शनास येईल.

स्वामींनीं जातीनिशीं दवलतीस आळा घालोन बदोबस्त करावा हीच इच्छा. त्याप्रमाणे स्वामीकारितां सेवकाकडून कोणतेही प्रतिकूळ पडणार नाहीं. कोणाचे समजाविल्यावरून स्वामीचे चित्तात व सेवकाचे चित्तांत संशय देऊ

नये राजकारणसंबंधीं व सल्लामसल्लतीचा दाखला पहिलेपासून सेवकाकडे ध्यावयाची चाल आहे त्याप्रमाणें सरकारांतून आज्ञा होत नाहीं परस्परें कोणाचें सांगितल्यावरून चित्तांत संशय आल्यास, सरकारांतून आज्ञा होत जावी इकडूनही विनंति होईल संशय दोन्हीकडेही राहूं नये ज्यांत स्वामीचा दाम तेज प्रतापाची वृद्धि होय तेच करण्यांत येईल येणेंप्रमाणें

---

११- करार

१ शिंदे यांस ऐवज द्यावयाचा ठरवून बाजीरावसाहेब याणी कराराची याद करून दिली छ १७ रूर आज्ञा मास ७

१ फौजेचे खर्चाबद्दल रुपये,

३७०००००

२५०००००

सुर्तें नक्त रुपये सावकारी निशा

१२०००००

बराश हिंदुस्थानांत बाळाजी गोविंद बुंदेले व शिवराम हरी झांशीवाले यांजवर दावा.

---

३७०००००

सदतीस लक्ष रुपये तुह्मांस द्यावयाचे ठरले त्यांपैकीं बारा लक्षांच्या बराता बाळाजी गोविंद बुंदेले व शिवराम हरी झांशीकर मामलेदार यांजवर द्याव याच्या बाकी पंचवीस लक्ष रुपये राहिले त्याच्या मुदतीची याद अलाहिदा ठरेल त्याप्रमाणें एका महिन्याचे आंत खुशालचंद याची निशा दिली जाईल येणेंप्रमाणें करार फौज व पल्टणें हुजुर चाकरीस राहातील त्यास सरंजाम स्वदेशांत बसुटी वेरजे चाल्वून घ्यावा ने ५००००० रुपये तुम्हांकडील एक हजार फौज दोन पल्टणें हुजुर चाकरीस राहतील, त्याच मदतखर्चास

पांच लक्ष रुपयांचा सरंजाम कच्चा वसूली जमेचा स्वदेशांत लावून दिला जाईल. येणेप्रमाणें करार.

—

२

९ सदरहु प्रमाणें ऐवजाची याद करून दिली.

—

२

---

१ बाजीरावसाहेब व आपासाहेब व मोरोबा बाबुराव फडणीस वगैरे मुत्सद्दी व सरदार शिंदे यांचे कारभारी आबा चिटणीस यांणी आपल्या डेऱ्यांत स्वयंपाक केला. तेथें भोजनास गेले. अमृतरावसाहेब वाड्यातच होते. आषाढ शु॥ ८ छ. ६ सफर सोमवार.

२ अमृतरावसाहेब यांणीं भिवंडी वगैरे सात लक्षांचा सरंजाम घेऊन कोकणांत भिवंडीस जावयाकरता श्रावण शु॥ १ छ २९ सफरी प्रातःकाळीं वाड्यांतून निघून गेले. स्त्री सौभाग्यवति वहिनीबाई व पुत्र विनायकराव वाड्यांत होते. देखावे अमृतरावसाहेब करीत होते ते राहिले. बाजीरावसाहेब देणें व फडणीसीची तारीख करून कारभारास सदाशिव माणकेश्वर व गोपाळराव मुनसी व बाळोजी कुंजर होते. मोरोबा फडणीस आपले घरीं असत.

३ नाना पुरंधरे यांचे पुत्र बज्याबा यास पुत्र दत्तक माहिपतराव त्रिंबक ऊर्फ नाना पुरंधरे यांणीं सरंजामी याचा कारभार करावा ह्मणोन श्रीमंतानें सांगितलें. श्रावण मास पागेचे काम निळकंठ महादेव पुरंधरे याजकडे सांगितले. त्याचे तर्फेनें सदाशिवपंत फाटक पागेचे काम पहात होते.

४ श्रावण मासचा देकार पाच दरवाजे मिळोन दिला. अडीच लक्ष रुपये खर्च झाला. बाजीरावसाहेब व आपासाहेब व मोरोबा फडणीस देकार घ्यावयास होते. दवलतराव शिंदे देकारांत आले होते. प्रदक्षणा सर्वांनीं

केल्या समारंभ यथास्थित झाला ब्राह्मण वाड्यांत व पर्वतीचे मिळोन वेचा तीस हजार झाले

५ ढेंढेरे याजकडे हुजुर पागा होती त्याजवर नारोबा आठवले याची चौकशी नेमली श्रावण शुद्ध १२ छ ११ रबिलाखल

६ मोरो बाबुराव फडणीस यांस तारिख घालावयास विजयादशमीस सांगितलें

७ नाना फडणीस मृत्यु पावले बाळोबा वगैरे मारले गेले व पदरचे मंडळीपैकी बहुतेक कैद केले अमृतरावसाहेब निघोन गेले आतां शिंदे गेले असतां बखेडा होणार नाही असें बाजीराव साहेब याणी मनांत आणून कार्तिक शु॥ १२ छ १० जमादिलाखरी दौलतराव शिंदे यांस निरोप दिला खंडेराव होळकर त्यांचे हवाली केले कार्तिक अखेर पावेतो शिंदे वानवडीवर राहून जांबगांवास गेले, तेथून पुढें गेले सर्जेराव कागलास जावयाकरितां राहिले बराबर गेले नाहीत गाईकवाड यांजकडून दाहा लक्ष रुपये शिंदे यास सरकारांतून देवविले आवजी पाटील निसबत गाईकवाड याणी बाबोलीचे मुक्कामी शिंदे याचे लष्करांत जाऊन विसा दिवसांत ऐवज बडोद्यांत पाठवून द्यावा याचा करार करून खास हवाला घेतला नरसिंह खंडेराव विंचुरकर व रंगराव राजे बहादुर व पवार रघुनायराव बळवंत जायगांवकर यांणी चार पतकें बराबर घ्यावी व काशीराव होळकर यास बराबर घ्यावें असें निरोपसमयीं ठरलें येविषयीं शिंदे यांची पत्रें कीं गाईकवाड याजकडील ऐवज पटला नाही व खंडेराव होळकर व चार पतके यांस आज्ञा होऊन रवानगी सत्वर झाली पाहिजे म्हणून सरकारांत व बाळोजी कुंजर यांस छ २१ फजल व १६ फजालची पत्रें चाळीसगावचे मुक्कामाची आली ती रानिसनसाहेब याजवळचे कागदांत सांपडली ती त्यावरून—

यशवंतराव होळकर यांचे पत्र छ १२ जमादिलाखरचे सरकारांत आलें कीं, शिंदे याजकडील बाया याणी पुण्यापासून येथपर्यंत मुल्खाची धूळ

करून कोठे ठिकाण राहूं दिला नाहीं. पुढेही येथूम वहकुम जावयाची चाल पाहून त्याची खातरजमा करून जवळ जावणोन घेतल्या असतां मुलखांत धूम आरंभून उज्जनीचा विध्वंस करावा ही दृष्टि पाहिली. मार्गाची चाल एकही दिसेना. निरोपाय जाणून स्वाधीन करणें प्राप्त होऊन, आसमंतात वेरा घालोन घ्यावा तों ज्वारीचे शेतांतून निघोन उज्जनींत गेल्या. सभोंवति नाकेबंदी ठेविली आहे. कदाचित् निघोन गेल्यास त्यांचे मागें फौजांची रवानगी करून ज्यांत बदोबस्त तेंच घडेल. खर्चे घरचे कलहामुळे पराकाष्टेच्या चाली होऊन कांहीं ठिकाण राहिला नाहीं. याउपरी व इकडील शिंदे याजकडील बंदोबस्त होऊन ऐक्यता राहून व पूर्वरीतीनें सरकार चाकरी घडे तें केले पाहिजेल ह्मणोन पत्र छ. २१ जमादिलाखर कार्तिक व।। ८ मीस आले. त्याचे उत्तर सरकारांतून गेले कीं लक्ष्मीबाई उज्जनींत जातां मेवाडचा रोख धरून निघोन गेल्या ह्मणोन ऐकण्यांत होतें. त्याचे पिछास तुह्मी फौज पाठविली असेल व येविषयीं दौलतराव शिंदे यांणींही तिकडील सरदार इंगळे व जनरल याजला लिहून पत्राच्या रवानग्या केल्या आहेत. त्याप्रमाणें तेही पाठलाग करतीलच. परंतु तुह्मीं त्याची वाट ज्या हाता जिकडे गेल्या असतील तिकडे शोध लावून जलदीनें फौजेच्या रवानग्या करून सरकार आज्ञेप्रमाणें ज्यात हास्तगत ते करणें. बंदोबस्त प्रकरणीं लिहिले त्यांस येविषयीं मल्हार शावजी यांशीं बोलण्यात आलें आहे. लिहीतील त्याजवरून कळेल. मशारनिल्हे सरकार आज्ञेप्रमाणें लिहितील तेच खचीत समजोन इकडील बदोबस्त विषयीं सशय न धरावा. लिहिल्या-अन्वयें करणें ह्मणोन उत्तर पाठविले. होळकर यांचें पत्र व उत्तराचा मसुदा राबिसनसाहेब याजवळचे कागदांत सांपडला त्याजवरून.

१ श्रीमंताची स्वारी मार्गशीर्ष मासीं निघोन सासवडास नाना पुरंधरे यांचे वाडयांत जाऊन राहिले. तेथून जेजूरी, मोरगांव, भुलेश्वर, वाई, वगैरे गेले. पुरंदर पाहिला नारायण याचें दर्शन घेतलें. पुण्यास माघ शु।। ७ मीस दाखल झाले.

२ घसई सरसुभ्याचें काम वामनाजी हरी मराठे यांजकडून दूर करून मोरोबाराव गोविंद बर्वे यांस दिलें तें काम कांहीं दिवस खंडेराव रास्ते व त्यांचा अभ्यंकर करीत होते पुढें बाजीराव बर्वे यांजकडून सरसुभा दूर करून खंडेराव रास्ते यांजकडे सांगितला शिंदे हिंदुस्थानांत गेल्यावर सरजेराव घाडगे कागलास जाऊन माघारे पुण्यास येऊन कुंजर यांचे घरीं खर्चाकरतां धरणें दिलें. तेव्हां श्रीमंतांनीं लोक पाठवून कुंजर यासह सोडून घेऊन सरजेराव यांस पुण्यांतून काढून दिलें ते दरकूच शिंदे याचे लष्करांत गेले

३ श्रीमंतांकडील बाळोजी कुंजर व शिंदे यांजकडील देशमुख व लिंबाजी भास्कर व बाबाजी पाटणकर एक विचारे कारभार करूं लागले सदाशिव माणकेश्वर याजविषयीं खातरी श्रीमंताजवळ बाळोजी कुंजर यांनी करून सरकारांतून जवाहीर वगैरे बाळाजयास देऊन भागानगरास वकिलीवर पाठविलें त्यांचे कारभारी कृष्णाजी भवानी श्रीमंताजवळ राहिले

४ जयवंतराव महार्णवर फत्तेसिंग बहादर यांजकडील सरंजामाची जप्ती सालमजकुरी केली छ १० मोहरम

५ कृष्णाजी दाभाडे यांजकडील सरंजामाची जप्ती सालमजकुरी केली छ २२ मोहरम

६ शिवाजी महाराज कोल्हापुरकर यांस पुत्र फाल्गुन व॥ ७ रविवारी थोरले स्त्रीस झाले त्याचें नांव आबासाहेब ठेविलें

७ नारोपंत चक्रदेव कारभारांत होते तों पावेतों तारिख तेच घालीत होते व मामलती जिल्हेस कोणी पैका देणें व खर्च करणें त्याचे परवानगीनें तारिख होत असे ते कैद झाल्यावर श्रीमंत तारिख घालूं लागले व चिंतोपंत देशमुख यांस माहितगारीकरितां कामांत घेऊन मामलती जिल्हेस लावूं लागले महाली मुलकी काम खुद पाहूं लागले. परकडे राज कारणी कामावर बाळोजी कुंजर वगैरे होते रसद सरकारी व आपली खाजगी जमा व्हावे वगैरे याचा संप्रदाय नवा श्रीमंतांनीं सुरू केला

८ धोंडोपत गोडबोले यांस पलटणे तयार करावयास सांगितलीं.

९ बाजीरावसाहेब यांणीं दौलतराव शिंदे यांस स्वदस्तुर पत्र लिहून पाठविले कीं तुम्हांकडून स्वदस्तूर अलिकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी वरचेवर पाठवीत जावें. समग्र पृथ्वीचे पाठीवर आमचे जन्मांतरीचें तःपश्चर्येचे सोबती एक आपणच सेवक आहेत. आह्माविषयीं किती काळजी आपले जवळ प्राण जीग जीग केले असतील. परंतु माझे जातीविषयीं आपला खंबीर लोभ व निष्ठा एकरूप आमचे मनोदयानुरूप वागावयाचीच राहून मोठ्या मोठ्या माणसाची सागणी मनावर धरली. तीच कारणें जन्मपर्यंत शेवटास जाऊन शेवट गोड व्हावा. आपली उभयतांची कीर्त रहावी हेंच सवाह्यातर आमची इच्छा आह्मास राहून आणून संकटात मोकळे करून, आह्माविषयींचे कल्याण करावयाचेच करावयाचें असा खंबीर भगवंत सत्तेकरून धरून आम्हांस स्वरूपास **आणिली.** आणून उजेडास आणिलें. हें सर्व करणें आपण केलें तसेंच आमचे जन्मपर्यंत निभवावें. आपली अशी सख्य भक्तिची निष्ठा मनांत आणून. अंतःकर्णापासोन प्रसन्न होऊन लिहिण्यात येतें कीं, बाबा आह्मांस आपण आहेत. आह्मीं आपले आहो ह्मणोन पत्र पाठविले. तें राबिसनसाहेब याजवळचे कागदांत सांपडले त्याजवरून.

---

२७

# कित्येक शब्दाची व्युत्पत्ती.

## वऱ्हाड, मऱ्हाड, कऱ्हाड.

मराठा शब्द महाराष्ट्र शब्दाचा अपभ्रंश कित्येक समजतात. कित्येक महारट्ट शब्दाचा हा अपभ्रंश असावा असे ह्मणतात. आणि कित्येक मरहट्ट असे ह्या शब्दाचे मूळस्वरूप असावे असें प्रतिपादितात. पैकीं दुसरी व्युत्पत्ति विद्वानांना मान्य आहे, असे दिसतें. डा. भांडारकरांनीं आपल्या दख्खनच्या इतिहासांत हीच व्युत्पत्ति मानिली आहे. शकाच्या, शातवाहनाच्या, व अशोकाच्या वेळीं दक्षिणेत रट्ट ह्मणून एक लोक होते; त्यांचेच भाऊबंद रड्ड, रड्डी, वगैरे उत्तर कर्नाटकातील कांहीं जुने लोक होत; ह्या रट्टापैकी कित्येक कुळी महापराक्रमी निघाल्या व त्यानीं आपल्याला महारट्ट असे बहुमानार्थी नाव घेतले; वगैरे अनुमानें काढिलेलीं प्रसिद्ध आहेत. कालें येथील शिलालेखात महारथी व महारथिनी असे शब्द आलेले आहेत. ते दोन वर्षांपूर्वीच्या मराठ्यांचे वाचक आहेत, असे बहुतेक सर्व प्राचीन लेखसंशोधकांचें ह्मणणें आहे. परतु महारथी ह्या संस्कृत शब्दाचे महारट्ट हे प्राकृत रूप कसे झालें हें नीट उलगडून कोणीच दाखविले नाहीं. रथ शब्दाचे रह व रथी शब्दाचे रही अशीं प्राकृत रूपे होतात; रट्ट व रट्टी अशीं होत नाहीत. महारथी उगाच मजेखातर रूप लिहिले, असेहि म्हणणें शोभत नाहीं. कारण, हे शिलालेख कांहीं कोणाला फसविण्याकरितां लिहिलेले नाहींत. त्यावेळीं जे रूप प्रचलित असेल तेच लिहिलें असेल. अशोकाच्या शिलालेखांत रास्टिक ह्मणून एक नांव येते ते निराळेंच. येणेंप्रमाणें (१) रास्टिक, (२) महारथी, (३) महारट्ट, (४) मरहट्ट, व (५) महाराष्ट्र, असे एकाच देशांतील लोकाच्या नांवाचे पाच प्रकार पहाण्यात येतात. ह्यापैकीं खरें नांव कोणते असेल तें निश्चयानें सागतां येत नाहीं. मराड, मरट्ट, मऱ्हाटा. मराठा, अशी हीं रूपे अलीकडील सात आठशे वर्षांत प्रचारात आहेत. मराठा ह्या

शब्द अलीकडील तीनशें वर्षांतील लेखांत दृष्टीस पडतो त्या पूर्वीच्या तीनशें वर्षांतल्या ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथांत मन्हाटा असें रूप आढळतें प्राकृत पिंगल-सूत्रांत मरट्ठ, महरट्ठ अशीं दोन रूपें सांपडतात व एक दोन ताम्रपटांत मराठ असें रूप येतें सारांश, हा शब्द गेल्या दोन हजार वर्षांत नऊ दहा प्रकारांनीं लिहीत आले आहेत पैकीं खरा शब्द व रूप महरट्ठ असावें असें वाटतें रट्ट हें ह्या देशांतील एका पुरातन कुळीचें नांव आहे, व महरट्ठ हे त्या कुळींतील एका पोटभेदाचें नांव आहे आतां, महरट्ठ म्हणजे मोठे रट्ट असा जो कोणी कोणी विद्वान् अर्थ करतात, ह्या अर्थाहून निराळा एक अर्थ ह्या शब्दाचा करावा असें पुढील कारणाकरितां मला वाटतें मराठींत वन्हाड व कन्हाड असे मन्हाड शब्दासारखेच दोन शब्द आहेत हे दोन्हीं शब्द एकाच देशांतील निरनिराळ्या प्रांतांत रहाणाऱ्या लोकांचे वाचक आहेत वन्हाड शब्द वहरट्ठ व कन्हाड शब्द कहरट्ठ शब्दाचा अपभ्रंश दिसतो येणें प्रमाणें महरट्ठ वहरट्ठ व कहरट्ठ असे तीन शब्द पुढें येतात हे तिन्हीं शब्द रट्टांच्या निरनिराळ्या पोटभेदांचे वाचक आहेत हें उघड आहे. आतां, ताम्रपत्रांतून व ग्रंथांतून कन्हाड शब्द करहाटक, करहट्ट अशा रूपांनीं आढळतो, हें खरें आहे परंतु, मरहट्ट, मरहाटक, ह्या शब्दाप्रमाणेंच करहाटक, करहट्ट हीं भ्रष्ट रूपें आहेत असें मानणें रास्त आहे वरहट्ट व वरहाटक हे शब्द ताम्रपटांत व ग्रंथांत कोठेंहि आढळत नाहीत पण, महरट्ठ व कहरट्ठ ह्या शब्दांप्रमाणेंच हजार पंधराशें वर्षांपूर्वी वहरट्ठ हा शब्द प्रचलित होता असें अनुमान होतें कदाचित् वहरट्ठ ही पोटकुळी राजकीयदृष्ट्या फारशी महत्वाची नसल्यामुळें तिचा नामनिर्देश ताम्रपटें व ग्रंथ ह्यांत नाहीं, इतकेंच तेव्हां, वहरट्ठ, महरट्ठ व कहरट्ठ असे तीन शब्द व्युत्पत्त्यर्थ आपल्यापुढें उभे राहतात ह्या तीन शब्दांतील वह, मह, व कह ह्या शकलांचे अर्थ समगावाचे आहेत माझ्या मतें, वह म्हणजे पलीकडील, मह म्हणजे मधील व कह म्हणजे अलीकडील, असे अर्थ घ्यावे रट्ट कुळीचे एकंदर तीन पोटभेद होते, पलीकडी[illegible] रट्ट ते वहरट्ट, मधी[illegible] रट्ट ते महरट्ट, व अ[illegible]लीकडील रट्ट ते

कहरट्ट. सारांश, हजार बाराशें वर्षांपूर्वी एके काळीं महाराष्ट्राचे वऱ्हाड, मऱ्हाड व कऱ्हाड असे तीन भाग होते व त्यांतील लोकांस वऱ्हाडी, मऱ्हाडी व कऱ्हाडी किंवा वऱ्हाडे, मराठे, व कऱ्हाडे अशीं नांवें पडली. ह्या तिन्हीं प्रांतातील तिन्हीं पोटकुळ्या एकच भाषा बोलतात व एकाच कुळींतल्या आहेत. मधील पोटकुळीतील जे महरट्ट किंवा मराठे ते राजकीय चळवळी करणारे असल्यामुळें त्यांच्या नांवानें नागपुरापासून तुंगभद्रेपर्यंत व तैलगणपासून कोंकणापर्यंत जो विस्तीर्ण मुलुख आहे तो महशूर झाला आहे. भोज, पिटिनिक, अपरांतिक, वगैरे पैठण, नगर, उत्तर कोंकण प्रांतातील मराठी भाषेसारखीच भाषा बोलणारे लोक राजकीयदृष्ट्या महत्वाचे नसल्यामुळे महरट्टांच्या ह्मणजे मराठ्यांच्या तेजांखालीं लोपून गेले. नाशकापासून वाईपर्यंतचा जो टापू तो महरट्टाचा मूळ देश; वाईपासून कोल्हापुरापर्यंतचा जो प्रांत तो कहरट्टाचा मुलूख; व खानदेशापासून नागपूर प्रांतापर्यंतचा जो देश तो वहरट्टांचा प्रांत, असा प्रकार होता. पहिल्यांदा एकटी महरट्ट कुळी राजकीयदृष्ट्या महत्वाची झाली; तिने पुढें वहरट्ट व कहरट्ट ह्या पोटकुळ्या आत्मसात् केल्या; आणि नंतर वाढत वाढत नागपूर, खानदेश, पैठण, बालेघाट, गुलबुर्गा, कोल्हापूर, बेळगांव, उत्तरकोंकण, दक्षिणकोंकण, गोवा, कारवार, वगैरे प्रदेश आक्रमिले. हा प्रकार शहाजी व शिवाजी ह्यांच्या पर्यंतच्या पंधराशें वर्षांत झाला. नंतर मराठशाहींत ओडिसा, ग्वालेर, इंदूर, बडोदा, गुत्ती, अर्काट, तंजावर, येथपर्यंत मराठ्यांच्या छावण्या व वसाहती पसरल्या. असा हा मराठ्यांच्या कुळीच्या राजकीय प्रसाराचा वृत्तांत आहे. हा प्रसार होतांना पूर्वी अनेक अडथळे आले आहेत व सध्या तर तो बहुतेक थांबल्यासारखाच आहे. परंतु ह्या कुळीच्या वाढीचा गेल्या दोन हजार वर्षांचा इतिहास पहातां, सर्व आर्यावर्तावर व जवळच्या म्लेंच्छ देशांवर ही कुळी पसरावी असा अंदाज बांधावा लागतो. ही पसरणी होतांना हजारों ठेंचा, लाखों अडचणी व शेंकडों वर्षें लागतील, हें उघड आहे.

# शिवगड, शिवगंगा व शिवपूर

पुण्याच्या दक्षिणेस दहाबारा मैलांवर सिंहगड नावाचा प्रसिद्ध किल्ला आहे त्या किल्याचे सिंहगड हें नाव शिवाजीनें तानाजी मालुसऱ्याच्या स्मरणार्थ ठेविलें, व मराठ्यांच्या इतिहासांत त्याच नांवानें तो किल्ला प्रसिद्ध आहे शिवाजीच्या पूर्वी मुसलमानांच्या अमदानींत ह्या किल्याला कोंढाणा ह्मणत असत हें नांव मुसुलमानानी फारशी भाषेंतून ठेविलेलें नाहीं गडाच्या पूर्वेस कोंढणपूर ह्मणून एक गांव आहे, त्यावरून सान्निध्यामुळें कोंढणा असें गडाला मुसुलमानांच्या पूर्वीच नांव पडलेलें आहे " अस्ति दक्षिणपथे कुंडिनपुरं नामनगरम्" हें पंचतंत्रांतील वाक्य सर्वश्रुत आहे तेंच हें कुंडिनपुर ऊर्फ अपभ्रंशानें कोंडणपुर असावें परंतु हेंही ह्या किल्याचें सान्निध्यानें नांव पडलेलें आहे, खरें नांव नव्हे ह्या किल्याचें खरें नांव शिवगड गडाच्या माचीवरील कोळी आणि कल्याण वगैरे आसपासच्या खेड्यांतील गावढे ह्या गडाला शिवगड ह्मणतात ह्या गडापासून जी नदी कोंडणपुरावरून पूर्वेकडे शिवापूरास जाऊन वनेश्वरावरून नीरेला मिळते, तिला शिवगंगा ह्मणतात तिच्या कांठीं असलेलें मोठें गांव शिवपूर होय हें गांव शिवाजीच्या वेळेस अगदीं मोडकळीस आलें होतें तेथें शिवाजीच्या मनांत एके वेळीं आपली राजधानी करावी असें येऊन, त्या गांवाची चागली दुरुस्ती झाली व त्यास शिवापुर असें नांव पडल

# कोल्हापूर.

सह्याद्रीच्या कांहीं भागांतील पूर्वेकडे उघडणाऱ्या खोऱ्याना ज्याप्रमाणें मावळें ह्मणतात, त्याप्रमाणेंच ह्या पर्वताच्या कांहीं भागांतील खोऱ्यांना कोल ह्मणण्याची पुरातन कागदपत्रांत वहिवाट आहे कोल्हापूराच्या पश्चिमेकडील सह्याद्रीच्या खोऱ्यांना कोल ह्मणत ह्या कोलांतून देशात येतांना वस्तीचा जो मोठा गांव त्याला पुरातन काळीं कोलापूर ह्मणत व अर्वाचीन काळीं कोल्हापूर

अथवा कोल्हापूर ह्मणतात. कोल्हा ह्या जनावराच्या नांवाशीं ह्या शहराच्या नांवाचा कांहीं एक संबध नाहीं. कोल्हापूरच्या पश्चिमेकडील खोऱ्यांत फार पुरातन काळीं कोल ऊर्फ कोळ लोक रहात होते, त्यावरून त्यांच्या प्रातालाहि कोळ ह्मणत असत. सह्याद्री पर्वतांतील कातकरी, भिल्ल, कोळी, कातवडी वगैरे मूळच्या लोकांपैकींच हे कोल ऊर्फ कोळ होत. कोल्हापूराचे करवीर हें संस्कृत नाव सापेक्ष दृष्टीनें अलीकडील आहे असे दिसते.

## महाबळेश्वर.

सह्याद्रीच्या ज्या खोऱ्यांना सध्या आपण मावळे ह्मणतों त्याना हजार बाराशे वर्षापूर्वी मामल ही संज्ञा असे. ह्या मामलदेशांतील जी मुख्य देवता ही मामलेश्वर अथवा मामलेस्त. महाबळेश्वराच्या भोंवतालील खेडयांतील लोक महाबळेश्वराला मामलेसरच ह्मणतात. मामलेसराला महाबळेश्वर हे नाव शास्त्रीपडितांनीं आपल्या सस्कृत वाणीला साजेल असे दिले आहे.

## खानदेश व सेउणदेश.

खानदेश हें नांव वऱ्हाणपूराच्या किंवा अलजपूराच्या नबाबानीं दिले असा कित्येक युरोपियनाचा व एतद्देशीयाचा तर्क आहे, आणि खान ह्या शब्दाकडे पहाता सकृद्दर्शनीं हा तर्क खरा असावा असें समजण्याकडे प्रवृत्ति होते. परतु किंचित् सूक्ष्म दृष्टीने पाहिले असतां असे दिसून येते कीं हा शब्द अगदीं शुद्ध प्राकृत आहे. ह्या प्रांताचे मूळचे नाव कन्हदेश. कन्हदेश ह्मणजे कृष्णदेश. देवगिरीच्या यादव कुळात कृष्ण ऊर्फ कन्ह नांवाचा राजा झाला. त्याने आपले नाव ह्या प्राताला दिले. कन्हदेश, कान्हदेश, काहनदेश, व खानदेश, अशा परपरेने अपभ्रंश होत होत खानदेश असे नाव प्रचलीत झाले. वहरट्ट उर्फ वऱ्हाड व नाशिक ह्याच्या दरम्यानचा जो पश्चिमेकडील प्रांत त्याला कन्हदेश ऊर्फ खानदेश ह्मणत. वऱ्हाड व नाशिक ह्याच्या दरम्यानच्या जो पूर्वेकडील व गोदेच्या उत्तरेकडील प्रात तो देवगिरी ऊर्फ देवरी प्रात होय. आणि देवगिरीच्य

दक्षिणेस, नाशकाच्या पूर्वेस व कुमराच्या उत्तरेस जो प्रांत आहे त्यास से उणदेश ह्मणत ह्या सेऊणदेशाची राजधानी सेउणनगर उर्फ सध्याचें सिन्नर होय सेउण हा यादव कुळांतील एक राजा होता ह्या सेउणदेशाचा उल्लेख डाक्टर भांडारकरांच्या दख्खनच्या इतिहासांत आहे परंतु सेउणदेश ह्मणजे सध्याचा अमका प्रांत असें त्यांत सांगितलें नाहीं

## अमदानगर.

देवगिरि उर्फ देवगिरीचा घाट चढून वर आलें ह्मणजे अमदानगर लागतें ह्यालाच प्रस्तुतकाळीं अहमदनगर ह्मणतात अहमदनगर अमदानगर शब्दाचा अपभ्रंश आहे अमदा ह्मणून यादवकुळांतील एका राजाची नाटकशाळा होती तिच्यावरून ह्या शहराला अमदानगर नांव पडलें असें कित्येक लोक ह्मणतात अमदा उर्फ अमळा ह्या नदीच्या नांवावरून हें नाव पडलें असें ही कित्येकांचें ह्मणणें आहे ह्यापैकीं कोणतेंहि ह्मणणें खरें धरलें तरी ह्या शहराचें नांव मूळचें फारशी नाही हें निर्विवाद आहे

## राजुरी, राउरी, राजपुरी, रायरी, रायरेश्वर.

राजपुरी हा मूळ संस्कृत शब्द त्याचें प्राकृत राअउरी राउरी राहुरी, राजा श ब्दाचें जुनें मराठी रास, राय त्यापासून रायपुरी, रायरी, रायरेश्वर. राजपुरी हें गाव वाईच्या दक्षिणेस तीन कोसांवर व रायरेश्वराचा डोंगर वाईच्या पश्चिमेस चार कोसांवर आहे राजपुरी, वेरुळी, रायरेश्वर वगैरे ठिकाणीं जुन्या सिद्ध पुरुषांचीं व राजपुरुषांची एकेका प्रचंड दगडाची घडगीं आहेत तीं घडगीं आपल्या पूर्वजांचीं आहेत, असें तेथील गांवढे सांगतात

## वेरूळ, वेरुळी, येरुळी

दौलताबादेजवळील वेरूळची लेणीं प्रसिद्ध आहेत - वेरूळ शब्द मिश्र राउय शब्दाचा प्राकृत अपभ्रंश आहे महान विहारालय ह्मणजे वेरुळी

गईच्या रस्तेनें अंबाड खिंडीजवळ डोंगरावर येरूळी ह्मणून गांव आहे. येरू-ळीचा येरुळी हा अपभ्रंश आहे.

## कान्हेरी, कण्हेरी, कण्हेरखेड कानगाव

कन्हगिरीचा अपभ्रंश कन्हेरी, का-हेरी, कण्हेरी. कण्हेरी हें गाव वाईच्या उ-त्तरेस असणाऱ्या गांढरदेवीच्या डोंगराच्या पूर्वेस दोन कोसावर व शिरवळाच्या दक्षिणेस दोन कोसावर आहे. येथें डोंगरांत एक विहार आहे. त्याचे तोंड ए-का प्रचंड शिलेनें कोंदले आहे. आत खोल्या, तळे वगैरे आहेत ह्मणून वृद्ध सांगतात. कण्हेरी येथील रामदासी मठाचे मूळ संस्थापक वासुदेवबोवा—राम-दासस्वामीचे शिष्य—ह्या गुहेत तपश्चर्या करीत असत.

## खंडाळें, खिंडाळें.

महाराष्ट्रांत खंडाळीं पुष्कळ आहेत. खिंडतल, खडतल, खंडअळ, खडाळ, खिंडाळ, अशा परंपरेनें हा शब्द आला आहे. खिंडीच्या तळचें किंवा माथ्याव-रचें जें गाव ते खंडाळें.

## पंढरी.

गांव व भोंवतालील शिवार ह्यांना पंढरी व काळी अशा संज्ञा महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. गावांतील वरठाणाची जेवढी जागा तेवढी पांढरी; व शेते, कुरण, वगैरे सर्व काळी. पंढरीस मूळची कोष्ट्यांची वस्ती दहापाच घराची होती. ह्मणून तिला मुळीं पंढरी अथवा पांढरी ह्मणत. जेथें सध्या विठोबाचे देऊळ आहे तेथें पूर्वीं शेतें होतीं. ह्या काळींचा जो देव त्याला काळ्या ह्मणत. ह्याच काळ्याला सान्निध्याने पंढरीचा राणा ह्मणू लागले. ही माहिती एका या-रकऱ्याने दिलेली आहे.

## धणीचाबाग.

सातारशहरात पहिल्या शाहु महाराजांच्या वेळेपासून छत्रपतींचे काहीं

वाग आहेत पैकीं एका वागाला धणीचाभाग ह्मणतात, व एका विहिरीला किंवा चिरेबंदी जल विहाराच्या जागेला धणीची विहीर म्हणतात धणीचा वाग व धणीची विहीर म्हणजे कोणाचा बाग व कोणाची विहीर म्हणून कित्येक लहान मोठ्या माहितगार लोकांस विचारतां समाधानकारक उत्तर मिळत नाहीं कोणी ह्मणत, धणी ह्मणजे धनी अर्थात् छत्रपति परंतु धनी शब्दांतील नीची णी कशी झाली तें कोणी सांगेना कोणी ह्मणत धनीण ह्या शब्दाचा अपभ्रंश धणी असावा त्यांच्या मतें धनिणीचा वाग ह्याबद्दल धणीचा वाग असा जलद वोलण्यानें अपभ्रंश झाला असावा ही व्युत्पत्ति खरी मानण्याला एक अडचण येई ती अशी कीं ह्या वागेंत शाहूच्या राण्या रहात नसून एक सुस्वरूप नाटकशाळा रहात असे राण्या रहात असल्या तर धणी म्हणजे धनीण उर्फ राणी असा अर्थ करतां आला असता तेव्हां धणी ह्या शब्दाचा दुसरा कांहीं तरी अर्थ असला पाहिजे धणी हें विशेषनामहि नाहीं, अर्थात्, धणी हा शब्द आधुनिक मराठी भाषेतून बहुतेक लुप्त झालेला असला पाहिजे व त्याचा प्रचार पांचशें किंवा नऊ दहाशें वर्षांपाठीमागें काढीत गेलें पाहिजे निर्णयसागर छापखान्यांत छापलेल्या प्राकृत पिंगलसूत्रांच्या ६४ व्या पृष्ठावर खालील श्लोक आहे

प्राकृत

रे धणि मत्तमअंगजगामिणि,  
खंजणलोअणि, चंदमुहि, ।  
चंचल जुव्वण जात ण आणहि,  
छइल समप्पइ कॉइ णहि १ ॥

संस्कृत

रे प्रिये मत्तमतंगजगामिनि,  
खंजनलोचने, चंद्रमुखि, ।

## पैठण.

फलस्थान=फलठाण=फलटण मल्लस्थान=मालठाण=मलटण विंबस्थान=बिंबठाण=ठाणें प्रतिस्थान=पइठाण=पैठण पट्टन ह्या शब्दाशीं पैठणाचा कांही एक संबंध नाहीं

## रंकाळें

कोल्हापुरास एक मोठा तलाव आहे, त्याला रंकाळ्याचा तलाव ह्मणून ह्मणतात त्याचें कारण असें सांगतात कीं ह्या ठिकाणीं एक अत्यंत दरिद्री माणूस रहात होता त्यानें कवडी कवडी भिक्षा मागून हें तळें मूळ बांधिलें ह्या आख्यायिकेवर जर फारशी भिस्त टेविली नाहीं, तर ह्या शब्दाची व्युत्पत्ती निराळ्या तऱ्हेनें करतां येण्यासारखी आहे कोल्हापुरास पुष्कळ तळ्यांना नावें झाडावरून पडलीं आहेत जसें—पद्माळें वगैरे. त्याप्रमाणेंच रंकाळें शब्द हा एका जुन्या वनस्पतिवाचक शब्दाचा अपभ्रंश आहे टंकाल्य असा शब्द गाथासप्तशतीच्या चवथ्या शतकाच्या ११ व्या श्लोकांत आला आहे "टंका रक्ष पुरी शाखा शाकिनी कुल्टासुच" टंका ह्मणजे झाडी, कुंज ज्या तळ्याभोंवती कुंज आहेत तें टंकाल्य ह्या टंकाल्यांत एक जुना संध्यामठ आहे तो पन्हाळच्या भोजराजाच्या वेळेपासूनचा आहे असें ह्मणतात व त्या मठाच्या रचनेवरून तो त्या वेळचा असावा ह्यांत संशय नाहीं

विश्वनाथ काशीनाथ राजवाडे

श्री.

# महाराष्ट्र इतिहास.

( गोविंदराव काळे यांचें दफ्तर. )

## सरकारी-रावसाहेब.

### श्रीमंत राजश्री माधवराव नारायेण पंत प्रधान यांस

पत्रं रवाना केलीं.

आर्बा तीसईन. १

माहे मोहरम उर्फ श्रावण मास चंद्र १९ रोजीं डांकेवर.

शके १७१५ श्रा. व. २ शुक्रवार,

1793 श्री.

श्रीमंत राजश्री —— —— राव ——

साहेब स्वामीचे सेवेसीं ——

विनंती. सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनंती विज्ञापना. ता। छ १९ माहे मोहरम पर्यंत मु॥ बेदर येथें स्वामीचे कृपावलोकनेकरून

१ ( शके १७१४ माघपासून शके १७१६ ज्येष्ठपर्यंत म्ह० इ. स, १७९३ जानुआरी, फेब्रुआरी. ते इ. स. १७९४ मे, जून. )

सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष— छ २० माहे जिल्हेजचें पत्र
सरकारांतुन सादर जालें तें छ २७ माहे मारीं पावलें त्यांत " नबाव टिपु
" सुल्तान बाहदुर यांचे मसलहतसमंधी तिर्ही सरकारचे करारनामे जाले,
" त्यांत सरकारचे तेरावे कलमांत, व नबाबाकडील दाहावे कलमांत,
' आईदा टिपु बाहदुर यांनी बदआहदी केल्यास तिर्ही सरकारांनी येक होऊन
" त्याची तंबी करावी याचा ठराव पुढें तीर्ही सरकारचे सलाहानें केला
" जाईल ह्मणोन करार आहे त्यास जनराल लार्ड बाहदुर यांजकडुन मिस्तर
" किनवी यांनी याद नबाब निज्याम आलि खानबाहादुर यांस दाखविली
" त्याची नकल नबाबांनीं तुह्मापासी दिल्ही, तुह्मी हुजुर पाठविली, व मिस्तर
" मालिट यांनी सरकारात याद गुजराणिली, दोहींचा मार येकच त्यास याचा
' विचार पाहतां करारनामा पहिला जालाच आहे, हासल मुदा टिपुने बदमा
" मली केल्यास त्यास [illegible] करावयाची याजकरितां या कलमाचाठराव
" येकाच कलमांत ठराऊन फर्द पाठविली आहे, ते मिस्तर मालिट यास
" दाखविली त्याचे बोलण्यात आलें कीं "लार्ड बाहदुर यांचे यादी बमोजीब
" व्हावें, त्यास तेरावे कलमातील ममलहताच्या ठरावाच्या शकला यांत आल्याच
आहेत याजकरितां येकच कलम ठराउन पाठविलें यांत जायसाल दगयेल
" या मारांचें थैली पत्र नबाबास व ठरावाची फर्द पाठविली" असें पत्र देऊन
" फर्द दाखवणें, याचे जाब घेऊन लौकर पाठवणें " ह्मणोन आज्ञा त्यास
नबाबाकडे जाऊन मध्यस्त समीप असतां सरकाराचें थैलीपत्र प्रविष्ट केलं,
व येक कलमाची फर्द सरकारांतुन आली, तेही दाखविली, याजवर सांनचार
घटिकापर्यंत बोलणें जालें याचा ताा आलाहिदा पुरवणीपत्रीं विनंती लिा
आहे अवलोकन सविस्तर मार ध्यानात येईल. सेवेसी श्रुत होय हे
विज्ञापना ———————

मर्दे १७१७ भाा व २ शुक्रवार

॥ १३ श्री

विनंती विज्ञापना नबाबास सरकारचें सरकारात प्रविष्ट करणे येत का

माची फर्द सरकारांतुन ठराऊन आली. ती दाखविल्या नंतर नबाब बोलले कीं
" इंग्रजांनीं सात दफा ठरऊन यादास्त पाठविली असता, हे एक कलमाची
" मुख्तसर फर्द यात ते मतलब उगवत नाहींत. मुख्तसर फर्द ठरवावयाची
" सबब काय ?" ह्मणोन मजला विच्यारिले. याचे उत्तर मी केले कीं
" पेशजी टिपु सुलतान यांचे मसलहत प्रकर्णी तीन सरकारचे तहनामे परस्पेर
" जाले त्यांतील आह्मांकडील तेरावे व इकडील दाहावे दफेत आइंदा तजवीज
" ठरावी असें आहे. त्या प्रकर्णी हल्लीं इंग्रजानीं सात दफेची यादास्त पाठविली,
" तो मतलब एक कलमांतच उगवला. त्यापक्षीं सात दफेचे लिहिणे तुल व विशेष
" नाहीं. तेरावे व दहावे दफेतील जो मजमून याचा मतलब या फर्देंत आला,
" तेव्हां लांब लिहिण्याचें प्रयोजन नाहीं, सबब एक फर्दच ठरली यांत कांहीं गेलें
" नाहीं." याजवर मध्यस्त बोलले कीं " पुढील तहनामा झाल्यानंतर मागील
" तहनामा बरबाद होतो. मागील तहनाम्यांत तेरावे व दाहावे दफेत आईंदा
" तजवीज ठरावयाचा लेख. त्यासआईदा तजवीज ठरण्याची तरकीब इंग्रजांनीं
" सात दफेची याद पाठविली त्यात उघडी आहे. या मुख्तसर कलमांत मागील
" तहनाम्यावर हवाला पडला यात ठराव व्हावा तो कांही जालाच नाहीं
" तेव्हा पहिला तहनामा आहे तोच. अधीक काय ठरले ? आइंदा
" तजविजीची तरकीब काय ठरली? असे इंग्रज ह्मणो लागल्यास याचा जबाब
" काय ?" याचे उत्तर मीं केले कीं " इंग्रज वाजवीनें बोलूं लागल्यास याचा
" जबाब हाच कीं तेरावे व दहावे कलमात टिपूकडून बद आहदी दर येकासी
" जाल्यास, त्याचा ठराव आइंदा तीन शरीकाचे विच्यारे व्हावा
" येसा साबीक तहनाम्यातील करार. याचा ठराव हल्लीं जाला कीं बद
" आहदीची दर्याफ्त दोघा शरीकांनीं करून तरफसानीकडे नसियतपूर्वक
" सागोन पाठवावे. इतक्यावर त्यानें न ऐकिल्यास पहिले तहनाम्याप्रा करावें
" असे आहे. त्या अर्थी ठराव उलगडुन जाला; ठराव न होण्यात बाकी
" काय आहे ?" या प्रा बोलल्यानंतर मध्यस्त मागती बोलले कीं " ज्यासमई
"तरफसानीकडून बद आहदी होईल त्याप्रसंगीं जर इंग्रजास गरज आहे

" तर तुह्मी ह्मणता याचप्रमाणें समजाल काहीक प्रतीची सबब दरपेष न
" आणितां चालतील, हें न होता त्याजला गरज नाहीं असें जाल्यास, याचा
" उलट अर्थ करतील कीं, साबीक तहनाम्याचे तेरावे व दहावे दफेंत आइंदा
" शकल ठरावी असें आहे त्याची शकल तर अलिकडे काही मुख्तसर
" फर्देंत ठरली नाहीं, मागील तहनाम्याप्रमाणें करावें ऐसा लेख, मागील
" तहनाम्यांत तो ठराव नाहीं, त्यापक्षीं ठराव आतां होणें, तेव्हां त्या वक्तीं
" जसी गरज व मतलब सर्व ह्मणों लागतील, त्यास नाहीं होय ह्मणावयाची
" दरज राहत नाहीं यास्तव प्रसंगोपात त्यांची दरज कांहीं न राहतां हलींचा
" तहनामा उलगडावा ती या मुख्तसर कलमानें पुढें इतका विष्यार
" आहे, यास्तव इंग्रजांनीं सात दफे लिहिल्या त्यांत खुलासा ठरावाची
" तरकीब आहे त्याप्रमाणें खोलून असावें हें सलाह " या प्रमाणें मध्यस्त
बोलले त्यास सात दफे न लिहिण्याचीं कारणें सर्व मनांत, परंतु यांसीं त्यां
तील कांहीं बोलण्याची आज्ञा नाहीं, आणि हीं मनांतील कारणें, यांचा फाया
पही करावयाचा नाहीं, याजकरितां फर्देंत जें लिहिलें होतें त्या अन्वयें यांसीं
बोलण्यांत आलें एक गोष्ट मध्यस्त बोलले कीं "मागील तहनाम्यांत
" आइंदावर हवाला दिल्हा त्याचा ठराव हलीं होतो यांतही मोहगम आहे
" तरकीब ठरली नाहीं हीच दिक्कत इंग्रज घेतील त्याचें उत्तर त्यांस असें दिलें
कीं " आइंदा शकल ठरावीस येईल असें पेशजीचे तहनाम्यांत आहे ह्मणोन
" हलींच येका कामाचे फर्देंत लिहिलें आहे कीं पकल पेशजीचें तहनाम्याप्रमाणें
" निही परीकांनीं करावी त्यास जसी पूर्वी नव्हे अमलहतीची ठरली त्या
" प्रमाणें तरकीब, ऐसा अर्थ यांत निघाला की नाहीं ? तेव्हां हलींची
" फर्द मोहगम नाहीं यांत तरकीब ठरावांत आली सात कलमांचा तहनामा
" केला, त्यांत तूल फार आहे एक कलमाची फर्द ठरविली, यांत मुख्तसर
" थोडक्यांत आहे, अर्थ कांहीं गेला नाहीं, असें समजोन ही फर्द ठरून
" आली त्यास दोंही सरकारचे येकवाक्यतेचें उत्तर इंग्रजांसी म्हणें
इतकाच प्रकार " याजवर नानांसमक्ष मध्यस्त बोलले कीं " इंग्रजांनीं

" ठराविले त्यांत परीकाचे फौजेने प्रसंग पडताच जे हजर असेल तित-
" क्यानसीं सामील व्हावे. नंतर पुढे कसे करावे याची तजवीज तिवांचें
" विच्यारे ठरऊन करावे याप्रा उलगडून लिहिले, तसे या फर्देत उलगडले
" नाहीं, याजकरितां मनात कल्पना येतात त्या सांगतो. त्याप्रा तुह्मी
" श्रीमतास लिहून पाठवून उत्तर आणवावे नतर ठरविण्यात येईल, असें
" नवाबानीं सागितले " त्याप्रा कलमवदीची पुरवणी आलाहिदा पा
त्यावरून ध्यानात येईल राा छ १९ मोहरम हे विज्ञापना.

शके १७१५ श्रा व २२ शुक्रवार.

श्री.

विनती विज्ञापना येसीजे. नवाबास सरकारचा खरीता दिल्हा. त्याचा जबाब मोहगम माझे पत्रावर हवाला घालून स्वामीचे नावे खरीता दिल्हा, व पुरवणी लिहावयासी सागितली. ती नवाबानीं आपण रोबरो वाचून पाहून रवाना करावयासी सागितले, त्यास खरीता पाठविला आहे, व आकरा कलमाची पुरवणी आलाहिदा आहे, त्यावरून ध्यानास येईल कलमवदीचे नवाबाची आज्ञा येईल त्याप्रा नवाबासी जाबसाल बोलण्यात येतील. राा छ. मोहरम हे विज्ञापना.

## नवाबानीं श्रीमंतांस पत्र लिहिले त्याची नक्कल.

---

१ ( रूबरू ).

२ अस्सल पत्र फारसी लिपींत व भाषेत आहे. भाषेत बऱ्याच चुका आहेत. तथापि, मराठी वाचकांकारिता सर्व भाग कायम ठेऊन बाळबोध लिपींत मूळ व त्याचा अनुवाद दिला आहे. मराठी अनुवाद खेरीज करून बाकीचे सर्व श्रम आमचे मित्र रा. रा कृष्णलाल मोहनलाल जव्हेरी एम्. ए. एल्. एल्. बी. वकील हायकोर्ट यांचे आहेत व त्याबद्दल त्यांचे आह्मी फार आभारी आहोत. ह्याचा निर्देश प्रस्तावनेंत केलाच आहे.

फारसी पत्राची नक्कल[१]

## एलाही

शहामत व बसालत मुस्तजे उवहत व अयालत मनूमलत मनीअ-उ-श्शान बुलंद मेकान बरखुरदार ससुदेह अतवार राहिवस बाद

मक्तूबे मरगूब मुसर्रत असलूब मुशएर बरसीदने मीस्तर हाल किनवी दिलावरजंग व मुरसले लार्ड कार्नवालिस बहादुर के बराये फिरस्तादने निशे

---

१ सदरपत्राचा मराठींत अनुवाद —" मिस्तर हाल किनवी दिलावरजंग यांजकडून आलेली तहनाम्याची कलमबंदी व कॉर्नवालिस बहादुर यांचें पत्र अशीं आपलेकडे रवाना होण्याकरितां व गोविंदराव कृष्ण यांजजवळ दिल्हीं होतीं तीं पोंचल्याचें आपलें कृपापत्र वाचून परम संतोष होऊन समाधान वाटलें. तसेंच, लाटबहादर यांचे तर्फे मिस्तर मालीटसाहेब यांनींही पूर्वी ठरल्या बमोजीब हर्फबहर्फ तहनाम्याची यादवास्त पाठविली आहे व त्यांतील मुख्य मुद्याचा भाग इतकाच आहे कीं टिपुसुलताननें मद आहदी केल्यास लागलीच त्यास तंबी करणें योग्य व अवश्य होणार आहे. नंतर याचा सारांश एक दफेत घालून मिस्तर मालीट यांस दाखविला त्यावर त्यांजबरोबर झालेल्या भाषणांत असें निघालें कीं लाटबहादुर यांजकडून आलेल्या तहनाम्याबमोजीब सर्व झालेंच आहे. ठेरल्या कलमांतील मजकूर ज्या प्रमाणें निराळे फर्देंत गोंविला आहे, त्या प्रमाणेंच इकडीलचा मजकुरही निराळ फर्देंत गोंविला जाऊन स्पष्ट सुवाच्याक्षरें आपल्याकडून त्यांजकडे पाठविला जावा म्हणजे त्याचा जबाब लवकर येऊं शकेल. सदर संबंधीं सविस्तर माहिती गोविंदरावांनीं लिहिलीच आहे, त्यांजवरून सर्व ध्यानांत येईल. सदरहू प्रकरणासंबंधानें पुढील परिणामावर दृष्टि ठेऊन विशेष सावधगिरी ठेविली पाहिजे व म्हणूनच हाईम सिसक्या कालक्षीनें एकंदर प्रकरणाचा सूक्ष्म विचार करून मागचा पुढचा विचार पाहून सर्व ठरविलें पाहिजे. ह्यासंबंधीं आपल्याहित कलमबंदी सदरहू गोविंदराव यांस सांगण्यास आलीच आहे. त्या सर्वांचा विचार होऊन उत्तर यावें. पाठविलेली फर्द कशी फायदेशीर होणार आहे याचा विचार लार्ड कॉर्नवालीस साहेबांकडून आलेल्या कलमबंदीच्या अवलोकनाअंतीं व्हावा व या सर्व गोष्टींचा विचार होऊन योग्य व मान्य वाटेल तो विचार इकडे सत्वर कळविला जावा. तसेंच रावमाधवरावजी राव यांचे पत्रावरून सर्व कच्चें म्हटाणें समजण्यांत येतील. आपले दिवस सुखानें जावोत।"

आन शहामत मुरत्तेब हवाले राव गोविंद किशन शुदेवद. वइनकेट मिस्तर माले नीझ अझ तर्फे लार्डवहादुर याददास्त मुतावके दफआते मझकूरे लफ्झवलफ्झ रसानीदेह. चुनकरारनमिदर अवायिल झीवेतरातिप या फतेह व कुल्लियये हमीन के अगर टिपू सुल्तान वद सलूकी नुमायद तदारुक वतलाफीये आन लाझम व झरूर. वनावर आन शिक्के इनमानी दरएक कलम मुकरर साखतेह वमिस्तर मालेट नमूदे शुदे, दरकीलोकाले मिस्तरे मझकूर चुनान वर आमद के मुवाफके याददास्ते फिरस्तादये लार्ड वहादुर व अमल आयद. चुन तदवीराते दफे सीझदहुम दरफर्दे मुशल्खसे हाल पानकाल दर आमदे अझीन ममर यककलम करारदादे फर्दे आन ( अझ? ) जानुवेमा वदौलत तरस्सूल याफतेह जवावश वझूदी वरसद. मफसूल वगोविंदराव किशन कलमी शुदेह वयान खाहद नमूद वमुले वेहजत शमूल (खाहंद? ) नमूद. चुन मुकदमये मरकूमे अझ कुल्लियात व एहतियात दर उमूर आतीये अझाल वाझम वहझम व माल अदेशी असत वनावरान वाझी मरातेव दरीन वाव व रावे मझकूर फरमुदेह शुदेह तावादे दरयाफ्त जवावे मुरातवे मरकूमये हुस्ने फर्दे मुरसले उदशहामत मरतवत वादफाते तजवीझ लार्ड वहादुर व मीझाने तामुल सजीदे आनचे मुनासव वाशद व तजवीझ दर आयद इतला दारे शवद वहम अझ नवश्ते रावे मोअझ्झ मफसुल पयरायये इझाह खाहद याफत. झीयादे अय्याम वफाम वाशद.

श्रीमतास अका दफ्याची पुरवणी नबाबाचे सांगितल्या प्रो लिहिली त्यांज-वर नबाबांनी स्वादवाहल करून दिल्हा ते ठेऊन त्याची नकल पुण्यास रवाना केली—

विनती विज्ञापना. लाड कारणवालिस यांजकडून टिपुसुलतान यानीं बद आहदी केल्यास त्याचे तवींचे शकल ठरावसि बाब साता दफेची तहनाम्याची यादास्त नबाव बंदगान आली याजकडे आली त्याची नकल रवाना केली व मिस्तर मालिट याचे मारफत सरकारातही सदरहु प्रो पोहचून, त्यांतील हासल येककलमाची फर्द सरकारातून ठराव होऊन येविसी बंदगान आली

यास खरीता पत्र आलें, ते आज्ञे प्रो छ ३० जिल्हेजी मध्यस्तासमीप आस्ता हाजरतीस गुजराणिलें, कलमाची फर्द सरकारची आली ती हर्फ व हर्फ वाचून दाखविली मुलाहिजा होऊन हाजरतीचे फर्मावण्यात आलें कीं मुख्तसर येक फर्दीचा तहनामा होणें यांत कागहर्ता दिसण्यांत येतात याचा तपसील—

लाड बाहादुर यांनीं साता दफ्याचा तहनामा ठराऊन इकडे व राव पत प्रधान यांजकडे पाठविला कीं सदरहु अन्वयें हरदो सरकारचे करार ठरुन परस्परें तीन सरकारचे तहनामे व्हावे यांत आइंदा हरगीज खलल न राहा ण्याची तजवीज होऊन आली असतां त्या दफाशीं एकीकड राहून हाल येफर्द ठराधून आली याप्रों इकडोन व तिकडोन इंग्रजाचे वकीलाशीं वोलल्यानंतर इंग्रज मनांत आणतील कीं आम्हीं ज्या दफाती ठराविल्या त्या वाजवी आणि तिन्हीही सरकारास समान असें असोन दरकिनार केल्या हल्लींचे फर्देत, "हमेष निल्य येऊन तंथी तरी करावयाची नाहीं" असा लेख, यावरूनही त्यास वाईट वाटलें कीं हरयेक वाहाणा करून तंथी करावी असी आमची खावाहेष आहे कीं काय ? ह्मणोन हें लिहिणें तस्मात टिपूकडील यास खातर, सबब हा प्रकार, असें दिलनिषीन होईल इंग्रजानीं ज्या दफा ठरावून पाठ विल्या यांत दोष तो कोणता ? व त्या वमोजीव हरदो सरकारचे तहनामे न होणें व मुख्तसर कलमाची फर्द ठराविली याची वज काय ?———कलम

१ हल्लीं हे फर्द रावपंतप्रधान यांजकडोन ठरून आली हीच फर्द मोहोर व दसखत होऊन इंग्रजाकडे रवाना होईल, किंवा या फर्देचे मजमुनाप्रों पत्र लेहून इंग्रजास पाठवावयाचें ? या दोहींतून कोणता निश्चय केला तो कळावा ———————————————————— कलम

१ या फर्देत टिपु सुल्तान यांजकडोन वद आहदी त्तान शरीकांपैकीं येकासी नमूद जाल्यास त्यानें दोन शुरकास इतल्ला द्यावी, त्यानंतर वद आ हदीचा दर्याफ्त दोघांनीं करून टिपूस सांगावें त्याजकडोन अमलांत न आल्यास साबीकच तहनाम्यांत वमोजीव तिन्हीं सरकारांनीं करावें ऐसा लेख,

तजवीज हाली ईंग्रजानी सात दफा ठराउन पाठविल्या यांत खोलून लिहिलें आहे. सांप्रत येक दफेची फर्द आली यांत तेरावें व दाहावें कलम साबीकचे तहनाम्यांतील त्याचे शकलची तजवीज असें करावें हें ठरलें नाहीं तेव्हां तेरावी व दाहावी दफे सारखी हेंही मोहगम फर्द, आणि हवाला ही मागिल तहनाम्यांवर पडला, त्यास टिपूनें हरयेकासी बद आहदी केल्यास आम्हीं त्या समयीं ईंग्रजास तहनाम्यांप्रो अमलांत आणावें असें ह्मणों लागल्यास, ते वेळेस ईंग्रजास गरज असल्यास दिकत घेणार नाहींत, अथवा त्यास मतलब जरूर नाहीं, आणि यादों सरकारांत तो समय गरजेचा आहे, तरी ईंग्रज दिकत काहडतील कीं "पहिला तहनामा व दुसरे फर्देत शकलची तजवीज करार जाली नाहीं यास्तव हाल करार ठरावा" तेव्हां ईंग्रज आणिक मुद्दे दरपेश आणितील ते आपले गरजेकारितां कबूल करणें प्राप्त पडतील यास्तव मोहगम दफा लिहिणें कयास आहे ———————— कलम

१ कदाचि(त) मनांत येईल कीं "तिहीं सरकारांसीं टिपूचा तहनामा व आहद मजबूत जाला त्या अर्थीं त्याजकडोन फिसाद अमलांत कसा येईल" तरी ईसा मिंया यांस पत्रें टिपूचीं आलीं यांत कांहीं बद आहदीचे चालीत बाकी काय आहे? हें पुरतें पणें ध्यानांत आणावें ह्मणोन पत्रें आह्मांस दाखविलीं नजीनस पत्राच्या नकलाच पाठविल्या आहेत ———— कलम.

१ मसलतीचे रईनें पाहतां ईंग्रजासी बद आहदीचा कदम टिपूकडून दिल्फैल नमूद होणार नाहीं कारण कीं ते जबरदस्त, मगर या दों सरकारांतून येकासी खलल पैदा करील यांत तथा नाहीं त्याजकडून खलल उत्पन्न होतांच शरीकाचा कुमक या करारावरून घडत नाहीं, तेव्हां गोष्ट मुष्किलीची पडेल यास्तव हे फर्द येक दफेची मोहगम लिहून आली आहे हा करार करण्याची सलाह राव पंतप्रधान यांस समजून उमजून आली कसी यावी? हे मसलहत सलाहदौलत्या नाहीं ———————— मजगम

१ अगर टिपुसुलतान याजकडोन या दों सरकारासीं बद आहदी अमलांत येणार नाहीं असी राव पतप्रधान यांची पक्की खातरजमा असल्यास खुलाशानें आमचीही तमानियत व्हावी. मग सदरहु मुख्तसर कलमाची फर्द ठराविली याचा संतोष अगर असंतोष इंग्रज मानोत! मुजाका नाहीं.——कलम.

१ टिपूकडील भरवंसा व तमानियत खातरखा नाहीं त्यापक्षीं इंग्रजांनीं यादास्त ठरविल्याप्रो करार करणे ये न सलाह. त्या सात दफेंत अगर कमजास्त कितेक हर्फ करणे ते तर्फेनचे सलाहाने जाल्यास मुजाका नाहीं. गला व घोडीं व उंटे वगैरे खरीदीविषई त्यांत लि॥ आहे. त्यास लडाईचे प्रसंगास सदरहु कलमे तिन्हीं सरकारांस समान व उपयोग आहे.——कलम.

१ टिपु खुष्कींतील सरदार; यास टाकून इंग्रज टोपीवाले योसी दोस्ती व येगानगत ठेवावी याची काहीं हाउस नाहीं; परंतु टिपु कोणे वेळेस काय करील याचा भरवसाच येईना; याजकारिता इंग्रजासी इतकी बळकटी करणें प्राप्त; टिपुचाही भरवसा नाहीं आणि इंग्रजांसी दुखवावें हे तुमचे व आमचे दोन्ही दौलतीस सलाह नाहीं.——कलम.

१ इंग्रजासीं दोन्ही सरकारातून दोस्ती अधिक व्हावी किंवा आहे तितकीच असावी अथवा जे आहे त्याजहून काही घटावी याविषई दोन्हीं दौलतींनीं स्वस्थ अगर मजबूत राहण्यास काही साधकताही पाहिजे. साधकता काय तेहीं समजावी.——कलम.

---

११

अशा कलमे लिहिली आहेत. यांतील सलाह—मसलहतीचे विच्यारे पाहाता इंग्रजांनीं ठराविल्याबमोजीब सात दफेचा तहनामा बहाल होणे यात इंग्रजास संतोष व आपलाले दौलतीस प्रसेस्त. तीन शरीकाची येकवाक्यता व मसलहतीची पोख्तगी आणि टिपुकडीलही दगदगेचा धोका रात्रदिवस करणें

लागणार नाहीं सर्व गोष्टीस आजरूये मसलहत गुण येतात—इतके पीयार्थे विष्याराचे मार्गे खूब दर्याफ्त करून जबाब जल्द येऊन पोहोंचावा लाड बाहादुर यांस विलायतेहून येहम येण्याविसीं हुकुम येतात परंतु टिपूसीं मसलहत आपेमापासोन आहे विद्यमानची, याचानक्षा मुस्तकाम ठरून मग जावें, यास्तव हरदो सरकाराचे जबाबाची इंतजारी करून लाडबहादुर राहिले "जबाबास विलंब न होतां उत्तर लौकर आणवावें त्यासरीखा तहनाम्याचा ठराव करावयास येईल" म्हणून हजरतींनीं व मध्यस्तांनींही मांगितल्यावरून विनती लिहिली असे रा छ १९ मोहरम हे विज्ञापना

शके १७१५ श्रा व २ शुक्रवार

श्री

विनती विज्ञापना टिपूसुलतान यांनीं ईसामिया नबाबाकडील ताडपत्री व ताडफरी वगैरे महालांतील तालूकदार यास टिपूनें फारसी पत्र येक लिहिलें व कमरादीखान यांनीं तीन पत्रें हिंदवी लिहून पाठविलीं त्याच्या नकला पारसी पत्राची पारसी नकल व हिंदवी पत्राच्या हिंदवी नकला येकूण पत्रें च्यार यांच्या नकला सेवेसीं रवाना केल्या आहेत त्यावरून ध्यानास येईल रा छ १९ मोहरम हे विज्ञापना

टिपूसुलतान यांचें पत्र आत्रास रंगाचे मल्कईसा याचे नांवें आलें त्याची नकल

या नं

पाहता ९१२२[1] (फारसी)

फ टिपूसुलतान जहास गिर्दे जदयले सूनेरी.

मनशूर फयाम गंजूर भिस्टूर ह अलामुल्ल उलमिनान टिपुसुलतान पाद शाहे गाझी खुल्दुल्लाह मुल्कहु व स ल्तनतहु बनामे मिपाहतय निजावत पनाह व शुजाअत निशान मल्क इमा सलमहु

१ हा शक मवलूदास शुरुआहे, का रण तसा शक कोठें नाहीं

अरझी मये खते मुशीर उल मुल्कके बनामे आनशुजाअत निशान रसीदे बूदे मुरसले व इस्तसवाबे बरखुरदार इकबाल निशान मीर कमरुद्दीनखान बनझर गुझस्त मझमुनश बदर्याफ्त रसीद. अस्ल इनस्त के इनदौलत अबद पयवद एनायात अझतकदटुसेत आलारत अगर कसी मीखाहद केइन दौलतरा झरर रसानद हरगिझ मझलुन नमीरसद. बहरसे सुलतनत मुलहेक शुदन नीझ खाम खयाल. बाबस्के नुकसाने करोरहा दर कपनी सरकार. अझ मुखालीफन शुदे बाशद आनहाबक्ते तदारुके आन मी बीनद. इनशाअल्ला तआला तदारुके आनहम अनकरीब. बीलफेल रायाते आलीयाते सरकारे हयदरी हमराहे बरखुरदार मसतूर बनाबरुतबथे झमीनदाराने आनीकोदी वगयरहू तअय्युन याफतेह. अझ आजा व फयझ हिसार याने कोठीमी रसद. बायद के आन शुजाअत निशान ब खातरजमी बला विसवास अझ बरखुरदार मुलाकात नुमायद. बीलमुशाफेह हमे कयफियत मालूम खाहद शुद. गरझ, बदुरुस्त अयतकाद व साफीदिल झाहरव बातेन दर सरकारे हयदरी रुजूबायदबूद. अलबत्ते सरफराझी खाहद याफत. मुवाफके वाजेबुल अर्झ आन शुजाअत निशान तालुके तारमरी वगयरहु बरान तियादत पनाह बहाल. वगयर अझआन कडपा व कही कोटा व गहमम बशर्ते फराहम आवुर्दने से हझार सवार बसेहझार बार सिवाये मवजूदाते जमिय्यते हाल हमराहीये इशान मुमताझ फर्मूदेह खाहद शुद. व जागिराते यकलक व बोस्तो पजहझार रुपिये दरहमुन नवाही दहानीदे खाहद शुद. व दर मुकद्दमये निगाह दाश्तने सवारान बहाली व बरतर्फी व कमी व झीयादती मुख्तार बर आन शुजाअत निशानस्त. व चीझीखर्च बनावरे फराहम नमूदने जमीऽअत मआरुझ दाश्तेबूद मालूम शुद. बराजिबके मआरुझे मनशूरे फयझ गंजूर दरबाबे रसीनीदने मबलगे मझकूर अझ आन्जा तलबानीदे खाहद गीरफत. जमीऽअत रा मुवाफके करार फराहम बायद नमूद. बदस्तगीरी नमुदने समाकूरी कारीमेह. बगीरफतने थाणे मीर मुस्लृ मआरुझ बुद झाहेर शुद. लेकीन, घडे मजकूर बनाये

गुंजीकोटा फाबेले मुनहेदम नीस्त कदेआन यडनिस्रते मुशीरटलमुल्कबहादर चे बनाबरान निगारगे मीरखदे बडे मजकूरा थाणे कायम नुमायन्द किल्ये गुंजीकोटा मुतेस्सल अज्ञ तालुके आन शुजाअत निशान अस्त, वनागोरीयान व मदुमाने थाणे किल्ये मजकूर किस्मीके दानद अजखुद राह्मीसारसेह गानचु नान पुख्तगी व मजबुती नुमायंद वक्तीके हुकमे हुजुर बनावरे गीरफतने थाणे सादेर गरदद बलातामुल किल्ये मजकूर दर सरकार आयद दरीन अयन मुजरा व कारदानी ये आन शुजाअत निशान अस्त व अखबारे अजतर्फे शमाल मुतवातर तलवानीदे मरसूल दारद व मावका कयाफियत अज्ञ खते बरखुरदारे मसतूर मालूम खाहद शुद. मरकूम याजदहुमे माहे वहारी सने ८१४१ महमंद खते गुलाम महमद मुनशी—

## वरील पत्राचा मराठींत अनुवाद.

फायज गंजर खिल्लुल्लाह-टीपुसुल्तान बादशाह याजकडून सियादत व निजामत पन्हात्र शजाअत निशान मालिक हसा यास सलाम, आपल व मशीर-मुल-मुल्क यांचें आपले नावचें गेलेलें अशीं दोन्हीं पत्रें बरखनदार एखल निशान मीर कमरुद्दीन खान याचे मार्फतीनें आलीं तीं पोंचलीं, मजकुर समजला त्या सर्वांचे वीज ( आमचमतें ) असें दिसतें की हे चिरंतन राज्य हें ईश्वरदत्त देणगीपैकीं येक असल्यानें कोणाचे मनांत आलें तरी त्याला कोणाचाही धक्का बसणें शक्य नाहीं शिवाय तिन्हीं सरकारचें ऐक्य होऊं शकेल ही कल्पना व्यर्थ आहे कंपनीसरकारास त्यांच्या गर्वामुळें जरी कोटयवधी रुपयांचें नुकसान झालें असेल, तरी त्या सर्वांचा विचार तें भरून काढण्याचीवेळ येईल तेव्हां ते करतील, व ईश्वर कृपेनें तशी वेळ जवळच आहे खरें म्हटलें म्हणजे हैद्राबाद सरकारचे सैन्यानें त्यांच्या रुम्हल व फडणाच्या भेट्या ममागमें घर किहिलेच्या बरकनदार व अनीकोंदीचा जमीनदार यांच्या टोळ्यानिशीं कपास हिसार अथवा फोर्ट

येथें जावें. या कामाकरितां सदरहु जमीनदाराची नेमणूक केलीआहे. सदर ब्ररकनदाराची आपण अवश्य भेट घ्यावी व त्याजशी अगदीं मोकळया मनानें व निःशकपणें सर्व विचार व्हावा. समक्ष तोंडी संभाषणान सर्व गोष्टींचा उलगडा होईल. सारांश, आंतबाहेर कोणतीही कसर न ठेविता प्रामाणिक पणाने व मोकळ्या मनाने सर्व गोष्टी हैद्राबादसरकारापुढें माडल्या गेल्या पाहि- जेत. त्याच्या मोठेपणांत व बहुमानात खात्रीने भर पडेल. तुमच्या ह्मणण्याप्रो तारमरी वगैरे, तालुके तुमचेकडे कायमचे दिले जातील.याशिवाय हल्लीं तुमचेजवळ असलेल्या सैन्यापेक्षा जास्त तीन हजार ३००० स्वार व तीनहजार बार¹ तुह्मीं आणिल्यास, कडप्पा कहीकोटा व गहमभ हीं तुह्मास दिलीं जातील व त्या ेच आसपासचे प्रदेशात सव्वालक्षाच्या जहागीरीही तुह्मांस मिळतील. रि- साल्यासबंधाने बहाली बडतर्फी तरक्की किंवा वजाई करण्याचा पूर्ण हक्क तु- ह्माकडे राहिल. तसेच फौज जमा करण्याच्या खर्चासंबधानें तुह्मी लिहिले होतें, ते समजले. त्यासंबंधाने येक लक्ष पंचविस हजार रुपये पाठविण्यासाठि फैर हिसरच्या सुभेदाराच्या नावाने हुजूरून हुकूम जारी झाला आहे. सबब त्याजकडे रकमेची मागणी करून रकम वसूल करून घ्यावी व ठरावाप्रमाणें रिसाला जमवावा, समोकूरी करीमीच्या कुमके संबंधाने व मीर मरलुचे ठाणें वेण्यासबधाने मजकूर लिहिला तोही समजला. परंतु सदर किल्ला गुजीकोव्याचे आधाराने असल्याने ( किंवा गुजीकोव्यासा- रखा आहे सबब )पाडण्यालायख नाहीं. त्याचे महत्व मशीर-उल-मुल्क बहादुर यास माहित आहे. याकारिता ( किल्याचे ठाणेकरावे ) सदर किल्यावर ठाणे बसवावे ह्मणून लिहिले आहे. गुंजी कोव्याचा किल्ला तुमच्या जहागिर गावा जवळ आहे. तव्हां वाटेल त्या रितीने गडावरील लष्कर व नागोरी लोक खुप

---

१ हा शब्द मूळात आहे तसाच दिला आहे; त्याचा अर्थ भारबरदारी (Transport) किंवा नळया-बंदुका-पायदळ-अशी होऊ शकेल.

करून ठेवावे व यासंबंधानें इतकी मजबुती झाली पाहिजे कीं, हुजूरकडून ठाणें घेण्याबद्दल हुकूम आल्याबरोबर तें सरकारच्या हस्तगत झालें पाहिजे तुमची नोकरी व तुमचें चातुर्य या कामाकडे ( लागलें ) पाहिजे तिकडून उत्तरेकडील बातम्या नेहमीं आणून लिहीत जाव्या बाकीचा मजकूर वरक दाराच्या पत्रावरून कळेल ( लिहिलें ) ता० ११ माहे बाहारी सन ८१२७ मरमद दस्तुर गुलाम महमद मुनशी

## मोहरमीर करूदी अलीखान

सियादत व नज्यावतपनाह व पुजायेत व तहवरदस्तगाह —मल्कईसा सल्मुहु खतम ये अर्जी दरजनाव व अलमियान मावहाजरत पातशाह गाजी खल्दला मल्कहु व सल्तनतहु मरसूल केलें तें पोहोंचलें लिहिलें तें मजमून दुपसल जाहीर जालें अर्जीमदार दरहदुर अमदस गुजराणिलें अवल अपु व्यायेत निपांकढोन खिलाफ आहद जाहालें तें वजुवान मुबारक बयान केलें इजान ववीसियार सतवान अर्ज मारूज करून अफडी तकसिरात करविलें असे लाजलाके खां(?)सफायेदिल आहेत, या पकडून दरगाह वाकपनाह आणून सावीत फहीम राहणे हा बमोजब येत खालफमर्जी हाजुर होणार नाहीं, म्हणोन मोकरार अर्ज केले असो इज्यान वग्या आहद करारखिलाफ न होये ऐसे अमलांत आणने इग्यानवआ सियादत निप्यावत पनाह च कामांत कसूर करणार नाहीं नपजलही अजमर्तस खी(खे)र तादूकज्यात अनग्राट मोसमम असें ईयानव आनकरीव वापोन मनसुरा अनागादीवरून न (फ?)हु (नु?) ल्हो त आहो अज खिदमत बहेसर सातक सरफराज फर्माविलें असे थे पुजायेत व तहवर दस्तगासही कडपा व गजाकोट वगैरे तहमा तपखी (दो?)म फौजचा वाह ८ाव नरतर्फी कमा व स्पादता आजहूनर फैजंग टरहन मोकरार करून घतो अमे वायेन्की जमयत तीन हजार सयार व नान हजार वारना दपूराह करन ठाग सरकार ा्या वचा अजमगाटन ईदराबादेग नगार

अखबार लिहून जे मतालब, येईल हाजुरांत अर्जी करणें. यांत आं सियादत वनज्याबतपनाःचा आ इतमाद मजबूत होईल. आइंदा अर्ज मारूज करणेस इज्यानबेस जाये होये सारखें रोज बरोज अफजू करीत जाणे. मालाय मरवारीद तुपा व्हाहुरास अस्पतुरकी हकत. हे साहेबखा व ताजखा मरसूल केलें तें पोचले. अल्हाल मनपुर फैजगनूर हासल करून रवाना केले असें बारतीबा आबज्या आणिले खूद बदौलतनी जबर अहवाल आ तहवर दस्तगाहः नियायेत व निहायेत मुतवजे व मराहीम बफजल व करम असे व अजबमे सुरत खातरजमा आन सरकारवाला इज्यान व करून व करार सरकार पाटिपानी करीत जाणें. लिहून खातर जमा इज्यान व जीनहार आ पुज्यात तहवर निपास कलमी करणार नाहीं बाजेमरातब बजुबानी दुलेखान मालुम होये. व नाम बरबुफैदवी सरकार व जीजद इंज्यान व येत बरास्त आंचखुबजी जाहीर कराल मजूर करणें बिनावर दाखल इमानी सेख इमाम यास पाठविलें असे जुबानी हुबजहुर खापाहद अमद ज्याबचे निगारपरबद

पो छ २७ माहे रजब सन २०७ हिजरी.

(माघ व. १४ शनिवार शके १७१३.)

मोहर मीर कमरुदी अलीखान.

सियादत व नज्याबत पन्हा पुज्यायेत व तहवर दस्तगाह मलक ईसा सलमहु दरीविला अर्जदास्त कीलेदार रायेदुर्ग हाजुरात गुजरलें कीं " मलकईस " अमीन पा। ताडकरी बाजमयेत खुद येऊन मरेसी व असासा आज तालुक " आंबावर दु तालके माहाल रायेदुर्ग घेऊन गेले. तमाम तालुके सरकार ताख्त ताराज केला. आजीसबब वरीयाया फरारी जाहली " ह्मणोन लि॥ होतें याजवर मिजाज अमदस बरहम होऊन आपुजाअत दस्तगाहवरी न्याह येतराजी फर्माविलें, व अहकाम बनाम सरदारान अफवाज खुद ज्याबज्या गेली जे बाद ईजफरागतही दुफसदान जमीदारान तालुके ज्यात सरकार जेहत गोप माली मलकईसा व जती नमूदन तालुके आत ताडकरी वगैरे कस्त करणें इंज्यानबेस हुकुम जाला जे बाद नबी जमीदार अनागोंदी मये जमयेत ननगाह

फौजहॊसार पोंहच्वून जसी ताळुकात मरकुमल सदर अमलेत आनण, त्याचे सावकाचे दोस्तीवर नजर ठेवणें, या सबब लिहिलें जातें जे "अगर बेहबूद खुद ज्यांन व अहरूदरकार असल्यियां अर्जी मवाफिक मसोदा दुरसेच हाल तयार करवाऊन निजद ईज्यानव रवानाकरणें अर्जी मजकुर दर हाजुर अमद. गुजराणुन वसफाईकरून आपठी तफसीरात करवाऊन, व आईंदा वर अहवाल आ तहवार दस्तगाहत फजूलात हाजरत पादशाह गाजी जुल्ला मल्कहु मपुमुल होये वगैरे दरदास्तही अमलांत येईजे सारखें केलें जाईल अगर इकदर कवीन सलाह आं तहवरदस्तगाह न होये, मये जमयेत व सरंजाम वगैरे घेऊन ताडकरी सोडोन व धाकेनूर व ताडपत्री गंजीकोटाच्या छाम्रा करून ते मैदानेत राहणे व इला कवाहत हासग्ला दरदेश हुसियारी व खबरदारी जरूर चंदुफिमाहेन इर्तबात कदीम आंजी सबब इतला केली असे पेस्तर दुस्तीयार जी याद चेनबीसेशयद लिहे

मोहर मीर कमरुदी अळीखान

सियादत व नज्याबत पन्हा पुज्याअत व तहवर दस्तगाह मल्कईसा सल्मह्‌—खतमै अर्जी दरजनाब हजरत पादशाह गाजी जिल्फहट्ल कुल्मकान टिपुसुल्तान खल्दल्लाह मुल्कहु व सल्तनतहु मरसुल केलें, तें पोंहचवून कैफियेत व माफसल मफहुन जाहालें, व मसीरल्मुल्कचा खत पाठविलें वजीनस हाजुरांस गुजराणिलें खुद बदौल्त मुतवजे होऊन मुतवजे फर्माविलें वाद मुजाहिजे हार्फ न हार्फ इर्षाद जालें इनपाला खुताला तदारुला आन करीब असे आं पुज्याअत व तहवर दस्तगाह यास लिहिणें कीं "जमयेत मोतबर " मवाफिक नविस्ते साबकि फराहीम करीत जाणे कडपा व गंजीकोटा वगैरे " माहालास सुपुर्द आं पुज्यायेत व नज्याहतपन्हा यांस केले जाईल गरज " इनायात मजीदत फजूलास मपमुल हाल येशांस खिदमत उमरा उमराई मरातब खासानी सर्फराज होत आहे बखातरजमा व इतमिजान ख्याजमे फिदवीयेत ज्योमिपानी बकार सरकार बजहुर आणे आईन मुजरा " असे आं पुज्यायेत व तहवर दस्तगाह मारूज केलें असे, जमयेत भारी, गुरूक जुजनी, हाल

कमि, याकडोन इत्तिफाक होत नाहीं. हाजुरात अर्ज करून खर्च मामुल मरहमत करवणे ह्मणून, बारतीबाक मारुज आ सियादत नज्याबत पन्ह: हाजुरात बिसियार अर्ज मारूज करून हाहु कदमेस कफील होऊन, येक लाख पचवीस हजार रुपयेचे परवानगी हासल करून, मनपुर फैजगनुर बनाम दारोगे फैज हीसार ईजहार करून रवाना केले असे मुबलग मजकुर आनवाउन घेणें. जमयेत दरेषान न होये सारखे फराहम करीत जाणें. अखबार साहेबान हैदराबाद मुतवातर अर्ज करीत जाणे. सेख उमर वगैरे सवरूतगराचे बाबत घोडे व मषराचे गटे पाठविले ते हाजुरांत गुजराणिलें बिसियारपसंद हिजीरा फर्माविले व बाजेमरातब दुफसल मालुम दोईल. ताजखान वतुलहेखान यास पगावर टेविलें. बिसियार बेहतर व आईन खुषनुधी इज्यानब जाहालें. ज्यादाच ब कलम आयेंद हुमर आमी मारुज केलें होतें जे सावीक जे मनषुर व तलदुफ नामाखत फारसी वरूद फर्मावित होते हालाहिंदवी सादर होत आहे काये सबब बरी सलाह हातीस्त ह्मणोन ईर्शाद जाला आहे

पौ छ २६ रमजान सन १२०७ हिजरी. पोहचला.

( अधिक वैशाख व. १३ बुधवार शके १७९३. )

श्री

श्रावण व. २ शुक्रवार शके १७१३

विनंति विज्ञापना:- मध्यस्ताचे बोलण्यात " कीं टिपुसी तीन सरकारचा
" तहनाम्यास कांहीं बहुत दिवस जाले यैसे नाहीं, इतक्यात आताच त्या-
" जकडून बेकरारीच्या चाली सुरु होतात; तेव्हा पुढे भरवसा काये माना-
" वयाचा ? तलालकोटा येथें इकडील ठाणें असता, तलालकोटा लोचन गुंडाचे
" पोटीं ह्मणोन टिपुने आपले ठाणे तेथें घातले हे एक. दुसरे, गुती सरकार
" पैकीं सिंगणमला या सरकारचे वाटणींत घेतला. याची रक्कम दहा हजार होन
" टिपूचे कमाल बेरजे प्रो लागली, त्यास सिंगणमला तालुक्याचे कुल
" सवीस देश मिळोन वसूल पाहिला असतां दहा हजार होन नाहीं. ऐसे
" असोन सवीस देश तालुका सिगगमला तालुका सिंगणतसा नाहीं. तेराच

"गांवची तुकडी ह्मणोन तेरा गांवास दुरडमाला तालुका येसे नांव ठेऊन तेरा
"गांवास हरकत केली आहे तसेंच इंग्रजाचे वांटणींत फिरट रामराज्याकडील
"एक तालुका आपला ह्मणून लाऊन दिला, त्याची ही कटकट पडली आहे
"मुळें अद्याप बोलास आहेत तोंच ह्या चाली" या प्रो बोलण्यांत आलें
रा।। छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१३

विनंति विज्ञापना मध्यस्तानी बोलण्यांत आणिलें कीं "अनागोंदी व
"हुर्वेगी दुर्ग हे तालुके टिपुकडील, तेथील जमीनदाराचा हांगामा भारी,
"दखल नाहीं, सबब टिपुनें फौज दहा बारा हजार दोन तालुक्याचे बंदो-
"बस्तास पा।।, जमीनदारासी व त्यांचे फौजेसी एक लढाइही जाली या
"प्रो वर्तमान आहे" ह्मणोन सांगितलें रा।। छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके ७१११

विनंती विज्ञापना मध्यस्ताचे बोलण्यांत आलें का, "टिपुची चालबे
आहदीची व शरारत व गस्तीची इतकी सजा जाली तथापी जात नाहीं
"पहिले तख्त केलें होतें, ते तख्तावर बसावयाची मात्र बाकी होती. हाली
"त्या तख्तावर बसावें हा इरादा करून साअत मुकरर केली तख्तारूढ
"जाल्यानंतर रोज च्यार च्यार हिंदु आणून मुसलमान करावे ही योजना केली
"याप्रो वर्तमान आहे, मग काय घडते पाहावें सारांश, पहिल्या
"चाली अद्याप दूर झाल्या नाहींत कोणे विसींचा भरंवसा व विश्वास
मानावा असें नाहीं" याप्रो बोलले रा।। छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७११

विनंती विज्ञापना मध्यस्ताचे बोलण्यांत आलें कीं "लाडबहादुर फल-
"कत्याहून चिनापटणास यणार, त्यांजपुढें मीर आलम बहादुर यांची र

"वानगी करण्याची तजवीज केली आहे. कारण कीं, करनूलकर संबंधीं "टिपूकडील बेशकसीचा जाबसाल, याचा बदोबस्त होणें. दुसरें, तलालकोटा "वगैरे ठाणीं इकडील असता ज्यादती करून टिपूनें घेतलीं. सिंगनमला "तालुकीयात निमे आपला ह्मणतच आहे. इत्यादिक जाबसाल लाडांसी बोलून बंदोबस्त जाले पाहिजेत. याजकारितां याची रवानगी जरूर" याजवर आह्मी बोलिले कीं "इतकींच कामे आहेत किंवा आणीक कांहीं आहे." मध्यस्त बोलिलें, "असेंच दुजबाबसाल आहेत. काहीं विशेष नाहीं; परंतु, गेल्यानें बदोबस्त होईल." याजवर आणीक मी विच्यारिले कीं "अशा कामास मीर आलम बाहादुर यानीं जावें लागेल कीं काय?" तेव्हां मध्यस्तानीं उत्तर केलें कीं जें "मीर साहेब यांस वाकफी येत आहे. याजकरिता याचे जाण्याचा बेत केला आहे. याचा इतला तुह्मी सरकारात ल्याहावा, आणि उत्तर आणवावें, ह्मणजे यांची रवानगी करण्यांत येईल. कदाचित सलाहास असें आलें कीं:—'जुजबी काम, याजकरिता मीर साहेब यास कशास पाठवावे? पत्रात जाबसाल लिहून पाठवूनच उगवावें.' असें उत्तर आलियास तसेंच करावयास येईल" ह्मणोन सांगितलें, त्याजवरून सेवेसीं विनति लिहिलीं आहे. याचे जाबाची आज्ञा लौकर जाली पाहिजे रा॥ छ १५ माहे मोहरम हे विज्ञापना.

श्री.

श्रावण व. २ शुक्रवार शके १७९३.

विनति विज्ञापना: नवाबाचे येथें इंग्रजाचीं व फरासीस यांची लढाई विलायेतेमध्यें पाच चार वेळा जाली त्याचा अखबार पारसी आली ती व दुसरी अखबार चिनापटणाहून सवदागिरानी पाठविली. ती दुरुस्तसर आहे व हाल छ ६ जिल्हेची अखबार मछली बदरास नवाबाकडील वकील आहे. त्याणीं पाठविली, तीं मोहरमचे समारंभात नवाबास पावती जाली नवती. तिची नकल येक गृहस्थापासोन घेतली; याउपरी नबाबास पावती होणार.

एकूण तीन अखबारेच्या नकला सेवेसी रवाना केल्या आहेत त्याजवरून ध्यानांस येईल

१ प्रथम अखबारेचा वंद पाठपोट भरून लिहिला आहे

१ दुसरी अखबार चिनापटणाहून सवदागरांनीं लिहिली त्याचा एक वर्ख

१ तिसरी अखबार मछेलीबंदराहूनसकाल्तराम याणीं पा। तिचा येक वंद येक तर्फा ——

—

३

—तीन अखबारा फारसी पाठविल्या आहेत, त्याजवरून ध्यानांत येईल रा।छ १९ मोहरम हे विज्ञापना.

इस्वट इंग्रजाकडील वकील येथें आहे त्यांणीं यांस अखबार विलायतेहून आली ते दिल्ही, तिची नकल हे असे

* सरजुमये इनतेखावे जग वा फरासीस दरविलायत व तारीखे गुरेर वमार्ग्य सने १७९२ इसवी मुताबके हफ्दहुमे रजब सने १२०७ हिजरी मसाम अछ आनहून सुल्ताने अल्मान बादशाहे परस फौजे खुदहारा सेजुक कर्दे वक्ते शव उबूरे नदी बइस्मे नरोर नमूदे अल्स सबाह बर्फौजे फरासीस के मुरचिल व बॅटरीहा बस्ते वूदन्द अक्षसे सर्फ पुर्स नमूदन्द फौजे फरासिस ताबे मुकाबमत न यावुर्दे रुवफरार निहादे दवाम्दे अशरामे किलान् वसी शूद बेटरी व खजाने फौज फौज व गनीमत आमद यकहजारो दोसद फरासिस कुस्ते व जखमी व शिस्सद असीर शुदन्द व अज् फौजे अल्मान दह फस कुस्ते व चहारकस जखमी व अज्ञ फौजे प्रूस हमानकद्र बतारीखे मजकूर शहाजादये इंग्रीज बइस्मे चार्लस वक्ते सेपोहोर बसरकर्दे हरावुछे अफवाज फरमुद ता मरचंद बॅटरीहा ये फरासीस के तयार वूदन्द युर्श नमूद नह अर्बे तोपेग्गिर वदस्त, आमद, चंद फसे फरासिस कुस्ते व चहारसद दस्तगीर व जम

* फारसीची नकल

मीहा विसियार, शुदन्द. व तारीखे दुयम मज्ञकूर अफवाजे फिरुजी व अफवाजे सुलताने मज्ञकूर वत आकुबे फरासीस परदाख्ते वर सियाल मेलके किल्ये विसियार किलान् व मुतहक्कम व दरआनथावे गिशहजार फरासिस वूद युर्श किर्देद. हफ्तसद फरासीस व कतल आमदन्द. वयानथे किल्ये मकुरारामये असबाव व आज्ञूके वाफेर तसखीर दर आवुर्देन्द व असीरान व मजरूहान विस्यार जनरला डोंबीअर सरदारे फरासीस दस्तगीर गस्त. व अफवाजे फीरुजी अज्ञ तर्फे फरासीयान दस्तगीर कर्दे मी आरद. फरासीयान अज्ञ दुत्तलाये किल्ये सियाल मेले हेरासान शुदे खुद वखुद किल्ये मुनतरकरा गुज्ञाश्ते इरादे दारंद के फरारी शुदे तमामे मुल्के आन तफरा वेगुज्ञारंद. सुलताने अलमान व वादशाहे परूस किल्ये मुसतरकरा फल्द गाहे खूद साख्तद व तारीखे सिय्युमे माहे मज्ञकूर तआकुबे फरासिस नमूदे पच हजार कसरा कुश्ते व झख्मीये विस्यारीरा दस्गीर नमूदे दो झुंडे व वीस्तोसि अझराव दर मयदान याफतंद. व दो अवे गुव्वार व झखीरये जगी व आसूके व कुर्तीहा व गोलेहा वदस्ते आवरदे वराकिनारे दारियाये मुझा फरूद आमदंद. सवाराने फौजे फिरुझी दोहझार फरासियाने फरारीरा दस्तगीर करदद. व तोपखाने व असबावे अखीरये हर किसम वदस्ते फौजे फिरुझी दर आमद. व तारीखे चहारुम हरावुले फौजे फिरुझी उवरे नदीये मुझा नमुदे त आकुबे मकहुरान ता तकदर नमूद व वर तकदर रसीदे जगे खूबे शुद. लेकीन चुन सवारने शाहझादे चार्लस नरसीदे वुदद व शव तारकिवूद शाहझादये मवसूफ हमानजा फरूद आमद. वतारीखे वंजुम वक्ते सुव य शाहझादये मवसूफ कूच करदे दीदंद के तं कदररा फरासियान खालीकरदे फरार नमूदंद. अस मकाने मज्ञकूर खझानये फौज व वॅटरीहा वझंखीरये विस्यार वदस्त आमर से पलाटन दरानजा गुझास्ते ना फौजे जरीदे व त आकुबे आनहाणरदाख्त यक झर्पे व यक झुंडे वदस्त आ व रसदके व जनरल गेलिकेट सरदारे फौजहमे दस्तुरे फतेह व सरदारे मुयससरे वीकदमी करदे फरासियानरा कुस्ते व झख्मी विस्यार कर्दे अमवाले फरावान वदस्ते आवरदे. चुन इनहर सेजुक वाहीम

इ साल्दाश्तद फरासीयानके दरमकाने स्वग्रमांद मनाह गिरफ्ते बुदंद हेरासान शुदे श्रश्नमकाने मस्तूर पेश्तर फरार नमूदंद, व रुख मोश्र दरदस्ते फिरोशी दर आमद्र बा उमदय आन मुल्क फेर आयाये बाद शाहाने मनसूर न अन्न चंदी महफूमे अहले बल्वाश्रुदंद अन्न आमदने पादशाहाने खुद व गलबये आनहा व हजीमत खुरदने अहले बल्वा विस्यार खुशदेल शुदंद बहर हन्न मीश आमदे मुबारक बाद बाद मी गुयद व शुकराने व जनाबे एलाही बनो मी आरंद व फरासियान रा हरजा केमी यावंद मीश्रनंद. तारीखे शिशुमे मार्च मगायते हस्तुमे मिनहू मकामे महयसाने फरासियान अश्नजाबजा दरीनजा मी रसद. व जनरल डोम्बीमर केदस्तगीर शुदे बुद हममी आयद शाहजादये दुव्यमे पादशाहे ईंग्रीश्न बसर फरदगीर जमाअते इस्तहस्तार अशहूरे वादशहा दस्तूरी यफ्ते मराये ए आनत बल्दीस दर मुल्के मसतूर दाखल शुद. व वादशाहे मुल्के-फरासिस बनामे तिफले खुर्द साले बादशाहे मफबूल केदर वैदे फरासियाने अहले बिलोरस्त व मनायब व वकीले मुतलक व मुखत्यारी व बिरादरे कि लाने वादशाहे मश्नकूर व मीर व रसीगीरी व सीपेसालारी व बेरादरे दुव्यमे पादशाहे मसनूर मकरर शुद व हरदो बरादराने मश्नकूर मये जमाअते पादशाही शरीके पादशहा नेदीगर केबराये ए आनत आमदंद व यक शहरे किल्लानके नामे आन या उन दर मुल्के फरासीस अस्त शिस्तहजार कारीगर के अन्न दस्ते अहले बाल्वा परीशान शुदे बुदद फुरसतदीदे बाहरे फाक्ते कदीम राली शुदे सरे शुरेश बरदाश्तद अहले बल्वा राहरजा केमी या बंद मी कुशद बदर शहे रहाये दीगर हमचुनीन फसाया मीनमूद गोया अन्न जमाअते फरासीआन मोफरीक शुदे अंद. व दर तयारी मे जहा श्रात व फौजबराये शराफ्त व खबी मशगुल व तारीखे भजुमे फीरुवी अन्न बादशाहे इस्तनुल व यादशाहे अमीश्न चुनीन इत्तेला शुद के इनजा नेव मगशी साजहासे किल्लानके फीनहास भन्न हफ्ताद अन्नराये ता यफसरो दशामे भन्नगर ग्वाहन्चुन बगर हरगीर ओकोनात मरगर शुमारश्रयरा।

तत्रिय फरासिस रवाने मी कुनम व वतारीखे शान्झदहमे फिरुझी दर शहरे लडन व वादशाहे इग्रीझ अझतर्फे वादशाहे तुर्कीस इत्तेला शुदके इनजानेब मवाझी हस्तो वज जहाझे किलाने जगी तयार मी कुनम व बसर कर्दगीए सरदारे शुभा हर मुल्के फरासिस मी फिरस्तम. वे वतारीखे हस्तोह कदहमे फिरूझी दरमकाने कील के फरासियाने दरसाल गुझस्ते मुतसरेफ शुदे वुदंद दरीन विला जमइ अझ फरासियान केदर आनजा वुदंद व जबरदस्ती अझ बाशदहाये आनजा कौलो कसमे शराकत मी गीर फतद. लेकीन बाशदहाये मझकुर हमेहा बयक झबान सदा आवरदंद के उमरे सुलतानें व फिल अल फौर बरफरा सियाने मझकूर हुमले करदंद अझ चूब व तरझदे बदर करदद. फरासियान ताव न आवरदे झुटे वगयरे गुझाश्ते गुरीखतद व हमचुनीन बाशदहाये कोलस वाद नीझे व अमल आवरदे

२ फरासीस व इंग्रजाकडील अखबार चिनापटणास परभारे आली तिची नकल सवदागरानी येथे पाठविली तिची नकल हे असे,

* तरजुमये अखबारे विलायत बमुजबे

नवश्तये सौदागराने बाशदे चिनापट्टन.

कौमे वलदीझ एताअते फरासीस नमूदद. दर मूल्के खुद निशानें फरासिस बर कोठीण खुद कायम कर्दे अद हमशीदे बादशाहे अग्रीझ मये पिसर शरीके फरासिस शुदे कौमे फरासिस हररोसे मकाने अंग्रीझ मुशार अलयहेरा कायम करदंद. बील फेल फौजे अग्रीझ अझतर्फे दरिया दरमुल्के खुद व फौजे फरासीस अझ इनतर्फे. हरदो जमीअत बजाये खद मुस्तइद्द. मरकुमे विलायत १७ शाबान सने १२०७ हिजरी.

३ मछेली बंदराहून छ. ६ जिल्हेजची अखबार राजे वकालतराम यांणीं पाठविली तिची हे नकल असे.

---

* असल फरासीस.

*हय अल गफूर अकरसे अ अला

शिशुभे शील हज्जे अल्हराम सन १२०७ हिजरी

किल अशीन हकीकते मिनाकशी इंग्रीस व फरासीस दर विलायत व दरींजा व इरादये इंग्रीस व एंत्तेहाए किल्लये व लेचडी व गिरफत वगीरे जहाजात वइस्से अईदर आवरदे बुद. दरीन विला किश्ती अस विलायत दर अर्से चहलो पंज रुज व चिनापट्टन आमदे खतुतीके आवरदे बुद रसानीद खावये कलकत्ता गरदीद चुन हुकमे विलायत दर मुहासरये किल्लये पेल्छडी व तसर्खीरे आन रसीद अहालीये चिनापट्टन पंजहजार वार व सेहजार सिलेदार व अम्बराये अतत्राव व सुर्ब व बारूत व आबूके व गयरहु व कडालूर व देवपट्टन के अस अमकनय कदीमये इशानअस्त रवानेकरदंद व दीगर सामाने हर्ब व मुहासेरेह अनकरीब इरसाल मीदारंद इरादे अस्तके अफवाज व आलाते मुहारबे व मुहासरे दरान मकान मुजतमे व मुहय्यासारने व हय्याते मजमूई अमीजा वरसे मकसद वामद शिनाफ्त व हम चुनानदर अंदक फुरसत मुतवज्जये मुहासरे खाहद शुद व अज विलाये फरासिस वा माल्के वेल्चडी नवस्तई रसीदके मुत आकबे हिजदे जहाज मशहून व मुमलव अज मर्दुमाने जंग व सुर्वो बारूत व खजाने व वेलचडी रवाने नमूदे अम्मा वसबवे इरारते हवा व मुखाले फते मिजाजे अज सिलेदारे मशकूर बीशतर अरकये तल्फ व कमतर वारेदे मकसद गरदीदंद दरीन व कतदर किल्लये वेल्चडी जीयादे अज दो हजारो पानसद फरांसीये आमी मवजूद नीस्त व मी गुयद के बरमरे किल्लये अस्रराये अतबाये किलान निस्त दर आवदीये वेलचडी मुनाही करदंद केतदर कसके आजू फयेमे माह ररवानये खुन्दास्ते वाशद दरशहर बेमानद वगरने राहे किस्मी फरागीरद व पोर्तुगीज व वलंदीस रफीके तरीके इंग्रीसर्द व इस्पानीये व डेनमार्कीये मुमद व मुआवने फरासिस गस्ते दरीं विला यक जहाजे फरासिसके मुमल व अज बिरंज बुर्ग वगारत बुर्दे सरकारश दर किल्लये

---

+ असल फरासीस

मछलीबदर बकयदे उसार गिरफतार अस्त खबर अस्तके लोर्ड कार्नवाल्लीश बजहते सरंजामे फरासिस अझ कलकते व चिनापट्टन मी आयदं फते अलीखान सरंजामे गावाने तुपकशीरा अझबराये खातरे कंपनीये इंग्रीझ किस्सये हिमत साखे अस्त आयदे अझांजा रूमीदहद व अर्झे खासीये पुशाने बसाते एकबाल व बंदगाने दरगाहे इझ्झा जलालमीर सानद. झीयादे इदे अदब.

सदर तिन्हीं अखबाराचा अनुक्रमे मराठींत अनुवाद. * (१) युरोपांत प्रेचाबरोबर झालेल्या लढाईच्या हकीगतींतील एका उताऱ्याचा तरजुमा.

ई स १७९३ च्या मार्च महिन्याच्या पहिले तारखेस ह्मणजे हिजरी सन १२०७ च्या रजबच्या १७ वीला जर्मनीचा बादशहा मसाम अलअन हून व प्रशिआचा राजा यानीं आपल्या सैन्याच्या तीन टोळ्यां करून, नरुर नावाची नदी रातोरात ओलांडून, तोफखाने व खंदक यानीं सुरक्षीत जागा घेऊन बसलेल्या फ्रेच लोकावर तीन बाजूंनीं हल्ला केला. फ्रेंच सैन्याचा त्या हल्यामुळे टिकाव लागेना व त्यामुळें ते पळून गेले, बारा मोठ्या तोफा, तेरा ज्याटरी व लष्करी खजीना इतकी लूट त्यास मिळाली. १२०० फ्रेंच लोक जाया व जखमी झाले आणि ६०० कैदी हातास आले. जर्मनापैकीं १० मेले व ४ जखमी झाले. प्रशिअनाची संख्याही तितकीच होती. त्याच दिवशीं सुमारे तीन प्रहरचे सुमारास चार्लस् नावाच्या इग्रज राजपुत्रानें तोंडावरलि टोळीबरोबर घेऊन, लढाईला तयार असलेल्या काहीं प्रेंच तोफ खान्यावर हल्ला करून ९ तोफा हस्तगत केल्या. काहीं प्रेंच लोक मारले गेले. ४०० कैद केले गेले व बरेच जखमी झाले. त्याच महिन्याच्या दुसरे तारखेस हे विजयी सैन्य व बादशहाचें सैन्यांनीं मिळून सियासमेलच्या किल्यापावेतों फ्रेंचाचा पाठलाग केला. हा किल्ला फार मोठा व मजबुत आहे व तेथें फ्रेंचांचे ६००० लढाऊ लष्कर आहे. त्याजवर त्यानी हल्ला करून ७००

---

* हे आंकडे आमचे आहेत व त्याची योजना मूळ व अनुवाद यांच्या क्रमाच्या सोईसाठीं केली आहे. स. + तोफखाने

फ्रेंच पाडले व किल्ला घेतला किल्ल्यांत बरीच अन्नसामुग्री व इतर दारुगोळा होता तो त्यांस मिळाला तसेच त्यांनी बरेच लोक जखमी केले व बरेच कैदी सांपडले फ्रेंचांचा सरदार जनरल डॉंविअर हा हातीं सांपडला व त्याबरोबर बरेच फ्रेंच लोक कैद झाले सियासमलचा किल्ला पडल्याची बातमी कळतांस फ्रेंचांची फार गाळण झाली व लागलीच किल्ला व त्याचे भोंवतालचा मुलूख तसाच टाकून देऊन त्यांनीं पळून जाण्याचा विचार केला जर्मन बादशहा व प्रशिआच्या राजांनीं ह्या सोडून गेलेल्या किल्ल्यावर आपली छावणी करून तिसऱ्या तारखेला फ्रेंचांचा पाठलाग केला, ह्यावेळीं ६०० लोक मारले, बरेच जखमी व कैद केले व रणांगणावरून दोन निशाणें व २३ तोफा व बरींच काडतुसें, गोळ्या व अवतर लढाईचें सामान आणिलें तसेंच दोन जंगी तोफा व बरींच काडतुसें, गोळ्या व अवतर लढाईचें सामान त्यांना मिळालें नंतर मेन्ह नदीवर त्यांनीं तळ दिला विजयी सैन्याच्या रिसाल्यानें, पळालेल्या फ्रेंच सैन्यांतले २००० लोक कैद केले, व त्याचे तोफखानें व सर्व प्रकारची सामुग्री ह्यांच्या हातीं सांपडली ४ तारखेला ह्या फौजेच्या तोंडावरची टोळी मेन्ह नदी ओलांडून ब्रकदर पावेतों ह्या घाबरलेल्या सैन्याचा पाठलाग करीत गेली तेथें पोहोंचल्यावर फार भयंकर रण माजलें परंतु राजपुत्र चार्लसचा रिसाला आला नसल्यानें व रात्रही अंधाराची असल्याकारणानें त्यानें तेथेंच मुकाम केला ५ वीला त्यानें कुच केला तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं फ्रेंच लोक ती जागा सोडून पळून गेले होते, येथेंही त्यास बराच लढाऊ सरंजाम, व बॅटरी व खजीना मिळाला तेथें असलेल्या तीन पलटणांचा कांहीं निवडक लोकांनिशीं पाठलाग करून येक तोफ व येक निशाण हस्तगत केलें सेनापति गेब्लिंट व एकत्र सैन्याचा सेनापती असे दोघे पुढें पाठलाग करीत जाऊन फ्रेंचांपैकीं बरेच जाया व जखमी करून पुष्कळशी लूट घेऊन आले ह्या तिन्ही तुकड्या जेव्हां पुन्हां एकत्र जमल्या तेव्हां रोहामंड शहरांत दया भाकून बसलेले फ्रेंच लोक घाबरून तें शहर शत्रूच्या हातांत सोडून पळून गेले तेथील सरदार लोक ह्या विजयी राजाची

च प्रजा असल्याने त्याच्या जमामुळे त्यास फार आनंद झाला; व मध्यतरी कालानुरोधानें जरी त्याजवर बंडखोरांनीं आपली सत्ता बसविली होती, तरी ते पळाल्याचें वर्तमान समजल्यापासून प्रत्यहीं सकाळीं ते शहराबाहेर येऊन ह्या विजयी राजाचें अभिनंदन करून व ईश्वराची प्रार्थना करीत असत व कोठेंहीं फ्रेंचांचीं गाठ पडली कीं त्यांस मार देत असत. तारीख ६ मार्चपासन ७ मार्च पावेतों जेथें फ्रेंच लोक कैद करून ठेविले होते तेथून त्यां सर्वास एक जागीं आणण्यात आले. त्यातच जनरल डॉंब्रिअर हा होता कारण तोही कैद केलेल्या लोकापैकींच येक होता. इंग्रजाच्या दुसऱ्या राजपुत्राला ७००० लोकाचें आधिपत्य मिळाल्यावर डच लोकाच्या मदतीकारिता तो निघाला व वर सांगितलेल्या जागानां शह दिला. फ्रेंच बंडखोरांच्या कबजात त्याचा राजा कैद केलेला होता. त्याच्या लहान मुलाला फ्रान्सचा राजा नेमिलें व युवराजाची व प्रतिनिधीची जागा त्याच राजाच्या वडील भावाला दिली. तसेच त्याच्याच आणखी एका भावाला मुख्य प्रधान व सरलष्कर नेमिलें. हे दोघे बंधु एकंदर सर्व राजचिन्हासहित त्यांचे मदतीसाठीं आलेल्या राजास येऊन मिळाले. फ्रान्स देशातील रोवेन नामक शहरात ५०००० कामकरी लोक होते, त्याना बडखोरानीं फार छळलें होतें ह्या लोकांनीं आपली संधि आली आहे असें पाहून जागजागीं जुटी केल्या व बंडखोर सापडल्याबरोबर त्याना मार देण्याचा सपाटा चालविला. दुसऱ्या जागींसुद्धां असाच प्रकार चालू झाला. जणूं काय त्यां वेळीं फ्रेंच लोकात दोन फळ्याच झाल्या होत्या असें दिसूं लागलें. बाकीचे लढाऊ जहाजे व लढाऊ शिपाई तयार करण्याच्या उद्योगाला लागले. पांचवे तारखेस इंग्लडच्या राजाला इस्तंबोलच्या सुलतानाकडून बातमी लागली कीं, फ्रेंचांना शासन करण्याकरितां इंग्रज ओकोडेल याचेबरोबर ७० पासून १०० तोफा पाठविल्या जात आहेत. १६ तारखेला इंग्लंडच्या राजाकडे तुर्कस्थानच्या सुलतानाकडून निरोप आला कीं २५ मोठीं लढाऊ जहाजें तयार करून आपले सरदाराबरोबर फ्रान्स देशांत लवकरच पाठविली जाणार

आहेत कौल नांवाचे शहर तेथील लोकांवर जुलुम करून फ्रेंच लोकांनीं गेल्यावर्षीं घेतलें होतें व तेथील लोकांपासून जबरीनें वंडवाल्याशीं प्रामाणिक पणानें वागण्याबद्दल शपथा घेतल्या होत्या परंतु ता० ७ व ८ रोजं तेथील सर्व लोक एकदम " जर्मन बादशाहा दीर्घायु होवो, फ्रेंचांचा त्यानें हासून पाडाव होवो " असा घोष करीत त्यांनीं फ्रेंचांवर हल्ला केला व काउथा आणि कून्हार्डी यांनीं त्यांस बराच मार देऊन बाहेर हांकून लाविले फ्रेंचांना त्यापुढें टिकाव धरतो येईना, आणि ह्मणून आपली निशाणें वगैरे वशींच टाकून देऊन त्यांनीं पळ काढला अशीच स्थिती कोल्सवाद येथे झाली

२ चिनापट्टन येथील व्यापाऱ्यांना आलेल्या पत्रावरून युरोपांतील आलेल्या बातमीचें भाषांतर

डच लोकांनीं फ्रेंचाचें वर्चस्व कबूल केल्यावर त्यांनीं आपल्या कोठी ( कारकान्या ) वर फ्रेंचांचें निशाण रोंविलें, इंग्लंडच्या राजाची बहीण व तिचा मुलगा यांनीं फ्रेंचांशीं मैत्री केली व दोन तीन ठिकाणीं त्यांचें स्वामित्व त्यांनीं कायम केलें. इंग्रजी सैन्य त्यांच्या देशांतील किनाऱ्याच्या प्रदेशांत तयार आहे व फ्रेंच सैन्य त्यांचे बाजूला तयार आहे इंग्लंडमध्यें हिजरी सन १२०७ शाबानच्या १७ वे तारखेस लिहिलें

१ तो सर्वांत पवित्रतम व श्रेष्ठतम आहे, सोम क्षमा करील

ता ९ झील्हज्ज अल्हराम सन १२०७ हिजरी

युरोपांत व या देशांत इंग्रज आणि फ्रेंच यांचे दरम्यान झालेल्या लढाईची बातमी किंवा बेलचारी घेण्याचा इंग्रजांचा उद्देश अगर इंग्रजांनीं कांहीं जहाजें धरली या बातम्या आपल्यास पोंचण्याचे पूर्वी ८१ दिवसाचे प्रवासांतच येथें पोंचलेलें युरोपांतून येक जहाज आलें आहे तें चिनापट्टणास लागलें व त्यानें आणिलेली कांहीं पत्रें येथें देऊन तें कलकत्त्याम रवाना झालें बेलचारीचा वेढा

घालून तें घेण्याविषयीं युरोपांतून हुकुम आला असल्याने चिनापट्टन येथील लोकांनीं कदलूर व देवपट्टन ह्या त्यांच्या जुन्या ठाण्यांकडे ५००० बारा (पलटणे—बदुकावाले—किंवा, भारवरदारी—पान १५ टीप-पहा), ३००० शिलेदार, तोफा दारूगोळा व लढाऊ सामान व वेढा देण्याला उपयोगी पडणारें बरेच सामान रवाना केले व आणखीही बरेच लढाऊ सामान लवकरच जाईल. त्याचा इरादा असा दिसतो कीं वरील जागीं फौज व सर्व सामान व वेढ्याची सर्व तयारी जय्यत ठेऊन तेथून सर्वांनीं एकवटून हल्ला करायचा व अशा रितीने अल्पकाळात वेढा द्यायचा. फ्रान्स देशांतून बेलचारी येथील लोकास असे आश्वासन आले आहे कीं लवकरच १८ जहाजे, तोफा, बदुका, शिपाई-दारूगोळा व इतर लढाऊ सामानासहित पाठविलीं जात आहेत. परतु ते येईपर्यंत त्यानीं आपले नाव राखावें व सदर ३ शहराचे उत्तम रितीने सरक्षण करून तें राखण्याचा त्यांनीं प्रयत्न केला पाहिजे. लागलीच त्यानीं ४ जहाजे ३०० शिलेदार, दारुगोळा व सामानसह बेलचडी येथे रवाना केलीं. परतु हवेतील ऊष्णतेमुळें व दुखण्यामुळें त्यापैकीं बरेच लोक मेले आणि मुकामाला फारच थोडे येऊन पोहोंचले. हल्लीं वेलचडीच्या किल्यांत २५०० पेक्षां ज्यास्त लढाऊ युरोपिअन नाहींत. व असेंहीं समजते कीं तटबंदीवरून मारा करण्यासारख्या मोठ्या तोफांसुद्धां तेथे नाहींत. बेलचडी शहरात असा जाहीरनामा फिरला आहे की फक्त ज्याजवळ तीन महिन्याची सामुग्री असेल त्यानीं राहावें व बाकीच्यानी चालते व्हावे पोर्तुगीझ लोक इंग्रजांना मिळाले आहेत, आणि स्पनिश व डेनमार्कचे लोकांची फ्रेंचाना मदत आहे. नुकतेंच त्यांनीं तादुळाने भरलेले फ्रेंचाचे येक जहाज लुटलें आणि त्यावरील सरदाराला मछलीपटणास कैद केलें, अशी बातमी आहे कीं, कलकत्याहून लार्ड कार्नवालिस येऊन सदरहू फ्रेंच प्रकरणावर स्वत: नजर ठेवणार आहे. इंग्रजी कंपनीबरोबर सलोखा राहावा या हेतूने फत्ते अलीखान तोफखान्याच्या

त्रैळाच्या तयारींत आहे यानंतर जें जें होईल तें आपल्यास कळविलें जाईल जास्त काय लिहिणें ? लोभ करावा हे विनंति

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५

विनती विज्ञापना मध्यरतांनीं वोळख्यात आणिलें कीं -"चिनापटणाकडोन अखबार आली त्यांत वर्तमान कीं -'फूलचरीवर चिनापटणचा गौरनर सवीस पलटणे गोरे पगडीवाले सिवाय तोफा दोनसें इतक्या मजबूत सरंजामानसीं जाऊन इरादा केला प्रथमतःच फुलचेरीवर गोळे पुरु केले येक लढाई या-प्रमाणें होऊन त्याजवर जगमजा केलें आणि फरासीसाकडोन अधिकारी फुलचेरी येथें आहे त्याजकडे इंग्रजीकडील गौरनरानें आपले पुत्रास कि-ल्यास पाठविलें निरोप सांगून पाठविला कीं — इंग्रज व फरासीस या उभ येतां मध्यें लडाई परदेशीं जाली असतां मागील कायदा असा आहे कीं — ' लढाईत पाडाव माणसें इंग्रजाकडील फरासीसाकडे अथवा फरासीसाकडील इंग्रजापासीं आल्यास त्यांस मारहाण न करितां येहतीयातीनें ज्यांची त्या-जकडे द्यावी, त्यास आमची जमयेत सवीस पलटणें व तोफा वगैरे सरंजाम या प्रकारचा, तुम्हापासीं कुल जमयेत दोन अडीस हजार यास्तव लढाईचा इरादा न करितां मकान खाली करून द्यावें तुम्हीं चजियस्त सुद्धां निघोन जावें हें न करितां जंग करावी असाच मनोदय असल्यास तोफा लाऊन येक येक सफीडव उरून मोकळा करून देऊ त्यासमई मकान हस्तगत झाल्यानंतर तुम्हीं ह्मणाल कीं इंग्रज फरासीसाचा कायदा पाडाउ यांस सोडावें तरी तें कबूल होणार नाहीं येविसीं आताच तुम्हांस सप्पाउन सांगतो लढाई होऊन तुम्ही हस्तगत जाल्यानंतर आम्हांस कतल करणें प्राप्त इतका विच्यार पुर्तेपणें दूरदेशीनें समजोन याचा जबाब मामुल पाठवावा याप्रो निरोप गेला, परंतु याचा जबाब कांहीं आला नाहीं याप्रो एक अखबार आली

त्यात वर्तमान दुसरें ऐकण्यांत आहे कीं इंग्रजाचे गौरनरानें सदरहु प्रो फुलचेरीचे फरासीसास सागून पा. याचा जबाब फरासीसानें इग्रजासी योजिला आहे कीं आमची जितकी फरासीसी जमियेत व तोफा वगैरे बार सरंजाम आहे तितकाच सरंजाम जमियेत, व बार इग्रजी आमचे मुकाबिल्यास घेऊन यावे. तुमची आमची लढाई होऊन ज्याची सिकस्त होईल याने फुलचरी मकानापासोन हातउचलावा. याप्रो ही वर्तमान आहे. याजवर याचे त्याचे लडाईची वातमी दुसरी अद्यापि आली नाहीं." याप्रो मध्यस्त बोलिले. रा। छ १९ मोहरम हे विज्ञापना.

श्री.

श्रावण व. २ शुक्रवार शके १७१५

विनति विज्ञापना. मध्यस्तानीं सागितले की " अखवारी वर्तमान येक येसे आहे कीं इंग्रजाचे बादपाहाने मिस्तर मेडोस यास सरदारी देऊन फरासीसाचे तंबीकारिता मुकरर केले. मेडोस फुलचेरी वगैरे बदोबस्ताकरिता येणार " याप्र॥ आहे; त्यास मेडोस वा सरजाम इकडे आल्यानतर, आधींच टिपुची त्याची दुष्मानी विशेष. त्यापक्षीं टिपुचे तंबीविपीचाही उद्योग करील यैसे वाटते, इतक्यावर पाहावे. दुसरे यक वर्तमान येसेही आहे कीं, " मेडोसास " त्याचे बादपाहाने रवाना केले हे वर्तमान फरासीसास समजल्यावरून फरा- " सीसानीं फौज सरंजाम पाठऊन मेडोसाची त्याची लडाई जाली, त्यांत " मेडोस पडला " हें दुसरे वर्तमान तहकीक नाहीं " याप्र॥ बोलले. रा॥ छ १९ मोहरम हे विज्ञापना.

श्री.

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५

विनती विज्ञापना. अलफखान करनुलकर यांजकडून रणदुलाखान येथें आले. नवावाची मुलाजमत होऊन, मध्यस्तासीं बोलणे जालें. रणमस्तखान यांची दौलत व करनुल आदिकरून कुल तालुका अल्फखान याजकडे वा-

हाल असावा या समंधें नवाबाची नजर दाहा लक्ष व मध्यस्त दरवार खर्च बाबद पांच लाख, येकूण पंधरा लक्ष ठरविले सदरहु पंधरा लाख रुपये दरसाल येक लक्ष प्रो पंधरा वर्षांत आदा करावे या प्रो किस्तबंदीचा ठराव जाला रणदुलाखान यांचें बोलणें मध्यस्तांसी की " टिपूकडून गुलावखान पेषकसीचे येवजाकरितां करनुलास येऊन तगादा करितो याचा बंदोबस्त करावा तर सालाचे सालास करार बमोजीव येवज ज्या बथ्या होईल टिपु पेषकसीचा येवज घेऊं लागल्यास त्यास परभार देणें, आणि नजरे बाबद इकडेंही येवजाची सरबराई करणें, हें कसें घडेल !" या प्रा। बोलणें आहे इब्राइमखान रणमस्तखानाचे वडील पुत्र यांजला प्रथम खिलाप व सरफराजी करून येथून करनूळ तालुक्याचे बंदोबस्ताकरितां महमद अ मीखां आरब यांजकडे रवाना केलें मागाहून फौज पाठऊन कुमक करावी येसा बेत होता तो राहून, अलफखानाकडील पैगम लागल्यावरून रणदु लाखानास येथें आणविलें, हें इब्राइमखान यास समजल्यावरून तेही पाफट्ट राहून निघाले ते येथें आले नबावाची मुलाखत जाली इब्राइमखां यांस साठ हजार रुपयांची जागीर यक तालुका धावा त्यांत त्याणी आपली गुज राण करावी, वरफल सर्व तालुका अलफखानाकडे, याप्रो रणदुलाखान यांसा निश्चयें ठरून सनदा पत्रें तयार करविली रा।। छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना नवाबांनीं मध्यस्ताजवळ असतां आह्मीं बोलण्यांत आ णिलें की "टिपुसीं तीन सरकारचा तह पटणावर जाला ते समई करनूलकराकडील पेषकसीचा जावसाल टिपूकडील मातबरांनीं बोलण्यांत आणिला, त्या समईची माहितगिरी तुह्मांस सर्व आहेच करनूलकर समंधी गाहतागिरी तुह्मांस सर्व आहेच करनुलकरासंबंधी जावसाल तहाम्यांत ते

वल्तीच उगवावा यैसे लाडांसी बोलण्यांतही आले; परतु, लाडबाहादुर यांनीं सांगितलें कीं तहनाम्यात हे कलम उगवावें यैसे आज ह्मटल्यास टिपुनें अगर कबुल केलें तर उत्तम; कबूल न केल्यास हरकत होईल. त्यापक्षीं जो जाबसाल तहनाम्यांत उगवाग येसा इकडील सवाल असता त्यानें न कबूल करणे यांत काय राहिलें? " इत्यादिक अदेशे समजोन बोलण्यांत मात्र जावसाल आला कीं "रणमस्तखान यांचे मोहरी दस्तायेवज पेषकसीचा निघाल्यास मजूर. दस्तायेवज निघत नाहीं त्यापक्षीं हा जाबसाल मजूर नाही. या प्रा गुलामअली व रजाअली टिपुकडील मातबर यासी इंग्रजांकडील मिस्तर किनवी व आम्हांकडून मीर आलम व राव पंतप्रधान याचे तर्फेनें तुम्हींच होतां. तीन सरकारचे वकीलाचा जाबसाल सदरहू प्रा असतां त्या समई रणमस्तखानाचा मोहरी दस्तायेवज निघाला नाहीं. पुढे पटणाहून कुच जाले; हा जाबसाल मुलतवी राहिला. साप्रत टिपुकडून गुलाबखान करनुलास येऊन पेषकसीचा तगादा लाविला आहे. याजकारिता लाडबहादूर यास पत्रें देऊन करनुलकराकडील सादुलाखान चेनापटणास गेला; अद्याप तेथेंच आहे. लाडबाहदूर याजकडील जबाब कीं "दस्तायेवज निघे अगर नसे. टिपुसुलतान करनुलकरास पेपकसीचा तगादा करतील त्यास मुजाहिमत नव्हती. व तालुकियात आपला दख्खल होऊ नये येसे म्हणणें" त्यास पेषकसीचे जावसालाची शर्त रणमस्तखान याचे मोहरी दस्तेयवजावरील करारांत असता लाडबहादूर या प्रा म्हणतात. ताजुब आहे. त्यास पेपकसीचे झटनिवारण करणे हे राव पतप्रधान यानीं व आम्ही याचा उद्योग केल्याशिवाय घडत नाहीं. यास्तव येविपईं लाडसाहेबास पत्रें आमचे व राव पतप्रधान याजकडील या प्रा जाऊन पहिला करार ठरल्याबमोजीब दस्तायेवज वर्जीनस असलियास मुजाका नाही. दस्तायेवज नसता जबरदस्तीने पेषकस घेणे हे सलाह नाही यास्तव हा कचा मार तुम्हीं राव पंतप्रधान यास लिहून सदरहू अन्वये बंदोबस्त प्रकर्णीं

लाड बाहदूर यांस पत्र आगावार्ते ह्मणोन बोलण्यांत आलें " त्यास त्यांनीं मसोदा दिल्यानंतर सेवेसीं रवाना करीन राछ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना मध्यस्तास आम्हीं विच्यारिलें कीं " करनुल संस्था नचा बंदोबस्त इब्राहमखान यांनीं करावा, येसे पेषजी ठरलें असतां सांप्रत अलफखान यांजकडे बाहाली जाल्याचें यैकतो याचें कारण काय? आलफखानाकडोन रणदुलाखान येथें आले, आपल्याकडील नजराणा वगैरे जाबमाल ठरलाच असेल श्रीमंतांचे सरकारचा जाबसाल होणें यास्तव करनुल प्रकरणी बंदोबस्त कोणे प्रकारचा ठरला ? " याप्रो बोलल्यावरून मध्यस्तांनीं बोलण्यांत आणिलें कीं " टिपुकडील पेशकपीचे येवजाकारितां करनुलकरास तगादा लगला आहे येविसीं लाडसाहेबांस लिहिलें होतें परंतु लाडानें म्हणणें कीं पेशकमीचा जाबसाल परभारें टिपुसुल्तान करनुलकरांसी समजोन घेतील आपल्याकडोन तोंपर्यंत करनुल तालुकियांत दखल होऊं नये, असें आहे त्याजवरून तूर्त इब्राहीमखान यांची पास करून तालुक्यांत हांगामा करणे सला नाहीं म्हणोन बिल्फैल अलफखानाकडे तालुका आहे तसाच असावा, पुढें प्रसंगानरूप होणें तसें होईल हा विच्यार समजोन आलफखानाकडेच बाहाली ठरली इब्राहिमखान यांस साठ हजार रु याची जागीर येक तालुका द्यावा, ऐसे रणदुल्लाखान यांसी बोलण्यांत आले मग साठ हजाराचा वसुली तालुका देसाल अगर पांच, हजार रु माहावारी द्यावी दोन्हीसून येक ठरेल बंदगान आली यांचें सरकारचे नजरेसे बोलणें जालें, परंतु मुख्लसी आहे मवय कीं रणदुलाखान यांचें बोलणें टिपुकडील पेषकषीचा तगादा मनकुफ करयाना याप्रमाणें नजराणा वगैरे जाबसाल सूर्त मोहगम आहे दोन्हीं सरकारचे जाबसाल ठरले पाहिजेत " रणदुलाखान सुमांकडे आल होते यांनी नाहीं

म्हणोन मजला विच्यारिलें मी सांगितले, " अद्याप आम्हाकडे नाहींत " मध्यस्त बोलिले " ते तुम्हाकडे येतील, बोलतील. टिपुकडील पेपकसीचा तगादा भारी, याचा बंदोबस्त जरूर. यास्तव तुम्हीं सरकारांत लिहून रा-उबहादूर यास इकडील व तिकडील दुतर्फा पत्रें जाऊन बंदोबस्त व्हावा. करनल सस्थान इकडील व तिकडील सालाबाद पेपकषीचे याजकारिता येयाची एहतियात करणे आवल, " म्हणोन बोलिले. रा॥ छ, १९ मोहरम हे विज्ञापना.

## श्री.

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५

विनंति विज्ञापना. रणदुलाखान यास मध्यस्तांनीं सांगितल्यावरून आम्हा-कडे आले होते. खान मजकुर याचें बोलणे कीं " रणमस्तखान मरहुम यास " कदीम पासोन आश्रा व भरवसा श्रीमंताचे सरकारचा व वदगानअली या " जकडील, त्यातही श्रीमंताचे सरकारात या संस्थानची यास खातर अधिक. " रणमस्तखान याचे मागे अल्फखान यास साभाळून सवस्थानचा बंदोबस्त " करणें हें सर्व परवरष त्या सरकाची आहे आम्हीं ही सेवाचाकरी ता " मगदूर करण्यास हाजर. परतु विल फैल टिपुसुल्तान याजकडील पेपक-" सीचा तगादा बेनिहायेत आहे. याचा बंदोबस्त दोन्ही सरकारातून आधीं " जाला पा. " या प्रो खान मजकूर याचे बोलणे याचे उत्तर त्यास दिलें कीं "टिपुकडील जाबसाल दोन्हीं सरकारातून ठराव होईल तसा करावयाचा, परंतु श्रीमताचे सरकारची नजर तरी ठरावी." "याचा विच्यार करून बो-लतो " म्हणोन निरोप घेऊन आपले मकानास गेले. " रणदुलाखान याचा बहुमान करावा " म्हणोन मध्यस्तानी सांगितले होते त्यास मोगली पोषाग मये दुपाटा व शिरपेच या प्रो गुदारान केली रा॥ छ. १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५

विनंती विज्ञापना मध्यस्तांनीं बोलण्यात आणिलें कीं "राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांजकडील जावसालाचा भाग तुटत नाहीं जानोजी भोंसले व सेनाधूरधर यांचे कारर्किर्दीस दुतर्फा तहनामें जाले त्या बमोजीब परस्परें तरिंघाट व्हावी तें न होतां सेनासाहेब सुभा यांची आगळीक होते वराड प्रांतीं वेमोईन जेथें जसा दस्त पोहचतो तेथें अमल घेण्यास देसा देश करीतच नाहींत यांचे जावसाल आज रुपें बाजवी ठरोंन ये विसी तुम्हांसी किती वेळ बोलण्यांत आलें ? तुम्हीं ही त्यांजला जे पर्यायें लिहिण्याचे ते लिहिलेच असतील पटणचे स्वारीहून येते समईं हरी पंत यांसीही सर्व दर्जे बोलण्यांत आले, परंतु अद्याप कोणचाही मुजका होत नाहीं त्याजकडोन विठ्ठलपंत सुभेदार बारा हजार फौज तोफा वगैरे सरंजाम घेऊन जडसी बाम्हणी वगैरे तालुकियांत सरहादेवर आले गाविल गडावर तोफा नेऊन बंदोबस्ती केली इत्यादि वर्तमानेंही पेहम येतात, त्यास बाजवी जावसालाची कामें बोलल्यानें उलगडायाची, त्यास फौजा पुढें ठेवणें व बंदोबस्त करणें याची सबब काय ? सेना साहेब सुभा सरदार आहेत त्याजपासीं फौजेचा सरंजाम कमाल तीस हजारपर्यंत कामाचे वस्ती हें महशूर आहे, त्यापकीं दाहा बारा हजार फौजेनसी सुभेदार पुढें आल्यानेंच त्याजपासीं फौज आहे हें समजावें येसे नाहीं, तर्फेचे तहनाम्या प्रो जावसाल विल्हे लागावे या सरकारचे जावसालाचा फैसला त्याजकडोन व्हावा त्यांचेही जावमाल इंदूर, बोधन वगैरे माहाला घा दाण्याचा व प्रांत गंगथडी येथील वास्या राहिल्या म्हणतात याचे उलगडे होऊन दुतर्फा करार बमोजीब अमलांत आणावें हें चांगलें आतां ही दसऱ्या पावतों त्याजकडोन कोण्ही मातबर मुख्तियार भवानी काळो अथवा श्रीधरपंत आगर कुशाबा चिटनीस या निवानून येकानें येऊन तड जोड करावी हे सलाह नक जो जावसाल आतां जसा उलगडण्यांत येईल,

तोच दसरा जाल्यानंतर करीन म्हटल्यास कठीण पडेल. तहनाम्याचे रुईने जाबसाल विल्हे लागावे असें म्हणत असतां, या जाबसालास कोण्हीही गैर वाजवी म्हणार नाहींत, याचाही विच्यार असावा. येविसीं सेना साहेब सुभा यास तुम्हीं येक वेळ ल्याहावे " याप्रो मध्यस्ताचे बोलण्यांत आले. ध्यानात यावे यास्तव विनंती श्रीमताचीही आज्ञा सेनासाहेब सुभा यांस जाऊन तिघापैकीं येकाने इकडे येऊन जाबसालाचे भाग तोडावे, येविसीं सरकारात तुम्हीं लिहुन उत्तर लौकर आणवावें " ह्मणोन बोलिले त्यावरून विनंती असे. आज्ञा येईल त्याप्रो यांसी बोलण्यांत येईल. रा छ१९ मोहरम हे विज्ञापना.

## श्री.

श्रावण व. २ शुक्रवार शके, १७१५.

विनति विज्ञापना. औरंगाबाद येथील तमाम साहुकारास पटी आठीघा॥ चा कर लाख रुपयाचा तेथील सुभे ईफ्तखारखान व मिरधे मुरादबक्ष यांणीं नवाबाचे हुकुमा बमोजीब केली. त्याची हिसेरसीद हरबाजी नाईक बिडवई याचा पुतण्या रघुनाथ नाईक याजवर साडेबारा हजार रुपयाची ठरली. पटी रुपयांचा तगादा सुभे व मिर्ध्योकडील, सबब, रघुनाथ नाईक यानीं शहरातील येक कलाल रुस्तुम ह्मणोन व आणिक काहीं साहुकार वगैरे लोकाचा येका करून पाचसातसेपर्यंत जाभियेत ही ठेविली; त्यास रोजमुरा वांटुन सुभे व मिरधे यास मारावयाची तजवीज केली. हें वर्तमान सुभ्यास समजताच त्यांणीं तमाम साहुकार लोक रघुनाथ नाईक सुधा धरून आणून चौकसी केली; सर्वांचे समते या करण्याचे बाजीकार रघुनाथ बिडवई व रुस्तुम कलाल. त्यावरून सुभे व मिरधे याणीं रघुनाथ नाईक याचे पाईं बेडी घालून कैद केले. दुकान घरदाराची जप्ती केली कलालास तोफेचे तोंडी देऊन उडविलें. याप्रो औरंगाबादेहून अखबार छ. २६ जिल्हेजी नवाबाकडे आली. बिडवई याचा दुकान येक औरंगाबादेस तो तेथे जप्त झाला. हैदराबादेंतील दुकानाचीही जप्ती करविली. रघुनाथ नाईक याचा मामा त्रिंबक नाईक येथें

बेदरास स्वारीसमागमें आला येथीलही दुकानावर पाहरे रात्रींच पाठवून जप्ती जाली बहुत लोकांच्या ठेवी त्याचे दुकानीं फार दिवसांपासोन, त्यासुधा येकवार चीजवस्त कुल जप्तींत आले सुभे यांणीं औरंगाबादी रघुनाथ नाइका पासीन गुन्हेगारीची नजर साडेबारा लाख रुपयांची फर्द मारहाण देऊन लेहून घेतले सांप्रत दुकानांतील वस्ता सरकारांत आणऊन ई॥ पासोन कोणाचा यैवज किती जमा याची चौकसी होत आहे इसकियावर काय होतें हें पाहावें र छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५.

विनती विज्ञापना कादरखान माजी करोडा यांजकडे नवाबांनीं सरकार खममेमेटे तालुका काडेपली सुमा अमिली दाहा लक्ष रुपये ताहुदऊन सांगितला लुखसत देऊन समागमें तीनसें स्वार व पांचसे बार जामियेस तैनात देऊन तालुकियास खान मार याची रवानगी केली रा छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५

विनंती विज्ञापना कोंदल येथील जमीदार बेदर येथील किल्यांत माजी कैद करून ठेविला होता त्यास, पाहाऱ्यांतून रात्रीं तो निघोन पळून गेला पाहऱ्याचे गारदी यास मारहाण होत आहे जमीदाराचा शोध किल्यांत व पेठ व आसपास च्यार च्यार कोस लोक पाठऊन केला परंतु सांपडला नाहीं. रा॥ छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व २ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना पंचोत्र्याचा अमल नवाबानीं आपले तमाम तालुक्यांत भराविला पा॥ रसगत येथें पंचोत्र्याचा दगड करण्याकरितां करोड्याकरील

येक कारकून व चोपदार व पन्नास स्वार येथून सैद मुनवरखान अमीन यांस पत्रें देऊन रवाना केले. वसमतेस जाऊन पोंहचल्यानंतर सैद मुनवरखान यानीं दखल दिल्हा. येक दिवस राहून दुसरे दिवसीं पचोतरा जारी केला. चौक्या भोवत्या ठेवून पंचोतरा मन मानेल तसा करोड्याकडील कारकून घेऊ लागला, सबब वसमतचे पेठकरी, व गांवातील लोक व बायका दोन अडीच हजारा पावेतों मिळोन येकच वलवा करोड्यावर केला. दगडाचा मार च्यार साहा घटिकापर्यंत होऊन काहीं स्वार व माणसे जखमीही जालीं. सैद मुनवरखान यास समजल्यानंतर त्यांनीं येऊन कजिया तोडविला. हे वर्तमान करोड्याचे कारकुनाने व चोपदाराने मध्यस्तास लिहिल्यावरून इतके कृत्य सैद मुनवरखान व हैदरबेग सवदागर यांणींच केलें असे मध्यस्ताचे चित्तांत येऊन, येथून च्यारसे स्वार व पांचसे बार जमियेत रवाना केली कीं सैद मुनवरखान व सवदागरास पाठवून देणें, आणि पंचोतऱ्याचा बंदोबस्त करून ज्याणीं वलवा केला, त्यांत षामील जाले असतील त्याचेही पारपत्य करणें. याप्रमाणे ताकीद होऊन स्वार व बार रवाना झाले. पुढे याचे काय ठरतें पाहावें. र॥ छ १९ मोहरम विज्ञापना.

श्री.

श्रावण व. २ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. हैदराबाद येथें मध्यस्ताचा धाकटा पालक पुत्र गाजी उल्मुल्क आहे. त्यास, अलीज्याह बहादुर साहेबजादे यांची कबुतरें सुटून आली तीं गाजी उल्मुल्क याणीं धरून ठेविलीं. साहेबजादे याचे माणसांसीं व गाजी उलमुलुक याचे माणसांत कटकट होऊन परस्परें मनुष्य जखमीही जाली. साहेबजादे याणीं कबुतरें आणविलीं. याप्रमाणे कटकटीचे वर्तमान हैदराबादेहून अखबार आली त्यांत आलें, र॥ छ १९ मोहरम हे विज्ञापना.

श्री.

श्रावण व. २ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. तैमुरशाहा दुरानी इराणचे बादशाहा यांचा अंतकाल जाला. त्याजला च्यार षाहाजादे पैकीं मधील शाहाजादे षाहा आलम बादशाहा

गाजी दिलीचे पादशाहा यांचा मात्या वहिणीचा पुत्र तैमुरशाहा याचे तख्ता-वर बसल्याची आखबार नवाबाकडे आली हें वर्तमान मध्यस्तांनीं सांगितल्या-वरून विनती लिहिली असे रा॥ छ १९ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व० ३० गुरुवार शके १७१५

आखबार शु॥ छ २३ जिल्हेज ता॥ छ ९ मोहरम शनिवार पावेतो, रवाना छ १९ मोहरम हे विज्ञापना

---

छ २८ मोहरमी रवानगी पत्रें टप्यावर

श्री

श्रावण व ३० गुरुवार शके १७१५

श्रीमंत राजश्री ———————————— रावसाहेब

स्वामीचे सेवेसी ————————————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा॥ नमस्कार विनंती विज्ञापना ता॥ छ २८ माहे मोहरम पर्यंत मु॥ वेदर येथें स्वामीचे कृपावलोकनेंक-रून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष इकडील वर्तमान सविस्तर छ १६ माहे मा॥रीं लेखन करून पत्राची रवानगी डांकेवर केली त्यावरून ध्या-न्यांत आलें असेल सांप्रत येथील वर्तमानाची विनती आलहिदा पुरवणी पत्रीं लि॥ आहे अवलोकनें ता॥मार ध्यान्यांस येईल उत्तरें रवाना होण्याविषयीं आज्ञा करणार स्वामी समर्थ सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

श्री

श्रावण व ३० गुरुवार शके १७१५.

विनंती विज्ञापना टिपु सुलतान यांजकडून शुतर स्वारासमागमें मध्यस्तास पत्र छ २३ मोहरमीं आलें मध्यस्तांनीं पत्र वाचून आपले मर्जीसहीत नवाबा-कडे पाठविलें नवाबांनीं मुलाहिजा करून टिपुकडील पत्राचा जबाब तयार करण्याकरितां फिरोन मध्यस्ताकडे पाठविलें त्यानंतर मध्यस्तांनीं जबाबाचा मसविदा ठरविला छ २४ रोजीं दुसरे दिवसीं मध्यस्ताकडे आम्ही गेलों ते समईं त्यांनीं टिपुकडून आपल्यास पत्र आलें त्यांतील मा॥र व जबाब रवाना

करण्याचा याचा बयान करून पत्र आलें. ते व जबाबाचा मसविदा दाखविला. याचा त॥ आलाहिदा पुरवणी पत्रीं विनंती लिहिल्यावरून ध्यानांत येईल. छ. २५ रोजीं नबाबाकडे मध्यस्त जाऊन जबाब ठरविला तो दाखविला. याउपरी शुतर स्वारास जबाब देऊन रवानगी होईल. रा॥ छ. २८ मोहरम हे विज्ञापना.

श्री.

श्रावण व. ३० गुरुवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. मध्यस्तास टिपूचे पत्र आलें त्यात म॥र कीं "आपल्याकडील तिसरे किस्तीचा यैवज़ करार बमोजीब कडपें येथें सवतरखान याजसमागमे प॥ आहे. तेथें ऐवज पारखून घेऊन रसीद द्यावी. व दुसरे हस्त्याचे यैवजाची रसीद अद्याप आली नाहीं, याजकारिता तेही रसीद पाठवावी." याप्र॥ लि॥ आहे. पत्राची तारीख, जिल्हेज महिन्याचे अखेरीची आहे. याजवर मध्यस्तास मी विचारिलें कीं दुसरे हस्त्याचे रसिदीविषई टिपूनें लिहिले, त्यास यैवज पोंहचून रसीद पाठविली नाहीं याचें कारण काय ? मध्यस्ताचे बोलण्यांत आलें कीं "दुसरे हस्त्याचा यैवज अद्याप दाखल जाला नाहीं. यैवज पोंचल्यानंतर रसीदीस काय गुंता ! दुसरे हप्त्याबाबत यैवज टिपुनें प्रथम व्यंकटगिरिकडे पाठविला, इंग्रजांनीं आह्मास लिहिले कीं "यैवज न्यावा." त्याचा जबाब इकडून गेला कीं इकडील यैवज टिपुनें कडपे प्रांतीं पोंहचता करून द्यावा यैसा करार आहे, त्याप्र॥ अमलात यावें. त्यावरून इंग्रजानीं त्यास ताकीद केली. दुसरे वायद्याचा यैवज तिकडून गुरुमकुंड्यानजीक येके गांवीं (आ) आला. त्यांतही कांहीं बाकीचा यैवज मागाहून येणार. येकंदर, दुसरे हप्त्याचा यैवज जमा करून कडप्यास पोंह्चता होणार याप्र॥ वर्तमान आहे. त्यास आम्हीं आपल्याकडून सैद गुलाम आली यास येथून कडप्यास रवाना केले, त्याचें समागमे दुसरे किस्तीचे यैवजाची रसीद दिल्हीं आहे; कडप्यास टिपूकडून दुसरे हप्त्याचा यैवज येईल तो पारखून घेऊन रसीद द्यावी" याप्र॥ सांगितले आहे; त्यास छ. २२ मोहरमपर्यंत कडपें येथें टिपूकडुन दुसरे वायद्याचा

अगर तिसरे हप्त्याचा ऐवज काहींच पावला नाहीं या प्रा। कडप्याचीं, पत्रें आलीं. इतक्यावर ऐवज आल्यास दुसरे किस्तीचा ऐवज घेऊन, रसीद सैद गुलाम अली देईल तिसरे हप्त्याचा ऐवज पोंहचल्यानंतर तेथुन सैद गुलाम याचें पत्र ऐवज पावल्याचें आलें म्हणजे इकडून रसीद रवाना करण्यांत येईल याप्रा। मध्यस्तांचें बोलण्यात आलें रा। छ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व ३० गुरुवार शके १७१५

विनंती विज्ञापना टिपूकडील पत्र मध्यस्तास आलें, त्याचा जबाब त्यास रवाना करण्याचा यांनीं ठरविला त्यांतील मा।र कीं " तुम्हीं शुतर स्वार समागमें पत्र पाठविलें, त्यांत इकडील तिसरे किस्तीचा ऐवज कडप्यास सबरखानासमागमें रवाना केला तो घेऊन रसीद धावी, व दुसरे हप्त्याची रसीद आपल्याकडून आली नाहीं ते पाठवावी म्हणोन लि। त्यास दुसरे हप्त्याचा ऐवज कडपे येथें अद्याप तुम्हांकडून दाखल जाला नसतां रसीद पाठवावी ऐसें लिहिलें हें काय ताजूब आहे ? येथून सैद गुलाम अली यां समागमें, रसीद दुसरे हप्त्याची देऊन त्यास कडपें येथें रवाना केलें ऐवज लौकर दाखल व्हावा म्हणजे पारखून घेऊन सैद मा।र रसीद देतील तिसरे किस्तीचा ऐवज कडप्यास पोंहचतां व्हावा तेथें ऐवज दाखल झाल्याचें पत्र सैद गुलाम यांची अर्जी येथें पोंचतांच तिसरे हप्त्याची रसीद येथून रवाना होईल या प्रा। टिपूचे पत्राचा जबाब यांनीं ठरविला सैद गुलाम यासही सदरहु अन्वयें यांनीं पत्रें लिहून रवाना केली कीं, टिपुकडील दुसरे हप्त्याचा ऐवज कडपें येथें पारखून घेऊन तुह्मांपासीं रसीद दिल्ही ते त्यांजकडे धावी तिसरे हप्त्याचा ऐवज कडप्यास दाखल होतांच तुमची अर्जी यावी ह्मणजे तेही रसीद येथुन रवाना करण्यांत येईल रा छ २८ मोहरम हे विनंति विज्ञापना

श्री

श्रावण व ३० गुरुवार शके १७१५.

विनंति विज्ञापना शमशदौला यांजकडील पागेचा तालुका सुभे महमदाबाद पैकी व परगणे वगैरे सुभे विजापूर येकंदर पसतीस माहाल येथील फुल

वहिवाट त्यांचे त्याजकडे. यांत मध्यस्ताचा दखल नाहीं. शमपुदौला वारल्यानंतर पागेकडील सर्व देखरेख नवाब जातीनें करू लागले. मध्यस्तानीं खटपट करावयाचे रीतीनें करून पाहिली, परंतु साध्य नाहीं. शमपुदौला याचा पुत्र लहान. कारभारी महमद अजीमखान यांचे निसबतीचे माहाल कलबर्गें भालकी चिटगोंदे चितापूर वगैरे याचा बंदोबस्त त्यांनीं राखिला. सर बुलंदजंग शमपुदौलाचे मेव्हणे व घासीमिया व गुलाम इमामखां व दिलदारखा व मुरादअली यांचे निसबतीचे लोक व पागा आलाहिदा. त्याचे बेगमीचा सरंजाम माहालही तोडून सदरहु इसमाचे निसबतीस वेगळाले होते. परतु तालुकियाचा बंदोबस्त नाही, आणि चाकरी विषईंही करार माफीक कमती. त्यात घासी मियांकडील तर फारच बखेडा. कारभार ओगडस्त. लोकाची धरणी पारणी नित्य खटला. याप्रा जाले. त्यावरून काहीं दिवस याचे तालुक्याचा बंदोबस्त पाहात जाणें ह्मणोन अजमखान यास नवाबानीं सागितले. अजमखान याचा इल हाक सरबुलंदजंग याचे दसखत, यैसे ठराऊन क्रमही चालिला होता. तथापि निर्वेध बंदोबस्त खातरखा नाहीं. पागेकडील हिसेबाचा घोल मध्यस्तानीं नबाबास अर्ज करून घातला. राज्याजीस हिसेब पाहण्यास सांगितलें. हिसेबी यैवज पागेवाल्याकडे निघाला त्याची तडजोड ठरून पांचसहा लक्ष पर्यंत पागेवाल्याकडोन यैवज सरकारास घेतला पुढे पागेकडील बंदोबस्त येथास्थित व्हावा हें नबाबास अगत्य. या सर्वांत पाहता येक महमद अजीमखान कार्य करता त्यांनीं नबाबास अर्ज केला कीं शमपुदौला मरहुम याजकडील सर्व बंदोबंत हजरत जातीनें करण्यास मुतवजे असोन हा प्रकार असा. गुलामता मगदुर सागणें ते सागतो, परंतु कोणी कोणांत नाहीं. याची येहतीयात जसी होणें तसी व्हावी. त्यावरून अजमखान यास नबाबानीं सांगितले कीं कुल तालुकियाचा बंदोबस्त तुमचे जिमेस आहे. सरबुलदजंग घासीमिया वगैरे यांस नेमाप्रा। माहवारी माहबमाह देत जावी. तालुक्यास अमला योजून बदोबस्त पका करावा. त्यावरून अजमखान यांनीं सिदी इमाम यांचे अमीलीचे कारस्तानाचा बयान केल्यावरून पुल पागेकडील पस्तीस तालुकियाची सरअमीली

सिदी इमाम यांजकडे मागावें छ २० मोहरमी अजमखान व घासीमियां यांजला सिदी इमाम यांस घेऊन येण्याविषीं नबाबांनीं चोपदार पाठऊन नेलें सिदी इमाम यांस बाहालीचा खलास दिल्हा माहावारीचें नेम ठरले त्याप्रा यैवज जिकडील तिकडे देऊन तालुक्याचा बंदोबस्त करावा या प्राा सांगितलें सिदी इमाम यांनीं तमाम तालुकीयास जम्या रवाना केल्या या उपरी अमील माहलो माहाल रवाना होणार सिदी आठ च्यार दिवसांत येथून तालुक्यास जाणार सारांश, शमसुदौला यांजकडील तालुक्याचा बखेडा अलाहिदा टुक ड्यामुळें होता तो अजमखान यांचे विच्यारें नबाबांनीं येकत्र बंदोबस्त याप्रा केला रा छ २८ मोहरम हे विज्ञापना.

श्री

श्रावण व ३० गुरुवार शके १७१५

विनंति विज्ञापना हरबाजी नाईक बिडकरी याचे पुतण्यानें औरंगाबादी सु-ल्याकर यल्ला करावयाचे केलें याची अखबार आल्यावरून दुकानाची जप्ती जाली सांप्रत त्याजकडील त्रिंबक नाईक येथें आहे, त्याचें बोलणें मध्य स्तासी रोशनराये बहरी नारायेण यांचे मारफतीनें होऊन तूर्त साडेतीन लक्षाची निशा त्रिंबक नाईक यांनीं करावी यैसे मध्यस्तानीं ठरविलें. त्याव रून साडेतीन लाखाची फर्द घेतली दुकानांतील नगदी यैवज व भरतीस लोकांकडे येणें तो लाऊन दिल्हा दुकानावर पाहारे होते ते उठावयाची पर-वानगी मध्यस्तांनीं नबाबास अर्ज करून घेतली रा छ २८ मोहरम हे विज्ञापना

श्री

श्रावण व० ३० गुरुवार शके १७१५.

विनंति विज्ञापना पुनर्वसु नक्षत्रापासोन आश्लेषा अखेर पावेतों तीन न क्षत्रें कोरडीं गेलीं पाऊस नाहीं मारा भयानक खरीफाची पिकें व सर्व जिनस धान्याचे गचोन्यास येऊन पर्जन्य नाहीं यामुळें पाऊस चालली धारण सस्त होती ते दररोज सेर आन्से (१) रोज माहाग होत चाली पर्जन्या-

मुळें मनुष्यमात्राचे होष ठिकाणीं नव्हते. इतकियांत श्रावण शु॥ षष्ठी मंगळवारीं मघा नक्षत्राची शुरुवात होताच पर्जन्याचे वृष्टीस आरंभ जाला. सगळें नक्षत्र पाऊस इकडील तमाम प्रांतीं जाले. रात्रीं पर्जन्य पडावा, दिवसां उघडावा, याप्रा दररोज. त्यांत च्यार पांच पाऊस मातबर जसे कुणबी लोकांस अपेक्षित तसे जाले. चहूंकडे पाणी पाणी जालें. वोढ्यास व नद्यास तमाम पूर आले. मार्गी येणार जाणार वाटसरू वोढ्या नाल्याचे पुरानें कितेक अटकून तीन तीन च्यार च्यार दिवस राहिले. कितेक दर्यानें वाहून गेले. बेदर येथे किल्यात व शहरांत व पेंठा येथील भिंतीस पाणी लागून ढांसळून पडल्या. त्यांत कित्येक माणसे मेलीं, व जायाही जालीं. मघा नक्षत्राचा पाऊस इकडील प्रांतीं बहुत जाला. पूर्वा निघाल्यापासोन उघड पडली आहे. त्यांतही वारीक मोठा वरचेवर पडतच आहे. आम्हीं छपराची भित घालविली त्याजवर छपरें टाकावयाचा अवकाश पडला नाहीं; कारण कीं, तीन दिवस पर्जन्याची झड येकसारखी लागली. भित पडोन दोन माणसे प्यादे ठार जाले; व पांच सात जखमी जाली. तीं वरी व्हावयास आणिक महिना दीड महिना पाहिजे. र॥ छ. २८ मोहरम हे विज्ञापना.

श्री.

श्रावण व. ३० गुरुवार शके १७१५.

विनति विज्ञापना. चेनापटणाहून व्यंकटराम दीला याजकडील अखबार आली, ती साप्रत रवाना केली आहे. राजश्री गोविंदराव सेवेसीं प्रविष्ट करतील. अवलोकने सविस्तर मार ध्यानात येईल. र॥ छ. २८ मोहरम हे विज्ञापना.

श्री.

श्रावण व. ३० गुरुवार शके १७१५.

अखबार ई॥ छ ९ मोहरम ता॥ छ. २५ माहे मार पर्यंत र॥ छ. २८ मोहरम.

विनंति विज्ञापना राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा यांचें पत्र आ-
म्हांस आलें कीं, पुण्यास राजश्री श्रीधरपंत व कुशाबा चिटणीस यांची रवा-
नगी राजश्री बाबूराव यांजसहित केली ह्मणोन, व सदरहु अन्वयें नवाबासही
सेनासाहेबसुभा यांचे खरीता पत्र आलें तें त्यांजकडील माधवराव रामचंद्र
यांनी गुजराणिलें रा॥ छ २८ मोहरम हे विज्ञापना

श्री.

भाद्रपद शु २ शुक्रवार शके १७१५.

विनंति विज्ञापना छ २८ मोहरमी प्रथम प्रहरीं मिस्तर इष्टवरट फिरंगी
मिस्तर ब्यान कनवी कडील आला होता नवाबही बाहेर आले दरबार
जाला फिरंगी मार यानें अर्ज केला कीं छ १४ मोहरमी फुलकचेरीत ई
भजाकडील ठाणें कायेम जालें त्याजवरून खुषीच्या तोफा सो
डावयास हुकुम केला एकवीस बार जाले कसी घेतली याचा तपसील
मागाहून समजून घेऊन लिहून पाठवीन रा॥ छ. २९ मोहरम हे विज्ञापना

---

छ ६ सफरी टप्यावर पुण्यास

श्री

भाद्रपद शु ८ शुक्रवार शके १७१५

श्रीमंत राजश्री——————रावसाहेब स्वामीचे

सेवेसी——————————

विनंति सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा नमस्कार विनंति विज्ञापना.
ता॥ छ २६ माहे सफरपर्यंत मु॥ बेदर येथें स्वामीचे कृपावलोकनेंकरून से
वकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष इकडील वर्तमान पेशजी डांकेवर ता
वार विनंति लिहिल्यावरून ध्यानांत आलें असेल सांप्रत येथील वर्तमान अला

हिदा पुरवणी पत्रीं सेवेसीं विनंति लेहून पत्राची रवानगी केली असे, त्याव. रून अवलोकनात येईल. उत्तरे रवाना करावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

## श्री.

भाद्रपद शु. ८ शुक्रवार शके १७१५'

विनंती विज्ञापना. "पागेकडील पस्तीस माहालचा वंदोवस्त नवावानी महमद अजीमखा यांचे विच्यारे सिदी इमाम यास सर अमीली देऊन केला" इत्यादिक तपसिलाची विनंती पेशजी लिहिल्यावरून ध्यानास आले असेल. सिदी इमाम यांनीं तमाम पागेकडील तालुक्यात आपल्या नफ्त्या पाठविल्या. सर बुलंदजंग घासीमिया वगैरेकडील अमील होते ते तगीर जाले. त्यास हे सर्व करणे महंमद अजीमखा यांचे निग्याचे. त्यानीं घासीमियां याजकडील संमत काहीं घेऊन केले. सर बुलंदजग वगैरे अलाहिदा राहिले. ते आपले ठिकाणीं नाखुप, कीं झाडून तालुकियाचा सरसुभा सिदी इमाम जाला. तो माहावारी उचले हाते देईल ते घेऊन खाऊन पडावें. तालुक्यांत सर्व हुकुम अहकाम त्यांजकडील. यात राहिले काय? याप्रा मनांत येऊन, त्यांनीं तीन च्यार इसमानीं येक होऊन अटा बांधिला. व्यंकटराव सरसुभेदार सुरापुरकर यांजकडे सर बुलंदजंगाकडील तीन तालुके. पा हसनावाद व अलद गुंजोटी अमीलीनें होते, त्या तालुक्यास सिदीची जप्ती गेली. व्यंकटराव यांची व सिदीची पहिली ही अदावत. त्यांचे तालुके सिदीने व सिदीचे व्यंकटराव यांनीं इजाफे कबूल करून केले, याप्रा चुरस होतीच. हल्लीं सिदीचा पगडा कुल पागा तालुकियांतपडला, हे गोष्ट व्यकटराव यांस आहद होऊन सरबुलदजंग यास हेही अनुकुल जाले. सरबुलदजंग आदिकरून व्यंकटराव याचा येक विचार जाला कीं कोणेंही प्रकारे सिदीने काम केलें हें उलटावे. इजाफा वरता बोलावा, परतु जाले कामाची पायमली करून आपटी घ्यावी. याप्रा नक्षा बांधुन राज्याजी यांचे विद्यमाने जाबसाल शुरु केला. पागा तालुकियाचा येकदर सरकारी आकार शिवाय खर्च बावीस लाख. याजवर दहा लक्ष ज्याजती

आकार करून देण्याचें बोलणें सिदीइमाम यांचें, अजमखान यांचें विचारें नवा वापासीं होऊन, वेचाळीस लक्षाच्या अंदाजा ठरला हलीं व्यंकटराव यांणीं दहा लक्ष इजाफा बोलण्यात आणिला बावन लक्षावर गोष्ट आली मध्यस्ता पासीं राव्याजीचे मारफत बोलणें पडलें पागा तालुकियांत हरयेक तऱ्हेनें आपला कदम सिरावा याची हाउस मध्यस्तास होतीच इतके दिवस उद्योग केला परंतु साध्य न जाला सांप्रत घरांतील फुट पडून अनायासें करून सरबुलंदजंग वगैरे कडील पैगाम लागला यांत संतोष मध्यस्तास होऊन नवाबाकडे मध्यस्त गेले पागा तालुकियावर इजाफा असा इत्यादिक बयान करून अर्ज केला सरबुलंदजंग घासीमियां गुलामइमाम वगैरे आले बोलणें च्यारसाहा घटिका पर्यंत यांचे त्यांचे जालें व्यंकटराव यांची पाट थापटून मध्यस्तांनीं आधींच सिद्ध केलें बावन लक्षाचे आकारांचें बोलणें पडलें शिवाय माहाल मार खर्च सिबंदी वगैरे आठ लक्ष येसें बोलण्यात होतें त्याजवर ही मध्यस्तांनीं मात्रा चढवून बोलले कीं आठ लक्ष सिबंदी खर्च बाबत देणें व येन बावन लाख येकून साठ लाख रुपयांचा जिमा करून जो उचलील त्यानें पागा तालुकियाचे दरोबस्त काम करावें याप्रा साठ लाखावर रकम येऊन पोहचली हलीं सिदी इमाम यांस म्हणतात कीं तुम्ही साठ लाख कबूल करून काम करावें नाहीं तर सदरहुप्रा व्यंकटराव यांजकडे करार करून देतों याचा विच्यार करून अर्ज करितों याप्रा अजमखां व सिदी इमाम यांचे बोलणें याजवर कोणाकडे ठरतें तें पाहावें सारांश पागा तालुकियाचा बंदोबस्त आजपर्यंत नबाबांनीं जातीनें राखिला होता सांप्रत घरांतील फुट पडल्या मुळें या थरास नौबत पोंहचली रा छ ६ सफर हे विनंती.

श्री

भाद्रपद शु ८ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना मध्यस्ताचे बोलण्यांत आलें कीं " इंग्रज व फरासीस यांचा बिगाड विलायतेंत जाल्यानंतर त्यांच्या त्यांच्या तीन लढाया मातबर जाल्या त्यांत तर्फैनचीं मनुष्यें बहुत खपलीं गेलीं फरासीसाकडील जमाव भारी इंग्रज

वगैरे तीन च्यार टोपीवाले येकत्र होऊन लडाया जाल्या, परंतु फरासीस गालब. तेव्हां इंग्रजांनीं रूसवाले टोपीकर याजकडे राजकारण करून त्यास षामील करून घेतले. रूसवाल्याचा जमाव हमेषा भारी. ज्याजकडील जंगी जाहाजांत तीस लाख लडाक माणसें समवाल्यासी ज्याचीं लडाई पैहाम होत असती त्यांस इंग्रजांनीं मेळऊन घेतल्यानतर रूसवाले व इग्रज येकत्र होऊन फरासीसासी लडाई मातबर जाली. फरासीसाची सिकस्त जाल्याचें वर्तमान आलें. खुष्कींत फुलचेरी बंदरही इंग्रजांनीं घेतलें." याप्रा बोलले. "तीन दिवसपर्यंत फरासीस इंग्रजासी फुलचेरीवर लडले. सेवटीं तावा इंग्रजांकडील फौज सरंजामाचा सोसेना, सबब किला इंग्रजांचे स्वाधीन केला." याप्रा बोलले. रा छ. ६ माहे सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद शु. ८ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. मध्यस्तानीं बोलण्यांत आणले कीं "लाडबाहादुर-कलकत्याहून मोहरमी जाहजांत सवार जाल्याचें वर्तमान आलें. चेनापटणास येणार. छ. २२ मोहरमचीं पत्रें चेना पटणाकडून अखबार वगैरे आली. तोपवेतो लाडसाहेब चेनापटनास दाखल जाले नाहींत. कलकत्याहून स्वार जाले त्यापक्षीं लौकर येतील" याप्रा बोलले. रा छ. ६ सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद शु. ८ शूक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. अलफखान करनुळकर यांजकडुन रणदुलाखान नवाबांकडें आले. त्याचे बोलणे मध्यास्तासीं होऊन अलफखान यांजकडे कुल तालुका बाहाल जाला. "टिपुकडील पेषकसीचे यैवजाची निकड करनुलकरास लागली. याचा बंदोबस्त व्हावा" म्हणोन रणदुलाखानाचें बोलणे. मध्यस्ताचे म्ह ( ण ) णें कीं "लाड बाहादुर यास-लेहून बंदोबस्त होईल तेथवर करितो, परंतु रणमस्तखान याचा मोहरी द-

स्त यैवज टिपुपासीं असल्यास पेषकसीचा यैवज सालावाद देणे प्रा करार च असा आहे, त्यापक्षीं दस्त यैवज निघाल्यास बोलण्यास जागा नाहीं परंतु दस्त यैवज मोहरी त्याजपासीं नाहीं जर दस्त यैवज असता तर आजपर्यं त कैद करून वशास ठेवते ? तथापि निघाल्यास दोन लाख रु पेषक सीचा दस्त यैवज असला तरी लाख रु तीन सरकारचे व लाख टिपुचे याचा निर्णय पुढें पाहता येईल त्यास तुम्हीं बंदगान अली यांचे नांवें अर्जी ल्याहावी कीं, टिपुकडील पेषकसीचा तगादा होतो त्यास रणमस्तखान यां चे मोहरी दस्त यैवज त्यापासीं निघाल्यास मंजूर" याप्रा रणदुलाखान यां सीं मध्यस्तांनी बोलून रणदुलाखान यांची अर्जी सदरहुप्रा नबाबास देण्याचा मसविदा मध्यस्तांनीं रणदुलाखान यांस आमचे समक्ष करून दिल्हा रा छ ६ माहे सफर हे विज्ञापना।

श्री

भाद्रपद शु ८ शुक्रवार शके १७१५.

विनंती विज्ञापना चेनापटणाहुन व्यंकटरामदीला याजकडील अखबार सांप्रत आली ती येथून रा केली आहे राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसीं प्रविष्ट करतील, त्यावरून वर्तमान अवलोकनात येईल उत्तर रवाना होण्यास आज्ञा जाली पाहिजे रा छ ६ माहे सफर हे विज्ञापना

श्री

अखबार ईा ठ २९ मोहरम ता छ ९ माहे सफरपर्यंत रा छ ६ सफर छ ८ सफरी टप्यावर पुण्यास

[२] श्री

भाद्रपद शु १० रविवार शके १७१५

—श्रीमंत राजश्री——————रावसाहेब——

—स्वामीचे सेवेसीं——————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा नमस्कार. विनंती विज्ञापना ता छ ८ माहे सफर मुा चेदर येथें स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचें म

र्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पेशजी छ. ६ माहे मारी लेखन करून पत्राची रवानगी डाकेवर केली ती पत्रे सेवेसी प्रविष्ट होऊन ध्यानात आले असेल. सांप्रत येथील वर्तमान अलाहिदा पुरवणीपत्री विनती लिा आहे. अवलोकने ध्यानास येईल. उत्तरें रवाना करावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ. सेवसीं श्रुत होय हे विज्ञापना

श्री

भाद्रपद शु. १० रविवार शके १७१५,

विनंती विज्ञापना. पागेकडील तालुकियाचे तगीरी वाहलीचा जाबसाल घोळाखाली पडला. येविपीची विनंती ता पेशजी लिहिण्यात आली, त्यावरून ध्यानात आले असेल. तीन दिवस नित्य सरबुलंदजंग, व घासी मिया, व महमदअजीमखा वगैरे पागेकडील इसमे व राज्याजी याप्रा नवाबाचे दिवाणखान्यात प्रातःकालापासोन प्रहररात्रपर्यंत जलसा व्हावा. कुलपागेकडील महाल येथील सन १२०२ (फसली) साल गुदस्तचा आकार याचे हिसेब पाहून, त्या आकारावर इजाफा हिसेरसीद प्रा बसऊन साठ लाखाची बेरीज यैन व इजाफा मिळोन सिद्ध केली. पैकी दोन टुकडे अलाहिदा तीस तीस लाखाचे केले. येक टुकडी सरबुलंदजग याचे निसबतीची, त्यात साहेब जादे ज्याहांदरज्याहा पहिलेच सरबुलंदजगाकडे नेमणुक होती. ते व शमपुलउमरा याचे पुत्र याचे खासगीचा तालुका केला, व कारभार महमदअजीमखा याजकडे होता. तोही साप्रत सरबुलदजंग, याजकडे ठरला. त्यासुधा तीस लाखाचा तालुका सरबुलदजगाकडे मुकरर-जाला. दुसरी टुकडी महमदअजीमखा व घासीमिया मिळोन उभयताकडे तीस लक्षाचा तालुका. या प्रा ठराव जाला. रा छ ८ माहे सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद शु. १० रविवार शके १७१५.

विनती विज्ञापना. पागेकडील तालुक्याच्या दोन टुकड्या नबाबांनी

ठराऊन वांटणी जाली सरबुलंदजंगाकडे महमदअजीमखान यांजकडील तालुक्या पौो कल्बर्गे व चितापुर, अवजलपुर, मणुरमायम, हुमणाबाद, मेंयली, हे वांटणींत गेले, व अजमखान यांजकडे सरबुलंदजंगाकडील हसनाबाद व हतमुरे, नारायेणखेड हे लागले घासीमियां यांजकडील देगळूर, सारवाड व खाळखेदार, आदिकरून पहिले माहाल होते तेच माहाल राहिले त्यांपैकीं कांहीं गेला नाहीं, व त्यांस आला नाहीं याप्रा दोन टुकड्यांत माहालची वांटणी मध्यस्ताचे समतें, नबाबाचे हुकमा प्रा राव्याजी यांनीं केली या उपरी सरबुलंदजंग व महंमद अजीमखां यांजकडून अमील ठरून आपआपले माहालीं रवाना होणार येकंदर पागा ताळुकियाचा आकार बतीस लाखाचा होता, त्याची वेरीज साठ लाखावर इजाफ्यासहीत कायम करून माहालाची वांटणी जाली सरबुल्दजंगाकडून सर अमील व्यकटराव सुरापुरकर व अजमखानाकडील सिदीइमाम व घासीमियांकडील फदुलाखान व भिमराव हरी याप्रा अमील रवाना होण्याचा बेत आहे रा छ ८ माहे सफर हे विज्ञापना

श्री

भाद्रपद शु १० रविवार शके १७१५

विनती विज्ञापना मध्यस्तानीं आपल्याकडील रिसाल्याचें व पागेचे लोकांस सर्वांस ताकीद केली आहे कीं "तुम्ही आपले सरंजामसहित तयार असावें खावंदाचा हुकुम कोणे समई कसा होईल याचा कांहीं नेम नाहीं यानकरितां अगाऊ तुम्हांस इसला केली आहे बेफाम न राहतां आपले जमियतीची सरजामानसी तयारी करून सावध राहावे हुकुम होतांच तेसमई तयारीची फिकीर न राहतां हुशारीनें असावे" याप्रा ताकीद केली सरकडही अतराफ सिलेदार वगैरे लोकांस याचप्रा ताकीद आहे नव निगादास्तीचे लोक मसाग घेऊन गेले त्याप्रो कितेक आले, व येणार तेही यरचेवर जमा होत आहे दाग चेहरे करून रोजमरे कितेकांचे ज्यारी जाले शिवाय नवीन फुटकर लोक येतात, तेही ठेवितात रा छ ८ माहे सफर हे विज्ञापना

श्री.

भाद्रपद शु. १० रविवार शके १७१५.

विनती विज्ञापना. राजश्री बाबाराव गोविंद यास मध्यस्तानी सांगितले कीं तुह्मीं पुणियास जाण्याची आपली तयारी करणे. पांच सात दिवसात हजुरची रुखसत येक महिन्याची घेऊन जावें. बायका मुले येथे आहेत; तसीच असो द्यावी. सडे जाऊन राव सिंदे याजपासी पोंहचावें. तेथुनही निरोप सत्वरच घेऊन येके महिन्यात येथे यावें. याप्रा सागितल्यावरून मारनिलेनी पुण्यास जावयाची तयारी आपली केली आहे. नवाबाची रुखसत व मध्यस्ताचा निरोप घेउन येथून निघाले, म्हणजे विनंती लिहिण्यात येईल. रा छ. ८ सफर हे विज्ञापना.

श्री।

अखबार ई॥ छ. २ ता॥ छ. ६ सफर पर्यंत रा छ. ८ सफरी

छ. ११ सफरी डाकेवर पुण्यास.

श्री.

भाद्रपद शु १३. बुधवार शके १७१५.

श्रीमंत राजश्री —————— रावसाहेब

स्वामीचे सेवेसीं ——————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा॥ नमस्कार विनंती विज्ञापना. ता॥ छ. ११ माहे सफर पर्यंत मु॥ बेदर येथे स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान छ. ८ माहे मारीं लेखन करून पत्राची रवानगी डाकेवर सेवेसी केली आहे त्यावरून ध्यानात आले असेल. साप्रत येथील वर्तमानाची विनंती अलाहिदा पुरवणीपत्री लि॥ आहे. अवलोकने सविस्तर ध्यानात येईल. उत्तरें रवाना व्हावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद शु १३ वुधशर शके १७१५.

विनंती विज्ञापना. पागेकडील तालुकियाचाकारभार आठ दाहा दिवस

पर्यंत घोळाखाले पडून रोज येक नक्षा ठरावा याप्रा होत गेलें येकंदर पागा तालुकियाचे दोन टुकडे तीस तीस लक्ष इजाफ्यासहित येक सरबुलंदजंग यांचे निसबतीस साहेब जादे व शमपुल उमरासुधां व येकांत अजमखान व घासीमियां, याप्रा वांटणी दौलाचे संमतें राघ्याजींनीं ठरविली इत्यादिक ता जें होत आलें त्याची विनती पेशजी लिहिल्यावरून ध्यानांत आलें असेल दोन वाटण्या याप्रा जाल्याचा विच्यार नवाबांनीं पाहून या करण्यांत तालुक्याचा बंदोबस्त खातरखा नाहीं पुढेंही बखेडाच समजोन नवाबांनीं अजमखान यांजकडे सांगोन पाठविलें कीं, "पागेकडील कामाचा कुल बंदोबस्त तुम्हांकडे सांगून सर अमीली सिदी इमाम यास दिल्ही दरमियान व्यंकटराय सुरापुरकर यानी त्याजवर इजाफा कबुल केला, त्यास तुम्ही सरकार नुकसानीचे रवादार कांहीं नाहीं त्यापक्षीं इजाफा व्यंकटराव यांनीं केल्याप्रा तुम्हीच कबूल करून आपले कामाचा बंदोबस्त राखावा अजमुल उमरा बहादुर यांची तुमचीही सफाई करून देवविलों त्यांनी तुम्ही येक विच्यारें राहून ज्यात सरकार काम व उपयोग तें अमलांत आणावे यांत आमची खुशी आणी तुमचेही नोकरीस हेच लाजम आहे अजमुल उमरा यांस तुम्ही पमपुल उमरा प्रा पाहात जावें "यैसें सांगोन पाठविल्यावरून अजम खान यांनीं अर्ज केला की " जशी हाजुरची ईर्षाद त्याप्रा गुलाम हाजर आहे " याप्रा इकडील बंदोबस्त आतुन करून दौलासहा नबाबांनी सांगितलें कीं "पागेचे कामांत महमद अजीमखा यांचीच वकफियत चांगली यांचे हातें पागा तालुक्याचा बंदोबस्त ज्यारी राहावा तुम्ही त्या काम चांगलें तें करावें अजमखान (शमशु)ल उमरा याची नजर होती तसी तुमची असावी, व खान मार ही तुम्हास त्यांचे ठिकाणीं समजोन वागतील " यासन्देहें दोंही कडील सावन पर्के केलें तों पावेतों राघ्याजी आदि करून कोणा येकास हे कांहींच समजों दिल्हें नाहीं दौलांनीं राघ्याजीस सांगीतलें की तुम्ही तीन फर्दा तयार कराव्या येक फर्द कुल तालुकियाचे काम व्यंकटराव यांचें नांवें, दुसरी फर्द निमे सरबुलंदजंग व निमे महमद अजीमखां घासीमिया, हानक्षा, तिसरी फर्द अजमखान यांचे नांवें कुल

तालुकियाची, या प्रा तीन फर्दा तयार करून समागमें घेऊन यावे. यातून हाजरती ..... केलेल या प्रा सा ........ फर्दा घेऊन दौला व राज्याजी नवाबाकडे गेले. पागेवालेही सरबुलदजंग घासीमिया व अजमखान दिलदारखान हे सर्व आले. अमील व्यंकटराव सिदी इमाम हेही हाजर जाले. प्रथम नवाबाचें बोलणें दौलासी दोन घटिका होऊन, राज्याजी यांच्या फर्दा पाहिल्या, कुल तालुकियाचा बदोबस्त अजमखान याजकडे सागांवा हे नवाबाचें विच्यारास आलें, याचा रुकार दौलाचाही पडून अजमखान यास बोलाऊन नबाबांनीं खातरजमा करून सांगितलें. दौलाची व त्याची सफाइ करून दिल्ही. अजमखान याचे जिमे पागा तालुकियाचा कुल कारभार केला हें व्यकटराव यास समजताच, मार निलेनीं ये तेथेंच आधीं बासष्ट लाखाची येकदर फर्द दिल्ही होती, त्याजवर आणिक इजाफा पांचलक्ष ........ (गु) जराणली. नवाबानीं पाहून दौलास ........ नवाब बोलले कीं, फर्द त्यांचे त्यास माघारी द्यावी. - त्या प्रा फर्द फिरोज व्यकटराव याचे यास दिल्ही. बासष्ट लक्ष रु. व्यंटरावानीं इजाफ्यासुधा केले होते; त्या पैकीं च्यारलक्ष महकुफ करून अठावन लाखाचा अदाजा महंमद अजीमखां यांस करार करून दिल्हा. याशिवाय व्यकटराव यानीं नबाबाचे तोषेखान्यांत चार लक्ष रु. देण्याचा करार केला होता, तोही अजमखान यास नवाबानीं माफ केला. याप्रा अजमखान याचीं पास खातर ठेऊन दौलाचें व त्यांचे रहस्य करून देऊन कारभार याप्रा उलगडला. रा छ. ११ माहे सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद शु १३. बुधवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. नवाबानीं आपले समक्ष दौलास व अजमखान यांस सरकार कामावर येक विचारें राहून कामाची वहिवाट करावयाचें सागोन सफाई उभयताची करून दिल्ही. अजमखान यास दौलाकडे जाण्याचें सांगितल्यावरून खान मार दौलाकडे गेले होते तेही अजमखान यांचे घरास जाणार.

याप्रा तूर्त असा क्रम चालिला आहे येकंदर पागेचे माहालापौ दिल-दारखान यांस जागीर साडेतीन लक्षांची नबाबांनीं लोहारें व आलुर हे दोन महाल नेमून दिले त्याप्रा या पुण्यांतून दोन माहाल त्याचे निसबतीस जाले आळंद व गुंजोटी हे दोन माहाल व्यंकटराव यांजकडे अजमखान यांचे तर्फेनें देविले बाकीचे सर्व तालुकियास अमील अजमखान यांनी ठराऊन पाठवावें येसा बेत ठरला वगैरे अजमखान यांस व्यंकटराव वा त्यांचे दस्तखतावांनें काम करावें येसें ठरलें रा छ ११ माहे सफर हे विज्ञापना

श्री

भाद्रपद शु १२ बुधवार शके १७१५

विनंती विज्ञापना येथील तमाम मुतसदी व किरकोळी मनसबदार यांचे जागिरीवर पट्टी पांच लाख रुपयाची दौलांनीं ठराऊन सर्वांचे मार्गे चोपदार व सजावल राघ्याजी भवानदास सेढमल आदिकरून देखील भारामल यांस लाऊन निकड केली आहे कीं नजरेबाबत येवज दाखल करणें त्यांची रदबदल दौलासीं होत आहे इतक्यावर यांचें काय ठरावास येतें त्याप्रा मागाहून ता विनंती लिहिण्यांत येईल दौलाचे कारकिर्दीपासोन मुतसदी यांनीं हजरी गणपतीचे कामांत तफावत खो रुपयाचा मुतसदी मंडळीवर निघतो या निर्योचा तगादा लागल्यावरून कांहीं आलल हिसेबी नजरेचा ठराव व्हावा असें बोलणें लागलें आहे कारण कीं, याची फुजरती केली असतां कोठपावेतों करावी ? सबब नजरेवर ठरणें असें होत आहे यावर जसें ठरेल त्याप्रा विनंती लिहीन रा छ ११ माहे सफर हे विज्ञापना

श्री

भाद्रपद शु १३ बुधवार शके १७१५.

विनंती विज्ञापना राजश्री बाबाराव गोविंद यांची रवानगी पुण्यास हो-ण्याविषयीं दौलांनीं नबाबास अर्ज केल्यावरून " बाबाराव यांस रुखसतीस

घेऊन येणें " ह्मणोन नवाबानीं दौलाकडे सांगोन पाठविलें. दौला मार निलेस घेऊन नवाबांकडे गेले. छ. १० सफरी बाबाराव गोविंद यास नवाबांनीं रुखसत दिल्ही. याउपरी दौलाचा निरोप घेऊन रवाना होणार नवाबांनीं ........ बाबाराव याचे तुमचें बोलणें दो ........ मग बाबाराव यांनी जावें. त्यास दोलासमवेत बाबाराव याचे बोलणे या उपरी जे होईल त्याची विनंती मागाहून लिहितो. रा छ. ११ माहे सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद शु. १३ बुधवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. गजीकोटा व कडपे तालुकियांत मुफसदाचा हंगाम भारी. कितेक ठाणीं जमीदार वगैरे मुफसद लोकांनीं नबाबाकडील व टिपूकडील घेतली. याजकारितां मुफसदाचे तंबीस टिपुकडीलही काहीं जमियत व सरंजाम आला. ऐसे वर्तमान आहे. यावरून नवाबानीं आपले तालुकियाचे बंदोबस्ताकारिता येथुन दिलावरदौला किलेदार गंजीकोटा याजकडे मुसारेह मु .... .... समागमे येक .... ... व दोन तोफा व दाहा निशाणे गारद्याचीं व दाहा सदुखा बारुदचे याप्रा सरंजामानिसी रवानगी केली. रा छ. ११ माहे सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद शु. १३ बुधवार शके १७१५

अखबार ङ्गा छ. ६ ता छ. १० सफर पावेतों रा छ. ११ माहे सफर- रा. छ. १७ माहे सफर पत्रे पुण्यास रवानगी टप्यावर.

श्री.

भाद्रपद शु. ३० बुरुवार शके १७१५.

श्रीमंत राजश्री ———————— रावसाहेब

स्वामीचे सेवेंसीं ————————

विनंती सेवक गोविदाराव कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनंती विज्ञापना

ता छ १७ माहे सफर मुा बेदर येथें स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकार्चे येथास्थित असें विशेष इकडील वर्तमान पेशजी छ ११ माहे मारी लेखन करून पत्रांची रवानगी डाकेवर केली असेल सांप्रत येथील वर्तमानाची ... पुरवणीपत्री लेखन केली आहे अवलो ... उत्तरें रवाना व्हावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

श्री

भाद्रपद शु १३ बुधवार शके १७१५

विनंती विज्ञापना "पागेवाल्याकडील तालुकियाचा कारभार महमद अजीमखान याजकडे, नवाबांनी सांगोन दौलाची त्यांची सफाई केली " इत्यादिक तप सीलें विनंती पेशजी लिहिल्यावरून ध्यानांत आलें असेल व्यंकटराव याजकडे आह्नेद, गुंजोटी, हासनाबाद तीन तालुके दिल्हे धरकड तालुकियाची अमीली सिदी इमाम याजकडे सांगितली. अद्याप अमील रवाना जाले नाहींत या उ पुरी होणार. अजमखान व बासीमियां दौलाकडे रोज येतात जातात मागील हिसेबाचाही मागती घोळ पडला आहे व्यंकटराव यांचे मानस सिदीकडे तालुके असो नये तथा आदावतीमुळे इजाफ्याच्या फर्दा वरचेवर देतच आहे तालु ( कि ? ) यावर इजाफ्याचे येवजा — राद निर्बंध बंदो ..
ई नाहीं याप्रो तुर्त पागा प्र खाने पडलें आहे पुढें काये रगावर येतें पहावें पागेवाले याजवर हात फिरला नवता अमानत होते त्या जवरही कारभारी यांनी युक्तीनें हस्त-घातला, तेव्हां पागेचे कारमारास कीड लागली तेव्हां परिणाम समजलाच आहे रा छ १७ सफर हे विज्ञापना

श्री

भाद्रपद व ५ मंगळवार शके १७ १५.

विज्ञापना राजश्री बाबाराव गोविंद यांस पुणीयास जाण्याची रुखसत नवा बाची आली याची विनंती पूर्वी लिहिलीच आहे दौलाचा निरोप घ्यावयाचा त्याम दौलाचे हवेलीस नवाब येक दिवस आले होते. आणि पागेवाल्याकडील

कारभारही दौलाचेयेथें नित्य दीड प्रहर रात्रपर्यंत दोन तीन दिवस सतत होत आहे, त्याजमुळे बाबाजीराव याचे निरोपाचे अद्याप जालें नाहीं. इतक्यावर जसे ठरेल त्याची विनती मागाहून लिहितो. रा छ १७ सफर हे विज्ञापना.

**श्री.**

भाद्रपद व. ५ मंगळवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. ........ जी येथे येके ठिकाणीं अशी आहे कीं .. . . समई आपल्यासीं बिगाड करतील ....... पुरत नाहीं. ज्या समई नमुद होतील. तेव्हां मुष्कील पडेल हे समजोन, टिपु बहुत सावधपणें आतां पासोन बंदोबस्तास लागला. पाहाडी दरोबस्त किले येथील यजबुती ज्यात्रज्या करावयास लाविली. पाहाडी किले जातील सरंजाम पोक्त ठेऊन बंदोबस्त कराविला. व, जमीदोन किले इंग्रजाचे लढाईंत पारिच्छिन्न राहावयाचे नाहींत. हे जाणून जितका जमीदोन किला कोयते पाडून साफ करावा यैसा विच्यार केला आहे. पटणचे पूर्वेकडे किला मजबूत करावयास आरभ केला आहे. जातीने रोज तेथे जाऊन किल्याची दुरुस्ती होत असती. नित्याचा दरबारही त्याच जागीं होतो. याप्रो वर्तमान शोध लागला, त्याची विनंती लिहिली असे. रा छ. १७ सफर हे विज्ञापना.

**श्री.**

भाद्रपद व. ५ मंगळवार शके १७१५.

........ इग्रज कलकत्त्यास ........ ( गलबता .... ) त स्वार होऊन चेनापटणास छ. माहे सफरी दाखल जाला. याचें वर्तमान नवाबाचे सरकारांत छ. १४ माहे मारी चेनापटणचे अखबारित आलें. रा छ. १७ माहे सफर हे विज्ञापना.

**श्री.**

भाद्रपद व. ५ मगळवार शके १७१५.

विनति विज्ञापना. व्यंकटराम दिला याजकडून चेनापटणाहून अखबार आली, ती येथून रवाना केली आहे. राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसीं

प्रविष्ट करतील, त्याजवरून वर्तमान ध्यानांत येईल, रा छ १७ माहे सफर हे विज्ञापना

श्री

भाद्रपद व ५ मंगळवार शके १७१५.

विनंती विज्ञापना पूर्वा नक्षत्र अखेरपर्यंत इकडील तमाम प्रांतीं पर्जन्याची वृष्टी फार जाली कितेक ठिकाणीं मूग उडीद वगैरे जिनसांस पाणी लागुन खराब जाले पाऊस उघडावा ऐसें सर्वत्रांस जालें उत्तरा नक्षत्र सगळें कोरडें गेलें वापसे जाले कितेक जागा रबीच्या पेरण्या जाल्या खरीफ चांगलें आलें सांप्रत तेरा चौदा सेर जौरी येथें धारण व तालुकियांत सतरा आठरा शेर याप्रो। आहे सारांष, साल मारि हंगामसीर धारण जसी व्हावी तसी होईल असें चिन्ह दिसतें पर्जन्य चांगले जाले रा छ १७ माहे सफर हे विज्ञापना

श्री

अखबार ता छ १० ता छ १६ माहे सफर रवानाजीला असे रा छ १७ माहे मजकुर सन १२०३ फसली, हे विज्ञापना

छ २१ सफरी पुण्यास डाकेवर

श्री

भाद्रपद व ९ शनिवार शके १७१५

श्रीमंत राजश्री———————————रावसाहेब————

स्वामीचे सेवेसीं———————————————————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनंती विज्ञापना ता। छ २१ माहे सफरपर्यंत मु।। बेदर येथें स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष इकडील वर्तमान छ १७ माहे मारीं लेखन करुन पत्राची रवानगी सेवेसीं केली त्यावरुन ध्यानास आलें असेल सांप्रत येथील वर्तमानाची विनंती अलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिली आहे अवलोकनें ध्यानांत येईल उत्तरें रवाना व्हावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

श्री.

भाद्रपद व. ५ शनिवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. राजश्री बाबाराव गोविंद यास पुणियास जाण्याची रुखसत नवाबानी दिल्ही, त्या समई मारनिलेसी कितेक बोलण्याचे मरातब लागणें ते आमचे समक्ष दौलानीं त्यासी बोलण्यात आणून मग निरोप द्यावा यैसा बेत ठरला. छ. १७ माहे सफरी दौलानीं आह्माकडे सांगोन पाठविल्यावरून गेलो. बाबारावही आले. साहा सात घटिकापर्यंत येकातीं बोलणे जाले. याचा ता॥ अलाहिदा पुरवणीपत्रीं विनती लि॥ आहे, त्यावरून सविस्तर ध्यानात येईल. बाबाराव यांसी दौलाचे बोलणे जालें. त्यास मार निले आह्माकडे येणार आहेत. त्यात आह्माबेगळे दौला त्यासी काय बोलले आहेत.. यातीलवी खुलासा समजेल, त्यासारखी मागाहून ता॥ वार लिहितो. रा॥ छ २१ सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद व ९ शनिवार शके १७१५.

विनती विज्ञापना पागावाले याजकडील तालुकियाचा रोज येक प्रकार याची विनंती पेशजी लिहिण्यात आल्यावरून ध्यानात, आले असेल. नबाबांनीं अजमखान यास सांगितलेकीं, तुह्मीं शमपुल उमरा याजप्रा॥ अजमुल उमरा यास समजोन, त्यांजकडे जात जावें. त्याप्रा॥ प्रथम दिवसी अजमखान व घासीमिया दोलाकडे जाऊन त्यांसीं बहुत नम्रतेचें बोलणे बोलले कीं "आपण शमपुल उमरा आहेत. जसा बंदोबस्त खातरेस येईल तसा करावा" तेंव्हां दौलानीं सांगितले कीं तुह्मांविषई हजुरात अर्जे करून पागेचा बंदोबस्त ज्यांत खातरखां असेंच करीन. तालुकियासंबंधे मागील देणे घेणे कोणाचें किती हें समजावावें. त्यावरून अजमखान यानी तालुकियाची बाकी व देणें व स्वराज्याचे मामलतीची बाकी इत्यादिक समजाऊन दिल्हे. कुलतालुकिचा आकार बासष्ट लक्ष रु. ठरला यापैकीं पागेचे बेगमीचा यैवज बत्तीस लक्ष जाता तीस लाख रुपयांत स्वराज्याचे मामलतीचा यैवज बाकी असेल त्याचा

फड्च्या करावा व त्यांचें देणें त्यास वायदा ठरऊन घावें सरकारचे कसरे बावत बाकी यैवज याचे तालुके तोडून सरकारांत घावे याप्रा दौलानीं शकल कादून अजमखान व घासिमियां यांसी बोलण्यांत आणिलें याचा विचार अजमखान यांनीं पाहतां कसरेबावत यैवजाचे तालुके निवडून परभारा घेतल्या-नंतर बाकी जें राहिलें त्यांत पागेचा कुल कारखाना व देणें व सिबंदी खर्च व स्वराज्याची मामलत येणे करून गोष्ट निभावयाची नाहीं हें समजोन अजमखान यांचे बोलणें दौलासीं कीं हें कांहीं आह्मांस सांगो नये आपण शमपुल उमरा आहेत तेव्हां पागेचा बंदोबस्त करणें तसा आपणच करावा, आणि वरकड कामही केलेलें तसें व्हावें याप्रा अगानिराळें टाकून बोलतात याजवर कोणे डौलास येतें पाहावें सारांश दौलाचे मनांत फार दिवसांपासोन पागेकडील चौकसी आपण करावी येसें होतें ते अनायासें हस्तगत जालें आतां घोळा खालीं घालून रोज येक शकल काढितात पहिले दिवसीं अजमखान घासी-मियां दौलाकडे गेले ते समई त्यासी दौलानीं आणा शपथा घाहून असा बं दोबस्त करितो, याप्रा बहुत खातरजमेचे बोलले दुसरे दिवसीं रंग येगळाच यावरून शपथ क्रियेची हे अवस्था तेव्हां इतबाराची उमेद काय राहिली ! कोणेही प्रकारें अजमखान याजला दौलाचे बोलण्याचा करण्याचा भरंवसा वाटेना यास्तव आंगानिराळी गोष्ट टाकून बोलतात यावर कोणे थरास येतें पाहावें रा छ २१ सफर हे विज्ञापना

श्री.

भाद्रपद व ९ शनिवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. " लार्डकारनवालीस ईग्रज याजकडून साता दफेची तहनाम्याची याद टिपुसुलतान यांचे मसलहत प्रकर्णी आली त्या यादीचे कलमांत कांहीं कमबेष हर्फ करून साता दफेची याद श्रीमंताचे सरकारांतून गोविंदराव कृष्ण यांजकडे रवाना जाली. " या प्रा मिस्तर माल्टिट यानें येथें मिस्तर इष्टवट ईग्रजाकडून आहे त्यास लिहिलें त्यास याद आपल्यापाशीं ये ऊन पोहचली कीं काय ह्मणोन भीरआलम ह्मणत होते त्यास अद्याप याद

आली नाहीं. आली ह्मणजे प्रविष्ट होतील येसें सांगण्यांत आलें. रा छ. २१ सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद व. ९ शनिवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. तमाम मुतसदी मंडळी यांस दौलांनीं तगादा लाविला आहे कीं सिलेदार लोकांची हजरी गणती करार वालाह नाहीं. ज्याचे शंभर स्वार त्याचीं घोडी पन्नास साठ असतां शंभराची तलब रोजमुरे वगैरे सरकारातून घेतले. त्यांत सिलेदारास जितकीं घोडीं तितकाज येवज दिल्हा. बाकी मुतसदी व हाजरीचे चोपदार यांनीं मिळोन तफावत केली याचा येकदोन पतालाऊन ह्या आपण कारभार करीत आल्या दिवसापासोन याचा हिसेब समजावणें. या प्रा तसदी केली. हिसेबास पाहाता कशास कांहीं मिळेना. लाखोंचाच पेंच. सबब याची नजर ठरऊन घ्यावी येसें बोलणें मुतसदी मंडळीचें पडलें. त्यावरून साडेबावीस लाखाची तफरीक ठरली. राज्याजी व भारमल छटुलाल आदिकरून सर्वोवर हिसेरसीद प्रा वांटणी जाली आहे. परंतु याचाही निश्चय नाहीं. याजवर आणिक काय ठरतें ते समजल्यानंतर याची विनती मागाहून लिहिण्यात येईल. रा छ. २१ सफर हे विज्ञापना.

श्री.

भाद्रपद व. ९ शनिवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. ईसामिया याजकडे नबाबाचे सरकारातून गुती सरकारपैकीं ताडकरी व ताडपत्री व सिंगणमला व येलानूर हे च्यार तालुके होते. त्यास ईसामियाकडे टिपुकडील पत्राचा सिलसिला लागल्याचें दौलास समजले. त्यावरून त्याजला येथें बोलाऊन घेतले. टिपुचीं व कमरुदीखान याचीं पत्रें ईसामियापासीं होती. ते त्यानें दौलाचे हवालीं केलीं. टिपुकडील या तऱ्हेनें पैगाम, परतु, आपण मिळालों नाहीं याप्रा इसामियानें दौलापासीं आपला निखालसपणा दाखविला. तथापि पुन्हां ईसामियास त्या तालुकियास रवाना केलें असता काय तऱ्हा पडेल याचा अंदेशा दौलास. याजकारिता त्या च्यार

महालाचें काम ईसामियाकडून तगीर करून दुसऱ्याकडे सांगितलें नल्गुंडा व देवरकुंडा हैदराबाद सुभ्याचे महाल येथील काम ईसामियास सांगोन सनदा पत्रें दिल्हा याउपरी ईसामिया हरदो तालुकियाचे बंदोबस्तास रुखसत घेऊन जाणार. हें वर्तमान ईसामियाकडे टिपुकडील राजकारणाचे सिल सिल्याचे इंग्रजास समजल्यावरून त्यानीं नबाबाकडे लिहिलें कीं ईसामिया फितुरी याजकरितां ताडपत्री वगैर तालुके याजकडे सांगो नये ततगीर करून दुसऱ्याकडे सांगावें ईसामियास दुसरीकडील काम योजावें याप्रा इंग्रजाचें मत, यावरून ईसामियाकडील तालुके पहिले दूर जाले आसद अलीखानही टिपुकडील सिलसिल्यांत यास्तव त्याची ही तिकडील तालुक्याची बरतरफी व्हावी हे इंग्रजाचें झ (ण) णें यप्रा बारीक व र्वमान मीर आलम याचे द्वारा व परभारां समजलें रा छ २१ सफर हे विज्ञापना

श्री

विनंती विज्ञापना व्यंकटराम दिल्ला याजकडून चेनापटणाहून अखबार आली ती रा केली आहे राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसी प्रविष्ट करितील त्यावरून अवलोकनांत येइल रा छ २१ माहे सफर हे विज्ञापना

श्री

भाद्रपद व ४ सोमवार ते व ७ शनिवार शके १७१५.

अखबार सी छ १६ ता छ १९ सफर पर्यंत रा छ २१ सफर

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५.

माहे रावल उर्फ आश्विन मास छ २ रोज रावसाहेबास पत्रें

श्रीमंत राजश्री —————————— रावसाहेब

स्वामीचे सेवेसी ——————————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सांष्टांग नमस्कार विनंती

558 59

विज्ञापना ता। छ. २ माहे रा। वल मु। बेदर येथे स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पेशजी डांकेवर पत्राची रवानगी केली त्यावरून ध्यानांत आले असेल. साप्रत येथील वर्तमानाची तपसिलें विनंती आलाहिदा पुरवणीपत्री लिहिली आहे. अवलोकने मजकुर ध्यानांत येईल. उत्तरे रवाना व्हावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ. सेवेसी श्रुत होय हेविज्ञापना.

श्री.

आश्विन शु. ३ मंगळवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. बाबाराव यास दौलाचा निरोप होऊन बाहेर जिनसीपासी जाऊन राहिले. मारानिलेस सागावयाचें तें दौलानीं सर्व सांगितलें. छ. २२ सफरी दौलाचा निरोप जाला त्यापक्षी मारनिलेनें येका दो दिवसांत निघोन जावें. परतु सरकारातून जावसालापैकी आठ फर्दा ठरुन आल्या, त्याचे जबाव ठराऊन देण्याचे राज्याजी यास दौलानीं सागितले. जबाव ठरण्या करितां इतके दिवस मारनिलेचा गुंता जाला. याउपरी आठ फर्दाचे जबाव मारनिलेपासीं ठराऊन देणार. ते दिल्हे ह्मणजे येथुन निघोन तिकडे येतील. रा। छ २ माहे रावल हे विज्ञापना.

श्री

आश्विन शु. ३ मंगळवार शके १७१५.

विनती विज्ञापना. राजश्री बाबाराव गोविंद यास पुणियास जाण्याची रुखसत नबाबानीं दिल्ही, येविपईची विनती पेशजी डांकेवर लिहिण्यात आलीच आहे. सरकार जावसालप्रकर्णी मारनिलेसी बोलावयाचे प्रकार दौलानी आमचे समक्षही बोलण्यात आणिले. छ २२ सफरी दौलानीं बाबाराव यास आपल्याकडील निरोप दिल्हा. येक कंठी मोत्याची व पानदान दिल्हे. तेंच दिवसी रात्रीं अकरावे घटिकेस बाहेर जाऊन राहण्याचा मुहुर्त दौलानीं बाबाराव यास सागितल्यावरून अकरा घटिका रात्रीं मशारनिले निघोन बाहेर डेरा देऊन राहिले. रा। छ. २ माहें रावल हे विज्ञापना.

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५

विनंती विज्ञापना पागेवाल्याकडील कारभाराची चौकसी दौला करूं लागले अजमखान घासीमियां रोज दौलाकडे जाऊन प्रहर रात्रपर्यंत हिसेबाचे जलसे होत गेले परंतु नित्य येक प्रकार वेगळाच यावरून अजमखान व घासीमिया यांस दौलाकडील भरंवसा वाटेना. तेव्हां दोघे येकत्र होऊन दोन दिवस धारू धरून दौलाकडे गेले नाहींत दौलानीं राव्याजी यांस त्याज कडे पाठविलें त्यांनीं राव्याजीसी बोलण्यांत आलें कीं या आवसाळापासान आम्हीं हात उचलला आपले विष्यारास येईल तसा बंदोबस्त करावा; हे गोष्ट नबाबास व दौलास समजल्यानंतर या प्रसंगीं पागेवाले यांस भजुरदा होऊं न देतां समाधानीनें कारभार उलगडावा हें प्राप्त आलें अजमखान व घासीमिया यांस खातरजमा करून दौलानी बोलाविलें तुमचा कारभार तुम्ही मुखत्यारीनें पूर्ववतप्रा करावा सरकारांत तेरा लाख रु० द्यावे पागेचे नेमणुकेचा अदमास बतीस लाख त्यांप्रा जिकडील तिकडे माहावाऱ्या पोंहों-चत्या होऊन बंदोबस्त राखावा स्वराज्याचे मामलतीची बाकी राहिली असेल त्याचा हिसाबाचे रुईनें इनफिसाल करावा माहाल मजकुर खर्च व देणी सारासार पाहून तडजोड करणें याप्रा सांगोन पागेचे कारभाराची मुख-त्यारी अजमखान व घासीमियांकडे सांगितली व्यंकटराव यांनीं इजाऱ्याची रकम चढविली. त्यासुद्धां येकंदर बेरीज मासट लाखास आली होती तें सर्व राहून तेरा लाख रु० मात्र सरकारांत दाखल करावे वरकड कामांस त्यांचे त्यासच मुखत्यार केलें तेरा लाखाचा पर्याय पाहतां पेशजी पागेक डील हिसेब नबाबांनीं मनास आणावयाची आज्ञा राव्याजीस केली होती त्या हिसेबा अन्वयें दाहा लक्ष पागेवाल्याकडून येणें व चितापुर वगैरे कांहीं तालुका पागेचे सरंजामासिवाय अमानीचा, त्याजबाबत येवन याचे हतेमंदी माबत साहा लाख जातां बाकी सात लाख रु० दरसाल येन पांच व दरबार खर्च दोन येकूण सात लाख सालाबादी बसेल यांतही पांच लाखास येवज पा

कल्वर्गे वगैरे कितेक माहाली जमीदाऱ्या सरकारांत जत, त्याचे हक, रुसुमसे- ऱ्याचा येवजही याचे पोटीं. दोन लाख रु० मात्र ज्याजती दरसाल पडतात. वास्तव्य पाहाता याप्रो। साराश. पागेकडील कारभाराचा येक महिना कमकस्तर मोठा मझेला पडला होता. साप्रत अशा तऱ्हेनें वंदोवस्त जाला. अजमखान व घांसीमिया याची जुट येक जाल्यामुळे या कारभाराची भटी सेवटास चागली उतरली. पागेवाल्याचे पुठ्यातून सरबुलदजग व दिलदारखान हे फुटल्यामुळें इतका बखेडा पडला. साप्रत, सरबुलदजंगाचेही समाधान अजमखान घासीमिया यानीं करुन कामकाजाचा क्रम पूर्ववतप्रा। ज्यारी केला. दिलदार खानाकडे लोहारे व अलूर येकेहली कसवा हे जागिरींत दिल्हे. व्यकटराव याजकडे अल्द, गुंजोटी, हसनावाद, कोळूर, हे च्यार तालुके राहिले. करेमुंगीस राज्याजी याचे विद्यमानेचा अमील जाम नारायणखेड फतुदुलाखानाकडे दिल्हे. वरकड कुल तालुकियाची अमीली सिदी इमाम याजकडे ठरली. सर्वाची देखरेख जुजरसी अजमखान यानीं करीत जावी. याप्रा। पागेकडील कारभार ठरण्नात आला. तेरा लाख रु० सरकारात देणें ठरलें. ते आदा करून देण्याचा जिंमा आजमखान यानीं केला. रा। छ. २ माहे रावल हे विज्ञापना.

**श्री.**

आश्विन शु. ३ मंगळवार शके १७१५.

विनती विज्ञापना. येथून शुक्लतीर्थ ह्मणोन जागा कोस दीड कोसावर आहे. त्याचे आसपास मकेचे फड व उंस ज्याचा होता, त्यापासोन सरकारात खरीदी करून त्या जाग्यावर वाडा वसऊन डेरे दिल्हे. वाड्याचे चौकीस मुसा रहेमु व अवदुल करीम कुमदान याचे रिसाल्यापेकीं गाडद ठेऊन बदोवस्त केला. छ. २१ व छ. २२ सफर दोन दिवस प्रात:कालींच नवाब सवार होऊन त्या जाग्यास गेले. प्रथम दिवसीं दौलासही समागमें नेलें. दहिहाड्या वगैरे सरंजाम आणऊन मकेचीं कणसें व खानाही तेथेंच जाला. दुसरे दिवसीं जनाना बरोबर होता. पागेवाल्याकडील लोक बरावर. याप्रा। दोन दिवस मका व उंसाची सैर जाली. रा। छ. २ माहे रावल हे विज्ञापना.

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५

विनंती विज्ञापना ईसामियां यांजकडील पहिले ताल्लुके गुतीसरकारचे ताडपत्री वगैरे तगीर करून दुसरें काम नळगुंडा व देवरकुंडा हैदराबाद सुभ्यापैकीं दोन माहाल खाजे मुनीमखां कुदरतजंग किल्लेदार कल्बर्गेकर या जकडे होते, ते त्याजकडून काढून ईसामियां यांस अमीली दिल्हे छ २६ नवाबाची रुखसत होऊन खिल्लत पांच पारचे कारचोबी दिल्हा इतक्यानंतर दौलाकडील निरोप घेऊन ईसामियां नळगुंडा व देवरकुंडयास जाणार. ताड पत्री वगैरे काम मवकुफ होण्याचें कारण याची तपसीलें विनंती पेशजी लिहि ल्यावरून ध्यानांत आलें असेल छा छ २ माहे रावल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५

विनंती विज्ञापना या प्रांतीं साल्मारीं पर्जन्याची अतिवृष्टी जाली हस्त नक्षत्राचे पाऊस आठ पंधरा दिवस उघडला तर रबीच्या पेरण्या होतील अ साच पडू लागल्यास पेरण्या होण्याचें संकट हैदराबादेकडेही पर्जन्य भारी जाला. मुसा नदीस पूर आला, व जळपलींचें तळें फुटुन दोन्हीं पाणी येकत्र जाली बेगम बाजार अगदीं वाहून गेला च्यार माहालापासी पाण्याचा डोहो होऊन फत्तेदरवाज्यांत देखील पाणी शिरलें नदीच आसपास गरीब गुरबाची घरें बहुतेक वाहून गेलीं येकायेकीच पाण्याची अमद जाल्यामुळें कितेक माणसें असावधपणें मेलीं, गेलीं, व जिंदगीस तर ठिकाणाच नाहीं याप्रा नदीचे पुरानें वर्तमान जालें यांची अखबार नवाबाकडे आली जळपलीचा तलाव फु टला होता त्यास हजार पांचसें माणसें च्यार पांच दिवस मेहनत लाऊन तला याचा बंदोबस्त केली ( ३ ) हलीं धारण येथें जोंधळे तेरा सेर व तांदूळ नऊ

---

१ पोपाख २ घर ३ बेलदारीकाम

साडेनउ सेर या अन्वयें आहे. पंचोत्र्याचे दिमतीमुळें धारण तालुकियांत आसपास आहे त्याहून येथें कमी. रा छ २ माहे रावल हे विज्ञापना.

श्री.

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५.

विनती विज्ञापना. जागीरदार व ईतलाखी व पागा व रिसालदार फौजेस ज्यावज्या पंधरा वीस कोसी चराईस राहाणें वोलाऊं ते समई येणें, याप्रो पहिले हुकूम होऊन रवाना केले. त्याप्रा वेदराहून पंधरा वीस कोसीं आसपास चराईकरिता लोक राहिले. साप्रत सरंजामासुधा येऊन हाजर होणें या प्रा ज्यावज्या ताकिदी गेल्या. नवनिगादास्तीचे लोकापैकींही वरचेवर येऊन कांहीं जमले व वाकी येणे त्याचीही निकड मोठी आहे. यासिवाये आणिकही लोक मिळतील ते जमा करावे यैसाही कितेक सरदारास हुकूम जाला आहे. नवनिगादास्तीपैकीं कितेक लोकाच्या हजऱ्या आजपर्यंत नवत्या, त्या जारी जाल्या. रोजमऱ्याचा यैवजही हाजरीचे अन्वयें देण्याची सुरुवात केली. मुसा रेहमुस हुकूम कीं आपली गाडद सारी तयार ठेवावी. नवीन पाच हजार गाडद सजऊन गाडदचा सरंजाम मजवुत करणे यैसे सागितलें. साराश, फौज व गाडद जमा करण्याची तुर्त गडवड फार आहे. रा छ. २ माहे रावल हे विज्ञापना.

श्री.

आश्विन शु. ३ मंगळवार शके १७१५.

विनती विज्ञापना. शकरराव भोग याजकडे निर्मळ, इंदुर, बोधन, बालकुंडा आदिकरून नफरदौला वावत माहालाची अमीली होती. ताहुदाची बेरीज होऊन पराकाष्टा सालोसाल वेरजे अन्वयें हिसेब कागदी पत्रीं व्हावें. त्यात माहालातीचा यैवज कस्त मेहनतीने वसूल होईल, त्यापैकीं खर्चवेंच वजा जाऊन बाकी सरकारदाखल होत आला. तो वसूली पोंहचून बाकी येकंदर ब्याणव लाख निघाली. त्याची किस्तवंदी पाच लाख दरमाहा दाखल करावे. शिवाय साल्मारचा यैवज. याप्रा नक्षा दौलानीं ठराऊन

शंकरराव यांस रुखसत केलें, च्यार महिने जाले तीन लाख मात्र सरकारांत आले वरकड येवजास ठिकाण नाही यामुळें शंकरराव यांजवर दौलाची मर्जी खफा होऊन तालुकियाची नफी करविली येथून स्वार शंभर व कांहीं गाढद मुर्ध्या जर्दस अमील रवाना केल्या याप्रा वर्तमान आहे रा छ २ माहे रावल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५.

विनंती विज्ञापना रणदुलाखान करनुल्कर यांस नवाबांनी छ २१ स फरी रुखसत दिल्ही अलफखान यांजकडे करनुळ आदिकरून रणमस्तखानाचा तालुका बाहाल जाला तुही व आलफखान येक विच्यारें आपले दौलतीचा बंदोबस्त करावा येसी रणदुलाखानास ईर्षाद जाली बाहादुरीचा खिताब व जेगा सरपेंच पानदान दिलें अलफखान यांचें नांवें बाहाली च्या सनदा यांचे सरकारच्या व्हावयाच्या होत्या, त्या तुर्त जाल्या नाहींत कारण कीं टिपुकडील पेस्कसीबाबत दरसाल दोनलाखप्रा आठ नऊ वर्षांचा जाबसाल याचा भाग तुटल्यासिवाय सनदापत्रें होत नाहींत याप्रा सांगोन प्रस्तुत सनदा पत्रें दिल्हीं नाहींत. पुढें ठरेल तसें होईल रा छ २ माहे रावल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५

विनंती विज्ञापना रणदुलाखान यांस रुखसत जाल्यावरून दौलास आम्हीं विच्यारिलें कीं करनुल संस्थान प्रकर्णी आपले सरकारचा जाबसाल नजराणा वगैरे फैसला जाला असेल रणदुलाखान यांस रुखसत जाली, त्यास श्रीमंताचे सरकारचा जाबसाल करनुल्करांकडून ईनफिसाल होणे याचें आपण सांगितल्या बमोजिब सरकारांत लिहीन याचें उत्तर दौलांनीं केलें कीं "करनुल्करांकडून हजरतीचे सरकारचा जाबसाल अद्याप फैसला नाहीं कारण कीं, टिपुकडील पेषकसीबाबत तगादा करनुल्करास आहे त्याचा फै

सला जाल्याशिवाय करनुलकरास सनदापत्रेंही करून देण्याचें मवकुफ जाले. बाहालीच्या सनदा होतील ते समइ नजराणा वगैरे जाबसाल अवल मुजका करून मग सनदा द्यावयाच्या. हजरतीचे सरकारचा जाबसाल ठरावांत आला ह्मणजे त्या समई श्रीमंताचे सरकारचे ठराऊन घ्यावे. तूर्त टिपूकडील पेषकसीचे मझेल्यामुळे करनुलकराकडील जाबसाल मुलतवी. त्यास टिपुचे पेषकसीचे बाबत लचाड तोडून टाकले पाहिजे. येविषई लाडबाहादुर यास हाजरतीचीं व श्रीमताचीं पत्रें जरूर जाऊन बंदोबस्त जाला पाहिजे. पटणावर तह जाला. ते समई रणमस्तखान याचे मोहरी दस्तयैवजा वरील शर्त बालण्यात असता आज पर्यंत दस्तयैवज निघत नाहीं, आणि पेषकसीचा तगादाही मना होत नाही. याजकरिता लाड साहेबांस पत्रे दोन्हीं सरकारचीं जाऊन हा मझेला रफा व्हावा. सबब की करनुल संस्थान हरदों सरकारचे पेषकसीचे. या संस्थानची यांस खातर जरूर. इत्यादिक दौलाचे बोलण्यातील भाव. त्यास लाडबाहादुर यांस येविषई हे आपले सरकारचीं पत्रे कशीं देतात व सरकारचीं पत्रे कोण्या अन्वयें लाडास जाण्याचीं. याचे सागतील त्या प्रो मागाहून विनंती लिहीन. साराश, टिपुकडील पेषकसीचे जाबसालाकारिता करनुलकराकडील नजराणा वगैरे जाबसाल व सनदापत्रे मुलतवी या प्रो दौलाचें बोलणे. रा छ. २ माहे रावल हे विज्ञापना.

## श्री.

आश्विन शु. ३ मंगळवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. वासीमिया याजकडे पहिली पागेपैकीं जागीर व लोकनेमा प्रा आहेत. या सिवाय त्याचे पुत्राचे नांवें नवा पाचसे लोकाचा करार जाला. पांचसे लोक नवे ठेवण्याचे मियास सांगितले, त्यावरून ते लोक ठेवाववयास लागले. सदरहु पांचसे लोकांचा यैवज इतलासी अगर जागीर हें काहीं अद्याप ठरलें नाही. ठरल्यानतर विनंती लिहिण्यात येईल. रा छ. २ माहे रावल हे विज्ञापना.

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५.

विनंती विज्ञापना माहाराव निंबाळकर यांची रदवदल दौलापासीं बाबाराव यांनी केली दौलांनीं सांगितलें कीं माहाराव यांची चाल दुरुस्त नाहीं मगर, त्यांचे पुत्रास हाजुर येण्याविषयीं अर्ज करीतों त्यावरून दौलांनीं नबाबास अर्ज करून माहाराव यांचे पुत्र जानोजी निंबाळकर यांस येण्याविषई नवाबाचा इनायतनामा व आपले पत्र बाबाराव यांचें समागमें तयार करून दिल्हें. जानोजी निंबाळकर करमाळें तालुक्यांत आहेत तेथुन येथें येणार. येथें आल्यानंतर जागीर वगैरे कांहीं पोटापुरती करून देणार याप्रो आहे रा छ २ माहे रा बल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५.

विनंती विज्ञापना छ २७ सफरी सैर करण्याकरितां नबाबाची स्वारी सिध जाली पागेवाल्याकडील छोफ वगैरे बाहेर दाटी फार जाली सैद उमरखां यांचे चौऱ्यावर भवानसिंग चौधरी बसला असतां घांसी मियांकडील घोड्याची लाथ चौधरी यास लागोन दांत पडले घोड्याची लात बेजरब बसली दोन घटिका मुर्छित चौधरी पडला माणसांनी उचलून त्याचे घरास नेलें " होट तुटला, त्यास टांके देऊन नीट करणें" याप्रा नबाबांनी ताकीद केली फिरंगी हकीमास चौधऱ्याकडे पाठवून टांके व मल्म देत असतात चांगले होण्यास पांच च्यार महिने पाहिजेत अशी अवस्था चौधरी याची जाली. रा छ. २ माहे रावल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु ३ मंगळवार शके १७१५

विनंती विज्ञापना सरकारचें पत्र छ २९ माहे जिल्हेजचें राजश्री गणपतराम माधव यांजकडून आलें तें छ १४ सफरी पावलें त्यांत "मौजे पाचोळी प्रा पा कजे भागदर हा गांव जागीर राजश्री गणपतराव माधव यांजकडे सरका-

रांतून आहे, त्यास भारामल नबाबाकडील याचा उपसर्ग लागतो. येविषीं नवाब निजाम अलीखा बहादुर यांसी बोलोन बंदोबस्त करणें" ह्मणोन आज्ञा सादर जाली. त्यास मौजे मजकुरास भारामलाकडील नायबाचा उपसर्ग येविषींचे वर्तमान समजल्यावरून सरकारचे पत्रापूर्वीही हा मार दौलासी तीन च्यार वेळां बोलण्यात आला. साप्रत सरकार आज्ञे वरून निकड करून दौलासी बोलणे जालें कीं पेशजीपासोन श्रीमंताचे सरकारात ............ ( येथें येक सबद पृष्ठ गहाळ झालें आहे. पृष्ठांक १२२ ) स ........ ( ठ )-राऊन हरादो परगण्याची जागीर रुकनुदौला यास दिल्ही. त्यात हे दोन गाव वजा आहेत. रुकनु दौला यांस दिल्हे नाहींत. येविषीं दौलास सांगोन हरदु गावास तोसीस लागों न देणें. याप्रा सरकारी पत्रे. त्याच्या नकला छा. त्या पत्रीं वाघोली व अरणी दोन्हीही गाव वजा आहेत. याजवर दौलाचें बोलणें कीं "आमचे सनदेंत अथवा दप्तरी पाहता कोठेंही वाघोली हा गाव वजा नाहीं. याचाही जबाब इकडून जाला कीं सनदेत अदुरे तालुक्याचा तनखा लिहिला, तो वाघोली गाव अलाहिदा वजा देऊन बाकी तालुक्याचा तनखा लाऊन सनद दिल्ही, येसाही अर्थ सिद्ध होतो. तर्फेनचे जें पहिले दिल्हें तें जिकडील तिकडे चालावें असा करार असता वाघोलीस हरकत करू नये. श्रीमंताचें सरकारचे जाबसालास सदरील हा सवाल आमचा आहे. याचा जाबसाल सरकारी येकदर जाबसालात उगवावयाचा. वाघोलीस भारामलानीं लोक पा। ते माघारे आणवावे दौलाचें म्हणणें कीं वाघोलीचा जाबसाल पुढें जसा ठरेल व जिकडे गाव वाजवी होईल तिकडे द्यावा. तों पावेतों वाघोली गाव अमानत, येसा जिमा तुम्हीं आपला करून दस्त येवज दिल्यास लोक माघारे आणऊ" आह्मी उत्तर केलें कीं "येसे दस्तयेवज कोठवर म्हणोन द्यावे ? गाव आमचे जिमे आहे परंतु दस्तयेवज सिवाये लोक तेथुन आणऊ नयेत, येसें ध्यान दिसण्यात आलें, व कालहरणावर टाकुन बोलतात. मटे व मालेगाव हे दोन ठाणीं रोशनखानानें घेतलीं, ते पोटी पडले, हली वाघोलीस सुरुवात केली. त्यास, वाघोली

हा गोष सरकारचे दसरचे रुइर्ने यजाईत आहे किंवा कसें येविषी यांसी बोल-
ण्यास आज्ञा होईल त्याप्रो बोलेन येविपीचे उत्तरास आज्ञा सत्वर जाली
पाहिजे रा छ २ माहे रावल हे विज्ञापना

श्री

भाद्रपद व ७ गुरुवार ते आश्विन शु २ सोमवार शके १७१५
अखबार छ १९ रोज सफर ता छ १ रावलपर्यंत
छ १० रावली डाकेवर

श्री

आश्विन शु १२ बुधवार शके १७१५.

श्रीमंत राजश्री ―――――――― रावसाहेब
स्वामीचे सेवेसी ――――――――

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा नमस्कार विनंती,
ता छ १० माहे रावल मुा बेदर येथें स्वामीचें कृपावळो कर्ने करून सेवकाची स्वारी
मान यथास्थित असे विशेष इकडील वर्तमान पेशजी डाकेवर ता सैद उमरखां
लिहिल्यावरून ध्यानांत आलें असेल सांप्रत येथील वर्तमानाल घोड्याची
पुरवणी पत्रीं विनंती लिा आहे त्यावरून अवलोकनांत येईल दुसली दोन
म्हामयास आज्ञा करणार स्वामी समर्थ सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना लेखें " होट

विनंती विज्ञापना शंकरराव जोग यांजकडे नबाबाकडून किल्ली फिरंगी
बोधन, पाल्कुंडा वगैरे माहाल नफुरदौला मरहुम यांजबाबत पगले होण्यास
बाकीचा तोटा भारी तालुके तमाम उज्याड साल मारचे येवजास ता छ. २ माहे
काण नाहीं सबब दौलाची मर्जी शंकरराव यांजवर खपा होऊन त
जतीस स्वार व अमील यांची रवानगी पेशजीची झाली सांप्रत, द
यांजकडील कुल तालुकियाचें काम मीरबदरुद्दीन हुसेनखां पेशजी पागावाले
यांजकडील तालुकियाचे अमीलीस होते, त्यांजकडे निमे तालुकियाचें काम
व निमे तालुका व्यंकटराव सुरापुरकर यांजकडे याप्रा आलाहिदा दोन
टप्पे उयांकरून दोघांकडे मागितल्या शंकरराव यांचेकारकिर्दीची बाकीची

तालुकियात रुजु करून घेऊन वसूल करून सरकार दाखल करावी. व साल दरसाल नेमाप्रा यैवज पावज्या कर्तीत जावा. बेमुबलग बाकी राहूं न देतां कारस्तनीनें उगवा करून तालुक्याचा बंदोबस्त राखावा. सरकार-काम करावें. याप्रा उभयतास ताकीद होऊन छ. ८ रावली दसऱ्याचे दिवसीं रात्रीं मीरबदरुदीन व व्यकटराव याचे पुत्र त्रिमलराव यास वाबाळीचें खिलत व खिताब व रुखसतीची पानदानें दौलांनीं नबाबांस अर्ज करून देवविलीं. या उपर बदरुदीन व व्यकटराव यांचे पुत्र त्रिमलराव उभयता तालुकियास दौलाचा निरोप घेऊन जाणार. येथुन रवाना जाले ह्मणजे मा-नमुद विनति लिहिण्यात येईल. रा छ. १० माहे रावल हे विज्ञापना.

श्री.

आश्विन शु. १२ बुधवार शके १७१५.

विज्ञापना. शंकरराव भोंसले याचे तालुकियास जप्ती अमीन व स्वार पेशजी गेले, त्यानीं इदुर, बोधन वगैरे ठाणीं कितेक दाखल केलीं. स वर्तमान समजल्यावरून त्यानें, आरमुर येथील गढी मातबर राहण्याची जागा. तेथें पाच सात हजार पैदल वगैरे जमियत आरमूरची गढी व शकराई पेठ वगैरे मकानें बळाविली. याचा गवरून, येथून भारामल तेजवत यास रवाना करण्याची योजना रून नबाबास अर्ज केला. छ. ८ रा वल दसऱ्याचे दिवसीं रात्रीं यांस रुखसतीचें पानदान दिल्हें. याउपरी भारामल दौलाचा निरोप जाणार. भारामल याचें समागमें जमियत दाहा हजार पर्यंत जाणार. दौला-कडील रिसाल्याचे लोक व जमातदार, व मुतफर्कात जागीरदार लोक चढचणकर सिंदे वोगरेस हुकुम जाला. भारामल कुच करून येथून रवाना जाले ह्मणजे ता विनंती लिहिण्यात येईल. भारामल यास रुखसत समई नबाबानीं जिगा व कलगी दोन अहद दिल्हे. रा छ. १० माहे रा वल हे विज्ञापना.

हा गांव सरकारचे दप्तरचे रुइनें वजाईत आहे किंवा कसें येविषीं यांसी बोल
ण्यास आज्ञा होईल त्याप्रो बोलेन येविषीचे उत्तरास आज्ञा सत्वर जाली
पाहिजे रा छ २ माहे रावल हे विज्ञापना

श्री

भाद्रपद व ७ गुरुवार ते आश्विन शु २ सोमवार शके १७१५
अस्वार छ १९ रोज सफर ता छ १ रावलपर्यंत
छ १० रावली डांकेवर

श्री

आश्विन शु १२ बुधवार शके १७१५

श्रीमंत राजश्री ———————————— रावसाहेब

स्वामीचे सेवेसी ————————————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनंती
ता। छ१० माहे रावल मु॥ बेदर येथें स्वामींचे कृपावलोकनें करून से[गावाची स्वार
मान यथास्थित असे विशेष इकडील वर्तमान पेशजी डांकेवर सा। [सैद उमराव
लिहिल्यावरून ध्यानांत आलें असेल सांप्रत येथील वर्तमान[ील घोड्याचे
पुरवणी पत्रीं विनंती लि॥ आहे त्यावरून अवलोकनांत येईल [२ नसली दोन
महत्वयास आज्ञा करणार स्वामी समर्थ सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप[ नेलें " होत

विनंती विज्ञापना शंकरराव जोग यांजकडे नवाबाकडून [ केली फिरंग
बोधन, पाल्कुंडा वगैरे माहाल नफुरदौला मरहुम यांजबाबत [ांगले हाण्यास
बाकीचा तोटा भारी तालुके तमाम उज्याड साल मारचे येवजास [ता छ २ मा
फाण नाहीं सबब दौलाची मर्जी शंकरराव यांजवर खपा होऊन त,
जतीस स्वार व प्यादे यांची रवानगी पेशजीची झाली सांप्रत, र..
यांजकडील फुर्[ तालुकियाचें काम मीरबदरुद्दीन हुसेनखा पेशजी पागावाले
यांजकडील तालुकियाचे अमीलीस होते, त्यांजकडे निमे तालुकियाचें काम
व निमे तालुका व्यंकटराव सुरपुरकर यांजकडे याप्रा आठ हिस्सा दोन
टुकडयांकरून दोघांकडे मागितल्या शंकरराव यांचेकारकिर्दीची माफीं

तालुकियात रुजु करून घेऊन वसूल करून सरकार दाखल करावी. व साल दरसाल नेमाप्रा येवज पावत्या करीत जावा. वेमुवलग बाकी राहू न देता कारस्तनींनें उगवा करून तालुक्याचा वंदोवस्त राखावा. सरकार-काम करावें. याप्रा उभयतास ताकीद होऊन छ. ८ रावली दसऱ्याचे दिवसी रात्रीं मीरबदरुद्दीन व व्यंकटराव याचे पुत्र त्रिमलराव यास बहालीचें खिलत व खिताब व रुखसतीचीं पानदानें दौलांनीं नबाबास अर्ज करून देवविलीं. या उपर बदरुद्दीन व व्यंकटराव याचे पुत्र त्रिमलराव उभयता तालुकियास दौलाचा निरोप घेऊन जाणार येथुन रवाना जाले ह्मणजे मागाहून विनंति लिहिण्यात येईल. रा। छ. १० माहे रावल हे विज्ञापना.

## श्री.

आश्विन शु. १२ बुधवार शके १७१५.

विनती विज्ञापना. शंकरराव भोंसे याचे तालुकियास जप्ती अमीन व स्वार नबाबाकडून पेशजी गेले, त्यांनीं इंदुर, बोधन वगैरे ठाणीं कितेक दाखल केलीं. शंकरराव यास वर्तमान समजल्यावरून त्यानें, आरमुर येथील गढी मातबर त्याची हमेषा राहण्याची जागा. तेथें पाच सात हजार पैदल वगैरे जमियत जमा करून आरमूरची गढी व शंकराई पेठ वगैरे मकानें बळाविली. याचा बोभाट आल्यावरून, येथून भारामल तेजवंत यास रवाना करण्याची योजना दौलानीं करून नबाबास अर्ज केला. छ. ८ रा। वल दसऱ्याचे दिवसीं रात्रीं ...मल यास रुखसतीचें पानदान दिल्हें. याउपरी भारामल दौलाचा निरोप घेऊन जाणार. भारामल याचें समागमे जमियत दाहा हजार पर्यंत जाणार. दौला-कडील रिसाल्याचे लोक व जमातदार, व मुतफर्कात जागीरदार लोक चडचणकर सिंदे वगैरेस हुकुम जाला. भारामल कुच करून येथून रवाना जाले ह्मणजे ता। विनती लिहिण्यात येईल. भारामल यास रुखसत समई नबाबानीं जिगा व कलगी दोन अहद दिल्हे. रा। छ. १० माहे रा। वल हे विज्ञापना.

श्री

आश्विन शु १२ बुधवार शके १७१५

विनंती विज्ञापना शंकरराव भोंग यांजकडे वातनीस दौलनीं आपला खिजमतगार सेखु पाठविला त्यानें दौलास लिहिलें कीं शंकरराव येथून निघोन भोसले यांजकडे जाणार. शंकराई पेठ व आरमुर या दोन ठाण्यांचा बंदोबस्त केला फौजफसासुद्धां जाणार. यैसी वातमी लिहिल्यावरून दौलानीं भारामल यांस फौजसुद्धां येथून रवाना करण्याची तजवीज केली नवाबाची रुखसत द सन्याचे दिवशीं देविली बाहेर डेरेही दिल्हे दौलाचा मात्र निरोप घेणें बाकीस तो घेऊन कुच करणार, त्यास आज दुसरें पत्र सेखूचें दौलास आलें कीं " पहिलें मीं शंकरराव यांची चाल लिहिली होती परंतु तें पाउल यांचें नाहीं शंकरराव येथेंच आहे कोठें गेला नाहीं, व परमंदा होण्याचा मनसबाही याचा दिसत नाहीं हाजूरचें पत्र खातर जमेनें येणें यैसें आल्यास हाजूर येतो " या अन्वयें पत्र आल्यावरून काल भारामलचे रवानगीची गडबड भारी होती, तसी जल्दी आज दिसत नाहीं शंकर रावा कडील विठलराव वकील येथें आहे त्यासी व व्यंकटराव यासी गांठही घालून दिल्ही शंकरराव यांस हाजूर येण्या विषयीं पत्रें रा होणार. इतक्यावर भारामल यांचे रवानगीचें कसें ठरतें तें मा गाहून विनंती लिहितो शंकरराव यांचीही पत्रें आजच दौलास आली आहेत रा छ १० माहे रावल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु १२ बुधवार शके १७१५

विनंती विज्ञापना राजश्री बाबाराव गोविंद येथून छ २ माहे कुच करून मैलारास गेले दोन तीन दिवस तेथेंच मुक्काम करून होते छ ९ माहे मारी मैलाराहून निघोन पुढें गेले याप्रा वर्तमान आलें मंशार निर्छे दरमजल येऊन पोंहचतील रा छ १० माहे रावल हे विज्ञापना.

श्री.

आश्विन शु. १२ बुधवार शके १७२५

विनंती विज्ञापना. रणदुल्लाखान करनुलकर याची रुखसत नबाबाकडील व दौलाचा निरोप जाल्याची विनंती पेशजी लिहिलाच आहे. खान मार २ रावली कुच करून दरमजल नारायेण पेंठचे मार्गे करनुलास गेले. रा॥ छ. १० माहे रावल हे विज्ञापना.

श्री.

आश्विन शु. १२ बुधवार शके १७१५

विनंती विज्ञापना गाजी खान बसमतवाला पेशजी हशमजग यांजपासी होता. त्यानतर राजश्री बलवंतराव लक्ष्मण सेलुकर याजपासीहि नौकर मे दोनसे लोकानसी होता. त्याचा व गाजीखानाचा वेबनाव जाल्यामुळे त्याजपासून बरतरफ जाला. हल्लीं नबाबाचे सरकारात नोकरीचे उमेदवारीनें दोनसें स्वार व शभर पेदल सहित येथें छ. ३ रावली आला. स्वार फार करून करोल आहेत. रा छ. १० माहे रावल हे विनंती.

श्री.

आश्विन शु. १२ बुधवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. मलगुर येथे जमीदार मुफसदाचा आठा जमा होऊन पाच साहा हाजार जमियत मिळाली. किला मुफसदानीं घेऊन तालुक्यात हागामा माजविला. त्याचे तंबी करिता महमद अजम बीडवाला याची जमियत दोन हजार सवार व तैनाती यक हजार. येकुण तीन हजार स्वार व च्यार हजार पयदलची जमियत मुसारेहमु व अबदुल करिम पैकीं. व हैदराबादेहून पाच तोफा समागमें बारूदचा सरजाम घेऊन जाण्याची परवानगी होऊन अजमखान बीडवाला यास रुखसत मलगुरास जाऊन जमीदाराची तंबी करकरण्याची जाली. छ. ८ रावलीं अजमखान बीडवाला आपले मेळा सुधा येथुन तीन कोसावर कुच करून गेला. मलगुर मागती किलेदारानें घेतलें, यैसेही वर्तमान आज याचे सरकारांत आलें. तेव्हां जमियत त्या कामाकरिता

रा जाली तेही माघारी येईल वैसें दिसतें होईल त्याप्रा ता लिहीन रा छ
१० माहे रावल हे विज्ञापना

श्री.

आश्विन शु १२ बुधवार शके १७१५

विनती विज्ञापना दसऱ्याचे दिवशीं मी रात्रीं नवाबाकडे गेलों होतों, दौला व राज्याजी आदिकरून सर्व मंडळ जमा जालें होतें नजरा जाल्यानंतर नवाबांनीं मल्न पानदान देऊन रुकसत केलें मागाहून दसऱ्याची वर्स्रे तायफार चोबी, पोषाग मजकडे पाठविला रा छ १० माहे रावल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु १२ बुधवार शके १७१५

विनती विज्ञापना चेनापटणाहून व्यंकटराम दिक्षित याजकडून प्रस्तुत दोन अखबारा आल्या त्या रा केल्या आहेत राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसी प्रविष्ट करीतील त्यावरून मार ध्यानात येईल रा छ १० माहे रावल हे विज्ञापना

श्री

आश्विन शु २ सोमवार शके १७१५ ते आश्विन शु ११ मं आश्विन शु १२ बु
अखबार ईा छ १ रावल ता छ ९ माहे मार. राछ. १० रावल
छ १४ रोज रवाना टपा रावल

श्री

आश्विन शु १ रविवार शके १७१५.

श्रीमंत राजश्री —————————————— रावसाहेब

स्वामीचे सेवेसी ——————————————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना ताा छ माहे रावल पर्यंत मुा बेदर येथें स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष इकडील वर्तमान छ १० माहे मारी डांकेयर तपशीलवार विनंती लिहिल्यावरून ध्यानास आलें असेल सांप्रत येथील वर्तमानाची विनंती अलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिली आहे अवलोकनें

मार ध्यानात येईल. उत्तरे रवाना व्हावयास आज्ञाकरणार स्वामी समर्थ. सोळावे मोहरम पासून आज पर्येन दाहा रवानग्य ( I ) पत्राच्या जाल्या. येकाचेही उत्तरें लिहावयास आज्ञा न जाली. याजकरिता विनंती लिहिली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री.

आश्विन शु. २ रविवार शके १७९५.

विनंती विज्ञापना. दौला अह्मांसीं बोलले कीं "बाबुराव यांची रवानगी होत आहे. तुमचे समक्ष यांसीं बोलावयाचे." तेंव्हा आम्हीं त्यांस पुशीलें कीं "बाबुराव यास काये सांगोन पाठवण्याचे मुकरर केले हे समजावे" याजवर दौलांनीं बोलण्यास आरंभ केला कीं "तर्फैन सरकारचे जाबसाल बाजवी प्रा परस्परे फैसल्यात यावे. आणि मदारुल मावला यांनीं व मी बे किलाफ[1] असावे हे ख्वाहेषे[3] फार दिवसांपासोन चित्तात. परतु, तसा प्रकार घडून येतच नाहीं यास काये करावे? हे सर्व दरेनें तुम्हासीं हमेष बोलण्यात आलें. त्याजवर पटणची मोहीम करून येते समई हरी पंडतजी यासी बोलण्यात कोणतींहि बाकी राहिली नाहीं. त्यांचे ह्मणणे की पुणियास गेल्यानतर याचे उत्तर पाठवितो. .... ....
(यापुढें १९ पृष्ठे कसरीचे सपाटयात सापडलीं. पुष्टाक १३१ ते १४९ सं. ) .... इष्टुवटाकडे[3] मांलिटानें पाठविलं. तेंव्हा संशय कोणता? माहिनाभर यांद न येण्याचे कारण काय? हें मसलतीचें काम. यास असी देरकर्षी होणे खुषनुमा दिसण्यांत येते कीं काये? याचा विच्यार पाहावा. लाडबाहादुर यास विलायेतीहून पत्रें जलद येण्याची व निकड कशी? तथापि, टिपुचे मसलहत प्रकर्णी काम आपले विद्यमानचे. याची पुढिल ही दुरुस्ती आपले हातें हमेषपणें व्हावी; यांत तीन सरकारास हीं उपयोग व चागलें. येसें समजोन आज पर्यंत लाडास त्याचे खाविदांचा हुकुम जलद येण्याचाही असता, या कामा कारितां राहून, दोहीं सरकारांत वकील आहेत त्यास पैहाम लिहितात कीं साता दफेचा करार होऊन लौकर पोंहचाव्या. येसें असतां साता दफेस सात महिने गुजरुन गेले.

१ एक मताने २ इच्छा ३ स्टुअर्ट ४ उशीर, दिरगाई ५ चांगलें.

अद्याप प्रथम दिवस. येक वेळ मुनमिल्या फर्दे आली, त्याजवर इकडून लिहिलें गेलें हली नवीन कितेक कलमें व कितेक पहिले दर्फेतील मवकूफ अशी याद ठरली तेही अद्याप तुम्हांपासीं आली नाहीं. ते याद तुम्हाकडे येणार त्याजवर शार्के बेशाक होय नव्हे होऊन सलाह जाणार. मागसीं तिकडून माणीक काय ठराऊन येणार ? या खालेच दिवस गुजरले व पुढें किती दिवस लागावयाचे याचा नेम कशावरून समजावा ? लाडास इतकी निकड, त्यापक्षीं इतक्यावर त्यांचें रहाणें होण्याचें चिन्ह दिसत नाहीं लाड बाहादुर विलायेतीस गेल्या नंतर नवा जनराल कलकत्त्यास आला आहे, त्यासी जाबसाल त्याची चाल कशी हें समजत नाहीं तेव्हां करारी कोणे प्रकारच्या व कशा याचा भास खूब काय संदेहाचा हें दुरदेशीनें मनांत यावें ठरली गोष्ट ते लांबणीवर पडून पुढें कसें ठरतें ? याचें अनुमान होत नाहीं इतके प्रकार विच्याराचे मार्गे ध्यानात आणुन लाड बहादुर ... (मधील पृष्टें कसरीनें गहाळ झाली आहेत पृष्टांक १४७ ते १७९ सं) (पृष्ठांक १८०) ... करऊन सायेंधाना मध्यें नवाब बरामद जालें सरबुलंदजंग व घांसीमियां व अजमखां व मुनषी वगैरे इसमांचा सलाम जाला मिस्तर किनेंयी दिलावरजंग यांची मुलाजमत नजर जाली सल्यावतखान यांस मोत्याचा तुरा, भुजबंद व त्याचे तीन पुत्रास खानीचे किताब दिल्हा दौला व मीरआलम व किनवी यांसी रुखसत जाली. चंदा कचनीचा नाच पाहिला येक प्रहर सात घटिकेस वर स्वार जाले आपले हवेलीस आले छ २ रोजी गुरुवारीं दिवसां दरबार जाला नाहीं असद अलीखां यांनीं सालगिरेचे ज्याफतीची तयारि करून तीन प्रहराम दौलाचे हवेलीस पोषाग वगैरे सरंजाम घेऊन आले येक घटिका रात्री नगार जनान्या सहित दौलाचे हवेलिस आले मामुली लोकांचा सलाम जाला पंना भांडाचा व कंचन्याचा नाच होता दौलासीं बोलणें ही होतें दोन प्रहर रात्री आपले हवेलीस गेले छ ३ रोज शुक्रवारी दिवसां खैर सला रात्रीं दौलाची अर्जी व धारणीचा निरखबंद गुजरला छ ४ रोज मंदवारी प्रातःकाळीं दोन ग्राने लावले अडीच प्रहर दिवसां मुजाहिदौला येऊन उतरल्याच,

१ इंधिम २ तहकुब ३ चंका, किंवा धजागियता, कचरीचा तंबु

अर्जे जाला. त्यास इस्तकबाल बादपाही बक्षीस पो. त्याजला तीन पारचे, दुषाला व स ( सि ? ) र पेंच दिल्हा. रात्रीं दौलाचेथे तयारी होऊन अर्जी गुजरली. च्यार घटिका रात्रीं नबाब जनान्या समवेत दौलाचे हावेलीस आले. मामुला इसमाचा सलाम जाला. मुजाहिदुदौला यांची मुलाजमत होउन नजर जाली. कंचन्याचा नाच होता. दोन प्रहर रात्री बरखास जाले. छ. ५ रोज रविवारीं तीन घटिका प्रथम दिवसां नबाब बेदार जाले. दौलाची अर्जी व दोन खाने व मेवा गुजरला. दिवसां दरबार जाला नाहीं। रात्रीं मामुली इसमे हाजर होतीं त्यास जबाब जाला. छ. ६ रोज सोमवारीं येक प्रहर येक घटिका दिवसा खावगामध्यें[१] नबाब बरामद जाले. जंगु व मुधा व मनबाचा सलाम जाला. लालन हजामाची याद केली. तो हजर जाला. हजामत होऊन येक प्रहर च्यार घटिकेत बरखास जाले. रात्रीं दौलाचे दिवाणखान्यात बंदोबस्त होऊन सात घटिकेस जनान्यासहित नवाब तेथे आले. दौला व मीरआलम व सरबुलंदजंग व घासीमिया व अजमखा वगैरे इसमांचा सलाम जाला. प्रथम कचनाचा नाच. त्यानंतर पना भाडाचा नाच होता. रावजीची याद केली. ते दरबारास आले. फुलाचे हार येक रावजीस व येक दौलास नबाबानीं दिल्हे दोन प्रहरास बरखास जाली. छ ७ रोज मंगळवारी प्रातःकालीं दौलाची अर्जी व दोन खानें मेवा गुजरला. लंगर हवदाचे फकीरानें पाच टोपली अनार गुजराणिणे ( ले ? ) दौलाचे घरीं रंगाची तयारी करऊन यक प्रहर यक घटिका दिवसा नबाब जनान्या सहित तेथें आले. बंदोबस्त जाला. कचन्याचा नाच होता. रंगाच्या पिचकाऱ्या घेऊन मारागिरी जाली, यक प्रहर सात घटिकेस नवाब आपले हवेलीस आले. रात्रीं दौलाचे हवेलींत तयारी जाली। नबाबही येणार होते. परतु, झुलकारअली साहेबजादे याची मातुश्री हैदराबादेंत बेआराम होती, तिचा वाका जाल्याचें वर्तमान शुतरस्वारासमागमे[२] आलें सा। नबाबाचें येणें न जालें. छ. ८ रोजीं बुधवारीं प्रातःकालीं दौलाची अर्जी गुजरली. रंगाची तयारी करण्याचा हुकुम त्याजला जाला. साहेबजादे मीरपोलादअली वगैरे याची

१ शय्यागृह २ साडणीस्वार.

याद केली. ते हुजर जाले येक प्रहर साहा घटिका दिवसा नवाब दौलाचे हवेलीस आले दौला व सरबुलंदजंग व घासीमियां व अजमखां व रायरंभा तमाम सरदार मनसबदार मुतसदी लोकांचा सलाम जाला रावजीकडे चोपदार पाठविला तेही दरबारास आले कुर्सीवर नवाब बरामद जाले सर्वांचे हातीं पिचकान्या देऊन रंग टाकिला कंचन्याचा व भांडाचा नाच होता दोन प्रहर च्यार घटिकेस बरखास होऊन नवाब आपले हवेलीस गेले ता छ ११ रा खर हे विज्ञापना

कार्तिक शु १४ शनिवार शके १७१५ ता० १६ नोव्हेंबर १७९३

छ ११ रोज टप्यावर रवाना

श्री

कार्तिक व. ४ गुरुवार शके १७१५ ता० २१ नोव्हेंबर १७९३

१ श्रीमंत रावसाहेब पेशवे यांस नेहमी प्रमाणें हवाल्याचें पत्र *

श्री

कार्तिक व.४ गुरुवार शके १७१५. ता० २१ नोव्हेंबर १७९३

विनंती विज्ञापना सिकारगा करितां नवाबांनी बाहेर निघावयाचा बेत दौलाचे विच्यारें ठरून तमाम लोकांस सवारीची ताकीद जाली बेदराहून तीन कोस मौजे कमठाणें हवेली तालुकियाचा गांव चिटगोप्याचे मार्गावरील येथें शिकारग्याचे डेरे देण्याचें ठरलें तेथील जागा मैदान, पाणी चांगलें पूर्वी बेदरी पातशाहा राहास गेले, त्यांचे शिकारीस जाण्याचें मकान कमठाणें, याचाही बयान होऊन जागा पाहून येण्याकारितां छ १५ रा खरीं दौला प्रथम च्यार घटिका दिवसां स्वार होऊन कमठाण्यास गेले तेथें जागा पाहून येणार. ते आल्यानंतर नवाबांनी छ १९ अथवा छ २१ या दोन तारिखां

* ( पृष्ठे १ ४२, ४८, ५ ५५, ५९, ६२, ६६ ७७, ८० पहा ) अशीं पत्रें प्रकार प्रकारचीं व प्रकाश मजकुराचीं असल्यानें पुन पुनरुक्ती टाळण्याकरितां या पुढें न देण्याचें ठरविले आहे क्वचित स्थळीं विशेष मजकूर असल्यास तीवस्तर देत दिला जाईल संपादक

पैकीं येके तारिखेस निघोन खैमे[1] दाखल व्हावे यैसा वेत आहे. नवाव निघाल्याचें वर्तमान मागाहून विनंती लिहिण्यात येईल. रा छ. १६ रा खर हे विज्ञापना.

श्री.

कार्तिक व. ४ गुरुवार शके १७१५. ता० २१ नोव्हेंबर १७९३.

विनती विज्ञापना. कमटाणें येथें शिकारगाहा कारिता नवाव जाऊन राहणार. डेरे वगैरे फरास खान्याचा सरंजाम रवाना व्हावयाचा. तेथील लोकाचीं घरेंही खाली करविलीं. कामाटीं वेल्दार लाऊन मरामत होत आहे. दौला जागा पाहावयाकारिता गेले आहेत. ते आल्यानतर नवाव तीन च्यार दिवसात कुच करून कमटाण्यास जाणार. रा छ. १६ रा खर हे विज्ञापना.

श्री

कार्तिक व. ४ गुरुवार शके १७१५. ता० २१ नोव्हेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. नवावानीं बाहेर निघावयाची तजवीज दौलाचे विच्यारे ठरलीं. त्यास डेरे दाखल होऊन फौज जमा करण्यांत शोहरतें[2] पडती, याजकारितां शिकारगाचे निमित्यानें कमटाणें येथें डेरे दाखल होऊन सैर शिकार करावी; इतक्यांत फौज सरंजाम कुल जमा होतो. सिकारगाचे मकानावर वाडाही मोठा देण्याची योजना जाली आहे. कारण कीं वाडयाचे रखवालीस फौज गाडद सभोंवतीं ठेवावी. येणेकरून फौज तयारी वगैरे दोष दिसण्यात नाहीं. यैसा वेत ठरून दौला जागा पाहावयास गेले. तेथून आल्यानंतर नवाब कुच करून जाणार. खैमे[3] दाखल होणार. येथें फौज गाडद जे जमियत आहे, ते हमराह कुच करते दिवसीं वाड्याचे वंदोबस्तास राहावी. आसपास दाहापंधरा कोसीं जमाव चराई वगैरेस आहे, त्याजला ताकीद आंतून निक्षूण जाली आहे कीं जलद येऊन जमा होणे. पंधरा वीस दिवसात कुल जमाव येकत्र करावा. यैसी धुन दिसत. येथील लोकमुखें वर्तमान कोणाचें ह्य (ण) णे नवाव बाहेर निघोन फोंज समवेत[4] औरंगाबादेस जाणार. कोणाचे

१ तंबू २ स्फोट होतो; गवगवा होतो. ३ तंबु, डेरे ४ बरोबर.

बोलण्यांत खु. मोसुले सेता साहेब सुमा याजवरील. कोणी ह्मणतात आतां फिरोन नबाब. बेदरास येत नाहींत परभारां हैदराबादेकडे जाणार. ग्रा प्रो अनेक तर्क करून बोलतात वास्तविक कोणतें काय असेल तें असो, परंतु, पिकार गाहाचे बाहाण्यानें जमियत सरंजामाची मजबुती करून पुढें कर्तव्य तें नमुदात आणावयाचें लक्षण या चालीवरून दिसण्यांत येतें यास येक दाखला मिळतो कीं छ १४ रोजी रात्रीं दौलांनीं चोपदारासमागमें येक रुका अह्मांकडे पाठविला कीं " हाजरत बेदगानआली कमठाणें येथें पिकारी कारितां खेम दाखल होणार तुह्मीं समागमें निघोन तेथेंच येऊन राहावें या मा हाजरतीची आज्ञा " याचें उत्तर दौलाकडे आह्मीं सांगोन पाठविलें कीं " हाजरत जेथें राहतील तेथें आह्मीं समागमें येऊन राहावें हें येन सलाह व लाजम परंतु डेरे वगैरे मारवरदारी सरंजाम आमचा येथें हजर नाहीं जोरिदें तेथें येऊन राहिल्यास कुल सरंजाम येथें राहातो चौकी पाहरा तेथील व येथील दोन ताण पडतात चोरांचा उपद्रव असा कीं सारे रात्र मनुष्यें जागत आहेत, तथापि चोऱ्या होतात. यास्तव कमठाणें येथेंच पिकारीची सैर येके जागीं असल्यास तेथें राहोटया पालें जुज सरंजाम देऊन दिवसां राहत जाऊं रात्रीं येथें येऊं या प्रा जाणें येणें होईल अथवा फिरती शिकार असल्यास समागमें येऊन राहणें जरूर. सरंजाम आणवाया लागेल याची सलाह आपण जशी सांगाल तसें करूं." याजवर दौलाचे बोलण्यांत आलें कीं "कमठाणें येथें पिकारीस हजरत राहणार याजा एक महिनियाचा सरंजाम तेथील केला आहे परंतु महिनाभर तेथें राहावयाचा येत नाहीं वीस दिवस कमठाणें येथें राहाण्याचा निश्चय, व सरंजाम येक महिन्याचा वीस दिवसांत येथें येणें जाणें हा येत मुनासीब नाहीं येथें सर्व खल्ला ठेऊन सर्व येत जावें तो पावेतों सरजामही येईल वीस दिवस कमठाण्यावर व फर्का" येसें बोलले याजवर दौलास विचारिलें कीं " वीस दिवसानंतर कमे पिकार कोणीकडे होईल ? " दौलाचें ह्म (ण) णें कीं

१ पत्र २ डेरे ३ हरवत ४ मुक्काम

" कमठाण्यावरील वीस दिवस राहण्याचा वेत मला समजला. विसा दिवसानंतर पुढे इरादा कसा हे हाजरतीचें विचारें ठरेल तसे. " या प्रा बोलले. त्यास दौलानीं असे मोहगम बोलणे यानील चिन्ह विच्यार करून तोडून पाहतां लोक तर्क कारितात यास ताळा मिलतो. लोकवार्ता याचे प्रमाणें ही वाटत नाहीं. परंतु वाहेर निघोन फौजा जमा करण्यास निमित्त समर्पक आहे. पुढें जसा मनसुवा तसे करावयास प्रतिप ( वं ) ध नाहीं. फौजा जमा करण्याची आणि वाहेर डेरे दाखल होण्याचा मोठी शोहरत गोष्ट लपून राहावयाची नाहीं. त्या विपई पिकारगाहची सलाह काढून वाहेर निघणार असे आहे. रा छ. १६ राखर हे विज्ञापना.

श्री

कार्तिक व. ४ गुरुवार शके १७१५. ता० २१ नोव्हेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. दौलाचे हवेलीस सुलेमानपाह साहेबजादे त्याचे दतकपुत्रकाचे सालगिरेचा समारभ वीस वावीस दिवसपर्यंत नित्य किंवा दिसा आड रात्रीं नाच राग रंग नवावानीं जनान्यासहित येऊन दोन प्रहर रात्र पावेतों राहून मग आपले हवेलीस जावें. याप्रा होऊन सेवटीं रग करविला सरगष्त व मेहदी ही निघाली. सालगिरेची समाप्ति जाली. दौलाची सालगिरेही यांतच येके दिवशीं जाली. रंगाचे दिवशीं आह्मास बोलविल्यावरून गेलों होतो. रा छ. १६ राखर हे विज्ञापना.

श्री

कार्तिक व ४ गुरुवार शके १७१५. ता० २१ नोव्हेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. सालगिरेसंमधीं दौलानीं पोषाग मिस्तर किनवी दिलावरजंग यास साहा पारचे व इष्टवट लपटन या दोघांस तीन तीन पारचे, याप्रा त्यांजकडे चोपदार समागमें पाठऊन दिल्हे. रा छ. १६ रावर हे विज्ञापना.

---

१ महशूर. २ जन्मदिवस

श्री

कार्तिक व ४ गुरुवार शके१७१५. ता० २१ नोव्हेंबर १७९३

विनंती विज्ञापना शंकरराव भोंग प्रकर्णी भारामल यांची पत्रें दौलतीस आली व उमरखेडकरांनी दस्तायैवज भारामलास दिल्हा, येविषीची तपसीलें विनंती पेशजी लिहिल्यावरून ध्यानांत आलें असेल हलीं शिवराम बापूराव व गंगाधर काशी यांचे पत्र उमरखेडाहून आह्मांस आलें की, " शंकरराव निघोन कोसंबदे तालुकियाचे गावीं प्रथम राहून तेथून मुलें माणसें सुधां मौजे सोईट पा उमरखेड येथें आला मावजी नाईक यानें राहूं नको ह्मटलें परंतु येकरोज मुकाम करून माहूर परगण्याकडे गेला मागाहून नवाबाकडील जमातदार सोइटास आले त्यांस तेथें शंकरराव नाहीं हें समजल्यावर डेराकडे गेले भारामल फौज तोफा सुधां सोइटास उतरून पायमालीकडे गाजीखान ध्यारसें लोकांसहित मौजे चिली पा माहूर येथें जाऊन वेढा दिल्हा तेथील नाईक भेटला नऊ दाहा घोडीं मोंगांची सांपडलीं फुलसांगवीस मुले माणसें आहेत येैसें नाईकानें सांगितलें फुलसांगवीहून भाड्याचे बैल करून उमरखेडा पासोन कोसावर गांव आवघानें येथील तळ्यावर माढेकरी सोडोन फुल सांगवीस आले, या सांगितल्यावरून गाजीखान उमरखेड्यास आला ' माग लाऊन देणें ' येैसें बोलणें पडलें मावजी नाइक फौज येतांच गैर हाजर जाला भोंग कोठें गेला असेल तो असो भारामलाकडे येतो येैसें ह्मटल्यास गाजीखानानें न येैकुन मुकाम करून जिराइत व बागाइताची खराबी केली भारामलाकडे कारकुन पाठविला त्यांणी सुभ्यान खानास पाठविलें तो व गाजीखान मिळोन वेशी पावेतों वंदी केली आह्मी भेटीस गेलों त्यांणीं अटकाव केला त्यानंतर भारामलाकडे शिवराम बापूराव व भगवंतराव गंगाधर व रामराव दादाजी त्रिवर्ग गेलों त्यांनीं पता लाऊन देण्याचें लिहिलें, मागितल्यावरून दिल्हें न यावें तरी हंगामामधे दिवस परगण्याची खराबी होऊं लागली, सबब पत्र लेहुन दिल्हें शिवरामबापुराव यांस निरोप देऊन उभयतांस त्यांनीं समागमें डेराकडे नेलें " या अन्वयें पत्रीं मजकूर आहे

त्यास उत्तर खेडकरांनीं भारामल यास दस्तैवज ' शंकरराव याचा पत्ता लाऊन देऊं. ' यैसा द्यावयाचा नवता. भारामल फौज सुद्धा तालुकियाची नुकसानी व पायेमलीकरिता तरी हा जाबसाल सरकारचा नवाबासीं. तालुक्याची नुकसानी होइल ह्मणोंन शंकरराव याचा पत्ता लाऊन देऊं यैसे लिहिले काये ह्मणोन दिल्हे ? " ये विषई निषेध करून उत्तर खेडकरास जबाब लिहिला. परंतु दस्तैवज बजीनस लिहून दिल्हा. तेव्हा पुढे यांचें कसें पडते पाहावें. ये विसीं सरकारांतुन आज्ञा येईल त्याप्रों यांसीं बोलण्यांत येईल रा छ. ११ राखर हे विज्ञापना.

श्री.

विनंती विज्ञापना. दौलाचे बोलण्यांत आले कीं " शंकरराव भोंग उमरखेड तालुकियांत याचा पत्ता. व तेथील कमावीसदारांनीं तेजेवत यास दस्तैवज पता लाऊन देऊं यैसा दिल्हाअसतां सांप्रत उमरखेडकर ह्मणतात कीं शंकरराव येथें नाहीं. नागपुरास गेला. या अन्वये भारामल वगैरे पत्रे आलीं. त्यास बजीनस पता असोन नाहीं ह्मणतात. तेव्हा उमरखेडकर यांस काये ह्मणावे ? व शंकरराव तेथें नसल्यास म्हणोन तरी फायेदा कोणता ? नागपुरचा पता सागतात, त्यास सेनासाहेब सुभा यास राव पंत प्रधान यांचे सरकारचीं पत्रें व त्याचे कारभारी पुण्यांत आले आहेत त्याजलाही ........ ( पुढील पृष्ठें गहाळ झालीं आहेत. पृष्ठांक १८८ ते १९४ सं. ) पृष्ठांक १९४. असल फारसीचा कांहीं अवशिष्ट राहिलेला भाग.

श्री

कार्तिक वा। ९ शके १७१५. बुधवार ता० २७ दिसेंबर १७९३.

* न बायद कर्द. व अज्ञ दफेसिय्युमे आन मसव्वदे चुनान मफहुम मीशवद के टीपुरा बराये खलल करदन हरयक शरीके दफे एजाझत बाशद. मआनी तदारुके खलले दफे अवल हरचंद दरानदफे कारे आन शरीक तमाम बुवद झरूर नीस्त बलके नसीहत बरान कर्दे शवदके चुनान बारे दीगर न बायद कर्द व अगर हमचुनीन वाझ खाहद कर्द खुबनीस्त. पस बनाये

---

१ असल फारसीचा कांहीं अवशिष्ट राहिलेला भाग.

अहदनामे कफाल्ते गुरका हमदीगर बराये तदारुके टीपु दरसुर खल्ल इस मेहलाले बल्के इन अदाम मीवष्टीरद. बहेतर इन अस्त के इबारते छार्ड बेहादूर दरीन दफे के फनायदे ( ॰ फवायदे ) मआनीये आन अजहर व- हाल दास्तन उलान अनसर दफे हफतुम आन–नहुमे आन-मसवदे मुनीन मरकूम अस्त हाला नक्शये मोहम करार याफते अस्त ममुजबे इन अगर मोहम फर्दन उफताद अजतर्फ टीपु मुल्को किल्लेजात हमे बदस्त आयद हरसे बराबर हिस्से कर्दे बेगीरीद चुन आनतहनामे अहदनामे केफाल्त अस्त न अहदनामये मोहिम व स्यश अस्त के चुनहरसे सरकार मुसहद अंद हरयक हिस्से मुसावी दर तकसीम खाहद याफत पस मवकए इन मआनी ममादे करार याफतने मोहम खाहद बुद व अगर नवश्तने आनमजमुन खाह मीखाह मनझूर बाशद बहमीन एबारत बायद नवेश्त, के तकसीमे मुल्को किल्लेजात वगयरहु के दर अयामे मुसालेहत अज टिपु बदस्त अमद मुनासबे सरहदे हरयक सरकार वा टिपुशुदे मुवद मअमल आरद दरदफे हस्तुम दर- खास्ते यकदो पलाटन अजसरकारे अंग्रीश मरकूम अस्त इन सवाल जवाब तआलुक व सरकारे कपनीए अंग्रीश दारद अजसरकारे मा यदौल्त इलाके नीस्त दरदफे नहुमे आन मसवदेह मरकूम अस्तके अजतर्फे टिपु मुल्कि के गु- श्रास्त खाहद शुद दरान् बराये आक्षन व फकीर व दरगाह हरचे जारी बाशद बमुजबे आन हरसे जारी दारद आन मजमुन अज शरायते तहनामे बे तआलुक दारद हरयक सरकार दरदादने खेरात अजखानये खुद मुखत्यार अस्त दफेदहुम के मजमुने पीशकशे सरकार राव पंतपरधान अज टिपुसुल- तान मरकुम अस्त आन दफे अज अहदनामे केफाल्त नीस्त बल्के अहद नामये मोहम अस्त अगर अहदनामे नवश्त हम मनझुर अस्त मज पीशकशी सरकार मा यदौल्त के अज कदीम उल अय्याम अज रुये असनाद याजेब उलअद अस्त नीज दाखेल कर्दे शवद लेकीन इन दफेसरीह मर खेलाफ मनाये इन तहनामे के फकत बराये हेफाजत व दफे खल्ले पीश फदमी ए टिपु सुल्तानस्त बिल्कुल सरहग नाखाहद व किस्स फीर मोहम आग्रम फर्दन

मी आयद. दरीन सुरत वर आवरदने आनदफे झरूर पुर झरूर. दफे याझ दहुम वारुत व गोले व वदुक व तोप वगयरहु सामाने जंगी अगर दर सरकार मसतुर शुद अझ सरकारे कंपनी व वेपारी परवानगीए खरीदी बर्ली महसूल शवद. इझहारे दिलावरजंग बहादर चुनानस्त के फरुख्तने सामाने जंगी मअमुले सरकारे कंपनी नीस्त व वेपारीयानरा हुमानअते कुल्ली अस्त के हीच सामानें जगी न फरुशंद. व गवरनर जनरल दरीं बाबहुकमे आम नमी तवानद दाद व दर सरकार मावदौलत सरंजामे मझकूर बिलकुल चंदान झरूर नीस्तअगर आन शहामत मुरत्तेब शुद झरूर बाशद. अझ मिस्तर मेलेट बहादूर हम मरातबे इझहारे दिलावर जंग बहादर तहकीक मुमायद. झियादे अय्याम बकाम बाद.

श्री.

कार्तिक वा। ९ शके १७१५. बुधवार ता० २७ दिसेंबर १७९३.

* तरजुमा श्रीमंतास नबाबाचे पारसी पत्राचा.

आ शाहामत मर्तबातच्या तजवीजेचा तहनामा मिस्तर मालिट बाहादुर यानीं पाठविला त्यास दोन महिने जाले, मिस्तर इष्टबॉरट बाहादुर यांचे मारफातीनें हाजुरांत गुजरला. ताजूब आहे कीं हा काल पावेतों राव गोविंदराव कृष्ण याचे मार्फतीनें हाजुरात मसविदा न पोंहचला. येसियास दाहा महिनें तहनाम्याचा जाबसाल दोन्हीं सरकारासीं दरपेश. इतकी मुदत गुजरल्यानंतरही पाहणें जरूर. याजकारितां राव मजकुर याचे मारफातीनें मसविदा पोंहचण्याची इंतजारी अधिक न करणे जाणुन हाल मसविदा तिकडुन ठरला यासीं व लाड बाहादुर यांचे तजाविजीनें सात दफांचा तहनामा ठरून आला, त्याचे शब्द व अर्थ यासीं मुकाबिला करून पाहतां यात कमज्यादा करण्याच्या कबाहती खातरेंत गुजरल्या, त्याचा तपशील लिहिण्यांत येतो बि॥. ?

---

( सदर तरजुमा मूळ मर्तीत दिलेला तसाच येथें घेतला आहे. सं. )

१ भाषांतर २ मोठी ३ पदवी ४ स्टुअर्ट ५ आश्चर्य ६ निकाल न होतां तसाच निकालाकरितां राहिलेला. ७ खटपट, काळजी ८ कलमाचा ९ मेळ, तलग १० मतभेद बाध।

१ या मसविद्यांत आपल्याले दोस्तीचे बंदोबस्ताचा शब्द लिहिला आहे त्यास, या आहदनाम्यासी या शब्दाचा तालुक काय आहे ? श्रीरंगपटणचे आहदनाम्याचे शर्तीची यांस हा शब्द व परस्परें वंशपरंपरा व कायम मकाम येक दुसन्यांचें हा शब्द लिहिला नाहीं हा शब्द असेल तसा दाखल करणें जरूर

१ दफे अवल व दुसरी या मसविद्याची त्यांत लाड बाहादुर यांचे तज विजेचे दफासीसी पाहातां शब्दाचा मात्र फेर परंतु, अर्थ येकच त्याअर्थी लाडबाहादुर यानी जसे शब्द लिहिले त्यांत तफावत्या कशाकारितां करावी ?

१ लाडबाहादुर यांचे मसविद्याची तिसरी दफा पहिले तहनाम्याचे दुसरे दफेचे मजबुतीकरितां आहे ती या मसविद्यांत बिलकुल मवकुफ केली त्यास हाली हा तहनामा होणे. याची बुनियादें श्रीरंगपटनाचा तहनामा, त्या तहनाम्याचे कायमी कारितां हे दफा लाडानें ठराविल्या बमोजीब दाखल करणें जरूर

१ या मसविद्याची तिसरी दफे यामी व लाड बाहादुर यांचे चौथे दफेसीं अर्थ पाहातां नवल आहे परंतु लाडाचे चौथे दफेंत परीकांनी जब्दीनें ज्या शरीकास इजा पोंहचेल, त्याची इतल्ला जाल्यावर तेच समई खबर घ्यावी असा मजमुन आहे तसा अर्थ या मसविद्याचे तिसरे दफेंत समजण्यांत येत नाहीं बल्की विपरीत आहे याज करितां लाडाचे चौथे दफेची इबारत बाहाल ठेवणें जरूर.

१ या मसविद्याचे चौथे दफेंत लिहिलें आहे की वकील ठेवावा तो आपला व आपले खाविंदाचे चित्तांतील खुलासा जाहीर करीत जाईल इतकेंच लिहिलें आहे असें लिहिलें नाही कीं वकीलानें कोठें राहावे ? लाड बाहादुर यांचे पांचवे दफेंत लिहिलें आहे कीं हरयेक सरकारचा वकील दुसन्या सरकारचे फौजेंत राहून चित्तांतील खुलास व मतलब जाहीर व्हावा या करितां परवानगी असावी तेव्हां हा मजमुन लाड बाहादुर यांचा चांगला जाहीर आहे

१ संबंध २ आधार, मूळ, पाया.

१ या मसविद्याचे पांचवे दफेत अधिक लिहिले आहे कीं घोड्याचे खरीदीची शुमारी पाहिजे. व शिपाई मनुष्याचे निगादास्तीचा शब्द कम केला. त्यास दिलावरजंग बाहादुर याचा ईजहार आहे कीं घोडयाचे मेज व अमुक वर्षाचें प्रमाण या प्रा मिळाल्यास कंपणीचे सरकारात पसद. त्यास अशा तऱ्हेचीं घोडीं पसदीचीं या मुलकात कम. या वमग, शुमारीचे कैदेचे काय जरूर ? व सिपाई लोकाचे निगादास्तीचा मार बाहाल ठेवणें, यांत तिन्हीं सरकारचा फायदा आहे यास्तव हा मजमुन वहरगीज मवकुफ करू नये.

१ या मसविद्याचे तिसरे दफेत असें समजण्यांत येतें कीं परीकातुन हर-येक शरीकासीं टिपुनें येक वेळ खलल करावी. अशी परवानगी यांत होती कीं पहिल्यानें येकासीं खलेल करिल, ते समंई त्या शरीकाचे पुरें काम जालें तरी त्याचा वदाला जरूर नाहीं ? वलकी फक्त नसियेत त्यास केली जाइल कीं असें दुसरेयानें न करी; अगर दुसऱ्यानें करील तर चांगलें नाहीं. तेव्हां टिपुचे खलेल करण्याचे वदल्याची आपसात शरीकामधें आहदनाम्याचे जामीनीची वुनीयाद राहात नाहीं. यास्तव लाड बाहादुर यानीं इवारत लिहिली ती फाय-द्याची हें जाहीर आहे. याज करिता तेंच बाहाल ठेवणें नकें व चांगलें.

१ सातवी दफा या मसविद्याची अशी लिहिली आहे कीं साप्रत मोहिमेचा नक्षा करार पावला आहे. या प्रा हे अगर मोहीम करणे पडली आणि टिपुक-डुन मुलुख व किल्ले जे काही हातास येतील ते तीन हिसे बराबर करून घ्यावे. कारण कीं हा तहनामा अहदनामा जामिनीचा आहे अहदनामा मोहिमेचा व चालण्याचा नाहीं. तिन्हीं सरकार येक आहेत. हर येकाची वाटणी बराबर होईल. तेव्हा यार्थाचा समय मोहीम जाल्यानतर आहे अगर खामखां लिहिणें मंजुर असल्या ( स ) या ईबारतीनें लिहावें कीं वाटणी मुलुक व-कीलें वगैरे टिपुचे सुलहामधें हातास येईल तो हरयक सरकारचे सरहादेच्या नासिब पहिल्यानें टिपुवर मोहीम जाली त्या प्रा वांटणी अमलांत मुआणावी.

---

१ अदाज. २ केव्हांही. ३ बद, तहकुब ४ परतु ५ ताकीद. ६ दखाल, अडथळा. ७ भाषा. ८ अवश्य.

१ आठवे दफेंत येफर्दोन पल्टणें इंग्रजाचे सरकारांतुन दरखास्त करून लिहिलें त्यास हा जामसाल कंपणी इंग्रज यांचे सरकारांसी तालुक आहे, आह्मांसी इलाक नाहीं

१ या मसविद्याचे न (व) वे दफेंत लिहिलें आहे की टिपु कडुन जो मुल्कि सुटेल त्यांत ब्राह्मण व फकीर व दरगाहा जे काहीं ज्यारी मीसेल त्या प्रा तिघांनीं ज्यारी ठेवावें त्यास या मजकुराच्या शर्ती तहनाम्यासी तालुक काय ? हरयेक सरकारांनीं खैरात देण्याविशई आपले घरचे मुखत्यार आहेत

१ या मसविद्याचे दाहावे दफेंत मजमुन आहे कीं राव पंत प्रधान यांचे सरकारची पेषकश टिपु कडुन येणें लागोन लिहीं आहे त्यास हे दफा करालें तीचे अहदनाम्यांतील नाहीं बल्की, मोहिमेचे अहदनाम्यांतील आहे त्यास अहद नाम्यांत लिहिणें मंजुर आहे तरी आमचे सरकारची पेषकश कदीमें पासोन सनदाचे रुईनें वाजबी आहे हेही दाखल करावी परंतु, हे दफा केवळ या तहनाम्या विरुद्ध. या तहनाम्याची बुनियाद केवळ संरक्षणार्थ टिपुसुल्तान यांचे पेषकदमीचा खलल दूर व्हावा या विषईंची आहे ही खराब होती आणि सध्यांच मोहिम करणें लाजमें होतें वास्तव हे दफा काढणें जरूर फार जरूर ।

१ अकरावे दफेंत दारुगोळा व बंदुखा व तोफा वगैरे सामान जंगी अगर सरकारांस मतलुब जाल्यास कंपणीचे सरकारांतुन वेपारी यांज पासोन विला महसूल खरीदी करण्याची परवानगी असावी त्यास दिलावरजंग बाहदूर यांचा ईश्तिहार येसी आहे कीं,जंगी सामान विक्रायाचें कंपणीचे सरकारांत मामुल नाहीं तमाम वेपारी यांस मनाई आहे कीं काहीं समान जंगी न विकावें गौरनर जनरल या विषईं हुकुम सर्वांस देऊं सकत नाहींत व आमचे सरकारांत हा सरंजाम घेण्याची बिलकुल जरूर नाहीं अगर ऑ शाहामत मर्तबात यांस जरूर असल्यास मिस्तर माल्लिट बाहादुर यांनीं दिलावर जंग बाहादुर यांनी जाहिर केल्याचें मरातब पडताळून पहावें जियादा अर्या ( ब्या ) मबकाम याद

१ संबंध २ कार्मान ३ शुभे ४ प्रमाणे ५ वाजवी ६ जाहिरनामा

(त्यास्त काय ? आपला काल सुखात जावो.) रा छ २२ राखर अर्बा तिसैन मया व अल्फ.

श्री.

कार्तिक वा ९ शके १७१५. बुधवार ता० २७ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. नबाबानीं सरकारांत पारसी पत्र लिहिले. त्याचे हिंदवी तरजुम्यांत कांहीं शब्द सम्रहार्थाचे आहेत, त्याचा खुलासा अर्थ ध्यानांत येण्याकारितां विनंती कीं:—

१ "**या मसाविद्यांत**" असा शब्द जागा जागा आहे. त्यास सरकारातुन दाफातीचा मसविदा ठरून मालिटाकडून यांजकडे आला. तो मसविदा लाडाकडून साता दफेची याद आली, त्यासी यानीं मुकाबिला करून कमज्याद निवडून काढिले, त्याचा दाखला पुरण्याकारितां **या** मसविघात एसा शब्द आले "**हामसविदा**" ह्मणजे सरकारातून ठरला तो.

१ "वंश परंपरा" याचे पुढें "**कायम मकाम येक दुसऱ्याचे**" हा शब्द आहे. याचा अर्थ असा कीं, येंक अधिकारी तगीर होऊन त्याचे कामावर दुसरा होणें, त्यास **कायम मकाम** असे ह्मणावे. यांस दृष्टांत जसे लाड बहादुर जाऊन त्याचे स्थलीं मिस्तर ज्यान पोर नवा जनराल आला या प्रमाणें.

१ "पलटणें इंग्रजांची सरकारांत दरखास्तीचें कलम" याजगीं "हा जाबसाल इग्रजासीं तालुक. अम्हांसी इलाका नाहीं." ऐसें यांनी लिहिलें. यांचे तात्पर्य कीं, हा तहनामा तीन सरकारासीं; व तिन्हीं सरकारातुन परस्परें देणें घेणें तेंव्हा तीन सरकारास समान तसे कलम तहनाम्यात असावे. पलटणाचे दरखास्तीचा प्रकार इंग्रजासीं. त्या अर्थी फक्त इंग्रजासींच तहनामा असता तर हें कलम नीट. तीन सरकारा मिळोन तहनामा होणें, यात याचें प्रयोजन नाहीं. असा यांचे लिहिण्याचा खुलासा. रा छ २२ माहे राखर हे विज्ञापना.

श्री

कार्तिक वा ९ शके १७१५. बुधवार ता० २७ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. लाड बाहादुर व मिस्तर सरज्यान पोर यांची दोन तीन

पत्रें नवाबास घेऊन आल्या त्या मिस्तर किनवी दिलावरजंग यांनीं नबाबास आम्हीं जवळ असतां गुजराणिल्या पत्रें खोलून वाचून पाहिलीं लार्ड बाहादुर यांचे पत्रांत मारकीं, " मी कलकत्याहून जाहाजांत स्वार होऊन विलायेतीकडे गेलो त्या मजवर आपली ममता व दोस्ती येखलास होती, त्याच बमोजीब दोस्तीचा सिलसिला मिस्तर सर ज्यान पोर गौरनर माहे जागीं आहेत, त्यांसी असावा " व ज्यान पोर याचे पत्रांतील मार कीं " लार्ड बाहादुर कलकत्याहून निघोन जाहाजांत बसोन विलायेती कडे ( गेले? ) गौरनरीचे अधिकारावर मी आहे. लार्ड बाहादुर यांसी दोस्ती व येगानगत आपली त्याहून ज्यादा तरकी असावी" याप्रों दोघांकडील पत्रातील मार. राछ २१ रावरहे विज्ञापना

श्री

कार्तिक वा ९ शके ७१५ बुधवार ता० २७ दिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना टिपुसुलतान यास दोघांनीं आपले तरफेनें पत्र तयार केलें, त्याचा मसविदा नवाबास मी समीप असतां वाचून दाखविला त्यांत मारकीं, " तिसरे किस्तीचा ऐवज सुभी करण्यास पाठविला, तो घेऊन अ लाकडील फलाणा शक्ष करण्यांत होता त्याजपासीं रसीद ऐवजाची आम्हीं पाठविली, ते त्यानें दिल्ही आपल्यापासी येऊन पोहोंचले दुसरे बल्हारी उमरगोड, सदाल्कोटा व सिंगणमला वगैरे तालुक्यांतील कित्तेक गांव आपल सरहद्दीत आहेत, ते इकडील अमीलाकडे वागुजास्त करावयाची ताकीद आ पलें तालुकदारास लिहुन यावी की, हरगीज खलाल न राहे या अन्वयें पत्राचा मा नवाबांनीं पाहून बेहतर आहे ऐसे सांगितलें. रा छ २१ माहे रावर हे विज्ञापना

श्री

कार्तिक वा ९ बुधवार शके १७१५ ता २७ दिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना अजिमुदौला प्रकर्णी नबाबांनीं सरकारांत पत्रें पेशज रवाना केलीं त्यां अन्वयें राव सिंदे यांसही पत्रें पाठविलीं त्याचा जबाब

खरीता पत्र सिंदें यांजकडून आले ते दौलांनीं नवावास वाचून दाखविले. मी समीप होतो. पत्रात मारकी "आजिमुदौला जेथ पावेतो गेला-असेल त्याची तहकीक करून हस्तगत करावा. त्यास, आजिमुदौला कोणते मार्गें गेल्याचें अद्याप समजले नाहीं; ज्यावज्या तालुकदारास ताकिदी पाठविल्या आहेत, की जेथे सांपडेल तेथे अटकाऊन पाठऊन द्यावा. या बमोजीब पत्रे सर्वांस रवाना केलीं आहेत." या प्रा मार. राजश्री कल्याणराव व बाबाराव यांच्याही अर्ज्या आल्या, त्या हरराव यांनीं गुजराणिल्या. बाबाराव यांनीं लिहिले आहे कीं 'पुणियास पोंहचुन राव सिंदे याची भेट जाली. या प्रा लिहिलें.' रा छ २२ मांहे राखर हे विज्ञापना.

श्री.

कार्तिक वा ९ बुधवार शके १७१५. ता० २७ दिसेंबंर १७९३.

विनती विज्ञापना. अजिमुदौला याजकडील नरसिंगराव व खानसामा वगैरे लोक सापडले ते यै (औ,) रंगाबादेहुन चिमणा राजे यानी येथे पाठविले. त्यांस कैद करून बेदरचे किल्यांत दाखल केले. रा छ २२ माहे राखर हे विज्ञापना.

श्री.

कार्तिक वा ९ बुधवार शके १७१५ ता० २७ दिसेंबंर १७९३.

विनंती विज्ञापना. नवावास राव सिंदें याजकडून घोडे आरबी दोन व काठेवाडी दोन (व) येकुण च्यार; व गुलकंद व गुलाब वगैरे जिंनस आला. या समधे बाबाराव याची अर्जीसहित हरराव यानीं छ २० राखरीं दौलाचे विचारें गुजराणिले. राछ २२ राखर हे विज्ञापना. सिंद्यांनीं पाठविली किंवा कल्याणराव यांनीं विकत घेऊन पाठविली याचा सशय आहे. शोध करून लिहितो. हे विज्ञापना.

श्री.

कार्तिक वा ९ बुधवार शके १७१५ ता० २७ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. शंकरराव भोग याचा पता लावित भारामल हेश्रा

पावेतों गेले उमरखेडकर कमाविसदाराचे दोन कारकुन मारामळा समागमें आहेत त्यांस ही निकड कीं शंकरराव याचा पता लाऊन देण्याचा जिमा तुमचा त्या प्रा पता लाऊन देणें. त्यावरून शोध लाविता शंकरराव याची बायको व जवाहिराचे डबे दोन व सनगे पोषागियाचे पेटारे सांपडले डबे व पेटारे मारामळ यांनीं दौलाकडे पाठविलें सदरहू अन्वयें मारही मारामळ यांनीं दौलास लिहिला शंकरराव अद्याप सांपडला नाहीं पुढें होईल त्या प्रा विनंती लिहीन शंकर नाईक नागपुरास गेला याजकरितां भोंसल्यास पत्रें जावीं, आणि त्यांजकडील कारभारी पुणियांस आहेत त्यांस ताकीद व्हावी ये विषई पेशजी नबाबाचे आज्ञे प्रमाणें दौलानीं सांगितलें त्याची विनती पूर्वीं लिहिली, त्याविसीं आज्ञा जालीच असेल राछ २१ माहे रावर हे विज्ञापना

श्री

कार्तिक वा ९ शके १७१५. बुधवार ता० २७ डिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना कामठाणें येथें शिकारगाहाकरितां जाण्याची तयारी नबाबांनीं केली जागा पाहाण्या करितां दौला छ १९ रावरी गेले होते मैदान धरून याडा मोठा दिला कमठाण्यांस लोकांचीं घरें होतीं तीं तमाम खाली करविलीं दोन तीन हवेल्याही आहेत त्या येक नबाबाकडे, येक दौलानीं आपल्यास, योजून ठेविल्या कामाठी, बेलदार, मजुरदार लाऊन जाग्याची मरमत करविली जागीरदार, मनसबदार, मुत्सदी सरदार सर्वांस ताकीद कीं कोणीं येदरांत न राहतां आपलाले सरंजामसुद्धां कमठाण्यावर येऊन राहावें, झडे नेऊन उभे करविले नबाबाचे खैम व चोबी बंगला जाऊन उभा राहिला बरकडही लोकांचे डेरे, राहोट्या, पाले सरंजाम कमठाण्यास गेला, घरचेवर जात आहे याडयाचे रखवालीस गारद मुसारेमु, व सैदउमरखां व असदुल्लखां फुमदान वगैरेस हुकूम पोहचला चराईस आसपास हाथी व उंट व बैल होते ते आणविले काहीं आले व येतात सरदारजागीरदारासही हुकूम असाच कीं आपलाले स्वार जेथें असतील तेथुन आणन जमा करावे स्वार

गाड्याची मोजदादही कमठाण्यावर पाहावयाचा वेत आहे. याउपरी नवाव निवोन डेरे दाखल होणार. याची तपसीलें विनंती लिहिण्यात येईल. रा छ. २२ राखर हे विज्ञापना.

श्री.

कार्तिक या ९ शके १७१५. वुधवार ता० २७ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. नवावाची शरिरप्रकृती हैदरावादेंत होती त्याहून वेदरास आल्यानंतर कृशत्व अधिक. आलीकडे तर वहुतच क्षीण शरीर आहे. नाकुवत, त्यांतून पाच सात दिवसां पासोन दस्तही दोन तीन होतात. या प्रा प्रकृतीचा अहवाल आहे. रा छ. २२ रा खर हे विज्ञापना.

श्री.

कार्तिक वा ९ वुधवार शके १७१५ ता० २७ दिसेंवर १७९३.

विनंती विज्ञापना. ईसामियाकडील पहिलें तालुके ताडपत्री, ततवारी, सिंगणमला, येलानुर हे च्यार तगीर करून दिलावरुदौला गजीकोट्याचा किलेदार याजकडे सागितलें. ईसामियां यांस हैदरावादचे सुभ्याचे तालुके नलगुंडा, देवरकुंडा व कोलीपाला वगैरे भवनगिरि सरकारसुद्धा सांगोन ईसामियां यांची रवानगी केली. छ. १९ राखरीं ईसामिया गेले. ईसामियां यांनीं टिपुस व कमरुदीखानास पत्रें लिहिलीं होतीं त्याचे जवाव सांपडले. दौलांनीं आह्मांस दाखविलें. याचा तपसील व पत्राच्या नकला पेशजी सेवेसीं पाठविल्या. त्यास ईसामियां यांचें वोलणें दौलांसीं कीं " हीं पत्रें खोटीं; याची तहकीक करावी. " दौलानीं तहकीक करितां पत्रें खरीं नाहींत. ईसामियांचा पहिला कारकुन व्यंकटराव वरतरफ केला. त्यानें अदावतीनें दरम्यान तुफान रचून पत्रें तयार केलीं. हीं खोटीं यैसें दौलास समजलें. रा छ. २२ राखर हे विज्ञापना.

श्री.

विनंती विज्ञापना. यैसीजे. येयील वृतमान ता छ. १९ माहे राखर

बुधवार पावेतों अखवार पत्रीं लेखन करून सेवेसी पत्राची रवानगी केली, त्यावरून त्यानास आलें असेल सांप्रत येथील वर्तमान छ मारी दौला कमठाण्यास जाऊन जागा पाहिली तेथील लोकांचीं घरें खालीं करून मरामतीस बेल्दार व कामाठी लाविले येते समई पांच हरणांची शिकार करून तीन प्रहराचे अमलांत किले बेदरास आले नवाबास तीन दस्त जाले रात्रीं दौलाची अर्जी गुजरली छ १६ रोज गुरुवारीं तमाम सरदार व मनसबदार मुतसदी यांजकडे चोपदार पाठऊन ताकीद केली कीं, " कमठाण्यास आपलाले डेरे दांडे पाठऊन मिसलबंदीनें उतरणें प्रातःकाळापासोन दोन प्रहर पर्यंत नवाबास पांच दस्त जाले चराईहुन पंचवीस हाथी व शेंमर उंटें आले दिवसां दरबार नाहीं रात्रीं दौलाची अर्जी गुजरली छ १७ रोज शुक्रवारीं हैदराबादेहुन अलीज्याह-बाहादुर—साहेबजादे यांची अर्जी व नजर व मिठाई आली ती गुजरली महमदपन्हा दारोगा हरकान्याचा यास हुकुम जाला कीं 'कमठाण्यास जाऊन सरकारी व तमाम सरदार म ( न ) सबदाराचे झेंडे उभे करणें.' त्या प्रा। झेंडे घेऊन तो गेला येक प्रहर दिवसां खिल्वतीमध्यें नवाब बरामद जाले सरबुलंदजंग व अजमखां व यकरामुदौला वगैरे इसमांचा सलाम जाला येक प्रहर दोन घटिकेस बरखास जाले रात्रीं जनान्याचा बंदोबस्त होऊन कंचन्यांचा नाच होता छ १८ रोज मंदवारीं मुसारेहमुकदील गाडद हजार आली याचा अर्ज जाला दिवसां दरबार नाहीं रात्रीं दौलाची अर्जी गुजरली छ १९ रोज रविवारीं फरेदुज्याह साहेबजादे यांनी आपली साळगिरे जाल्याची नजर केली मीर पोलादअली व सुभानअली यांची याद घेतल्या प्रा। ते हजर जाले त्यांस जनान्यांत बोलाऊन घेतलें शुतरखाना शंभर उंट व प्यादे बैल रथगाड्याचे आले दिवसां दरबार जाला नाहीं दोन घटिकादिवस शेप असतां चराईहून पंचवीस हाथी आले छ २० रोज सोमवारी दौलाकडे हुकुम गेला कीं राजजीस व मिस्तर किनवीस घेऊन येणें साहा घटिका प्रथम दिवसां खिल्वतीमध्यें नवाब बरामद जाले दौला व मीरआलाम व सरबुलंदजंग व धामीमियां व

अजमखान वगैरे मामुली इसमांचा सलाम जाला. रावजींची याद केल्याप्रा ते आले. त्यांचाही सलाम जाला. दौला व रावजी व मीरआलम तिघांसीं खिलवत जाली. त्यानंतर मिस्तर किनवी व इष्टवट लपटन इंग्रजाकडील वकील आले. त्यासुधा बोलणे होऊन यक प्रहर च्यार घटिकेस किनवीस वाटे लाविलें.त्यानतर यक घटिका निपर्स्त होऊन येक प्रहर पाच घटिकेस बरखास जाले. रा। छ १२ राखर हे विज्ञापना.

छ १३ गुरुवारीं टपा रवाना पुण्यास.

श्री.

श्रीमंत राजश्री —————————— रावसाहेब स्वामींचे

सेवेसी —————————— ——————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनंती विज्ञापना ता। १३ माहे राखर बेदर येथें स्वामीचे कृपावलोकानेकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पेशजी छ १२ माहे मजकुरीं लेखन करून पत्राची रवानगी सेवेसी केली त्यावरुनें ध्यानांत आले असेल. साम्प्रत येथील वर्तमान छ मजकुरीं रोज गुरुवारीं प्रथम दोन घटिका दिवस आल्यानतर नबाब जर्द अबारींत स्वार जाले. खवासींत दौला व मीरआलम होते. वरकड साहेब जादे ज्यास समागमे यावयाची आज्ञा जाली ते व आणिक अमीर उमराव तयार होऊन आले. व जनान्याचा रथ व गाडया व अंबाऱ्या वगैरे सरंजाम सिद्ध जाला. या समुदायानसीं कसबे कमठाणें पा। मजकुर बेदरापासोन तीन कोसाचे फासल्याने आहे, तेथें शिकारीचें मकान करार केले आहे. स्वार होऊन गेले. कमठाणें याचे उत्तर व पुर्वभागीं गारद्याचा बाडा शिकारचे मैदान मध्यें सात कोस घेऊन बदोबस्त करविला. याजमुळे बेदराहून लोकांस जाण्यास येका मार्गें नबाबाचे डेऱ्यास पाच कोस व पश्चमेकडूनें व पूर्वेकडोन जाण्यास बारा कोस, याजकरितां सर्वलोक, सर-

१ बसून

दार, मुतसद्दी आदिकरून समागमें गेले ते किल्याचे दरवाज्यावर परवानगी आंत जाण्यास नाहीं दौलत यांचे सांगण्यांत कीं नबाब कमठाण्यास वीस दिवस राहणार. आणि सरंजाम महिन्याचा तेथें करविला आहे मग पाहावें-वीस दिवस राहतात किंवा महिना राहतात, नबाबाची प्रकृति या दिवसांत काहींसी बेआरामचि दिसण्यांत आली परंतु जाहेरदारीस दाखविण्यात कटाक्ष दाखऊन आहेत बेदरची हवा तो कोणासच मानत नाहीं कमठाणें येथील हाशा कसी आहे हें आतां पुढें समजेल त्या प्रो विनंती लिहिण्यांत येईल रा सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

छ ४ जमादिलावली पत्राची रवानगी डांकेवर

श्री

मार्गशीर्ष शु ५ रविवार शके १७१५ ता० ८ डिसेंबर स १७९३

श्रीमंत रावसाहेब यांस मामुली प्रो हवाल्याचें पत्र* पृष्ठ टीप पाहा

श्री

मार्गशीर्ष शु ५ रविवार शके १७१५ ता ८ डिसेंबर स १७९३

विनंती विज्ञापना येसीजे कमठाण्यास शिकारगाहाकारिता नवाब बेदराहून निघोन डेरे दाखल छ २१ माहे राखरी जाले वाडा वारा को साचा भारी बसला नित्य प्रातःकाळीं नी नबाबांनी स्वार होऊन शिकारीस पांच सात कोस, केव्हां जनान्याचे बंदोबस्तानसी, कोण्हे दिवसी मर्दान्याची शिकार या प्रो रोज होत आहे बाज्या बाहेरहो कितेक लोक शिकारीस हुकुमा प्रो जाऊन शिकार करून गुजराणितात या प्रो शिकारीचा तुर्त हररोज उपारी आहे रा छ ४ जमादिलावल हे विज्ञापना.

श्री

मार्गशीर्ष शु ५ रविवार शके १७१५ ता० ८ डिसेंबर स १७९३

विनंती विज्ञापना- मोर्जेगांव मा यरवोळ येथील यात्रा सालाबादी पं पाचवीपासोन सुरु होती चहूकडून घोडी, तट्टें, उंट वगैरे जनावरें विक्रीस

येतात. त्यास सालमजकुरीं नवाबाचे सरकारातुन असदआलेखान यांस प. न्नास हाजाराचीं घोडीं व पागेकडे चालीस हाजारांचीं खरीदी करण्याचा हुकुम जाला. असदअलीखान घोडीं खोस रवाना होणार. रा छ. ४ जावल हे विज्ञापना.

श्री.

मार्गशीर्ष शु. ५ रविवार शके १७१५. ता० ८ दिसेंबर स १७९३.

विनंती विज्ञापना. चेनापटणांहून व्यकटरामदिला याजकडोन अखबार आली ते पाठविली आहे. रा गोविंदराव भगवंत सेवेसीं प्रविष्ट करतील. अवलोकनें मजकूर ध्यानांत येईल. उत्तरें रवाना व्हावयास आज्ञा जाली पाहिजे' रा छ. ४ जावल हे विज्ञापना.

श्री

कार्तीक शु. ५ रविवार शके १७१५. ता. ८ दिसेंबर स. १७९३.

विज्ञापना येसीजे. येथील वर्तमान ता २० माहे राखर सोमवार पावेतो अखबार पत्रीं लेखन करुन सेवेसीं पत्राची रवानगी केली, त्यावरुन ध्यानास आलें असेल. तदनंतर येथील वर्तमान छ मजकुरीं रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ २१ रोज मगळवारीं प्रथम च्यार घटिकां दिवसां ख्वाबगाहामधें नवाब बरामद जाले. सैद उमरखान व अबदुल करीम व महमदषाबान यांचा सलाम जाला. लालन हज्यामाची याद केली. तो हाजर जाला. हाज्यामत होऊन येक प्रहर च्यार घटिकेस बरखास्त जाले. छ २१ रोज मगळवार भारामल यांची अर्जी व शंकरराव भोंग यांचे दोन डबे जवाहिराचे व पोपागी सणगे वगैरे सरंजाम आला, तो गुजरला. रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ २२ रोज बुधवारीं दिवसां दरबार जाला नाही; रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ २३ रोज गुरुवारीं सवारीचा हुकुम होऊन लवाजमा हजर जाला. दोन घटिका प्रथम दिवशीं खिलवतीमध्ये नवाब बरामद जाले. दौला व सरबुलंद जंग व धासीमिया व अजमखान व रायेराम व मुनशी व मीरआलम व

रावरंभा वगैरे मामुल इसमांचा सलाम जाला हाथीवर जर्द अंबारीमध्यें नबाब सवार जाले दौला मीर अलम उभयेतां खवासीमध्यें होते किल्याबाहेर स्वारी आल्यानंतर फौज व गारद यांचा सलाम जाला येक प्रहर तीन घटिका दिवसां कमठाणें येथें स्वारी डेन्यास दाखल जाली सर्वांच्या नजरा होऊन बरखास्त जालें चार घटिका दिवस शेष राहिला असतां बगल्यामध्यें नबाब बरामद जाले मामुली लोकांचा सलाम जाला दुरबीण लाऊन चहुकडील बाडयाचें राण पाहिलें, मगर हेंच समई बरखास्त जालें रात्रीं खैर सला छ २४ रोज शुक्रवारीं खासे रथ व च्यार हाथी गदीचे वगैरे स्वारीचा ल्वाजमा प्रातःकाळीं हाजर जाला दोन घटिका दिवसां नबाब स्वार होऊन जनान्यासहित शिकारीस गेले शिकार करून येक प्रहर पांच घटिकेस डेन्यास आले आंबराईमध्यें डेरे देण्याचा हुकुम फरासखान्याचे दारोग्यास जाला रात्रीं शेपनीनें नबाब दौलाचेथें आले त्याची व साहेबजादची नजर जाली च्यार घटिकेस आपलें मकानास आले छ. २५ रोज मंदवारीं तीन घटिका दिवसां नबाब स्वार होऊन शिकारीस गेले दौला समागमें होते पांच परींदांची शिकार करून आंबराईतून आले दौला शिकारीस पुढें गेले त्यांस येक हारण फांशांत सांपडलें तें त्यांनीं गुजराणलें बाडयांत तीन माणसें सांपडलीं, त्याचे हात सोडावयाचा हुकुम जाला आंबराईत भोजन दौलासहित जालें येक प्रहर च्यार घटिकेस मकानास आले रात्रीं साहा घटिकेस नबाब बरामद जाले पागावाले वगैरे मामुली लोकांचा सलाम जाला जासुदाचे दारोग्यास हुकुम जालाजे वाडया आंत कोण्ही माणु ( स ) न ये येसा बंदोबस्त करणें छ २६ रोज रविवारीं दोन घटिका प्रथम दिवसां नबाब जनान्यासहित स्वार होऊन शिकारीस गेले दौला स्वार होऊन मैदाराकडे गेले अर्ज जाला नबाबांनीं पांच परींदाची शिकार करून अंबराईत आले तेथें भोजन जालें. दोन खाने रवाना दौलाकडे मैदारास पाठविला दौलांनीं चिते सोडोन

१ पक्षी

दोन हारणाची शिकार करून पा, ते गुजरली. दोन प्रहर पाच घटिकेस नवाब डेऱ्यास आले. दौला मैलाराहुन आले, त्यांचा अर्ज जाला. रात्रीं खैर सला. छ २७ रोज सोमवारीं दोन घटिकां दिवसां नवाब जनान्यासहित स्वार होऊन शिकारीस गेले. येक प्रहर च्यार घटिकेस माघारे आले. रात्रीं खैर सला. छ २८ रोज मंगळवारीं प्रातःकाळीं दौला स्वार होऊन शिकारीस पुढें गेले. तीन घटिकेस नवाब गदीचे हाथीवर स्वार जाले. शिकारीस गेले. पागावाले यांणी येक हारणाची शिकार केली. दौलांनीं च्यार हारणांची शिकार करुन गुजराणली. असदअलीखानानीं परिंदाची शिकार केली. नवाबाची अंगठी गमावली, ते खिजमतगारास सांपडली त्यानें आणुन दिल्ही. त्यास इनाम दिल्हा. येक प्रहर पाच घटिकेस डेऱ्यास आले. दौलास व पागावाले यांस हुकुम जाला जे वाडयाबाहेर शिकारीस जात जावे. रात्रीं खैर सला. छ २९ रोज बुधवारीं दोन घटिका दिवसा नवाब जनान्यासहित स्वार होऊन शिकारीस गेले. दौला व असदलीखान व रावरंभा शिकारीस परभारा गेले. पागवाले अलाहिदा गेले. नवाबांनीं दोन हारणांची शिकार केली. दिलदारखानानें पांच हारणांची शिकार करुन गुजराणली. दौलानी येक हरण धरलें. दोन प्रहराचे अमलांत नवाब डेऱ्यास आले. हैदराबादेहून नव तोफा दाहा दाहा सेर गोळ्यांच्या आल्या व वीस शेर गोळ्याच्या तोफा ४. च्यार पेटारे बारूत गोळ्याचे. सदरहु सरंजाम बेदरचे किल्यांत दाखल जाला. छ माहे जावल गुरुवारीं प्रातःकाली जनान्यासहित नबाव स्वार होऊन शिकारीस गेले. दौला व पागावाले व सलाबतखान वाडावाहेर शिकारीस गेले. नवाबानीं तीन हरणाची सिकार करुन डबापुरास गेले. तेथील उसाचे गुन्हाळ तायार जाले. जनान्यासुधा उसाचा रस घेतला. भोजन जाले. दोन प्रहरास डेऱ्यास आले. रात्रीं खैर सला. रा छ ४ जमादिलावल हे विज्ञापना.

श्री

मार्गशीर्ष शुा ५ रवीवार शके १७१५ ता. ८ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. दौला शिकारीकारिता श्रीक्षेत्रप्रमेर या राणात छ २६

राखरीं गेले शिकार करुन नंतर क्षेत्रानजीक श्रीचें देवालयानजीक आंवराई आहे तेथें बसले गांवातील ब्राह्मणांची घरें वगैरे जागा पाहाण्यास कोन्हा को न्हास पाठऊन शोध करविला पुढे चंपाशष्टी यात्रेचे दिवस हाजरत येथें खान लाअर्पजा होणार ह्मणोन बोलोन करोडगिरीकडील मुतसदी व पंचोत्र्य वाले कारकुन यांस बोलाऊन सांगितलें कीं ' लस्कर क्षत्रा समीप याजकारितां बेपारी उदमे येण्यास व पंचोत्र्याचे दहशती मुळें व गाफिली करतील त्यांस दिलीशाचे कौल ज्यावज्या पाठऊन मामुल प्रो यात्रा करवणें ' व त्यावरुन करोडे यांणीं हुमणाबाद कल्बर्गे व सुळेपठ वगैरेचे बेपारी यांस कौल पा। कीं सुखीं खातरजमेनें ब्रवसवास माल घेऊन यात्रेस येऊन खरीदी फरोख्ती करणें या प्रा। तेथें येक प्रहर बसोन कारभार केला पोहरत आम जाली कीं ब्रह्मणांचीं घरें खाली करवितात नवाब येथें येणार त्याजवरुन क्षेत्रीचे ब्राह्मण समस्त भयेभीत होऊन अह्माकडे आले आणि वर्तमान सांगितलें कीं "हे क्षेत्र प्राचीन यास कधींही उपद्रव जाला नाहीं तो आतां होणार आह्मां ब्राह्मणांचे वाली श्रीमंत किंवा प्रसंगीं तुह्मी आहांत हें अरीष्ट निवारण होय तें करावें " ह्मणोन बहुत घाबरे जाले त्यावरुन दौलांकडे सांगुन पा। कीं "हें क्षत्र देशाब्राह्मणाचें येथें मागें उपद्रव जाला नाहीं, आणि पुढेंही होऊं नये ब्राह्मणांनीं वर्षांचा धान्य संग्रह ससारकृत्याचा व सांप्रत यात्रेमुळें येजमान येणार याजविसी आधिक संग्रह करून ठेविला आहे व घरोघर बाळंतनी व दुखनाइत मुलें लेकर. यास या हिंवाळ्या दिवसांत कोठें घेउन जावें? क दाचित नवाबांची मर्जीच जाण्याविशी असल्यास, यात्रेचा तमाशा पाहाणें तरी गांवा पासोन फासऱ्यानें डेरे उभे करून येक दोन राहिल्यास चिंता नाहीं परंतु ब्राह्मणास उपद्रव करून घरें खाली करवणें हें चांगलें नाहीं " याप्रों सांगुन पाठविल्यावरुन दौलांनी उत्तर पा। कीं आह्मी क्षत्रास जाऊन जागा पाहुन आलों त्या प्रों हाजरतीस अर्ज केला परंतु अद्याप निश्चय नव्हता हाल तुमचे लिहिल्यावरुन अर्जही करितों बहुत करून ते जागा नाप

---

१ मर्जे २ आधावन

संत होईल. तथापी मागती इरादा केला तरी पुन्हा अर्ज करितो. तुम्ही ब्राह्मणाची खातरजमाकरून क्षेत्रास वाटे लाऊन द्यावे. या प्रो उत्तर दौलांकडील आल्यानतर सर्वत्र ब्राह्मणाची खातरजमा करून क्षेत्रास पा. रा छ ४ माहे जा दिवल हे विज्ञापना.

छ ११ जावलीं डाकेवर

श्री

मार्गशीर्ष शु १३ रविवार शके १७१५ ता. १५ दिसेंबर १७९३

श्रीमत रावसाहिब यास मामुली हवाल्याचे पत्र-

श्री

विनती- विज्ञापना छ ६ जावल मगळवारीं नवाब शिकारीस निघाले. दौला व वांसीमियां व सलाबतखा समागमे होते. गदीचे हाथीवर नवाब पिछाडीस मनु छत्री धरून होता. दौलाही दुसरे गदीचे हाथीवर होते. शिकार करुन डेन्यास येताच दौलास उलटी होऊन ज्वर शरीरीं चहडला, तो अद्भुत. केवळ बेताब बेहोप होऊन पडले. काहीं शुद्ध राहिली नाहीं. अशी अवस्था जाली. मीरअलम व हाकीम जवळ बसोन अवषध उपाय केले. आठप्रहर पर्यंत ज्वर येक सारखा होता. त्यानतर काहीं शम जाला. उजवे कुशीस पाठींत वायुचा दर्द भारी; त्यानें बहुतच हैराण. तीन दिवस पर्यंत बोलणे देखील नाहीं. या प्रा फारच विकल जाले. वैद्यांनी अर्क प्याला भरून दिला, तो बेहोषीमुळें हातातून खाले पडला. सांप्रत काहींसा उपशम आहे. येक शब्द निघणे तर येक घटिका अशी अवस्था आहे. मीरअलम व हाकिम नेहमीं जवळ असतात. नवाब वरचेवर तबियतीची खबर आणवितात. नबावानीं दौलाकरिता आपला चोबीं बगला त्यांचे मकानीं पाठविला. दौलाची तबियत तुर्त अशी आहे. मागाहुन ता विनती लिहिण्यात येईल. रा छ. ११ जावल हे विज्ञापना.

यांच्या फर्दा पाहुन येक प्रहर तीन घटिकेस बरखास जालें छ ३ रोज मंद वारीं दोन घटिका प्रथम दिवसां नबाब जनान्यासहित वाडग्यांत शिकारीस गेले दोन हरणें फांशांत सांपडली ते घेऊन येक प्रहर साहा घटिकेस डेन्यास आले दौलांनी वाडग्याबाहेर जाऊन सात हरणांची शिकार करून पाठविली, ते गुजरली रात्रीं खैर सला छ ५ रोज सोमवारीं तीन घटिका दिवसां नबाब जनान्यासुधां शिकारीस गेले येक हरणाची शिकार करून येक प्रहर सात घटिकेस डेन्यास आले दौला वाडग्याबाहेर शिकार करून आले अर्ज जाला रात्रीं पाच घटिकेस ख्वाबगामधे नबाब बरामद जाले सरबुलंदजंग व घासीमियां व अजमखां वगैरे इसमाचा सलाम जाला येक प्रहराचे अमलांत बरखास जाले छ ६ रोज मंगळवारीं तीन घटिका प्रथम दिवसां मर्दान्यानें गादीवर नबाब हार्थावर सवार जाले दौला व सलाबतखां व घासीमियां वगैरे चा सलाम जाला चित्यानें पांच हरणें धरलीं पैा दौलांस येक हरण व मीर अल्म यांजकडे येक पाठविलें शिकार होऊन येक प्रहर पांच घटिकेस डेन्यास आले दौला आपले मकानास येतांच वमन होऊन ज्वर आला रात्रीं खैर जाला छ ९ रोज बुधवारीं शिकार मना जाली येक प्रहर पांच घटिका दिवसां खिल्वतीमधें नबाब बरामद जाले अर्जबेगी व सैदउमरखां वगैरे लो कांचा सलाम जाला दौलाची तब्रियत फसकमंद याची खबर आणविली रा छ ११ माहे जायल हे विज्ञापना

छ १६ जाखटी डाकेवर रवानगी

श्रीमंत रावसाहेब यांस छ १६ चे हाणाम्याचें पत्र

श्री

मार्गशीर्ष व ३ शुक्रवार शके १७१५ ता २० नोव्हेंबर १७९३

विनंती विज्ञापना दौला छ ६ जायल मंगळवारीं शिकारीहुन आल्यापा सोन त्यांची तब्रियत बेआराम पाठीस वायुचा दर्द, आंगीं ज्वर, याचे उपश मनार्थ महमदमासी हाकिम यांचा दवा मीरअल्मजवळ बसोन दोन तीन दि वस हेंच जालें दरबारची मनाई होती छ १० रोज शनवारी दौलांस

काहिसें स्वस्थ वाटुन मर्दाना केला. रावरंभा व राज्याजी व नवाबाचे मुनशी व अर्जबेगी यास बोलाऊन घेतले. आह्मी कोन्हेरपत यास पाठविले, तेही जाऊन वसले. दौलानीं आपले प्रकृतीचे वर्तमान सागितलें. "शरीर भोग आहे, दोनच्यार दिवसात स्वस्थ होईल" याप्रा बोलले. येक घटका पर्यंत सदरहु मडळी होती. त्यानंतर लोक आपलाले जागीं आले. दुसरे दिवसीं दौलाचा परामर्श करून यावे यास्तव प्रातःकाली आह्मी गेलो. बाहेरील कचेरींत मरिअलम व हाकीम व नवाबाचे जांवई वगैरे लोक होते. रावरभादि आले. तेथेच सर्व बसोन दौलाकडे आंत खबर पोचविली. त्यास शनवारचे रात्री पासोन दौलाची प्रकृत फिरोन बिघडली. प्रातःकालीं बहुत बेकल; शरीरीं ग्लानता बेहोप. नबाबानीं सांगोन पाठविलें कीं, कचेरी व लोक मेळऊन बसो नये. येहतयात असावी मीरअलम महंमदमाखां यां उभयतास मात्र जाण्याची परवानगी. वरकड सर्वत्रास मनाई. याप्रा बंदोबस्त जाला. मीरअलम व हाकीम दोघे दौलापासीं क्षणभर जाऊन हाकिमानें तबियत पाहुन अवपध दिल्हे, आणि उभयताही बाहेर आले. दौला काहीं शुद्धीवर नव्हते अशी अवस्था मीर अलम व हाकिमानीं तवियतीचा अहवाल सागितला. इतके तेथें होऊन तेदिवशीं दौलाची गाठ न पडता सर्वत्र आपलाले स्थळास आले, तो दिवस रात्र दौलाची प्रकृत अस्वस्थ. कोणाची वारयाबी नाही. दुसरे दिवशी दोन प्रहर पावेतो तोच प्रकार. मीर अलम व हाकिम दवा देऊन आले. अस्तमानीं काहीं स्वस्थ होऊन राज्याजी, समशेरवत व रोशनराव यास अर्ध घटका बोलाऊन घेऊन भारामलाकडील पत्राचे जाब लिहिण्यास सांगितलें. छ १३ रोजीं नबाबानीं शिकारीस जाण्याची सिद्धता केली. बराबद जाले. दौला जनान्या चे वाटेनें म्यान्यात बसोन नवाबापासीं गेले. डेऱ्यात दौलांस नबाबांनीं त्यांचे तबियतीचें वर्तमान विच्यारिलें. यांनीं अर्ज केला, नजर गुजराणिली. मीर-अलम व हाकिम व राज्याजी व आह्माकडून कोन्हेरपत हे तेथें ते समई होते. येक घटिकेत याप्रा होऊन दौलास निरोप दिल्हा. आपले मकानीं आले. नवाब स्वार होऊन शिकारीस गेले. दौलाची मिजाज छ मारी स्वस्थ कांही-

शी जाली छ १४ रोजी दोनप्रहरपर्यंत बरेच होते मागती प्रकृत वे आराम या प्रा यांचे मिजाजीचा अहवाल दिवसांत फेर दुसराहोतो असें आहे याजवर प्रकृत फिरोन जशी दौलास येईल त्याप्रा विनंती मागा हुन लिहिण्यांत येईल रा छ १६ माहे जाखल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा ३ शुक्रवार शके १७१५ ता० २० डिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना दौलाची मिजाज मांदगी सबब नवाबांनीं मीर अल्म व हकीम महमदमाखां यांस नेहमीं जवळ राहुन दवा देत जाणें यैस। ताकीद केली त्या प्रा उभयतां त्याजपासींच असतात असीलास पाठउन घटके घटकेचे वर्तमान आणवितात नवाबांनीं आपला चोबी बंगला दौलाक-रितां पाठऊन फरासाकडुन त्यांचे मकानीं उभा केला तेथें दौला आहेत हाकीम महमदमाखां यांस पांच हजाराची जागीर देण्याचीही योजना जाली आहे राछ १६ जाहल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा ३ शुक्रवार शके १७१५ ता २० डिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना कमठाण्यास दाखल होऊन येकवीस दिवस जाले सैर शिकार आलीकडे दौलाचे मिजाजमांदगी खाले दिवस गेले मागती बेद-रास छ १७ अगर छ १९ रोजी येण्याचा बेत होता परंतु तो राहिलासा दिसतो नबवाचें मानस व माहाल्यांतुनही बेदरास यावे यैसा निश्चय होता दौलाचा अर्ज कीं येथून फिरोन बेदरास माघारे जाण्यांत कुच्यात विघडती यास्तव महिना पंधरा रोज कमठाण्यावरच राहावें पुढें विचारासारखी तजवीज असेंही वर्तमान आहे यैकिल्यात येथें बेदरास येण्याचा गुलबांग दाट होता। तो पुर्ते दिसत नाहीं मागाहुन जसें ठरेल तसी विनंती लिहीन रा छ १६ जाखल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा ३ शुक्रवार शके १७१५ ता० २० डिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना बारामहालाकडील पत्रें दौलास आलीं त्यांत मारार्फ

" शंकरराव भोंग याचे ठिकाण लागत नाही. त्याचे भाउवंद व चीजबस्त कोठें कोठें याचे तलाशांत आहो. या प्रांती मुफसद नाईकडे यांचा हंगाम भारी याचे तंबीविषई आज्ञा जाहल्यास उद्योग करू. मात्रजी ना सोईटकर टेंभुरदरा ह्मणोन उमरखेडचा गाव येथें आहे. तेथुन उमरखेड व सोईटावर स्वारी करणार. याजकारितां टेंभुरद्न्यावर मीं फौजसुधा जातो. तें जागा बेलाग आहे. भोंसलें यांजकडिल विठलपंत सुभेदार वासीमा पासोन पांच कोसावर जमियतसुधां माहुरचे रुखाने आहेत, त्याचे फौजेसी आह्मासीं फांसला पंचवीस कोसाचा आहे. त्यानीं आह्मीं इत्यफाकानें[1] राहुन मुफसद[2] नाइकडे आदि करून याचे तंबी विषई तर्फैन मदद मावला करण्पाचा ईर्षादें[3]. त्या बमोजीब त्याचा आमचा नविर्स्त[4]. खादर्[5]यारी कुमकही परस्परे होत आहे. बिल्फैल[6] सुभेदार नाइक ह्याचा शोध लाऊन तबी कारितात. या प्रांती फौजाचे भयाने मुफसद कितेक मकाने खालीं टाकुन फरारी जाले आहेत. त्या गढया साफ करण्याचा उद्योग सुभेदाराचा आहे. आज्ञा येईल तसी वर्तणुक होइल. या अन्वये पत्रातील मजकुर दौलानीं येकुन राज्याजीस याचा जबाब देण्याचें सागितलें. जबाब काय दिल्हा हे शोध लावलियावर मागाहुन लिहिण्यात येइल. रा छ. १६ माहे जावल हे विज्ञापना.

श्री

मार्गशीर्ष वा। ३ शुक्रवार शके १७१५ ता. २० दिसेंबर १७९३.

विनती विज्ञापना. शंकरराव भोग याजकडील तालुका इदुर, बोधन वगैरे काम व्यंकटराव सुरापुरकर याचे पुत्र त्रिमलराव यांजकडे सागितले. मारनिलेनीं दौलास पत्र लिहिले त्यांत मार कीं पा। वालकुंडा येथील जमीदार दयारडि याचा पैगाम[7] आलाकीं शंकरराव याची चीजबस्त काहीं मजपासीं आहे ती मी देतो; व मुचालका लेहुन देतों कीं यासिवाय चीजबस्त आपले आंगीं लागल्यास दुपट देईन. कौल यावा. भेटीस येतो. दुसरे, भोगाकडील

१ ऐक्य; सालोख जूट. २ बंडखोर. ३ इच्छा. ४ लेख ५ ६ आणि खरोखरच ७ निरोप.

कारकुन हणमंतराव म्हणोन येथ कैदेंत आहे त्याचे विद्यमाने मोंगाकडिल पैगाम की मजला सरकारचा कौल आल्यास मी येतों या प्रा लिहिलें आलें याचे जबाब दौलांकडुन त्रिमलरायाकडे गेलें की दयारडीस कौल पाठऊन आ णावें चीजवस्त असेल ते घेऊन मुचल्काही सदरहु प्रा घ्यावा त्याचे तालुकियाचें काम त्याचे हातें घ्यावें मोंगाकडील पैगाम प्रमाण नाहीं तुम्ही हणमंतराव यांनी वचनीं गुंतू नये तो कैदेंत आहे तसाच असावा याप्रा जबाब गेले रा छ १९ जावल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा ३ शुक्रवार शके १७१५ ता २० दिसेंबर १७९३

विनति विज्ञापना हपमतजंग याची जागीर वजीरखानाकडे सांगितली जंगाचे जातीस भातांबरें वगैरे गांव आहेत तेथें जंग आजपर्यंत होते सांप्रत जंगांनीं नबाबास अर्जी व दौलास पत्र पाठविलें की माझी मिजास दुरुस्त नाहीं याजकरितां हुकुम जाल्यास हैदराबादेस जाईन या प्रा पत्रें आलीं याचा जबाब नबाबांनीं पाठविला कीं तबियतीस इलाज करण्या करितां तुम्हीं हैदराबादेस जावें त्यावरून जंग भातांबर याहून निघोन छ १३ रोजीं मैलारास आले छ १४ रोजीं तेथेंच मुक्काम जाला आज उद्यां बेदरास येणार शर्कुदौला यांची भेट घेऊन हैदराबादेस जाण्याचा निश्चय जाला रा छ १६ माहे जावल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा ३ शुक्रवार शके १७१५ ता २० दिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना चेनापटणाहुन व्यंकटरामदिक्षित यांजकडुन अखबार आली ते सेवेसी रा केली आहे राजश्री गोविंदराव भगवंत प्रविष्ट करतील उत्तरें रवाना करण्यास आज्ञा जाली पाहिजे रा छ १६ माहे जावल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा २ गुरुवार शके १७१५ ता २० दिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना राजश्री कल्याणराव व बाबाराव यांनीं यने दौलास

झाली. ती हरराव यांचे विद्यमाने गुजरली. पत्रें वाचते समई मीर आलम व महमदमाखां जवळ होते. बाबाराव यांनीं लिहिले मी पुणियास आलों. मदारुलमाहाम यांची भेट जाली. सविस्तर मार सागितला. त्यावरून बहुत संतोष जाले. साप्रत आपण हजरत सुधा शिकारगाहास आल्याचे व भोसल्याकडील विठलपंत सुभेदार यांची तर्फेन दोस्ती भारामल यांस लिहून राखविली याचाही मार यैकुन खुष झाले. पुढे परस्परें भेटीं व्हावयाचाही बयान केला. त्याजवरुन मदारुलमहाम यांचे ह्मण्यात वेहेतर आहे इत्यादि मार होता. हें यैकुन दौला निजले होंते ते थटकारुन उठोन बसले, आणि बोलले कीं " आह्मीं कोठे नको ह्मणतो ?" या प्रा आवेश येऊन बोलले. याजवर मीर आलम बोलले की ह्या सर्व गोष्टीं गलत आहेत. राव मार याची प्रकृत दुरुस्त नाहीं. तेंव्हा हे जाबसाल काय करितात. या प्रा मीर आलम बोलल्यानंतर दौला उगीच राहिले. हें वर्तमान युक्तीने खचित समजले. सबब विनंती लिा। असे. रा छ १६ माहे जावल हे विज्ञापना.

श्री.

मार्गशीर्ष वा। ३ शुक्रवार शके १७१५ ता. २० दिसेंबर १७८३.

विज्ञापना येसीजे. येथील वर्तमान ता छ १० माहे जावल मंदवार पावेतों अखबार पत्रीं लेखन करून सेवेसीं पत्रीं रवानगी केली, त्यावरून ध्यानास आलें असेल. तदनंतर येथील वर्तमान. छ मारीं प्रातःकाळीं नवाब बेदार जाले. असीलास दौलाकडे पाठऊन त्यांचे तबियतीची खबर आणविली. तीन घटिका दिवसा नवाब स्वार होऊन जनान्यासहित शिकारीस गेले. शिकार जाली नाहीं. दोन प्रहरास डेऱ्यास आले. रात्रीं खैर सला. छ. ११ रोज रविवारीं दिवसां दरबार जाला नाहीं व नवाब शिकारीसही गेले नाहींत. दौलाची तबियत फार अस्वस्थ होती. त्याची खबर वरचेवर असीलासीं आणवीत होते. मीर आलम व हाकीम महमदमाखा उभयतांस त्यांजपासीं नेहमीं असावें. या प्रा हुकुम जाला. छ १२ रोज सोमवारीं दोन घटिका प्रथम दिवसां नवाब सवार होऊन जनान्याचे बंदोबस्तासहित शिका-

रीस गेले शिकार जाली नाहीं त्यानंतर येदलाबाद म्हणोन येक गाव आहे तेथें स्वारी गेली पाटलाचे बायकोनें स्वयंपाक करून अन्न आणिलें तें घेऊन तिजला इनाम दिल्हा येक प्रहर च्यार घटिकेस डेन्यास आले दौलाची खबर अशीलाम पाठऊन आणविली रात्रीं खेरसला छ १३ रोज मंगळ वारीं पाच घटिका प्रथम दिवसा खासगामधें नबाब बरामद जाले दौला जवळचे वाटेनें म्यान्यांत बसोन आले त्यांनी नजर केली पांच सांत इसमांचा सलाम जाला दौलासी क्षणभर बोलोन त्यास घोटे लाविलें नबाब साहा घटिकेस स्वार होऊन शिकारीस येदलाबादेकडे गेले दोन प्रहर तीन घटिकेस डेन्यास आले दौलाचें प्रकृतीची खबर आणविली रात्रीं पांच घटिकेस नबाब बरामद जाले सरबुलंदजंग व घासीमियां व अजमखां वगैरे इसमांचा सलाम जाला दिल्दारखां व मुरादअलीस हुकुम जाला कीं दोन चित्ते घेऊन वाड्याबाहेर हरणाची शिकार करून घेऊन येणें चोबी बंगला दौलाचयें उभा करण्याची ताकीद जाली येक प्रहाराचे अमलांत बरखास जाले छ १४ रोज बुधवारीं प्रात काळीं दौला चेथें चोबी बंगला उभा राहिला त्यांनीं फराम व कामाठी नबाबांकडील यांस इनाम शंभर रु दिल्हे दोन घटिका दिवसा नबाब जनान्यासुधां स्वार होऊन अमलापूरचे जंगलांत शीकारीस गेले भोजनादि तेथेंच होऊन दोन प्रहर दोन घटिकेस डेन्यास आले दिलारखान व मुरादअली यांनी वाड्याबाहेर च्यार हरणांची शीकार करून गुजराणली दौलाची तबियत कांहींसी स्वस्थ जाली म्हणून राज्याजी, रोशनराये, समशेरबंग वगैरे त्यांचे लोकांनीं त्यांस नजरा केल्या रावरंभा यांचे बंधू अप्पाराव कुटुंबासुद्धां माहुरची यात्रा करून आले याचा अर्ज जाला रा छ १६ माहे जावल हे विज्ञापना

छ २४ जावली अकीर पुण्याम

श्री

मार्गशीर्ष वा। १० शनिवार शके १७१५ ता. २८ दिसेंबर १७९२.

श्रीमंत रावसाहेब यांस छ. २४ चे मामुली हवाल्याचें पत्र

श्री

विनंती विज्ञापना. उमरखेडाहून कादाराचीं पत्रे इकडे येत गेलीं कीं भगवंतराव व रामराव उभयता भारामल तेजवत यांचें समागमें अटकेत आहेत. त्यांची मोकळीक व्हावी व तालुकीयास इजा न लागे येसा बंदोबस्त होऊन तेजवंतास पत्रे यावीं. त्यावरून दौलासी बोलण्यांत येत गेलें. साम्प्रत उमरखेड प्रकरणीं ता। मा।र रा गोविंदराव भगवंत यांनीं लिहिल्या आन्वयें दौलासी जाले कीं तेजवंतास आपले पत्र 'उमरखेडचे कारकून दोघे तुम्हीं समागमें नेले त्यांस उमरखेडास पाठवून द्यावें. त्यास त्याजपासून दस्त ऐवज लेहून घेतला तो फिरोन द्यावा. आणि तालुकियास उपद्रव परिच्छिन्न लागों नये' या अन्ययें एक पत्र आज्ञापासी द्यावें ह्मणजे सरकारांत रवाना होईल. व एकदर मारही आपण तेजवंत याजकडे पाठवून सरकार हुकुमाप्रमाणे त्याजकडून अमलात येण्याचे करावे. याजवर दौलाचे बोलणे की 'उमरखेड करानी मावजी ना। यास चीजबस्त सुद्धां दिल्हे नाहीं व भोगाचे भावाचा पत्ता लावून द्यावा त्यास हजर करावे ते केले नाहीं यास काय करावें?' याचे उत्तर इकडुन कीं 'उमरखेडकर कादारानी दोही सरकारची दोस्ती येखलास जाणून भोगाचीं मुले, मनुष्यें चीजबस्त जे शोधात आली ते तेजवत यांचें हवाला केलीं. भोगाचा भाऊ तेथे नाहींच त्यापक्षी यानी काय सांगावे? मावजी नाईक गैरहजर आहे. उमरखेडकरानीं आपले प्रयत्नास काही कमती केली कीं काय? कारकून दोन्ही माहली पाठवावे. आणीकहि शोध लागेल त्यात कसूर करणार नाहींत. या आन्वये मोठे झटापटीची बोलणी भवती न भवती फार काहीं जाली. याजवर एक दो दिवसानतर आणीकहि या समंधे दौलांसीं बोलणे जाले. दौलानीं सागितले कीं तेजवताचीं पत्रे आली त्यात उमरखेडचे दोघे कारकून समागमे होते त्यातून भगवतराव यांस शरीरीं समाधान

नाहीं सबब उमरखेडास रा। केलें, रामराव मात्र जवळ आहे मावजी नाईकाचा शोध फार केला. हलीं माळेगांवचे यात्रेस गेल्याचा ठिकाणा लागला, त्याची कन्या व जांवई धरले, व मावजी नाईकचे पत्यावर उमरखेड कराची माणसेंहि गेल्याचे वर्तमान आहे, तहकीक करून मागाहून लिहीन या प्रा। भारामल यांचे पत्रांतील मजकूर ह्मणोन बोले याजवर आह्मी बोलणें कीं भगवंतराव यास उमरखेडास रा। केलें उत्तम आहे, रामराव यासही रवाना करावें दस्तऐवज फीरोन देशास उमरखेडास इजा लागो नये या प्रा। तेजवंतास लिहून पत्र द्यावें दौलानी सांगितलें कीं रामराव यास येथें पाठवून देण्याविषयीं पत्र तयार करविलें तेजवंत मारानिलेस येथें पाठवून देतील उमरखेड तालुक्यांत उपद्रव करूं नये येैसें पेशजी भारामल यांस पत्र गेलें उमरखेडापासोन बावीस कोसाचे फासल्यावर तेजवंत आहे हलीं इंदूर, बोधन, म्हसें, मुधोळ, या प्रांतीं कामगिरीस जाण्याविषयीं भारामलास पत्रें गेलीं तिकडे जातील पेशजीहि उमरखेड तालुक्यास फौजेचा उपद्रव जाला नाहीं सोईट्यावर तीन मुकाम होते परंतु कांहीस धका लागला नाहीं आतांहि इजा लागणार नाहीं मारानिलेस ताकीद आहे या प्रा। बोलून रामराव यांस येथें पाठविण्याविषयीं भारामल यास पत्र देण्याचा मसविदा दाखविला तो दाखविला आज उद्यां पत्र मोहर होऊन आलें ह्मणजे रवाना करण्यांत येईल स॥ विनंती मागाहून लिहीन पत्रें दौलाकडून आलीं यांविसीं अलाहिदा पुरवणी लि॥ आहे त्यावरून ध्यानास येईल रा छ २४ जमादिलाखर हे विज्ञापना।

श्री

मार्गशीर्ष बा। १० शनिवार शक १७१५ ता २८ दिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना उमरखेडकर कामदाराचीं पत्रें पेशजी आह्मांस आलीं त्यांत त्यांनीं लिहिलें होतें कीं भगवंतराव यांचे शरीरीं समाधान फार नाहीं यास्तव कोणेही प्रकारें त्यांचें येणें उमरखेडास व्हावें रामराव, भारामल यांजपाशीं राहून भगवंतराव यांस यावें लागेल ऐसी ताकीद यावी त्यावरून हा मार दौलांनी

बोलण्यात आला होता त्यांनीं तेजवंतास पत्र पाठविलें की भगवंतराव यास ऊमरखेडास पावतें करून द्यावे. त्या प्रा। तेजवंताचे पत्र आले. दुसरे, तालुक्यास इजा लागों नये ऐसी ताकीद तेजवंतास आधीं जावी. हाही गार दौलासी पेशजी बोलण्यात आला. त्यांनीं तेजवंतास सदर्हु अन्वये लिहून लिहिल्यावरून तालुकियास उमरखेडचे कोटे उपद्रव न देता ईर्पादेवमोजीव इंदुर बोधनाकडे कामगिरीस दरकुच जातो. याप्रा तेजवंताचे लिहिण्यात ह्मणोन दौलानी सांगितले. हल्लीं रामराव याची सुटका व्हावी दस्तऐवज फिरोन द्यावा. येसे दौला ।। आमचे बोलणे. याचे यानी असे ठराविले कीं रामराव यांस येथेच आणवितों, दस्तऐवजहि आणवावे येसे आह्मी बोलले. दौलाचे ह्मणणें की असल दस्तावेज येथे आणिल्यास तुह्मीं छातीवर बसोन घ्याल. यास्तव नकला पाठवाव्या ऐसे भारामलास लिहितो. आह्मीं उत्तर असल दस्तयैवज येथे आपण आणवावें. आह्मीं आपल्यापासीं बोलुनच घेऊं. याप्रा बोलणें जाले. परंतु अस्सल कागद भारामल याजपासीं असोन त्याच्या नकला येथे व रामराव यास पाठवावे. याप्रा दौलानीं दोन पत्रे तयार करून दिल्हीं, पै॥ येक पत्र परभाग उमरखेडकर कादांराकडे मुजरद गा। केलें व येक पत्र राजश्री गोविंदराव भगवंत याजकडे डाकवर पा। आहे. मारानिले सेवेसीं प्रविष्ट करतील रा। छ २४ जावल हेविज्ञापना.

श्री.

मार्गशीर्ष वा। १० शनिवार शके १७१५ ता. २८ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. दौलाचे तब्रियतीचें वर्तमान पेशजी विनती लिहिल्यावरून ध्यानात आलें असेल. छ १९ रोजीं रात्रीं नबाबाकडे दौला आतील वाटेने म्यान्यात बसोन गेले होते. राजश्री कल्याणराव व बाबाराव यांजकडील पत्रे आलीं. त्या प्रकरणीं बोलणें पाच सहा घटिका पर्यंत होऊन आपले मकानास आले. प्रकृतीस समाधान नाहीं. सबब दौला आपले येथें दरबार पहिल्या (प्रमाणें ?) करीत नाहींत. फार करून जनान्यांत असतात. येका दो दिवसाआत दोन तीन घटिका मर्दाना करून मीरआलम राजाजी रोषनराव वगैरे कोणी कोणी

येतात त्यांस बोलावून घेऊन काहीं जाबसाल होतो छ २० रोजी दौलांनीं स्नान केलें तमाम लोकांनीं सतके नगदी रु व खुर्दा व उडीद तेल, तीळ वगैरे जिनस तसदीक केलें दौलास समाधान झाल्याच्या त्याचे लोकांनीं नजराही केल्या दौलांनीं तबियत आराम झाल्याची नवाबास नजर पाठविली सांप्रत दौलाची प्रकृत काहीं स्वस्थ जाल्याप्रा आहे, परंतु निस्तोष आरोग्य नाहीं ज्वर पहिला होता तो नाहीं शम आहे खोकलाही बहुतसा नाहीं शम्द हकुवट जाला चेहऱ्यावर व अंगावर नकाहत व शरीरीं अशक्तता आहे रा छ २४ जावल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता २८ दिसेंबर १७९३

विनंति विज्ञापना मिस्तर किनवी दिलावरजंग बाहादुर इंग्रजाकडुन नबाबापासीं वकीलीचे कामावर आहेत त्यास यांची बदली इंग्रजांनीं करून यांचे कामावर दुसरा वकील पाठविला तो येणार. सबब येथुन किनवी नबाबाची व दौलाची रुखसत घेऊन जाणार, किनवीनें आपला सरंजाम कुल असबाब येथुन हैदराबादेस रवाना केला रुखसत होऊन दरमजल जाणार. हा मार मीरआलम यांस विच्यारला त्यांचे सांगण्यांत कीं दिलावरजंग यांची तगीरी होऊन जातात यैसे नाहीं पलटणचे स्वारीहुन आल्यापासोन दिलावरजंग यांची तबियत दुरुस्त नाहीं येथील आबहवाही माफिक नाहीं सबब लाड बहादुर व नवे जनरालास यांनीं सांगितलें कीं मी विलायेतीस जातो तर प्रकृत हुषार होईल त्यावरून दिलावरजंगास हुकुमही आला कीं तुम्हीं विलायेतीस तबियत आराम होण्याकरितां यावें, त्यावरून जातात यैसें यांचे बोलण्यांत सारांश किनवी येथुन रवाना होत आहे मागाहुन विनती लिहिण्यांत येईल किनवी येथुन जाणार. येथील कामावर मिस्तर इष्टवट यास ठेविलें दुसरा किनवीचे मुबादला[१] येणार तोंपर्यंत काम इष्टवटानें चालवावें यैसें ठरलें आहे रा छ २४ जावल हे विज्ञापना

---

१ बरतरफी

श्री.

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५, ता. २८ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. चेनापटणाहुन व्यंकटराम दिला याजकडील दोन अखबारां आल्या,त्या पा॥ आहेत. राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसीं प्रविष्ट करतील. अवलोकनें मा॥र ध्यानांत येईल. उत्तराविषीं आज्ञा व्हावी. रा॥ छ. माहे जा॥वल हे विज्ञापना.

श्री.

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता २८ दिसेंबर १७९३,

विनंती विज्ञापना. राजश्री माहादजी सिंदे यास नवाबांनीं पेशजी दोन च्यार वेळां यैवज येथुन हुंड्या वरचेवर पाठविल्या. येविषींची विनंती राजश्री नाना यांनीं सेवेसीं केलीच असेल. बाबाराव गोविंद इकडुन गेले ते समईंही दाहा लाखाच्या हुंड्या त्यांचे बराबर रा॥ जाल्या. सांप्रत पांच लक्षांच्या हुंड्या राव सिंदे यांजकडे पाठवावयाकरिता यांनीं तयार केल्या आहेत. लौकरच रवाना होतील. यैसें वर्तमान यैकण्यांत आले, मागती याची तहकीक करून लिहुन पाठवितो. रा॥ छ. २४ जा॥वल हे विज्ञापना.

श्री.

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता. २८ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. कृष्णमा करोडा वारल्यानंतर करोडगिरीचें काम त्याचे पुत्राकडे दौलांनीं ठेऊन कृष्णमाचा भाऊ पापमा याचे हातें कारभार घेतला. यैवज सरकारचा कृष्णमाचे बेरजे अन्वये बहुत येणें. त्याचा निर्वाह होईना. सबब पापमा दुखणें आलें ह्मणोन निरोप घेऊन गेला. त्यानंतर रामया ह्मणोन दुसरा भाई कारभारावर होता, त्यास यैवजाची सख्ती लागली, तेव्हा त्यानें हैदराबादेस जाऊन पांच लक्षांची तोड पाडितो ह्मणोन रुखसत घेऊन हैदराबादेस गेला. यैवजास ठिकाण नाहीं. कृष्णमा याचे हाताखाले हासन अली खान ह्मणोन होता. त्यानें तीन लाखाची सरबराई केली. सबब त्याजला करोडगिरीचे नयाबत मीरआलम यांचें विद्यमानें सांगोन काम चालविलें. परंतु

यैवज बहुत येणें त्याचा तगादा खान मार यास सख्त आहे व कृष्णमाची अमानत साहुकारे वगैरे जेथें जेथें जसी, त्याचाही शोध करून तगादा होत आहे कादरखान पहिला करोडा व नुरमहमदखान सिदी इमामखानाकडील यांजकडेही करोडगिरीचें संधान आहेच पुढें कार्य ठरतें त्याप्रो लिहिण्यांत येईल रा छ २४ जावल हेविज्ञापना.

श्री

*मार्गशीर्ष शु १० शनिवार शके १७१५ ता. २८ डिसेंबर १७९३*

विनंती विज्ञापना हरबाजी नाईक बिरमई याचे दुकान औरंगाबाद व हैदराबादेतील व येथील तिन्हीही जप्त करून लोकांच्या ठेव्यासुद्धां रोकड व वस्त व जी कापड चिजवस्त सुद्धां यैवज घेऊन मारानिलेचा यैवज आजकडे येणें तो व ह्याचे दाखल्याने निवडून काहाडोन ज्याजकडे यैवज त्याचे मागें चोपदार लाऊन बै मुरवतीनें कितेकांपासोन यैवज घेतला, व घेणात इतकेंही होऊन हरबाजी नाईक याचा पुतण्या व स्त्री व त्रिंबक नाईक वगैरे गुमास्ते यांची सुट का नाहीं सारेवारा ळ्ख मायो आहेत त्यापैकीं हा यैवज जो जमा होईल तो घेऊन बाकीचाही फडच्या त्यांनीं करावा तेव्हां मुक्तता हैदराबादेतील गुमास्ते बखासुद्धां आणिले आहेत बखाची रुजुवात येक येकाची होत आहे मोठा घोळ घातला तसेंच लक्ष्मीचंद साहुकार यांजकडे अपराव नसतां वि त्ताविषय पंधरा सोळा हजार पर्यंत जिंदगी सरकारांत घेतली. हाली कृष्णमा करोडे याचा यैवज कोणे साहुकारापासीं कायं तो सांगणें व मुचल्के लेहुन देणें याप्रा तमाम साहुकारांस तगादा केला याचें कसें होतें तें पाहावें. सर्वांवर गजब जाला आहे निव्हां नाहीं रा छ २४ जावल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष शु १० शनिवार शके १७१५ ता २८ डिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना तिमाराव देशपांडे घसमतकर परागंदा जाला त्याजला धरावयाकारितां सैद मुनवरखान व याजीराव अमीन याणीं उद्योग बहुत केला परंतु हस्तगत जाला नाहीं सांप्रत तिमाराव याचे राहण्याचा गांव मौजे लोक

पा। वसमत येथें सैद मुनवरखान व बाजीराव हजारपांचसे लोकांनिसी जाऊन गांवास महासरा केला. आंतुन गोळी चालती. तिमाराव याचा पुतण्या व चीज वस्त वगैरे तेथें आहे. लांक येथील गढीही मजबुत आहे. गढी घेऊन तिमाराव याचीं मुलें मनुष्ये चीजवस्त जे तेथें असेल ते हस्तगत करावी. याप्रों सैद मुनवरखान व बाजीराव यांस ताकीद व उभयतांची कुमक करण्याविसीं भारामल यांसही याची आज्ञा आहे. मकान अद्याप याचे हातीं आलें नाहीं. होईल त्याप्रों विनंती लिहिण्यांत येईल. तिमाराव यास विठ्ठलपंत सुभेदाराकडील आश्रा ऐसेंही यांचेथें वर्तमान आहे. रा। छ. २४ जमादिलावल हे विज्ञापना।

श्री.

मार्गशीर्ष वा। १० शनिवार शके १७१५ ता. २८ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. फकरुदौला ईत्फखारखान याजकडे अवरंगाबाद येथील शहरचे सुभेदारीचें काम. त्यास जामीन हाकीम ज्याफरखान आहेत. त्यास फकरुदौला सुभेदारी करून गेल्या तागाईत सरकारांत पैसा वसूल नाहीं. याजकरितां हाकीम मजकूर यांस तगादा हालीं लागला आहे कीं तुम्ही फकरुदौलास जामीन आहां. त्यांजकडील यैवज दाखल करणें. व त्याजकडेहि दस्तक सजावल येवन व जमाखर्च घेऊन येणें म्हणोन जालें. दुसरें, चिमणाराजे यांजकडे दौलताबाद सरकारचे वगैरे येकदर माहालची अमीली. याजकडुनही ताहुदाचे बेरजेचा यैवज बेमुबलग येणें. सबब मारनिलेवर दस्तक सजावले रवाना करण्यास तयार जाले आहेत रा। छ. २४ जमादिलावल हे विज्ञापना.

श्री.

मार्गशीर्ष वा। १० शनिवार शके १७१५ ता. २८ दिसेंबर १७९३.

विनंती विज्ञापना. दौलाची तबियत बेआराम होती. सांप्रत आराम होऊन आरोग्यस्नान केले. नजरा व लोकांचे तसदुक सतेके जाले छ. २१ जावल बुधवारीं नवाब दोन घटिका रात्रीं दौलाचे मकानास आले. मीर आलम व असद अलीखां जवळ होते. त्यासुध्दां दौ (लां) नीं नजर केली;

तबियतीचें मान विच्यारून त्यानंतर दोन घटिका दौला व मीर आलम यांसी खिल्वत जाली सात घटिकेस नबाब दौलाचे मकानाहून आपले जाग्यास गेले. रा छ. २४ जमादिलावल हे विज्ञापना.

श्री

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता २८ डिसेंबर १७९३

विनंती विज्ञापना जगमाची येक पोर बारा वर्षाचे वयाची तिचे आईबापास हजार रुपये देऊन खरीद केली तिसीं नबाबांनीं निका छ १७ जमादिलावलीं लाविला ह्मणोन वर्तमान येकदोन मासावर येकिलें, त्यवरून विनंती लिहिली असें खरें वर्तमान आहे रा छ २४ जमादिलावल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता २८ डिसेंबर १७९३

विनंति विज्ञापना नबाब कमठाण्यावर राहिले तेथें जाग्याचा बहुत संकोच. गांवांत जागा थोडी बाहेर बाहेर मोठा दिल्हा दोन कोस अडीच कोसावर जेथें ज्याची सोये तसे लष्करचे लोक राहिले तेव्हां बाहेर अथवा कमठाण्यांत राहण्याची सोये नाहीं जाणुन बेदरचे मंगळवार पेटेंत मी पहिलें राहिलों त्याच जागीं अ हे येथुन कमठाणें तीन कोस बाडयामुळें कोस कोसाचा फेर जाणें येणें होतें नेहमीं तेथें कोन्हेरपंत व च्यार जोडया जासुद ठेविले आहेत. रा छ २४ जमादिलावल हे विज्ञापना

श्री

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता. २८ डिसेंबर १७९३

विनंति विज्ञापना कमठाण्यावर नबाब राहिल्यास येक महिना जाला सैर शिकार व दौलाची मिजाज मांगी हेंच आजपर्यंत जालें बेदरास येण्याचा बेत होता तो तुर्त राहिला येक महिन्याचा सरंजाम कमठाण्यावर गेला महिना पंधरा दिवस मुकाम आहत येकरामुदौला गफुरजंगाचे पुत्र यांनीं आपली पागी करण्याकरितां हैदराबादेस जाण्याचा निरोप मागितला, परंतु दिल्हा नाहीं मुळें

माणसे येथेंच आणा येसी ताकीद जाली. याचप्रो मीर आलम यांचींही मुलें माणसें आणविलीं. रा छ. २४ जात्रल हे विज्ञापना.

श्री.

मार्गशिर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता. २८ दिसेंबर १७९३.

विज्ञापना येसीजे. येथील वर्तमान ता छ. १५ माहे जावल शुक्रवार पावेतों अखबार पत्रीं लेखन करून सेवेसीं पत्राची रवानगी केली त्यावरून ध्यानास आलें असेल. तदनंतर येथील वर्तमान. छ. १६ रोज शुक्रवारीं प्रातःकालीं सरबुलंद्जंग व दिलदारखान पुढे चिते घेंऊन सिकारीस गेले. दोन घटिकां दिवसां जनान्यासहित वाडयाआंत मौजें चिटपालाकडें गेलें. दीड प्रहरास माघारें आले. पागावाल्यांनीं वीस हरणांची शिकार करून गुजराणिली. दोन घटिकां दिवस शेष राहतां नवाब बरामद जाले. पागावाले याचा सलाम व शिकारीच्या नजरा जाल्या. रात्रौ दौलाची अर्जी गुजरली. छ. १७ रोज मंदवारीं प्रातःकालीं पागावाले हुकुमा प्रों वाडयाबाहेर शिकारीस गेले. नवाब दोन घटिकां दिवसां स्वार होऊन जनान्यासुधां सैर करावयास गेले येक प्रहर पांच घटिकेस डेन्यास आले. पागावाल्यांनीं नऊ हरणांची शिकार करून गुजराणिली. रात्रीं खेरसला. दौलाचे तबियतीचे वर्तमान आणविले. छ. १८ रोज रविवारीं दोन घटिका दिवसां नवाब शिकारीस वाडयाबाहेर गेले. पागावाले वगैरे लोकांचा सलाम जाला. शिकार करून येक प्रहर पाच घटिकेस डेन्यास आले. रात्रीं साहा घटिकेस खिलवतीमध्यें नवाब बरामद जाले. सरबुलदजंग व घांसीमिया व अजमखां वगैरे इसमांचा सलाम जाला. पागावाल्यासीं बोलणे जाले. येक प्रहर दोन घटिकेस बरखास्त जाले. छ १९ रोजीं सोमवारीं दोन घटिका दिवसांनंतर नवाब स्वार होऊन जनान्यासहित बाड्याआंत चिटपालास गेले. तेथें भोजन जालें. येक प्रहर साहा घटिकेस डेन्यास आले. पागवाल्यानीं येक ससें व तीन डुकराची शिकार करून गुजराणिली. डुकरें मिस्तर किनवीकडे पाठविलीं. रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ. २० रोज मंगळवारीं दोन घटिकां दिवसा नवाब स्वार होऊन जनान्यासहित

शिफारीस गेले दीट प्रहराचे अमलांत फिरोन डेन्यास आले दौलांनीं आरोग्यस्नान केल्याचा अर्ज जाला नवाबांनीं सेयका पंचवीस बकरीं उडीद, तेल व खाना व खुर्दा याप्रों केला. दौलांनीं नजर पाठविली ती गुजरली मिस्तर किनवी यांनीं आपला असबाब हैदराबादेकडे रवाना केला माल्हेगांवचे यात्रेहून पन्नास घोडीं किनवीनें खरीद करून आणविलीं तीं आलीं पागवाल्यांनिशीं करार करून गुजराणिलीं तीन प्रहरास असद-अलीखान माल्हेगांवचे यात्रेहून तीनसे आठ घोडे खरीदी करून आणिले याचा अर्ज जाला रात्रीं दौलाची मर्जी गुजरली छ २१ रोज बुधवारीं दोन घटिका दिवसां नवाब जनान्यासहित स्वार होऊन गेले, आंबराईंत भोजन करून येक प्रहर तीन घटिकेस डेन्यास आले तीन प्रहरास खास-गामध्यें बरामद होऊन लालन हाश्यामाची याद केली ती हजर जाला हज्यामत करविली च्यार घटिका दिवस बाकी राहतां बरखास्त जाले रात्रीं दोन घटिकेस नवाब दौलाचेथें आले दौला व मीर आलम व असदअली-खां व रायेरायां यांचा सलाम नजरा जाल्या दौलांसीं बोलणें होऊन येक प्रहराचे अमलांत नवाब आपले मकानास गेले रा छ २४ जावल हे विज्ञापना.

श्री.

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ वा २८ दिसेंबर १७९३

विनंति विज्ञापना मिस्तर किनवी दिलावरजंग यांस रुखसत देण्याची याविषईं दौलांनीं नवाबांस अर्जी लिहिल्यावरून दौलांस हुकुम जाला जे सुद्धीं किनवीस घेऊन च्यार घटिका रात्रीं यावें त्याप्रमाणें छ २२ रोज गुरुवारीं च्यार घटिकेस रात्रीं नवाब खासगामध्यें बरामद जाले मीर आलम व पागवाले व अर्जबेगी व रायेरायां वगैरे इसमांचा सलाम जाला. दौला आंतील वाटेनें आले हातीं काठी धरली होती किनवीची याद केल्या प्रों हाजर जाले. हैदराबादेहून मुजफरखान आला त्याची हुशाजमत नजर जाली मिर्दी इमाम यांस जगन्याळची किल्लेदारी होऊन खिल्लत

दिल्हा. यानंतर दौला व मीरअलम व किनवी यासी तीन घटिका पावेतों खिलवत जाली. किनवींस सिरपेच, जिगा व कंठी तीन दागिने जवाहीर व रुखसतीचें पानदान देऊन रुखसत केलें. त्याजवर येक घटिका दौला व मीर आलम यांसीं बोलणे जालें. प्रहराचे अमलांत बरखास्त जाली. याउपरी किनवी कुच करून जाणार. रा छ. २४ जावल हे विज्ञापना.

**श्री.**

मार्गशीर्ष वा १० शनिवार शके १७१५ ता. २८ दिसेंबर १७९३.

श्रीमत राजश्री रावसाहेब स्वामीचे सेवेसीं यांस ता छ, २४ माहे जावलचे पत्र + ++ + विशेप. कित्येक खुफिया वर्तमान यैकण्यात आले तें तावार राजश्री गोविंदराव भगवंत यास लि आहे. सेवेसी गुजराणतील. ते अवलोकनांत येऊन उत्तराविषीं आज्ञा करणार स्वामी समर्थ सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

छ २ जाखरीं डांकेवर.

**श्री.**

पोष शु ४ रविवार शके १७१५ ता ५ जानेवारी १७९४,

श्रीमंत रावसाहेब यांस मार्मुली हवाल्याचे पत्र.

**श्री.**

पौष शु. ४ रविवार शके १७१५ ता ५ जानेवारी १७९४.

विनंती विज्ञापना. दौलाकडे छ. २७ जावलीं मी गेलों. च्यार घटका प्रथम दिवसा नवाबानीं यास आपला बंगला दिल्हा. त्या बंगल्यांत अंगांत डगला घालून जवळ असदअलीखां व हाकिम महमदमाखां वगैरे पांच सात इसमेंसहित होते. असदअलीखान यांनीं मालेगांवचे यात्रेंतून घोडीं खरीद करून आणिलीं तीं पाहिलीं. त्याजवर षाबेखान बीडवाला याजकडील घोड्याचीही हजरी इसमनवेसी होती. तबियत मांदगीमुळें बसण्याउठण्याची शक्ति पहिल्याप्रा नाहीं व बोलण्याचा आवाजही हालका. मुखावर कांही म्लानता. तशांत

कामाचा क्रम चालिलाच आहे हाकिमाची दवा नित्य घेत असतात सांप्रत तबियत बरी आहे रा छ २ जाखर हे विज्ञापना

श्री

पौष शु ४ रविवार शके १७१५ ता ५ जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना असद अलिखान यानी मालेगांवचे यात्रेंतून घोडे ख रीद करून आणिले ते दौला पाहात असतां 'घोडे किती खरीद केले' ह्मणोन मीं विचारिलें दौलानीं बोलण्यांत आणिलें कीं, 'असदअलीखान मुजफरुल्-मुल्कि यांची जमियत पांच हजारांची सुलेमानशाहासाहेब जादे यांचे पागा रिसाल्यापैकीं हाजुरजचे हुकमाप्रा पैकीं चार हजार स्वार घोडा याजपासीं हजार बाकी येक हजाराची भरती व्हावयाची त्यास चार हजार जमावांत कुलसिदर समशेर असे लोक आहेत करोल बिलकुल नाहींत याजकरितां येक हजार करोलाची जमियत करण्याचा ईर्षाद हजार घोडीं खरीद व्हावयाचीं पैकीं मालेगांवचें यात्रेंत यांनीं तीनसें घोडे पच्यायेसी हजारांस खरीद करून आणले आणिकही यैनज जेथें घोडीं खरीद मिळतात तेथें पाठविला मग खरीद होऊन काय येतात पाहावें, याप्रा बोलले रा छ २ जाखर हे विज्ञापना

श्री

पौष शु ४ रविवार शके १७१५ ता ५ जनेवारी १७९४

विनंति विज्ञापना दौलाचे बोलण्यांत आलें 'कीं टिपूनें मीरकमरदीखां व महमद वजीरखां व आणिक येक मातबर गृहस्त या सिवांस कैद केलें हें एक वर्तमान व दुसरें कलिकोट—प्रांतीं मापिलें ह्मणोन जमीनदार मुफसद भारी जमियतेचे आहेत त्याजवर टिपूनें दोन कुशून पयेदल चार व दोन रि-साले तंबीकरितां रवाना केले होते त्यास मापिल्यांनीं दोन कुशुन व दोन रिसाले टिपुकडील लढाई करून गारत केले हे वर्तमान टिपुस समजल्यावर खुद्द जातीनें मापल्यावर जाण्याचा इरादा केला आहे याप्रा वर्तमान आहे, ह्मणोन बोलले रा छ २ माहे जाखर हे विज्ञापना

श्री.

पौष शु. ४ रविवार शके १७१५ ता. ५ जानेवारी १७९४.

विनंती विज्ञापना. मिस्तर किनवी दिलावरजंग यांस नवाबांनीं रुखसत छ. २३ जावलीं दिल्ही. इत्यादिक वर्तमानाची विनंती पेशजी लिहिल्यावरुन ध्यानांत आले असेल. किनवीनें दौला व मीर आलम यांचा निरोप घेऊन छ. २४ रोजीं तीन प्रहर दिवसां लस्करांतुन निघोन मंगळवारपेठ येथें त्यांस जागा नवाबांनीं दिल्ही तेथें येऊन भोजन केलें. इष्टवट व आणीक दोघे सोबती त्यांस येथें ठेविले. किनवी स्वार होऊन छ मारीं सदासिव पेंठेच्या मुकामास गेला. हैदराबादपर्यंत रथ, घोडे, पालखी, म्याना, हाथी यांची डांक बसविली. हैदराबादेस छ. २९ रोजीं पोहचावयाचा होता. तेथुन चिनापटणास जाणार. चेनापटणाहुन विलायतीस जाण्याचा बेत जाला. किनवीचे मुबादला दुसरा येणार, तो अद्याप येथें आला नाहीं. तुर्त इष्टवट आहे. तो आल्यानंतर मागाहुन विनंती लिहिण्यात येईल. रा॥ छ. २ मोहे जा खर हे विज्ञापना.

श्री.

पौष शु. ४ रविवार शके १७१५ ता. ५ जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना. येथील साहुकार मंडळी बेदरचे किल्याआंत हुकमावमोजीब छपरबंदी करुन दुकानें घालून राहिले. त्यास छ. ३० जावल शुक्रवारीं दोन घटका प्रथम रात्रीचे समई येकायेकीं फतेदरवाज्याकडुन पस्तीस चालीस मनुष्य हत्यारबंद साता आठाचे हातात बलम, व सात आठ तरवारी नागव्या धरून, व पांच सातजणाचे वोटांत धोंडे, पांच सातांचे हातीं कांठ्या, येकदोन पटेकरी, व तिघे टेंभे मोठे लाऊन, याप्रा प्रथम मल्हार नाइकाचे दुकानापासीं आले. त्या दुकानास ताटी लाऊन येक माणुस उभा होता. त्यानें चोर असें ह्मणताच त्यास काठी घालुन बसविला. पुढें नन्हुमल याचे दुकानीं माणुस होता. तोही दगडानें जाया

करुन तसेंच मोतीराम टकसाळी याचे दुकानावर पडले तो दस्करांस गेल होता गुमास्ता दुकानीं त्यास बदमानें जखमी करून जिवें मारिलें येक दोन माणसेंही, चित केली दुकानांतून संदका आणुन कुऱ्हाडीनें, फोडला त्यांत नगदी तोडे व सोनें रुपें वगैरे गाहाण ठेवी–सुधा येवज होता, ते घेतला तेथुन जमनादास धरमदास याचे दुकानावर पडुन त्याचे मेव्हण्यास जिवें मारिलें येक गुजराथी ब्राह्मणाचा मूल तेच दिवसीं, हैदराबादेहुन नव आला होता तोही पुरा केला येकदोन माणसें ठार जखमी करून जमनादासाचा संदुक फोडुन नगदी व चीजवस्त कुल विलविषय नेला त्यानंतर मल्लुकचंद व लक्ष्मणदास अगरवाला याचे दुकानावर गेले परंतु अवकाश पडल नाहीं मोतीराम व जमनादास दोन्ही दुकानचा येवज घेऊन निघाले वाटेस ज्यानें चोर म्हटलें त्यास ठार जखमीं केलें. चौकांतील पिंजारी व गंजाचे बाजारचा वहेदा व रायेरायां यांचे बाजारांतील मारवाडी वगैरे सात, आठ जखमी व ठार करून नीट मार्गे पासलगंजाचे दरवाज्यानें निघोन गेले याप्रा भरले बाजारांत साहुकाऱ्यावर या बमोजीब चोरांनी जबरदस्तीची चोरी करून साभाळुन येवजसहित गेले रा। छ २ माहे जाखर हे विज्ञापना

श्री

पौष शु ४ रविवार शके १७१५ ता ५ जानेवारी १७९४

विनंति विज्ञापना शंकरराव भोंग यांजकडील कांहीं जिनस व कापड सुदावंतपुर येथें कोमटी याचेथें होते त्याचा पत्ता भारामल यांनीं लाऊन जिनस व कापड व ते कोमटी धरून मेदरास पाठविले भारामल यांनीं यासमंधें दौलास पत्र लिा आहे कापड व जिनसाची मोजदाद करून घे ण्याचें दौलांनीं नेमवंतास सांगितलें रा। छ २ माहे जा खर हे विज्ञापना

श्री

पौष शु ४ रविवार शके १७१५ ता ५ जानेवारी १७९४

विनंति विज्ञापना चेनापटणाहून व्यंकटराम दिा यांजकडुन अम्बार

आली, ती सांप्रत रा केली आहे. राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसीं प्रविष्ट करतील. अवलोकनें मार ध्यानांत येईल. उत्तराविषयीं आज्ञा जाली पाहिजे, रा छ. २ माहे जाखर हे विज्ञापना.

श्री.

पौष शु. ४ रविवार शके १७१५ ता ५ जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना. तिमराव देशपांडे वसमतकर यांचा राहातां गांव मौजें लांक येथे सैद मुनवरखां व बाजीराव अमील यांनीं माहासरा केला. आठ दाहा दिवसपर्यंत गोळी वाजली. सेवटीं मौजे मारचें ठाणें उभयतांनीं घेतले. आंतील चीजवस्त व तिमाराव यांचा पुतण्या व कारकून सांपडले ते धरून आणिले. दौलांस सैद मुनवरखां व बाजीराव यांचीं पत्रे सदरहुप्रा आलीं. रा छ. २ माहे जाखर हे विज्ञापना.

श्री.

पौष शु ४ रविवार शके १७१५ ता. ५ जानेवारी १७९४.

विज्ञापना ऐसिजे. येथील वर्तमान ता छ. २३ माहे जावल शुक्रवार पावेतों अखवार पत्रीं लेखन करुन सेवेसीं पत्राची रवानगी केली आहे, त्यावरून ध्यानास आलें असेल. तदनंतर येथील वर्तमान. छ. २४ रोज मंदवारीं प्रातःकाळीं नवाब जनान्यासहित शिकारीस गेले. पागावाले हुकुमाबमोजीब वाड्याबाहेर होते. परिंदाची शिकार करून येक प्रहर दोन घटिकेस डेन्यास आले. दौलाचे मीर आलम यासीं दौलाचें खिलवत जालें. याचा अर्ज जाला. जो रावरंभा यांचा पुत्र मुजाहिदुदौला यांजपाशीं मोगल चाकरीस होता, त्याची तनखा चहडली सबब मागावयास गेला. बोलीचाली होतां मोगलानें कटार मुजाहिदुदौलावर चालविली. त्यानें मोगलास धरून मारिलें, त्यावरून दौलाचे रिसाल्यातील मोगल चालुन गेले. कटकट होऊन तीन च्यार माणसें जखमी ठार जालीं. मिस्तर किनवी कुच करुन हैदराबादेकडे गेला. तेथून विलायेतीस जाणार. रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ. १९ रोज रविवार

दोन घटिका प्रथम दिवसा नवाब जनान्याचे बंदोबस्तानसीं स्वार होऊन शिकारीस गेले. येक हरणाची शिकार करून दोन प्रहराचे अमलांत डेन्यास आले फौजदारखानाचा माणुस उसाचे मळ्यांत जाऊन ऊंस मोडिले गांवकरी यांनीं त्यांस धरून देवढीवर आणिले त्या माणसास घरतरफ करावयाचा हुकुम जाला रात्रीं च्यार घटिकेस खिल्वतीमध्यें नवाब बरामद जाले सरबुलंदजंग व वासीमिया व हिसामुद्दौला वगैरे इसमांचा सलाम जाला साहा घटिकेस बरखास जाले छ २६ रोज सोमवारीं प्रातःकाळीं नवाब जनान्यासुधां शिकारीस निघोन पागावाले यांस हुकुम बाग्याबाहेर शिकारीचा, त्याप्रा तेही बाहेर हजर जाले. दोन हरणांची शिकार करून दीड प्रहरास डेन्यास आले रघोत्तमराव यांनीं पुण्याहुन सोळा उंट मेदुखी पाठविल्या त्या गुजरल्या रात्रीं दौलाची अर्जी व हिंदुस्थानची अखबार गुजरली छ. २७ रोज मंगळवारीं दोन घटिका दिवसा नवाब जनान्यासहित स्वार होऊन शिकारीस गेले दोन प्रहरास डेन्यास आले रात्रीं दौलाची अर्जी गुजरली च्यार घटकेस खिल्वतीमध्यें नवाब बरामद जाले सरबुलंदजंग व वासीमिया वगैरे इसमांचा सलाम जाला येक प्रहरास बरखास जाले. छ २८ रोज बुधवारीं दोन घटिका दिवसा नवाब स्वार होऊन शिकारीस गेले. चित्ते सोडुन दोन हरणांची शिकार केली. दोन प्रहराचे अमलांत डेन्यास आले सिदी अबदुला यांजकडे गंजीकोट्यास तीनसें स्वार रवाना जाले रात्रीं गैरसला. छ. २९ रोज गुरुवारीं दोन घटिका प्रथम दिवसा नवाब स्वार होऊन मोत्ररादिमध्यें गेले तेथें भोजन जालें दोन प्रहरास डेन्यास आले रात्रीं दोन घटिकेस नवाब बंदोबस्तानें दौलाचेथें आले दौला व मीर आलम व पागावाले व मुनशी व रायेराया यांचा सलाम जाला. दिवाणखान्यामध्यें बरामद जाले अजमखान पागावाले याचा भाऊ कमरसाहेब ह्मणोन होता त्याचा वाका जाला. सबब मातमपुरसी अजमखान यास च्यार पारचे करचोबी दिल्हे दौला व मीर आलम यांसी खिलवत होऊन साहा घटिकेस बरखास जाले, रात्रीं लस्करांत चोरीनें जोरावरजंग याचे, घोड्याचा फडापटा

व दिलदारखानाचेथील दुपाला गेली. अर्ज जाला. छ. ३० रोज शुक्रवारी दोन घटिकां दिवसां नवाब बंदोबस्तानें शिकारीस गेले. परिंदाची शिकार करून दीड प्रहरास माघारे आले. माहबतजंग याची अर्जी व दोन बंदग्या दार्लिवे गुजरलीं. दौलानीं मालेगावींहुन उंट व सवदागरी आणिले ते पाहिले. रात्रीं दोन घटिकेस नबाब दौलाचेथें आले. दौला व मीर आलम व पागावाले वगैरे लोकाचा सलाम जाला. दौला व मीर आलम यांसीं खिलवत जाली. साहुकाऱ्यांत किले वेदर येथें दरवडा पडोन जमनादास व मोतीराम यांची मालियत गेली, याचा अर्ज जाला. येक प्रहरास नवाब आपले मकानास गेले. छ. १ जाखर मंदवारीं दोन घटिकां दिवसां नवाब स्वार होऊन शिकारीस गेले. पागावाले यांनीं वाडाबाहेर शिकार करून येक लांडगा धरून गुजराणिला. दोनप्रहराचे अमलांत डेऱ्यास आले. औरंगाबाद येथील सुभेदाराची अर्जी व दार्लिवें आलीं तीं गुजरलीं. रा॥ छ. २ माहे जाखर हे विज्ञापना.

छ. ७ जाखरीं डाकेवर.

श्री.

पौष शुा ९ शके १७१५ शुक्रवार ता १० जानेवारी १७९४.

श्रीमंत रावसाहेब यास मामुली हवाल्याचें पत्र.

श्री.

पौष शुा ९ शके १७१५ शुक्रवार ता. १० जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना. दौलाचे बोलण्यांत आले कीं राजश्री परशरामपंत भाऊ यांचे चिरंजीव रामचंद्रपंत फौजसुधां कोल्हापुर प्रांतीं येके मातबर गढीस लागोन लडाई करून गढी व गांव घेतला. फौज लुटावयास गुतली. आपण जातीनें सेंदोनसें स्वार सुधां गावापासोन येक कोसाचे फांसल्यावर उभे होते; हे वातमी कोल्हापुरकरास समजतांच त्याचे लोक हजार पांचसें येऊन रामचंद्रपंत यांस धरून घेऊन गेले; याप्रा वर्तमान लिहिले आलें.

लढाई करून प्रथम फते जाली असतां येकायेकी अशा तर्‍हेनें दगा जाला हें मोठें ताजुब यासा बोलण्यांत आलें त्यास याचें कचें वर्तमान सरकारांत आलेंच असेल यांजकडे सदरहुप्रा वर्तमान आलें यांनीं सांगितलें त्याची विनंती लिा असे दोन जखमा त्यास आहेत राजश्री परशराम भाऊ तासगांवाहुन निघाले तिकडे जाणार येैसें यांचें सांगण्यांत आलें रा। छ ७ माहे जाखर हे विज्ञापना

श्री

पौष शुा ९ शके १७१५ शुक्रवार ता १० जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना उमरखेडकर काा दाराकडील दोघे कारकुन भारामल यांनीं समागमें नेले होते पैकीं भगवंतराव यांस पेशजीच उमरखेडास रवाना केल्याची विनंती लिहिण्यांत आली आहे रामराव यांस येथें पाठऊन देण्याविषई भारामलास दौलांनीं पत्र दिल्हें तें पाठविलें त्यावरून भारामल यांनीं समागमें स्वार देऊन मारनिलेस दौलांकडे पाठविलें छ. ४ रोजीं वेदरास आले छ ९ रोजीं दौलांनीं रामराव यांस आह्मांकडे पाठविलें, आणि निरोप पाठविला कीं, यांस आपले जवळ ठेऊन ह्यांचें मावजी नाईक सोईटकर यांस हजर करणें वगैरे येकदोन जाबसालाचा गुंता आठ पंधरा दिवसांत यांनीं उरकोन उमरखेडास जावें मजला विच्यारल्याशिवाय यांची रवानगी उमरखेडास अथवा कोठें न व्हावी, त्यास रामराव आह्मांपासीं आहेत इतक्यावर दौलांसीं याजप्रकर्णी बोलणें होऊन जसें ठरेल तसी विनंती मागाहुन लिहिण्यांत येईल रा। छ ७ जाखर हे विज्ञापना

श्री

पौष शु ९ शके १७१५ शुक्रवार ता १० जानेवारी १७९५

विनंती विज्ञापना शंकरराव भोंग नागपुरास गेल्याचें वर्तमान यांजकडे आलें होतें त्यावरून दौलांनीं माधवराव रामचंद्र, भोंसले यांजकडील, यांजकडून सेनासाहेब सुभा यांस लिहिलें कीं, शंकरराव हरामखोरी करून

पळून गेला सरकारचा माहा सबेदार लाखोचाच. चौकशी करून जेथे शोध लागेल तेथे अटकाऊन त्यास पाठवावे.' सदरहू अन्वये सेनासाहेबसुभा यांस भारामल यांचींही पत्रे गेलीं होतीं. त्याचे जबाब सेनासाहेब सुभा यांजकडून आले 'कीं हजरतीचे सरकारचा हरामखोर तो इकडील; त्याची तंबी जरूर. नागपुरात शोध केला, परंतु कोठे आढळ पडत नाहीं. हजारों मनुष्याची अमद रफ्त. त्यांत असा चोरून जो येणार तो कोणे स्वरूपाने व कसा येतो हें कशावरून समजावें? तलाश फार केला, परंतु शोध लागत नाहीं; याप्रा उत्तर आलें. रा छ ७ जाखर हे विज्ञापना.

श्री.

पौष शु ९ शके १७१५ शक्रवार ता १० जानेवारी १७९४

विनंति विज्ञापना. दौलाचे बोलण्यांत आले की 'अजिमुदौला कोठें गेला याचा शोध कोठेही लागत नाही. इग्रजाचे मकाणास गेला ह्मणावा तर ममइ व सुरत या दों ठिकाणचीं वर्तमानें तहकीक आलीं. अजिमुदौला तेथे नाहीं. तेव्हा कोणे ठिकाणीं गेला. मोठे ताजुब आहे. याचा शोध येथुनही होत आहे. व श्रीमताचे सरकारांतूनही शोध व्हावा.' ह्मणोन बोलण्यात आले. रा छ. ७ माहे जाखर हे विज्ञापना.

श्री.

पौष शु ९ शके १७१५ शुक्रवार ता १० जानेवारी १७९४.

विनंति विज्ञापना. येथील साहुकाऱ्यात दोन घटका रात्रीं चालीस पचेतालीस मनुष्ये येऊन जमनादास व मोतीराम दुकाने दोन लुटुन वित्त विषय घेऊन गेले. त्या दिवसापासून शंभुनाथ ब्रजलाल, व बखतामल हुलासराये, व मनुलाल अपचलराये हे तीन दुकानदार मातबर, वरकड लहानमोठे सर्व हवालदील जाले आहेत. दुकानें आटोपून व्यवहार बंद. या प्रा तूर्त जालें आहे. चोरीचे बंदोबस्ताकरिता किल्यात साहूकाऱ्यापासीं काहीं पाहाऱ्याचे जवानही दिल्हे आहेत. परंतु साहुकार लोकास कोणे गोष्टीचा भरं-

वस्य वाटत नाहीं असा प्रकार जाला आहे रा छ ७ जाखर हे विज्ञापना

श्री

पोष शु ९ शके १७१५ शुक्रवार ता १० जानेवारी १७९४

* नेहमींप्रमाणें छ १ ते छ ९ बुधवार पावेतों नवाबांसंबंधीं कमठा, त्याची अखबार. छ ७ जाखर शंकरराव भोंग यांजकडील तीनसें गाडदी बरतरफ केले

छ ९ रोज मकरसंक्रमण निमित्य पत्र पो

श्री

पोष व ११ शके १७१५ रविवार ता १२ डिसेंबर १७९१

श्रीमंत राजश्री———————रावसाहेब

स्वामीचे सेवेसी———————

विनंति सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. तागायत छ ९ माहे जमादिलाखर पर्यंत मुकाम बेदर येथें स्वामीचे कृपाव लोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष स्वामीचे सेवेसी मकरसंक्रमणयुक्त तिळशर्करासहित थैली पाठविली आहे याचा स्वीकार होऊन उत्तरगौरवामृतसंतोषसंपन्न सेवकास करणार स्वामी समर्थ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

* अशा प्रकारच्या अखबारांचे नमुने मागें तीन च्यारदां दिलेच आहेत. (पृष्ठे ८१, १०३, ११०, ११५, १३५, १३१) म्हणून त्याच प्रकारच्या फार असेल तेथें पुनरावृत्ती टाळण्याकरितां फक्त महत्वाचा तेवढाच मजकूर तारीखवार देण्यांत येईल. बाकी मजकूर मामुली मोघम आहे असें समजावें, सम्पादक.

श्री

पौष व. १ शुक्रवार शके १७१५ ता. १७ जानेवारी १७९४.

रा छ. १४ जाखरीं डांकेवर.

—श्रीमंत राजश्री ———————— रावसाहेब

—स्वामीचे सेवेसीं ————————

विनंति सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनति विज्ञापन ता। छ. १४ माहे जमादिलाखरपर्यंत स्वामीचें कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. राजश्री गोविंदराव भगवत याचे लिहिण्यात आलें कीं 'इंग्रज प्रकर्णी नवाबाचे थैलीपत्र श्रीमतास आलें त्यांत सर्व सावनें इंग्रजाचे कलमाचीं. तेव्हां सरकारात राजश्री पाटीलबावासहित विचार जाला या प्रमाणेंच नवाबांनीं मान्य करावे.' त्याजवरून मुषीरुलमुलुक यासी बोलण्यांत येऊन भवति न भवति जाली. आणि त्यानीं ल्याहावयास सांगितले त्या अन्वये राजश्री गोविंदराव यांस जाब लि। आहे. सेवेंत विनंति करतील ते ध्यानात येऊन उत्तराविषयीं आज्ञा जाली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री.

पौष व. २ शनिवार शके १७१५ ता. १८ जानेवारी १७९४.

छ. १५ जाखरीं डाकेवर.

श्रीमंत रावसो। यांस हवाल्याचे पत्र.

श्री.

पौष व २ शनिवार शके १७१५ ता. १८ जानेवारी १७९४.

विनंति विज्ञापना. नबाब कमठाण्यावर राहिल्यास कमकसर दोन महिने होत आले. सैर शिकार जाली. सांप्रत येथून कुच करून मौजे बोरोंची व मौजे पापाड पा। हसनाबाद बेदराहून आठ कोस व कमठाण्याहून बारा कोस येथें जाण्याचा बेत ठरला आहे. दोन्हींही गाव वंजरातीरीं आहेत. तेथून

सगारडी पंधरा कोस, सदाशिव पेंठ सतरा कोस आहे घोरोंची व पापाड येथील जागा पाहण्याकरितां लछीराम व हरकाऱ्याचा नाईक व हरकाऱ्याच्या जोड्या मा।प्रा पा। होते जागा पाहून आले नक्षा दौलतीस आणोन दाखविला कमठाण्याहून कुच होण्याची तारीख छ १७ व छ. २२ जाखर दोन आहेत यांतून कोणे तारखेस कुच करणार त्याप्रा। वर्तमानाची विनंति मागाहून लिहिण्यांत येईल येथून निघोन जनवाडा तीन कोसांवर, येथें मुक्काम होऊन तेथून पांपाडास जाणार पांपाढ हा रुख हैदराबादचा आहे पांपाडाहून आग्नेय दिशेस हैदराबाद आहे बेदर आठ कोस पाठीमागें राहिलें तेथून शिकार करीत, कोठें कोठें फिरतात हें पहावें रा छ १९ जाखर हे विनंति

श्री

पौष व २ शनिवार शके १७१५ ता १८ जानेवारी १७९४

विनंति विज्ञापना दौलतीकडे छ १९ जाखर गुरुवारीं अस्तमानीं आम्ही गेलों नव खरीदीचे घोडे वमा दमाना परंडे वगैरे जवळ तालुक्यांतून आस्या रया पाहात होते असदअलीखान वगैरे जवळ होते ताळमुपाल येथील पठाण नौकर यांचे सरकारांत राहिले आहेत. त्यांनी नजरा केल्या त्यानंतर चौकी बंगल्या पुढील सायवानामधें बैठक जाली मीरआलम यांस बोलाऊ पाठविलें. तेही आले येथून कुच होऊन मौजे पांपाड व घोरोंची या जाग्यास नवाब जाणार हेंही दौलतीचे बोलण्यांत आलें तेथील नक्षा आला तो दौलतींनीं दाखविला. बेदराहून ईशान्य कोनास पापाढ घोरोंची वजरासीरीं आहेत तेथून सगारडी पेठ पधरा कोसावर आहे या प्रा। बोलण्यांत आलें रा छ १९ माहे जाखर हे विज्ञापना

श्री

पौष व २ शनिवार शके १७१५ ता १८ जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना नवाबाकडील जासुदाचा सवाई नाईक यास दौलतींनीं येथुन पुण्याकडे छ १४ जाखरीं पत्रें समागमें देऊन बाबाराव गोविंद यांज

पासीं जाण्याचें सांगोन रवाना केलें. तो येथून दरमजल गेला. येकवीस दिवसात सवाई नाईक यानें फिरोन हजुर याने येसी ताकीद त्याजला दौलांनीं केली आहे. सवाई नाइक याचे समागमें हरकाऱ्याच्या जोडया च्यार दिल्या आहेत. येसेंही येकिलें कीं सवाई नाइक याने वावाराव याची पत्रें नवावांक-डील डाकेवर परभारां रवाना करीत जावीं. पूर्वी रघोत्तमराव याजपासीं लाखोटे येऊन रवाना होत होते. तसें असूं नये. याजकारितां नाइकास पाठविले. दोहीतुन कोणता प्रकार होतो हें निदर्शनास येईल. रा छ. १९ माहे जाखर हे विज्ञापना.

श्री.

पोष व. २ शनिवार शके १७१५ ता. १८ जानेवारी १७९४.

विनंती विज्ञापना. हृयमतजंग याचे शरीरीं समाधान नव्हतें सबब भातां-बरें येथून हेदराबादेस जाऊन राहिले. तेथें हृयमतजग यांचा काल जाला. या प्रा वर्तमान येथे छ. १२ जाखरीं आले. छ. ११ तेरखेस वारले. रा छ १९ जाखर हे विनंती (?).

श्री.

पोष व. २ शनिवार शके १७१५ ता. १८ जानेवारी १७२४.

मामुली अखवार छ. ९ माहे जाखर वुधवार ते छ. १४ रोज शुक्रवार.... छ. ७ रोज शुक्रवारीं........आवसे परगण्यांतील येक गांवचे पाटलानें पुत्राक-रिता नवावास मानत केली होती. त्यास पुत्र जाला. सवव त्यास पाटलानें आणोन नवावाचे पायावर घातलें. मानत केली. पाटलास शंभर रुा नगदी व वस्त्रें मुलास नवावांनीं इनायत केली...............रा छ. १९ जाखर हे विज्ञापना.

छ. १७ जाखरीं रामचंद्र भिरध्या समागमें.

श्री.

पौष व. ४ सोमवार शके १७१५ तां. २० जानेवारी १७९४.

श्रीमंत राजश्री ——————— रावसाहेव

स्वामीचे सेवेसीं ———————————

विनंती सेवक गोविंद राव कृष्ण कृतानेक सा नमस्कार. विनंती विज्ञापना. ता। छ' १७ माहे जाखर पर्यंत मुा। बेदर येथें स्वामींचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष स्वामींचे सेवेसी येथुन पक्षियर त्याची जोडी दोन पिंजरे समवेत पा। आहे हे जोडी नानाप्रकारचे पांखराच्या बोल्या तर्‍हेतर्‍हेनें बोल्त आहेत. व येकास येक ल्हढाईही चमत्कारानें करीत असतात हे पाखराची जोडी सरकारचे शिकारखान्यांत असण्या। योग्य जाणुन रवाना केली आहे राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसी प्रविष्ट कारितील। उत्तर रवाना व्हावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

रा छ १९ जाखरीं डांकेवर

श्री

पौष वा ६ बुधवार शके १७१५ ता २२ जानेवारी १७९४

श्रीमंत रावसाहेब यांस मामुली हवाल्याचें पत्र

श्री

पौष वा ६ बुधवार शके १७१५ ता २२ जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना —नवाब कमठाण्याहून कुच करून पांपाड व बारोंचीस जाण्याचा बेत ठरला होता याची ता। विनंती पेशजी लिहिली त्यास पांपाड बारोंचीकडे जाण्याचें तुर्त मनकुफ होऊन छ १९ तारखेस नवाब कमठाण्याहून कुच करून किल्ले बेदरास येण्याचें ठरलें च्यार पांच दिवस बेदरांत राहून मग जनवाडा येथून तीन कोसांवर नैरुत्येकडे कारंगी परगण्याचा गांव, येथें जाऊन राहण्याचा बेत जाला आहे दौला जनवाडयास जाऊन जागा पाहून आले तेथील नक्षा करून नवाबास आणून दाखविला जनवाड्यांत लोकांची घरें होतीं, तीं तमाम खालीं करविलीं गांवांत जाऊन नवाब राहणार. वाडा कमठाण्यास होता तो उठऊन जनवाड्याकडे नेऊन बसविला आहे पेशखाना डेरे वगैरे सरंजाम जनवाड्याकडे गेला राज्याजीस ताकीद जाली कीं तुम्ही जनवाड्यास जाऊन तेथील राहण्याचा बंदोबस्त मिसलबंदी

सुरू करणें. त्यावरून गाड्यांनी दोन फिरंगाण्यांतील नेहमी तेथे आहेत. जनवाड्याचे मागचे बाजूस पेठेची वस्ती आम्हासही होती, तेथीलही घरें पाडून रिकामी करविली. नवाब बेदरास येऊन त्यास पांच दिवसानंतर जनवाड्यास जाऊन राहणार. तेथें किती मुक्काम होतात व पुढे येऊन कोणीकडे शिकार करीत जाणार हें निदर्शनास येईल त्याप्रमाणे विनंती मागाहुन लिहिण्यात येईल. फारेंगी तालुका सरबुलंदजंग पागावाले याजकडे आहे. त्यांनी दोन तीनसे लोक निसाराचे स्वारीकरितां ठेविला आहे. तथापि कहीकवाडाचा उपसर्ग लोकांचा होतच आहे.. छ १८ जाखरी कमाठणे येथें वागड जाली. छ. १९ अगर २० या दोन तारखेतून येके तारखेस कुच करून नवाब बेदरचे नजीकीत येणार. थंडीचा जाडा जाला. रा॥ छ. १९ माहे जाखर हे विज्ञापना.

श्री.

पोष व. ६ बुधवार शके १७१५ ता २२ जानेवारी १७९५

मामुली अखबार छ १२ माहे जाखर गुरुवार ते ता॥ १८ रोज मंगळ-वार पावेतों.

+ + + + ता॥ १६ रोज रविवारीं........ ...मुसारेहमुपासीं येक फरासीस नवा नौकरीचे उमेदवारीनें आला. त्याची मुलाजमत नजर जाली. जनवाड्याचा नक्षा दौलानीं दाखवून जागा पाहून आले त्याचा बयान केला. साहा घटिकेस बरखास जालें. रा ता॥ छ १९ जाखर हे विज्ञापना.

छ २० जाखरी डाकेवर.

श्री.

पौष वा ७ गुरुवार शके १७१५ ता. २३ जानेवारी १७९४.

श्रीमत रावसाहेब यांस मामुली हवाल्याचें पत्र.

जाले खवामीमधें दौला व मीरआलम उभयतां होते तमाम फौज बरावर होती सवा प्रहर दिवसां किले वेदरचे हवेलीस नवाव दाखल जाले, पांच सात मुक्काम येथें होण्याचा बेत आहे पुढें जनवाड्यास जाऊन राहावयाचा बेत निश्चय जाला कुल असवाव डेरे वगैरे जनवाड्यावर उभा राहिला आहे मागाहुन विनती लिहिण्यांत येईल रा छ २० जाखर हे विज्ञापना

श्री

पौष व ७ गुरुवार शके १७१५ ता २३ जानेवारी १७९४

विनती विज्ञापना. दारा ज्याहा बाहदुर माहबतजंग यांचे शरीरीं समाधान नव्हतें त्यांचा काल जाल्याचें वर्तमान नवावांकडे छ १८ जाखर मंगळवार रात्रीं आले नबावांनी यैकुन बहुत अपसोस केला माहालांत बेगमां आदिकरून सर्वांचा आकांत रात्रीं मोठा जाला नौवत मना केली कुच करण्याचा हुकुम आधीं जाला होता. त्यानंर तीन च्यार घटकेनें हें वर्तमान आलें छ १९ रोजीं नवाब स्वार होऊन सवा प्रहर दिवसां किले बेदरास दाखल जाले तेही मोठे उदासीनपणें खवासींत दौला व मीर आलम होते गमी करून कोणासीं न बोलतां दाखल जाले रा छ २० माहे जाखर हे विज्ञापना

श्री

पौष व ७ गुरुवार शके १७१५ ता २३ जानेवारी १७९४

विनती विज्ञापना हषमतजंग वारले सवव त्यांजकडील जागिरीचे गांव मौजे मातांवरें पा माळकी वगैरे पांच गांवची जप्ती नवाबांचे सरकारांतुन जाली रा छ २० माहे जाखर हे विज्ञापना

श्री

पौष व ७ गुरुवार शके १७१५ ता २३ जानेवारी १७९४

विज्ञापना यैसीजे येथील वर्तमान रा छ १८ माहे जाखर मंगळवार पावेतों अखबार पत्रीं लेखन करून सेवेसीं पत्राची रवानगी केली

त्यावरून ध्यानात आले असेल. तदनतर येथील वर्तमान छ. मारीं रात्री दौलाची अर्जी गुजरली. उदईक कुच करावयाचे ह्मणोन त्याची अर्जी दसखत होऊन आली. चार घटिका रात्रीं आदवनी राये चुरचे वर्तमान आले कीं दारा ज्याहा माहाबतजग याचा वाका जाला. त्यावरून नौबत मना जाली. छ. १९ रोज बुधवारी प्रातःकाली सवारीचा हुकुम होऊन लवाजिमा हजर जाला. जनान्याचे रथ पुढे वाटे लाऊन नवाब पाच घटिकेस दिवाणखान्यामधें आले. दौला व मीर आलम व पागावाले व रायेराया व असदअलीखा वगैरे मामुली लोकांचा सलाम जाला. हाथीवर अवारीमधे नवाब सवार जाले. खवासीमधे दौला व मीर आलम होते. वासल गजाचे दरवा. ज्याने सवा प्रहर दिवसा वेदरचे हवेलीस किल्यातील दाखल जाले. गावांत दाखल होते समई येक स्वार विहरींत घोडयासुद्धा पडला. दुसऱ्या दरवाज्यात दाटीमुळे दोन माणसे जाया जालीं. रा छ. २० जाखर हे विज्ञापना.

छ. २२ जाखरी डाकेवर.

श्री.

पौष व. ९ शनिवार शके १७१५ ता २५ जानेवारी १७९४

श्रीमत रावसाहेब यास मामुली हवाल्याचें पत्र.

श्री.

पोष व ९ शनिवार शके १७१५ ता २५ जानेवारी १७१४,

विनंती विज्ञापना. नवाब कमठाण्याहुन छ. १६ माहे जाखर बुधवारीं वेदरचे हवेलीस दाखल जाल्याचे वर्तमानाची विनती डाकेवर यापूर्वीं लिहिण्यात आली आहे. छ. २० रोज गुरुवारीं वेदर येथे मुकाम जाला. छ. २१ रोज शुक्रवारीं प्रातःकाळीं नवाब गदीचे हाथीवर सवार जाले. दौला व मीरआलम व पागावाले आदिकरून अलाहिदा हाथीवर, याप्रा स्वार होऊन प्रथम प्रहर दिवसा जनवाडयास दाखल जाले. वाडा अगोदर रायेराया यानीं जाऊन तेथे वसविला आहे. येक महिन्याचा सरंजामही तेथें गेला. इतक्यावर

जनवाडे येथें किती मुकाम होतात पुढें कोणीकडे जातात हें ठरेल त्याप्रा विनंती मागाहुन लिहिण्यांत येईल रा छ २२ जाखर हे विज्ञापना

श्री

पौष व ९ शनिवार शके १७१५ ता २५ जानेवारी १७९४

विनंती विज्ञापना चेनापटणाहुन व्यंकटरामदिला याजकडुन असवार आली ती रा केली आहे राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसीं प्रविष्ट करतील अव-लोकनें मार ध्यानांत येईल उत्तराविषयीं आज्ञा जाली पाहिजे रा छ २२ जाखर हे विज्ञापना

श्री

पौष व ९ शनिवार शके १७१५ ता २५ जानेवारी १७९४

विज्ञापना येसीजे येथील वर्तमान ता छ १९ माहे जाखर बुधवार पावेतों असवार पत्रीं लेखन करुन सेवेसीं पत्राची रवानगी केली त्यावरुन ध्यानांत आलें असेल तदनतर येथील वर्तमान छ. मारीं रात्रीं दौलाची अर्जी गुजरली रायेरायां यांस हुकुम जाला जे जनवाडयास जाऊन वाडा बसवणें छ २० रोज गुरुवारीं तीन घटिका प्रथम दिवसा लालवागांमध्यें नवाव बरामद जाले जनान्याचा बंदोबस्त केला नवा दिवाणखाना पाहिला त्यानंतर येक प्रहर च्यार घटिका दिवसा खिल्वतीमध्यें नवाव बरामद जाले आपज्या उलमुल्क व येकतमुदौला वगैरे लोकांचा सलाम जाला रायेरायां यांनीं प्रातःकाळीं जनवाडयास जाऊन वाडा बसविल्याची अर्जी पा ते दौलाचे अर्जी सहित गुजरली लालन हज्यामाची याद केली तो हजर जाला हज्यामत होऊन येक प्रहर सात घटिकेस बरखास जाले दौलाची अर्जी गुजरली उदईक कुच करून जनवाडयास जाण्याचें दसखत जालें छ २१ रोज शुक्रवारीं गजर समई प्रातःकालीं स्वारीचा हुकूम होऊन ल्याजिमा हजर जाला जनान्याचे रथ पुढें रा केले दौला व पागावाले व मुनपी व असद अलीखां वगैरे सरदार मनसबदार मुत्सदी सर्व हजर जाले लालवागामध्यें नवाव बरामद जाले सफेत पोशाग व हिऱ्याचें जवाहिर घालुन हाथी जर्द

गदींचा त्याजवर नवाब सवार जाले. पिछाडीस मनु छत्री घेऊन उभा होता. दौला व मीरआलम व सरबुलदजंग व वासीमिया व अजमखा वेगळाले हाथीवर, याप्रा सवार होऊन दिली दरवाज्याने शुक्लतीर्थाचे रस्त्यानें येक प्रहराचे अमलात जनवाडे येथें दाखल जाले. रा। छ. २२ जाखर हे विज्ञापना.

छ २८ जाखरी डाकेवर.

श्री.

पौष व ३० शुक्रवार शके १७१५ ता. ३१ जानेवारी १७९४.

श्रीमतरावसाहेब यास हवाल्याचे पत्र

वरील पत्राचा पृष्ठाक २६२ आहे. पुढें ३०६ पावेतो पृष्ठें उपलब्ध नाहींत. सपादक.

माघ वा १२ गुरुवार शके १७१५ ता २७ फेब्रुवारी १७९४

+ + + रुदौला व अजिमुदौला यांच्या नजरा जाल्या. नाच रागरग पाहुन येक प्रहर साहा घटिकेस जनवाडयास दाखल जाले. छ २० रोज शुक्रवारीं दोन घटिका दिवसा नवाब नदीकडे जाऊन माशाची शिकार करुन दोन प्रहराचे अमलात आले. दारकोजी पाटणकर यास इस्तकबाल बवर्चीखान्याचे दारोगे यास पाठविले. रात्रीं साहा घटिकेस नवाब दौलाचे मकानास आले. दौला व पागावाले व अर्जबेगी व मुनपी व रायेराया वगैरे मामुली इसमाची सलाम जाला. दारकोजी पाटणकर याची मुलाजमत होऊन अकरा इसमाची नजर जाली. हषमतजगाचे पुत्रास मातमपुरसी तीन पारचे कारचौबी दिल्हे. कंचन्याचा नाच होता. दौलासीं बोलणे होऊन येक प्रहर दोन घटिकेस बरखास जाले. छ. २१ रोज मदवारीं प्रातःकाली नवाब नदी किनाऱ्यास गेले. सैर करून एक प्रहर तीन घटकेस जनवाडयास आले. तीन प्रहरास फिरोन नवाब सवार होऊन गेले. दौला हुकमा-बमोजीव आपले चावडीवर गेले. रात्रीं नाच, रोशनी, आतषबाजी जाली. छ. २२ रोज रविवारीं प्रातःकाळीं मेद उमरखा यानें मांस घेऊन गुज-

राणिले प्रहराचे अमलांत जनवाडयास आले येक प्रहर पांच घटिका दिवसां स्वाबगामध्यें नवाब बरामद जाले जेगु व मनुचा सलाम जाला छालन हजामाची याद केली तो हजर हजामत होऊन दोन प्रहरास बरखास जालें खेदीखानास इस्तकबाल मुजाहिदु दौलास पाठविलें च्यार घटिका दिवस राहात नवाब जनान्यासहित स्वार होऊन शिकारीस नदीकडे गेल छोटी खानाचे पुत्रास मातमपुरसी तीन पारचे दिले महमंद हुसेनखा घटाल्या तालुक्यांतुन दोनसें स्वारानसीं लस्करात आला अर्ज जाला छ २३ रोज सोमवारीं येक प्रहर च्यार घटिका दिवसा नवाब जनवाडयास आले दौलांनीं कदुरीची तयारी करुन अर्जी पाठविली त्याजवरून दोन प्रहर दोन घटिका दिवस नवाब दौलाचे येथें आले भोजन होऊन दोन प्रहर च्यार घटिकेस दौला व मीर आलम व पागावाले वगैरे इसमांचा सलाम जाहला नाच रागरंग पाहुन येक प्रहर येक घटिका रात्री हवेली गेले छ २४ रोज मगळवारीं तीन घटिकां दिवसां नवाब स्वार होऊन नदीकडे गेले च्यार मासांची शिकार करून येक प्रहर साहा घटिकेस आले तीन प्रहरास दौला येकरामु दौलाचेथें जाऊन आले मगरबाचे समई नवाब येकरामुदौलाचे घरास गेले दौलाही हजर जाले नाच रागरंग पाहुन बरखास जाले येक प्रहर दोन घटिकेस हवेलीस गेले छ २५ रोज बुधवारीं दोन घटिका दिवसां रथामधें नवाब स्वार होऊन इसलामपूरचे नाल्याकडे गेले सीकार न होतां येक प्रहर साहा घटिकेस फिरोन आले मीर पोलादअली व सुभानअली व जुल फुकारअली तिघे साहब जादे यांचे वकीले हैदराबादेहुन आले बखतमलाचा दस्तपत्र भेटा, सत्रष तुफान जती करविलें रा छ २६ रजब हे विज्ञापना

श्री

माघ व १२ गुरुवार शके १७१५ सा २७ फेब्रुवारी १७९४

विनंती विज्ञापना रणदुल्लाखान फारनुल्कर यांचें पत्र दौलास आलें त्यात वर्तमान लिहिलें कीं टिपु पट्टणाहुन निघोन मांगडीस आला तेथील किल्याचा बदोबस्त करुन बागेरुलास दाखल जाल्याची बातमी आली पुढें

कोणीकडे इरादा करील नकळे! करनुल बाब्त पेषकसीचा जाबसालही त्याचे चित्तांत आहे, तेव्हां कसें पडेल? याप्रो भयाभित होऊन लिहिले तें पत्र दौलांनीं वांचून पाहून बोलले कीं 'आता टिपु पासोन भय वागवावें ऐसें नाहीं. अथवा त्यानेही इकडील भयाचा अंदेश करावा ऐसें राहिलें नाहीं.' याप्रो बोलले. उगेच वर्तमान समजण्यात आलें त्याची विनती लिहिली असे. रा छ २६ रजब हे विज्ञापना.

श्री.

माघ व. १२ गुरुवार शके १७१५ ता. २७ फेब्रुवारी १७९४.

विनंती विज्ञापना. साप्रत लस्करांत धारण वजन पक्के

| | |
|---|---|
| ८।६ | जोरी दादरी |
| ८।७ | बाजरी |
| ८।१ | गहू |
| ८।१ | तांदूळ मोठे |
| ८।९ | हरभरे |
| ८।३ | दाळ तुरीची |
| ८८१॥। | तूप |
| ८८३ | तेल |
| ८। | मुग |
| ८।५ | उडीद |
| ८। | मीठ |

सदरहु प्रमाणें धारण छ २९ रजबीं आमखास बाजारात जाली. यापूर्वी च्यार दिवसामागे या निरखाहून कमी सेर दीड सेर धारण होती. ती हल्लीं महसुलात अडीच आणे सूट पडली, सबब ताकीद करोडे वगैरेस होऊन धारण हाली असी आहे. याजहुनही पुढे सेर दोन सेर जास्त करावी असी ताकीद आहे. रा छ. २६ रजब हे विज्ञापना.

छ २९ रजबीं संक्रमणाचे तिळाचा जाब निवाजी
ना यापासीं जिल्हा

श्री

फाल्गुन शु. १ रविवार शके १७१५ ता २ मार्च १७९४

श्रीमंत राजश्री————————राव साहेब

——स्वामीचे सेवेसी——————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनंती विज्ञापना। ता। २९ माहे रजब पर्यंत मा। जनवाडा येथें स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. सरकारांतून छ १० माहे आखरचें पत्र सादर जालें तें छ १९ माहे मारी पावलें "त्यांत मकर संक्रमणाचे तिळ शर्करायुक्त पा। आहेत, घेणें" म्हणोन आज्ञा येसीयास पत्र व संक्रमणाची थैली सिरसा वंदन करून स्वामीशेषामृतसंतोषसंपन्न सेवक सनाथ जाला सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

रा छ ४ माहे शाबान रवानगी डांकेवरुन

श्री

फाल्गुन शु ६ "क्रवार शके १७१५ ता ७ मार्च १७९४
श्रीमंत रावसाहेब यांस मामुली हवाल्याचें पत्र.

श्री

फाल्गुन शु ६ शुक्रवार शके १७१५ ता ७ मार्च १७९४

विनं । विज्ञापना दौलाची नात सैफनमुल्क यांची कन्या गफुरजंगाचे टेकीपार न जाली ती मीर पोलादअली सिकंदर ज्याहा बाहादुर साहेब यांदे यांस देण्याचा निश्चय होऊन छ २० माहे रजबीं पखतखोरी जाली नबाब दौलाचे घरास आले जनानाही समागमें होता सारवतखोरीचा समारंभ दौलानीं नबाबास व माहालांत नजरा केल्या सिकंदर ज्याहा यांस चढा यापाचे खाने पोषाग व जवाहीर सरपच जिगा कंठी व मुग भुजबंद या

मो मीर आलम व अर्जबेगी या समागमे पाठविला. पादी छ. १९ माहे षाबानापासून शुरु होणार. सैफनमुलुक यांची दुसरी कन्या हरम ह्मणजे राखीचे पोटची ते असद अलीखानाचे पूत्रास देण्याचा नेम धरुन त्याचीही शरबतखोरी व चढावा छ मारींच जाला. रा छ. ४ माहे पाबान हे विज्ञापना.

श्री.

फाल्गुन शु ६ शुक्रवार शके १७१५ ता. ७ मार्च १७९४.

विनंती विज्ञापना. सिकदर ज्याहा मीर पोलाद अली याची षादी व्हाव-याची याचा समारंभ भारी होणार. जनवाडा येथे जागा प्रशस्त नाहीं. सबब बेदर येथे मंगळवार पेठेत जाऊन राहावे. तेथे पादी व्हावी ऐसा बेत ठरला आहे. येथुन छ. ९ साबानीं कुच करून मौजे चिलरगी पो कारिमुगी येथें पांच सात दिवस राहावें; तेथुन मंगळवार पेठेंत जाऊन राहावे ऐसें वाटत आहे. ठरेल त्याप्रमाणे विनती मागाहुन लिहिण्यात येईल. रा छ० ४ माहे पाबान हे विज्ञापना.

श्री.

फाल्गुन शु ६ शुक्रवार शके १७१५ ता ७ मार्च १७९४.

विनंती विज्ञापना. नबाबाचे सरकारातुन सवाई नाईक पुण्यास पेशजी पुण्यास गेला होता. तो तिकडुन येथे छ. ३० रजबी आला. राजश्री कल्याणराव व बाबाराव गोविंद याचीं पत्रे समागमे घेऊन आला तीं दौलास देऊन दौलाचे व सवाई नाइकाचें बोलणे च्यार साहा घटका जाले. त्याजवर दौलानीं नबाबास अर्जी पाठविली त्याजवरुन सवाई नाइकास घेऊन येणें ऐसा हुकुम जाल्या बमोजीब दौला नाइकास आपले बराबर घेऊन नबाबाकडे गेले. नबाबानीं सवाइ नाइकास वर्तमान विच्यारिले. यानें अर्ज केला. कल्याणराव व बाबाराव याचीं पत्रे दौलांनीं दाखविलीं. त्याजवर दोन घटका दौलासीं खिलवत जाले, सवाई नाइक नासिक प्रांताकडे गेला होता ह्मणोन ऐकण्यात. रा छ ४ षाबान हे विज्ञापना.

श्री

फाल्गुन शु ६ शुक्रवार शके १७१५ ता ७ मार्च १७९४

विनंति करनुळ संस्थानचा आधिकार अलफखान याजकडे जाला त्याज कडुन रणदुलाखान येथें येऊन करनुळास गेल्यानंतर अलफखान व रणदुलाखान या उभयताचें वयमनस्य येऊन सांप्रत रणदुलाखान व अकबर अलीखा ह्मणोन रणमस्त खानापासुन मातवर त्याचे सल्लाह मसहल्तीत होता त्यास व मुस्तफाखान यां त्रिवर्गास अलफखानानी कैद केलें लोकांस नित्य उपद्र(व) तालुक्याची खारावी कुणी चांगला राहिला त्यास नागवणें याप्रमाणें जाल्मी व जलाली(ची) चाल अलफखानाची ऐसें वर्तमान नबाबाकडे आले रा छ ४ पावान हे विज्ञापना

श्री

फाल्गुन शु ६ शुक्रवार शके १७१५ ता ७ मार्च १७९४

विनंती विज्ञापना चेनापटणाहुन व्यकट रामदीक्षित यांजकडील अकबरा दोन आल्या त्या रवाना केल्या आहेत राजश्री गोविंदराव भगवंत नेवेसीं प्रविष्ट करितील अवलोकनें मार ध्यानांत येईल उत्तरा विषई आज्ञा जाली पाहिजे रा छ ४ पावान हे विज्ञापना

श्री

फाल्गुन शु ६ शुक्रवार शके १७१५ ता ७ मार्च १७९४

ता छ २९ माहे रजब ते छ ४ सावान पावेतों मामुली अखबार या अखबारांत विशेष महत्वाचा मजकुर नाहीं मार्गे आलेल्या शादीचा थोडासा उल्लेख आहे स

छ १० साबानी शकेश्वर

श्री

फाल्गुन शु १२ गुरुवार शके १७१५ ता १३ मार्च १७९४

श्रीमंत रावसाहेब यांस मामुली रवान्याचें पत्र

विनंती विज्ञापना छ २ सावान गुरुवारी रात्री दौलाकडे मी सरदारचें पैलोपत्र सिंदे प्रकर्णीं ?? यान आ?? नें ???????? ??? ??? आ??दी

होते. मी आल्याची इतला दोलानीं नबाबास अर्जी पाठविली. त्याजवर दस-खत होऊन आलें कीं बरामद जाल्यानतर फलाण्यास आम्हाकडे पाठवणें. नबाब दरामद होऊन चोपदार येताच मी नबाबाकडे गेलो. जाते समई दौला बोलले कीं हाजरतीपासीं जाऊन तेथुन फिरोन मजकडे आपण यावें. नबाबाकडे गेलो दरबार जाला होता. नाचही होत होता. सिकदर ज्याहा साहेब जादे याचे पादीच्या निश्चय जाल्याच्या नजराही लोकानी केल्या. सरकारचें येलीपत्र नबाबास प्रविष्ट केलें त्याजवर नबाबाचें बोलण्यात आल्याची ता॥ विनति अलाहिदा पुरवणी पत्रीं लि॥ आहे त्यावरुन ध्यानात येईल. रा॥ ता. १० बाबान. हे विज्ञापना.

श्री

फाल्गुन शु १२ गुरुवार शके १७१५ ता १३ मार्च १७९४

विनती विज्ञापना. नबाबानीं बोलण्यात आणिलें कीं ' सिकदर ज्याहा बाहादुर याची पादी करण्याचा निश्चय जाला. त्यास या पादीचे समारंभात राव पंत प्रधान यानी येण्याची येनसलाह आहे. राव पंत प्रधान यास पाहावें हे बहुत दिवसापासोन आमची खाहेश आहे. त्या गोष्टीचा इत्यफाक या पादीचे खुषीचे समारभात घडावा हे फार चागले येसें समजोन राव पत प्रधान यास आम्हीं पत्र या मुकदम्याविषईं तयार करविलें रवाना होत आहे. तुम्हीं हे मरातब मुफसल लेहुन त्याचे येण्याची इतला लौकर करावी. दोन्हीं रियासती पुस्तैन पासोन येक जुदाई नाहीं. त्या अर्थी राव पंत प्रधान यांनीं अनमान न करिता पादीस जातीनें यावें हे त्यास लाजम आहे. याप्रा॥ बोलण्यात आलें. या प्रकर्णी पत्रे यानी राजश्री रघोत्तम राव याजकडे रवाना केलीं आहेत. त्यास विनंती कीं येविषीं बोलण्याचा प्रकार आज्ञा येईल त्या प्रा॥ बोलण्यात येईल. 'आपले सरदार व मुतसदी सुधा येऊन लग्नाची शोभा करावी ' ह्मणोन हौसेनें सागुन बोलले कीं 'याचे उत्तर लौकर आणवावें. तोंपर्यंत षादीची तारीख मुकरार करीत नाहीं. च्यार दिवस षादी लाबवावयास येईल. चिंता नाहीं. 'येण्यास फार दिवस लागतील, आणि

शादी तर लौकर होणार' असें कदाचित ह्मणतील तर त्यांचे येण्याचा सुमार पाहुन मग तारीख ठरण्यांत येईल पंत प्रधान यांचे येण्यांत दोन खुब्या येक तर, जन्म त्याचा जाला त्या दिवसापासोन त्यांस पाहावें ही उत्कंठा दुसरें, त्यांचे पादीस सिकंदर ज्याहा गेले, यांचे पादीस राव पंत प्रधान आले दोंही दौलतीची असी याहदीयेत याचा लौकिक दिगांत होईल विलायेत पर्यंत सर्व दौलतदारानीं आश्चर्य मानावें, ही दुसरी खुबी यास्तव येणें व्हावें याची इंतजारी आहे याप्रा तात्कार लिहुन लौकर उत्तर आणव म्हणोन सांगितलें, त्याजवरुन लिा आहे सदरहुचा जबाब विस्तारें करुन यावा त्या अन्वयें यांसीं बोलण्यात येईल रा॥ छ १० पावान हे विज्ञापना

श्री

फाल्गुन शु १२ गुरुवार शके १७१५ ता १३ मार्च १७९४

विनंती विज्ञापना दौलाचे बोलण्यांत आलें कीं ' सिकंदर ज्याहा बाहदुर साहेबजादे यांचे पादीस श्रीमंतांचें येणें व्हावें येविषीं हाजरतींनीं श्रीमंतास पत्र लिा आहे त्यास त्यांचें येणें घडावें हें येन सलाह आहे येण्यास कांहीं अनमान करतील कीं काय ? म्हणोन विच्यारिलें मी उत्तर केलें कीं " दोन्ही सरकारची याहदीयत व येकदिल, त्या अर्थी अनमान कशाकरितां व्हावा ! मगर काहीं अडचण असल्यास नकळे ' दौला बोलले कीं ' टिपु व इंग्रज या दोन दौलतदारासीं सलूख व फजल इलाही घरचाही बदोबस्त खातरखा कोणतीही अडचण नाहीं अशा प्रसंगी श्रीमंतांचें येणें होऊन परस्परें मुलाकात व पादीचा समारंभ यांत हाजरतींची चित्तापासोन खुषी व सर्वांत चांगलें दिसेल पत्रें रवाना होतात व तुम्हीही हा मा श्रीमंतांस त्याहाचा पादीस येण्याची इच्छा लौकर व्हावी हाजरत इंतजारी करितात " यामों दौलाचे बोलण्यांत आलें रा॥ छ १० पावान हे विज्ञापना

श्री

फाल्गुन शु १२ गुरुवार शके १७१५ ता १३ मार्च १७९४

विनंती विज्ञापना नवाब जनाबत्याहून कुच करुन छ १९ सामानी

वेदर येथील मगळवार पेठेंत येणार. कारखान्यास तमाम हुकुम जाला. षादीचा समारंभ होणे त्यास जागा प्रशस्त पाहिजे. वेदरचे किल्यात पहिले नवाव होते ते जागा अडचणीची, व जनवाडा येथे केवल संकोचित, जाणून मंगळवार पेठ येथील झाडुन लोकाची घरें खाली करऊन नक्षा करुन राज्याजीनीं आणोन दाखविला. नागझरी पोटीं घेऊन भोवता वाडा दीड कोस दोन कोस पर्यंत बसउन वंदोवस्त करविला. साहेव जादे याची षादी रमजानचे महिन्यांत व्हावी. अद्याप पत्राल! अद्याप मुकरर जाले नाही. परंतु तयारी सरंजामाची ज्यावज्या ताकिदी करुन होत आहे. मंगळवार पेठेत नवाव आल्यानंतर काहीं दिवस राहुन वारोचीस जाण्याचाही बेत आहे. तेथील पैर पिकार करुन फिरून मगळवार पेठेत येणार. तदनंतर षादीची शुरुवात, येसेही आहे. होईल त्याप्रा। विनंती लिहिण्यात येईल. नवाव बोलले कीं 'मंगळवार पेठेत तुमचे येथे आह्मी राहावयास येतो'. मी उत्तर केले की 'आम्हीं राहतो तेथे आपण येऊन षादी कारतात याजपेक्षां अधिक काय आहे! ज्या जाग्याचे नसीव थोर म्हणोन हजरतीच मनात आलें.' हे बोलणे येकुन संतोष मानला. राजे रायेराया यास सांगितलें कीं किल्यातील हवेल्या यास राहावयास खाली करुन द्याव्या. त्याजवरुन देशपांडे आदिकरून मुले माणसे काढावयाचा झिकर. ती जागा पाहावयास मी गेलों होतो. देशपांडे याचे घरचे पनास मनुष्य कुटुंबाचे आहे. बायका पोरें येकच कलकलाट जाला. त्यानीं निघोन दुसरे ठिकाणीं राहावे तर वायेकांपोरे आणि असबाव कोठें ठेवावा? ठिकाणा नाही! सरकारची तर सक्ती! तेव्हा त्या देशपांडे याचे मीं समाधान केले. त्याचे दुःख पाहावेना! बाहेर येक आंबराई पाहून डेरे देऊन तेथे राहिलों. नवाबानी सांगून पाठविले कीं घरात जाऊन राहिला कीं नाहीं? जर नाही ह्मणावें तर वाईट मानतील कीं 'आह्मीं मगळवारात याचे जाग्यावर राहिलो हें वाईट वाटले, याजकरिता बाहेर राहिलें.' यास्तव सांगोन पाठविले कीं त्या जाग्यात पडझड फार जाली. मरमत करावयाची, नूतं तयार होण्यास चार दिवस लागतील. याजकरिता

आमराईत राहिलें यात्रा गरीबगुरबा यांस अतिशय उपद्रव! लिहिण्यात किती त्याहावें ? सीमा जाली ! रा छ १० माहे हे विज्ञापना

श्री

फा. चैत्र शु. १२ बुधवार शके १७१५

विनंति विज्ञापना सिकंदर ज्याहा साहेब यांचे पादी सर्वघाने यांनी पत्रे पाठविण्याची योजना केली —

१२ पुणियास

१ सरकारांत
१ नाना
१ हरिपंततात्या
१ आपा बळवंत
१ दौलतराव सिंदे
१ आबा चिटणीस
१ कल्याणराव कदवे
१ अंबाबाई कल्याणराव यांची स्त्री व बायाबाई कन्या यो। २
१ गोविंदराव भगवंत
१ बाबाराव गोविंद
१ रघोत्तम हैबतराव

१२

३ नागपुरास

१ रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा
१ भवानी काळो
१ आनंदराव नरसिंह

३

५ इंग्रजांस

१ मिस्तर ज्यानसोर जनराल कलकत्तेकर.
२ गहिले वकील गेले तेथे त्यांस

१ मिस्तर हालन.

१ मिस्तर ज्यानसेन.

१ मिस्तर किनवी दिलावरजंग.

---

३

१ चेनापटणचे गौरनरास.

---

६

१ महमद अली वालाज्याहा बाहादुर यास.

४ टिपुकडे

१ टिपु सुलतान

२ त्यांचे पुत्र दोघे चेनापटण येथें त्यास.

१ गुलामअली.

१ रजाअली.

---

४

यासी पत्रें तयार करविलीं. पो कांहीं रवाना जालीं व होणार. याशिवाय करनुळकर आदिकरुन सर्वांस पादीस येण्याचीं पत्रें सिद्ध करविलीं आहेत. रा। छ. १० षावान हे विज्ञापना.

**श्री.**

फा. ~~चैत्र~~ शु १२ बुधवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. करोडगिरीचें काम कृष्णमा याचा पुत्र व त्याचे नायब हासन अलीखा याजकडे होतें तें तगीर करुन सिदी इमाम याचा साडू नूर महमदखा यांजकडे करार होऊन छ ५ सावानीं त्यास करोडगिरीचा खिलत दिल्हा. करोडगिरी व पंचोत्रा दोन्हींही कामें नूर महमदखां याजकडे जालीं. रा। छ. १० षावान हे विज्ञापना.

श्री

फा [redacted] शु १२ बुधवार शके १७१५

विनंती विज्ञापना दौलतराव सिंदे यांनीं दौलास व नबाबास पत्रें कारकुनासमागमें कल्याणराव व बाबाराव यांचे पत्रासहित हरराव यांजकडे आलीं त्या कारकुनास प्रथम दौलासीं भेदऊन छ ७ सावानीं नबाबाची मुलाजमत केली पत्रें प्रविष्ट करून जिनस, नबाबास पोपाग, बिलोरी रिकाब्या, प्याले, व मोमबत्तीचे दुपोला येक शाल्ये याप्रो जिनस गुजरा णिली, ऐसें वर्तमान ऐकिलें हरराव याचे मारफात गुजरलें त्याजवरून बोलिल्यांत कीं दौलतराव यांचकडुन आलें मनांत येण्यास हेंच कारणही आहे रा। छ १० सावान हे विज्ञापना

श्री

फा [redacted] शु १२ बुधवार शके १७१५

छ १ ते छ १० सावान पावेतों नबाबाची मामुली अखबार

श्री

फा [redacted] शु १२ बुधवार शके १७१५

—श्रीमंत राजश्री ———————— रावसाहेब

—स्वामीचे सेवेसी ————————

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना ता। छ १० माहे सावानपर्यंत मु॥ जनशाहा येथें स्वामीचें कृपावलोकनें-करुन सेवकाचे वर्तमान यथास्थित असें विशेष सरकारांतुन छ २६ माहे जमादिलाखरचीं पत्रें, नबाबाचे पत्राचा जाब—ईमज प्रकर्णी दफातीचा—सहित रवानगी जाला तीं पत्रें छ ४ रजबीं पावलीं आज्ञेप्रो खरीतापत्र प्रविष्ट करून यासंबंधें मजकुर यांसीं बोलण्यांत आला सरकारचे थैलीपत्राचा जवाब मागितला तजवीज ठरून तयार करून देवितों ऐसें बोलिले त्यास त्याजवर इकडून जबाबाविशई निकड केली नाहीं जबाब लौकर घऊन पाठविण्याची आज्ञा आल्यास निकड करून जबाब घेऊन रवाना करीन सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

ने फळेत असून बोलिले कीं तुम्ही बोलतों हें दुरुस्त आहे रा छ मार सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

श्री

फा चैत्र शु १२ गुरुवार शके १७१५
रा छ ११ माहे सावान डांकेवरुन रवानगी

श्री

श्रीमंत रावसाहेब यांस मामुली हवाल्याचें पत्र

विनंती विज्ञापना नबाब छ ११ सावान शुक्रवारीं जनवाड्याहुन च्यार घटका प्रथम दिवसा स्वार जाले खवासीमध्यें दौला व मीर अलम हाथीरव मखमली लाल अंबारीमध्यें होते प्रहर दिवसा बेदर येथील मंगळवार पेठेंत च्यार पांच मुकाम करुन बोरोचीस जाण्याचा मनसबा आहे तेथुन रंगा पेठेसही जावयाचा बेत रंगा पेठ ह्मणजे हैदराबादचा नीट रुख आहे अद्यपा कोणता येक निश्चय नाहीं ठरेल त्याप्रमाणें विनंती मागाहुन लिहिण्यांत येईल रा छ ११ माहे सावान हे विज्ञापना

श्री

फा चैत्र शु १२ गुरुवार शके १७१५

विनंती विज्ञापना अदवानीस नबाबांनीं मुस्तकीमजंग यांस मोजदाद करुन पाठविण्याकरितां रवाना केलें त्यांनीं जाऊन मोजदाद खजाना व नगदी, जवाहीर, सोनें, रुपें, हाथी, घोडे, पागा, रथ, हत्यारें सुधां मोजदाद करुन याद पाठविली चौपन्न लक्ष रोकड, सिवाय सोनें, रुपें व जवाहिर दागिने, घोडा पागेची येकंदर चौदास, पैकीं सातसें सरम व सातसें निरस, हाथी पस्तीस, तोफा वगैरे कुल आसबाब अदवानी व रायचूर संस्थानचा तीन करोडीचा मालियत लिहिली आली रायचूर येथें सिबंदी मोहबतजंगाकडील स्वार व पागेचे बारगीर व गाडद व प्यादे यांनीं रायचुरचे किल्याचे दरवाजे बंद करुन गोळ्या वाजवितात तलबेचे ऐवजाचा फडशा जाल्यासिवाय किल्याचा दखल देऊं नये असा अटा बांधिला आहे हें वर्तमान आल्यावरुन येथून यांनीं असद

नात, नेर्माबंदी बेगम मोहबतजंग यास दिल्ही तिची कन्या, देण्याची योजना केली, व तेगजंगाची कन्या ज्याहादार ज्याहासाहेब जादे यांस फरावी ऐमा बेत ठरऊन अजमनुल्मुल्क सरबुलंदजंग यांस सांगितलें त्यांनीं अर्ज केला कीं ' हाजरतीसीं शरीरसंबंध करणें आमची काय योग्यता आहे!' नवाबांनीं सांगितलें 'दोन्हीं मासींचा खितास येईल तसें करीन तुम्हाकडे काय आहे!' याप्रों होऊन दोन्हीं याद्या करावया ऐसें आहे परंतु तेगजंग यांची मायको मुलाची मातुश्री—हें कबुल करणार नाहीं, असें वाटतें मग पाहावें रा छ ११ साबान हे विज्ञापना

दफे अलाहिदा

श्री

फा—वैश शु १२ गुरुवार शके १७१५

श्रीमंत राजश्री———————————रावसाहेब

स्वामीचे सेवेसीं———————————

विनंति सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक सा नमस्कार विनंति विज्ञापना ता छ ११ माहे पावानपर्यंत स्वामीचे कृपेकरून मुा बेदर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष कितेक मार राजश्री गोविंदराव भगवंत यांचे पत्रांत लिा आहे स्वामीसेवेंत विनंति करतील त्याजवरून ध्यानास येईल अधिक उणे शब्द असतील त्याविपई क्षमा असावी पत्रांतील मार मनन होउन उत्तराविपयीं आज्ञा जाली पाहिजे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

विनंति विज्ञापना येसीजे नवाब निजामली खान यांनीं सवाई नाईक म्हणोन येक जासुदाचा नाइक पुण्यास व नागपुरास पाठविला, येविपींची विनंति पेशजी सेवेंत लिा आहे. नाईक मार निकडे येऊन अजिमुदौला यांचा शोध लाऊन येथें आला त्यानें मुषीरुल्मुल्क व नवाब यांस सांगितलें कीं अजिमुदौला यांस श्रीमंतांनीं आश्रय दिल्हा आहे गोविंदराव कृष्णही या कामांत आहेत कोणी कारकुन व दुजे पुण्याहून गेले होते या

११ दफे चटण्या

१ कोथिंबिर, लसण, कांदे

१ तिळाचा.

१ जवसाची

१ कारल्याची

१ अंबसलाची

१ हरभरे याचे डाळीची

१ उडदाचे डाळीची

१ आल्याचा

१ फक्त मिरच्याची लाल

१ लिंबे

१ न्यामत मिरच्याचें

—

११

१ आल्याचे लोणचें.

१ धु

१ साखर

—

९३

सदरहु प्रमाणें सरंजाम नवाबांकडे व दौलास व आपजाउलमुलूक यांस छ २० पाठवान

श्री

पौष शु १ शनिवार शके १७१६

विनती विज्ञापना आपल्या उलमुलूक नवाबांचे हुकुमप्रमाणें आमचे डेऱ्याम आले त्याजला त्याफन केले

करीता दौलतीनीं हरराव यांसीं बोलण्यांत आणुन रवाना केलें कन्याणराम व बाबाराव यांसी सर्व मरातब बोलुन अवा चिटणीस यांचे विद्यमानें सिल सिला व नवीन तहनामा पकेपणें करुन घ्यावा, त्या हरराव यांची रवानगी केली जितका प्रयत्न तितका करुन पाहावा हें कारण कुफिया समजण्यांत आलें रा छ २९ पावान हे विज्ञापना

श्री

चैत्र शु १ शनिवार शके १७१४

विनंती विज्ञापना दौलाचे बोलण्यांत आलें की सिकंदरज्याहाबाहादुर सा हेबजादे यांचे पादीकरितां श्रीमंतांनी येण्याविषईं हजरतीनीं पत्रें पेशजी रवाना केलीं त्यास फार दिवस जाले, अद्याप त्यांचे जबाब आले नाहींत नबाबाची इंतजारी हजरत करितात श्रीमंतांस तुम्हीं विनंती लेहुन पादीचे मुकदम्याच्या पत्राचे जबाब बसबब लौकर येत ऐसें टप्यावर लौकर लिहावें, ह्मणोन बोलण्यांत आलें त्यावरुन विनती कीं येविषईं आज्ञा येईल त्याप्रों यांसीं बोलण्यांत येईल उत्तराविषईं आज्ञा सत्वर जाली पाहिजे रा छ २९ पावान हे विज्ञापना

श्री

चैत्र शु. १ शनिवार शके १७१४

विनंती विज्ञापना गजेंद्रगड तालुकियापैकी घोरपडे यांचे तशरुफात तालुका आहे त्यास श्रीमंताचे सरकारचीं व राजश्री परशरामपंतभाऊ यांचीं पत्रें पेशजी दिल्हीं असता इकडील तालुका वागुवस्त करीतात यांकरितां अलीहासनखान यांस जमियत सुद्धां रवाना केलें यांचीं इतला लिहिण्याविषईं तुह्मांस सांगितल्याप्रमाणें तुम्हीं लिहिलें असेल यास फार दिवस जाले अद्याप श्रीमंतांकडुन जबाब आला नाहीं हल्लीं पापणापंत अमील तो गजेंद्रगड यांचें पत्र आलें कीं पेशजी तालुक्याचे बंदोबस्तीकरितां पुणियास राय राव ह्मणोन कारकुन पाठविला होता दोन तीन महिने तेथें राहुन श्रीमंताचे सरकारची ताकीदपत्रें गडकरी यांस आणिलीं ती दिल्हीं असतां ठाणीं

देण्यास दिकत. त्यावरुन साप्रत नीलवंगल येथील किल्यास अलीहासनखान यानीं मोर्चे दिल्हे आहेत. याप्रो लिहिलें आहे म्हणोन दौलांचें बोलण्यात आले. रा छ २९ षावान विज्ञापना.

श्री. 1895

चैत्र शु. १ शनिवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. आदवनी रायचुर येथील मोजदाद करण्याकरितां येथुन यांनीं मुस्तकीमजंग व मिर्धे सवाउक यांस रवाना केले ते जाउन मोजदादीची फर्द पेशजी नवाबाकडेस पाठविली. परतु रायचुरात मोहवत जंगाकडील सिबंदी स्वार बारगीर गाडद व प्यादे यांनीं तलबचे यैवजाकरितां हंगामा केला. किल्याचे दरवाजे बंद केले. हें वर्तमान मुस्तकीमजंगानीं लिहिलें. त्यावरुन असद अलीखान याची रवानगी फौज जामियत सुद्धां रायचुराकडे केली. खान मार येक दोन मजल गेले. इतकियांत मुस्तकीम जगाची अर्जी नवाबांस आली की ' रायचुरातील सिबंदीचा गवगवा होता तो सफा जाला. तोड पडली. खजीना जवाहीर सुद्धां वगैरे सरजाम घेऊन मी निघोन लौकरच हाजुर पोंहचतों' या प्रो अर्जी आल्यावरुन असदअलीखानास यांनीं पत्रे पाठऊन माघारे आणविलें. खान मार छ २३ रोजीं बेदरास आले. मुस्तकीमजग मोहबतजंगाकडील अनवरादौला बहादीखान कारभारी या समागमें घेऊन छ २७ रोजीं बेदरास आले. घोडीं व उंटें व यैवज जवाहिर कापड व सिलेखाना वगैरे सरंजाम आला. बतीस हाथी रायचुरचे व येथुन नवाबाकडून बावीस हाथी भारबारदारीस गेले. येकुण चौपन हाथी व सरजाम सोनें, रुपें, नगदीं यैवज जवाहीर भरुन आले. रा छ २९ षाबान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शु १ शनिवार शके १७१५.

विनंती विज्ञापना. मगळवार पेठेंत नवाब दाखल जाल्यानंतर तमाम

कारखान्यास चराईस जाण्याचा हुकुम जाला त्यावरुन फिल्खान, पुतरखाना व वैल, रथ, गाड्या, उंटाच्यांचें व जिनसीकडील येथुन पंधरा वीस कोस कोंकस प्रांतीं व कुहीर वगैरेकडे रवाना जाले रा छ २९ माहे हे विज्ञापना

श्री

चैत्र शु १ शनिवार शके १७१५ ९

विनती विज्ञापना दौलांनीं बोलण्यांत आणिलें कीं 'हे दिवस होळीचे आहेत आपण मंडळी सुधां येथें येऊन नाच रागरंग पाहावा' यामों फार आग्रह केला त्यावरुन छ १९ माहानीं दौलाकडे रात्रीं गेलों दौलांनीं आपले हवेलीपुढें येक चबुत्रा हजार माणसें बसावया जोगा विस्तीर्ण केला आहे छ मारीं नवाब दौलाकडे येणार म्हणोन दौलांनीं राज्याजीचे जाग्यावर फर्श अलाहिदा करुन नाच रागरंग तेथें आम्हांस बसावयाची जागा केली इतक्यांत नवाबांनीं दौलांकडे सांगुन पाठविलें कीं 'आज आमचें येणें होत नाहीं तुमचा समारंभ होऊं द्यावा' त्यावरुन राज्याजीकडील जागा तयार केली होती तें राहिलें दौलाचे चबुत्र्यावरच नाच सुरु जाला राज्याजी आदिकरुन सर्व मंडळी व दौला होते अबीर कुमकुम्याचे खाने आणोन पुढें ठेविले त्याची मार जाली दोनप्रहर पर्यंत नाच रागरंग जाला रा छ २९ माहे हे विज्ञापना

श्री

चैत्र शु १ शनिवार शके १७१५ ९

विनती विज्ञापना शिमग्याचे दिवसांत पागावाले यांस नाच पाहण्याकरितां यांस आम्हीं बोलावीत असतो त्याप्रों साळमारीं घासीमियां व अजमखान व सर बुलंदजंग यांस बोलाविलें अजमखान घासीमया यांनी नवाबांची परवानगी घेऊन छ १८ माहानी रात्रीं आले नाच रागरंग जाला सर बुलंदजंग यांनीं सांगोन पाठविलें कीं हजुरची परवानगी घेऊन उदईक

---

१ दनी

येतो. त्याप्रो जंग मजकुर छ १८ रोजी आले होते. नाच पाहुन अतर पान दान देऊन रुसकत केले. रा छ २९ माहे पाव्रान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शु १ शनिवार शके १७१७-८.

विनंती विज्ञापना. कडपे प्रातीं जमीदार मुफसद यानीं जमियत धरुन हगाम केला. याचे वोभाट नवावाकडें आल्यावरुन असद अलीखान यास जमियत सुध कडप्याकडे वदो × × × ( पुढील पृष्ठे गहाळ झालीं आहेत. )पृष्ठांक २४९.

( गु ) लावाचीं फुले आलीं तीं गुजरलीं. रात्रीं दोन घटिकेस चौवी वगला उभा करविला. छ १४ रोजी सोमवारीं च्यार घटिका दिवसा नवाब बंगल्यामधे वरामद जाले. पागावाले व अर्जवेगी वगैरे लोकाचा सलाम जाला. नाच पाहुन प्रहराचे अमलात वरखास जाले. रात्री दोन घटिकेस दौलानीं सिकंदरज्याहा साहेब जादे यांस पोषाग येक खाने व जवाहिर किस्त येक व मिठाई पान फुले वगैरे सरजाम मुनीमुदौला समागमें पाठविला. तीन घटिकेस नवाब दौलाचे मकानास आले. दौला व मीर आलम व पागावाले व रामराया वगैरेचा सलाम जाला. कंचन्याचा नाच होता. दौला व मीर आलम यासीं बोलणे होऊन येक प्रहर च्यार घटिका रात्री वरखास जाले. छ १५ मंगळवारीं तीन घटिका दिवसा नवाब सवार होऊन नागझरीकडे गेले. सैर करून उमदा बेगमचे बागात आले. भोजन होऊन येक प्रहर साहा घटिका दिवसा हवेलीस आले. रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ १६ रोज बुधवारीं दोन घटिका दिवसा नवाब सवार होऊन शिकारीस चिते समागमें घेऊन गेले. शिकार जाली नाहीं. नागझरीस येऊन तेथें भोजन करुन आराम केला. ( प्र ) हरास हवेलीस आले. रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. तीन घटिकेस बगाल्यामध्ये नवाब बरामद जाले. पागावाले व अर्जवेगी वगैरेचा सलाम जाला, नाच कचन्याचा भाउचा व अतषबाजी व रोशनी जाली. छ १७ रोज गुरुवारीं पाच घटिका दिवसा नवाब नागझरीकडे सैर करुन येक प्रहर पाच घटिकेस आले.

रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ २१ रोज शुक्रवारीं दोन घटिका दिवसा वामणी वादशाहचे गुमजाकडे नवाब स्वार होउन गेले तेथून बंदे नवाबाचे वस्तादाचे गुमजापाशीं जाउन शंभर रु॥ पुढें ठेविले कबरेवर किमखावी चादर घातली फात्या देउन भोजन जालें दोन प्रहराचे अंमलांत हवेलीस आले रात्री दौलाची अर्जी गुजीरली छ २६ रोज मदवारीं च्यार घटिका दिवसा नवाब बागामधें जनान्यासहित गेले आपच्याउल्मुल्क दारोगे खर्चीखाना यास खाना यहतीयातीनें रावजीकडील घेउन येणेंयाचा हुकुम जाला. ते आले ते खाना घेऊन नवाबांकडे गेले भोजन जालें दोन प्रहरास हवेलीस आले रायचुराहून मुस्तकीमजग व अनवरदौला वगैरे आले. खजीना वगैरे सरंजाम अदवनी रायचुरचा आला. अर्ज जाला रा छ २९ पावेतो हे विज्ञापना

छ मारीं, दुसऱ्या प्रकर्णी येक पत्र

—श्रीमंत राजश्री रावसाहेब

—स्वामीचे सेवेसीं

विनंती —सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागाइत छ २९ माहे पावानपर्यंत मु॥ क्देर येथें स्वामीचें कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें इकडील कितेक वर्तमान अलाहिदा पत्रास लिहून सेवेसीं पाठविलीं त्याजवरून ध्यानांत येईल सांप्रत राजश्री नाना यांचे सांगण्यावरून रघोत्तमराव नबाबाकडील यांणीं पुर्णियाहुन नबावास व मुपीरुल-मुल्क यांस स्वराज्याचे कलमबदीचे फडच्याविसीं पत्रें लिहिलीं, त्याजवरून नवाबांनीं व कारभारी यांनीं मजकुर बोलण्यांत आणिला व अदवनीचे स्वराज्याचे फडच्याविसीं पत्र राजश्री नाना यांस नवाबांनीं पत्र लिहिलें व

कलमवदी प्रकर्णी गोविंदराव भगवंत यांस पत्र लिहिलें. हा सर्व मजकुर सविस्तर लिहिला आहे. राजश्री नाना सेवेंत निवेदन करतील, त्याजवरुन ध्यानात येईल. उत्तराविसीं आज्ञा जाली पाहिजे. सेवेसीं श्रुत हाय हे विज्ञापना.

रा॥छ २ माहे रमजान रवानगी टप्यावरुन.

श्रीमत रावसाहेब यास मामुली हवाल्याचें पत्र.

श्री.

चैत्र शु ३ गुरुवार शके १७१६.

विनती विज्ञापना. वेदरचे किल्यात नवाब पेशजी राहिले, त्या जाग्याच्या दुरुस्ती करुन दिवाणखाना व येक दोन मकाणें चांगलीं तयार केलीं. मंगळवार पेठ येथे नवाब छ ११ पावानी दाखल जाल्यापासोन वीस दिवस राहिले. साप्रत माहे रमजान. राजे याचा महिना. सैर शिकारीस जाणे येणें यांत लोकास तसदी. याजकरितां हा महिना किल्यात राहावें, येसी तजवीज ठरुन कुल असबाब छ १ रमजानीं किल्यांत रवाना केला. छ २ रोज गुरुवारीं पाच घटका प्रथम दिवसां नवाब हाथीवर पिस्ताई आबराईमध्यें सवार जाले. खवासीत दौला व मीर अलम उभयतां होते. सात घटिका दिवसा किले वेदरचे हवेलीत दाखल जाले. रमजानचा महिना किल्यात राहुन मागती मंगळवार पेठेंत येउन राहण्याचाही बेत आहे. मंगळवारांतील जाग्याचा बदोबस्त चौकी पाहारे आहेत. रा॥छ २ माहे रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शु ३ गुरुवार शके १७१६.

विनंती विज्ञापना. छ २ पावानीं रात्रीं दौलाकडे गेलो होतों. राज्याजी व रावरंभा वगैरे होते. दोन घटिका बैठक जाली. इतक्यात दौलाचे चबुत्र्यावर

फर्ष तयार होऊन नबाब आले बरामद जाले व मजली बोलाउन घेतले मीर आलम अम्द अलीखान वगैरे तमाम दरबारची मामुली इसमें होती. कितेकांच्या नजरा नवरोज्यामध्यें जाल्या असद अलीखानाचे पुत्रास खिताब मनसब वगैरे खानीचेही खिताब सर्फराजी जाली पुन्हा भांडाचा नाच होता नबाब मजकडे पाहुन बोलिले की तुम्ही खाना पाठविला तो बहुत पसंद त्यांपैकी येक येक पदार्थाचें वर्णन करुन तारीफ केली दौलाही त्यास अनुमोदन देत गेले दोन घटिका बैठक जाली लोदीखान वगैरे लोकांचे नज राची दाटी होती साहा घटिका रात्रीं नबाब बरखास जाले आणिखी बोलिले की येकवेळ बहुत पदार्थ असले ह्मणजें यथास्थित स्वाद सर्वांचा समजत नाहीं मी सांगुन पाठवीन ते वेळेस दोनतीन पदार्थ करुन पाठवीत जावे, ह्मणजे स्वाद समजेल जसी आज्ञा होईल त्याप्रमाणें पदार्थ करुन पाठवीन ह्मणोन बोलुन निरोप घेतला रा॥छ २ माहे रमजान हे विज्ञापना

श्री

विनंती विज्ञापना सरकारचे खरीतापत्र नबाबास माहादजी सिंदे यांचा काळ जाला त्याचे दौलतीवर दौलतराव सिंदे याची बाहाली सर्फराजी या प्रकारीं पुणेंहून आलें तें नबाबास प्रविष्ट जाल्याची विनंती पेशजी लिहिल्यांत आली सांप्रत सरकारचे पत्राचा जबाब नबाबांनीं थैली पत्र दिलें तें सेवेसी रवाना केलें आहे राजश्री गोविंदराव भगवंत प्रविष्ट करितील अवलोकनें मजकुर ध्यानांत येईल रा॥छ माहे पाबान हे विज्ञापना

फारसीपत्र व अनुवाद

... जवाब बनामे श्रीमंत राव पंडित प्रधान शहामत व बसालत म नियरा टवहत मैमनत मनीटरशान बन्तामकान नरसुरदार समुदे अनवार ... रि फम्र बशीर

मजमूंे इत्तिहाद [illegible] नामये मकूम [illegible] शुद. व कैफियते इंतिकाले राव सिंदिया बहादुर व पस्मांदे आंवाले राव दौलतराव सिंदिया बहादुर व नजर बर [illegible] के खुलूस व वसूके यिगानगत व दौलत ख्वाहीये मुनदर्का मस्तूर मुफस्सल व [illegible] आगाहीद. व नगारिशे कदीम परवरी व मुख्तार नमूदने राये मस्तूर [illegible] ममालिके हिंदुस्तान बजा व अज आइने सरदारी व कारदानी [illegible] दिरायत मुतजल्ली शुद. व इत्तिलाये इनमानी व मादिर्दौलत व मुकतजाय इत्तिहाद व यकजहती मवइज व खुशतर नमूद. पैवस्ते आगाहियता [illegible] व इरसाले रकाइमे इत्तिहाद इखलासमाइम मसरूर मुसाइब शुद. ज़ियादा अय्याम बकाम बाद

( सदर पत्राचा मराठींत अनुवाद )

श्रीमंत राव पंडित प्रधान बहादुर यांस जबाब आपलें कुशल असो. आपलें ऐक्यांनिदर्शक पत्र पोचलें. शिंदे यांचें निधन व तदनुषंगिक गोष्टींची बातमी, तसेंच राव दौलतराव शिंदे यांचे ठायीं असलेल्या आपल्या विश्वास व दौलतीच्यानी शिंदे यांची राजनिष्ठा वगैरे गोष्टी सविस्तर ( लिहून आलेल्या ) समजल्या. पुर्न कायम ठेवणें व उत्तरहिंदुस्थानातील बंदोबस्त मागील पुरुषाचे वारसास देण्याचा आपला संकल्प फार चांगला आहे. विशेषेंकरून त्यांचे अंगीं असलेलें राज्यकर्तृत्व व राजकारणपटुत्व आपल्या विश्वासाला पुष्टि आणितात. त्यावरून ( आपल्या ) ऐक्याची व सलोख्याची कल्पना करिता येते. वरचेवर प्रकृतीचें मान येत असावें व ऐक्य व कुशल कळवीत असावें बहुत काय लिहिणें ?

श्री

चैत्र शु ३ गुरुवार शके १७१६

विनंती विज्ञापना कडपे प्रांतीं जमीदार गुर्फसदाचा हंगामा व टिपुक-डील तीन ग्यार जमियेन सरहदेवर आला. याचें वर्तमान नबाबाकडे आ त्यावरुन असद अलीखान यास फौजसुधां कडप्याकडे जाण्याची रुखसत दिल्ही याउपरी खानमार कुच करुन गेले ह्मणजे मागाहुन विनंती लिहिण्यांत येईल राछ २ माहे रमजान हे विज्ञापना

श्री

चैत्र शु ३ गुरुवार शके १७१६

विनंती विज्ञापना माहावतजंगाचे कारभारी अनवरुदौला व हादीखान यांस घेऊन मुस्तकीमजंग खजीना वगैरे घेऊन आले यांची विनंती पेशजी लिहिल्यावरुन ध्यानांत येईल दौलासी बोलणें होऊन यांची नबाबाची मुला-जमन जाली नगदी व सोनें रुपें जवाहीर + + + + —

( पृष्ठ ३९९ ) + +, + + + + + +

मामुली अखबार व हवाल्याचें पत्र

श्री

चैत्र शु ८ सोमवार शके १७१६

विनंति विज्ञापना नबाबाचे मनांत या उपरी हैदराबादेस जावें, येथें राहूं नये याचप्रमाणें माहालांत बेगमा आदि करुन सर्वांची सल्लाह दौलाचे चित्तांत हैदराबादेकडे सुत जाण्यांत कुल मानीस दुरुस्त नाहीं, याजकरितां येथेंच असावें याप्रों त्याची सल्लाह तथापि, आम्हानें नबाब येथें न राहतां हैदराबादेस जाणार छ ९ शवाल्ची तारीख कुच करण्याची योजून

ठेविली. याप्रों बारीक रीतीनें वर्तमान समजण्यांत आलें. होईल त्याप्रमाणें विनंति लिहिण्यांत येईल. अधिक बोझीं बोंगमांकडील जीं आहेत तीं रवाना करावीं ह्मणोन हुकुम जाला असें ऐकिण्यांत आलें. याजउपरी आणखी काय निश्चय होईल तो लिहून पाठवीन. रा छ १२ रम जान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शु. ८ सोमवार शके १७१६

विनंति विज्ञापना. बाहलोलखान इसमाइलखान याचे पुत्र यांजकडे अलजपुरची सुभेदारीचे काम आहे. सांप्रत छ. ४ रमजानीं नबाबांनीं अलजपुरची रुखसत खानमार यास दस्तबंद जोडी व पानदान दिल्हें. अषफजंग त्यांचे कारभारी यास मोत्यांची कंठी दिल्ही. त्याजवर औरंगाबादचें सुभेदारीचें व पैठण वगैरे तालुक्याचें काम बाहलोलखान यांसीं बोलणें होऊन टरलें. फकरुदौला व चिमणाराजे याची तगीरी होऊन बाहलोलखान यास सनदांपत्रे व खिलत छ ९ रमजानीं जाला. दौलाचा निरोप घेऊन या उ. परी खानमार कुच करून जाणार. रा छ १२ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शु ८ सोमवार शके १७१६.

विनंति विज्ञापना. बाहलोलखान नवाबाची रुखसत व मध्यस्ताचा निरोप घेऊन आह्मांकडे छ. १० रमजानीं आले. घरोब्याचे मार्गें खान मार यांचें बोलणें कीं, आजपर्यंत अलजपुरचे सुभ्याचें काम 'मजकडे होतें भोंसले सेना-

साहेब सुभा यांसी दोस्ती व येक + (पुढील दोन, पृष्ठें गहाळ). + +
पृष्ठ २९१ मध्यें दिल्हीं—

६ खान मार यांस—

५ पोषागसनगें

१ दस्तार

१ ज्यामेंवार

१ पटका

१ दुपाला

१ किमखाप

—

५

१ जवाहिर सिरपेंच

—

६

२ अफजग कारभारी यांस

(मुसलमानी मृगसालही संपत आलें आहे सरासरीं वर्षांची पत्रें छापून झाली त्याप्रमाणें आणखी ५ वर्षांची आहेत कधीं योग येईल तो खरा

स महाराष्ट्र इतिहास)

१ पागोटें

१ दुषाला

—

२

६ पेषकार व वकील असाम्यांत

३ पागोटीं

३ षालफर्द

—

३ (? ६)

सदरहुप्रमाणें दिल्हे. रा छ १३ रमजान हे विज्ञापना.

श्री.

( चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता. १४ एप्रिल १७९४ इ०. )

विनंती विज्ञापना. छ ११ रमजानी बाहलोलखान यांनीं आह्मास मेजवानी कारितां बोलाविले. त्याजवरून छ माारीं त्याचे डेऱ्यांस गेलो. पोषाग व सिरपेंच दिल्हा. "श्रीमंताचे सरकारात पत्रें तयार करून पाठवितो, ते रवाना करावीं; व आपणही मुफसल ल्याहावयाचें प्रकारें ल्याहावें" या प्रों बोलण्यांत आलें. आह्मीं आपले ठिकाण्यास आलों. खान माार कुच करुन गेले. रा छ १३ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता. १४ एप्रील १७९४ ईसवी.

विनंति विज्ञापना. गफुरजंगाचे चौघे पुत्रांकडे च्यार कामें. येकास खानसामानी. येक बत्रचीं खान्याचा दारोगा. येक बेदरचा किल्लेदार. येकाकडे बादशाही दिवाणीचें काम. दौलाचे आप्त, च्यारी कामें मोठींच, येक घरीं. सांप्रत अमिनुदौला तारासाहेब ज्याकडे बेदरचा किल्ला. त्यांस नबाबानीं सांगितलें "अंगुराची रखवाली यहतियातीनें करावी" असें सांगितलें असतां अंगुराची यहतीयात न जाली. लोकास, कंचन्या वगैरे अंगुर दिल्हे. हें नबा-

वास समजल्यावरून "ज्याच्यानें अगुराची रखवाली झाली नाहीं तो किल्याचा बंदोबस्त काय राखील ? " या प्रो बहुत रागें भरून किल्लेदाराचें काम त्याज कडील तूर्त मना केलें दुसरें, अपज्याउलमुल्क याजकडे बवर्चीखान्याचें काम होतें त्यांनी (?)शर्वाकडील माहालांत खाना पाठविणें सो तुपांत च्यर्न्याची मिसळ करून पाठविला बेगमांनी चौकशी करून नबाबास समजाविलें त्यावरून त्याजकडीलही बवर्चीखान्याचें काम दुर करून ते गज गापासी ( व ) र्ची‌चा दारोगा होता तो हैद्राबादेंत आहे, त्यास बलाऊ पाठविलें, येकुन गफुरजंगाचे दोघे पुत्राकडील दोन कामांची व्यवस्था तूर्त या प्रो जाली किल्लेदारीचें काम अद्याप काहाडलें नाहीं तजवीज होत आहे, बवरची खान्याची दारोगी थोरले भावाची काहाडली, रा। छ १९ रमजान हे विज्ञापना

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता १४ एप्रील १७९४ ईसवी

विनंती विज्ञापना छ ७ रमजानीं राजाराम मोदी रायरायाकडील, त्याचे गुमास्त्यानें येक तेल्यापासून पाच पले तांदुळ दर पल्यास साडेबारा रो। प्रो खरीदी केले त्यांपैकीं येक रुपयाचे तांदूळ नबाबाकडील असीलेस पघरा रो पल्याचे भारानें आठ शेर वजन करुन दिल्हे असील घरास तांदुळ घेऊन आली घरीं वजन केलें तों साडेसात शेर भरले असीलेनें बक्षी बेगम पांस अर्ज केला त्यांनीं नबाबाचे समक्ष तांदुळ आणून वजन करुन पाहिलें तों साडेसात शेर भरले बेगमांनीं अर्ज केला कीं बाजारचे मारवाडी याप्रमाणें मनास येईल तसी विक्री करितात वजन कमी । नबाबांनी फौजदारखान याचे मार्फत गजाचे बाजारांतून येक रुपयाचे आणिक तांदुळ खरेदी करुन आणविले ते चौदा रा पल्याचे भारानें नबाबांनी रुबरु वजन करविले नव शेर रा भरले व तांदुळ चांगले मोद्याचे गुमास्त्याचें व तेल्याचें कृत्रिम) सम (ज)लें तेव्हां मोद्याचे गुमस्त्या चा गर्दन मारण्याचा व तेल्याचे नाक (का न घेण्याचा हुकुम झाला मोद्याचे गुमस्त्यास गाढवावर बसवोन यामउाज

बाहेर नेऊन गर्दान मारविली. तेल्याचे नाक कान घेतले; त्यानें विहिरींत जीव दिल्हा. याप्रों जालें. रा छ १३ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता. १४ एप्रील १७९४ ईसवी.

विनंती विज्ञापना. हैदराबादेहुन आलीज्याहा बाहादुर साहेबजादे याची अर्जी नवाबास छ १० रमजानीं आली. त्यांत. शहरांत गिराणी तांदुळ सात शेर व जोरी दाहा शेर जाली करोडयाकडील बोभाटही लिहिण्यावरून तेजसिंग हजारी यांस हुकुम जाला जे तुह्मीं दाहा स्वार पाठवून करोडा नुरमहंमद याचा नायब तेथें आहे त्यास धरून आणावें. हैदराबादेहुन अर्जी आली ती नवाबानीं दौलांकडे पाठविली. असीले हातीं दौलाकडे निरोप पाठविला कीं जनवाड्याचे मुकामीं तुह्मी करार केला होता की पंधरा दिवस धारण तादुळ सोळा शेर व जोरी चोवीस शेर करितो त्यास किती दिवस जाले? या उपरी करोडा अथवा मारवाडी वाणी कोणी यव्हाचा मुलाजे होणार नाहीं. याप्रों मोठें रागाने सांगोन पाठविले. दौलानी नुरजाहद खानास बोलाउन आणून गोडवे गाईले. याप्रो जालें रा छ १३ रमजान हे विज्ञापना.

श्री

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता, १४ एप्रिल १७९४ इ०.

विनंति विज्ञापना. चेनापटणाहून व्यंकटरामदीक्षत याजकडील अखबर आली तें रवाना केली आहे राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसीं प्रविष्ठ करितील. अवलोकने मार ध्यानात येईल. उत्तर रवाना व्हावयास आज्ञा जाली पाहिजे. रा. छा १३ रमजान हें विनापना.

श्री

चैत्र शुद्ध १४ शके १७१६. तप्रिल ता १७९४ इ०.

विनती विज्ञापना. सोम भुपालराव गदवालकर सस्थानिक याचा काल जाल्याचें वर्तमाम त्याजकडील वकील कृष्णाजी (न)रसिंव्ह येथें आहेत त्यास त्याचे चिरंजीव रामराव याची पत्रे व नबाबास व दौलास येथी पत्रें आलेलीं

आहेत. सरकारांत सोमभुपाळ याचे पुत्राची पत्रें आलींच असतील तर रवा छा १९ रमजान हे विज्ञापना

मामुल अखबार. छा २ गुरुवार ते छा १९ रमजान.

श्रीमंताकडील पत्रांची मामुलजोच.

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता १४ एप्रील १७९४ ईसवी.

विनंती विज्ञापना.

'उमरखेडचे फारकुनास निरोप देणें व महालास उपसर्ग न लागे येसा बंदोबस्त करणें' ह्मणोन आज्ञा त्यास उमरखेडकडीळ फारकुन राम राव दादाजी येथें होते त्यास उमर खेडास पेशजीच रवाना केले माहा लासही नबाबाकडील उपसर्ग न लागे ऐसा बंदोबस्त सरकार आज्ञेप्रों जाला कलम १

'बेदरास सावकारावर दरवडा प डला. नबाबासमीप असतां असें कसें जालें पता लागला की जिराले हें समजलें लिहिणें' ह्मणोन आज्ञा, त्यास त्याची चौकशीही दोन चार दिवस होत होती, परंतु पत्ता लागला नाहीं. कलम १

'नबाब उदगीर वगैरेकडे फिरणार किंवा बेदरास येणार हे शोध करुन लिहिणें' ह्मणोन आज्ञा, त्यास तुर्त

'माळेगांवचे यात्रेंत नवी घोडी नबाबानें किती खरेदी केलीं, नबाबांनीं परवानगी किती दिली हें शोध करुन लिहिणें' ह्मणोन आज्ञा, त्यास शोध केला व दौलास युक्तीनें विच्यारिलें. यांचें सांगण्यांत अठेचाळीस घोडी खरीद केलीं आणीकही घोडीं घेते, परंतु इंग्रजी काठीचें मोजानें जितकी घोडी मिळाली ती अठेचाळीस खरीद जाली कलम १.

'बसालत जंगास पुत्र किती, त्यांत नबाबाच्या लेकी कोणकोणास दिल्या, हल्लीं नबाबापासीं कोण आहेत सं स्थानचा बंदोबस्तकार किंवा आपणच घेणार याचा मात्र गर्भ लिहिणें' ह्म णोन आज्ञा, त्यास, बसालत जंगास पांच साहा पुत्र आहेत नबाबाच्या लेकी कोणास व येथें किती याचा शोध करुन लिहितो, संस्थानचा बंदो

वेदरास आहेत. हैदरबादची बोलवा बस्त बसालतजंगाचे पुत्रांपैकीं कोणास आहे. ठरेल तशी विनंती लिहीन. कलम १.

सांगत नाहींत. माहाबत जंगाचा पुत्र खवासेचा आहे. त्याचे नांवचा संस्थानचा अधिकार—वरकड कामाचा बंदोबस्त येथुनच होतो. कलम १.

कलमें सुमार पांच रा छा १३ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता. १४ एप्रील १७९४ ईसुवी.

विनंती विज्ञापना. छ २० माहे पावानचे सरकारचें पत्र सादर जालें तें छ १ माहे रमजानी पावलें त्यांत नबाबाकडुन स्वराज्य प्रकर्णी जावसालाचे फैसले होणें येविषई राजश्री गोविंदराव व बाबाराव यांस आज्ञा जाली कीं दाहा वर्षे जावसाल होतच आहे. हल्लीं तुह्मीं नबाबाकडे जाऊन सरकारचे जा(व) सालाचे फडचे होत ते करणें, याप्रों आज्ञा जाली. उभयतांनीं नबाबाकडील परावनगी येण्याची विनंती केली. त्यास परवानगी पाठविण्याविसी आज्ञा येसीयास या प्रकर्णी सरकार आज्ञेप्रमाणें मुषीरुलमुलुक यासीं बोलणें जालें त्या प्रकर्णी पत्रे लिहून रवानगी करितो. रा छा १३ रमजान हे विज्ञापना.

रा छ १६ माहे रमजान रवानगी डाकेवरुन.

श्री.

चैत्र शुद्ध २ शके १७१६, ता. १७।४।१७९४,

श्रीमंत राजश्री———————रावसाहेब ———

स्वामीचे सेवेसीं———

विनंती सेवक गोविंदराव कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना ता। छा १६ माहे रमजान मु॥ बेदर येथे स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान यथास्थित असो विशेष. स्वामी छ २० माहे षाबानचें

आज्ञापत्र पाठविलें तें छ १ माहे रमजानी पावलें, " स्वराज्य प्रकर्णी नवा घाकडून फडचे व्हावयाचे या विषईं राजश्री रघोत्तमराव व बाबाराव त्याज-कडील उत्तरें बोलले परंतु फडच्याची सुरत दिसत नाहीं, याजकरितां त्यास नबाबाकडे जाण्याविसी आज्ञा केली त्यांनीं नवा(बा) चे परवानगीचा उजर केला पत्रें हीं त्यांनीं लिहिली आहेत तुम्ही नवाब मुषीरुल्मुलुक यांसी बोलोन यांस बलाउन घेणें ह्मणोन आज्ञा त्यास अक्षेप्रों दौलासी सर्व -मार बोल-ण्यात आला त्याची उत्तरें यांनीं सांगितली तीं अलाहिदा पुरवणीं(त) लिहिलीं आहेत, अवलोकनें घ्यानांत येईल सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

श्री.

चैत्र शुद्ध २ शके १७१६, ता १७।४।१७९४

विज्ञापना ऐसिजे नवाब निजामअली खानबहादुर यांचे सरकारांतुन वे माहालाकडून स्वराज्याचे अमलाचे वगैरे फडशे वहुतं होणें करार मदार सर्व जाले त्यास सालचीं सालें लोटलीं परंतु, येकही फडशा न जाला तुह्मांस जाऊनही पांच वर्षे कमकसर होत आलीं त्याजवर राजश्री गोविंदराव भगवंत व रघोतम हैवतराव आले त्यांनीं तिकडील वसुराची विनंती केली त्यांत मागीची व वाजवी फैसल्याची तऱ्हा न पाहिली नंतर बाबाराव गोविंद हैदराबादेस जाते समई कितेक बो(ल) ले त्यावरुन आठफर्दी सुर्त तुह्मांकडे पाठविल्या होत्या, त्या तुह्मी बाबाराव गोविंद यांस घेऊन मोइनुदौला यांस दाखविल्या त्याचे जाब मागविले समागमें आले ते पाहतां गोविंद भगवंत व रघोत्तम हैवतराव या समागमें उत्तरें आलीं त्या प्रोंच याचा जाबसाल पडला तों(हीं) पाहावयासे नाहीं मषीरुल्मुलुक यांणीं राजश्री बाळाजी जनार्दन यांचे पत्रांत लिहिलें होतें कीं जाबसाल ठराऊन उभयतांस रुखसत रवाना करावें, त्यास ठराव करणें तो कोणता? जागीर बाबत कांहीं ऐस तिकडील नाहींत स्वराज्य कैलासवासी यांचे कारकीर्दी प्रमाणें येणें आणि ज्या जवाबी रकमा तितक्या करारा दमोजीय फर्दांवर लिहुन पाठविल्या, मग निराळा ठराव तो काय होणें असो वाजवी फडशे व्हावे हे दोस्तीस

व स्नेहास चांगले. यास्तव मोसुदोला यांचे लिहिल्याप्रमाणें सर्व मार बोलोन रघोतम हैबतराव गोविंद यास नवाबाकडे जाण्याविसीं आज्ञा जाली. त्यांणं विनंती केली कीं येक वेळ आह्मीं लेहुन पाठवतो. उत्तर आले ह्मणजे जाऊं ये विसी नवाबास उभयतांनी लिहिले आहे. व तुह्मीं बोलून उभयतांस येण्या-विसी पत्र पाठवणे मामलतीं फार तटल्या. या उपर फैसले होणें चांगलें. उत्तर लवकर पाठवणें. दिवसगत न लावणें, ह्मणोन आज्ञा, त्यास आज्ञेप्रमाणें दौलाकडे जाऊन बोलणें झालें. बोलिले कीं, "रघोतमराव व बाबाराव यांनीं येथें येऊन विशेष काय सांगावयाचे आहे. पत्रात मार लिहिला आहे तोच समक्ष बोलतील. इकडून सेवटचे प्रकार तोडीचे जे सांगावयाचे ते पूर्वी गोविंदराव भगवत व रघोतम हैबतराव याजबरोबर सर्व सांगून पाठविले आहेत, बाबाराव यासही त्याच अन्वये सांगून पाठविले. यांज परती राजवटी ती कोणती आहे? जे वेळेस बोलणें पडेल तेव्हा तेच आमचें बोलणें जाप श्रीमंताचे व मदारुलमहाल याचे चित्तास न येई तरी ती गोष्ट अलाहिदा आहे. खुद श्रीमतानीं बमैफोज पंढरपुर अथवा पंढरपुरचे वाटापर्यंत इरादा केला तरी आमचें बोलणे वाजवी असेंच बोलत जाऊं. पुढें ईश्वर इच्छा. याप्रमाणें बोलिल्यावर त्यास ह्मटले कीं "आपण असे उत्तर का करिता? हे वाजवी उत्तर नव्हे. याची दरयाफ्त करून बोलावे. श्रीमंताकडून आठ फर्दा मुजकर होऊन आल्या त्यात काय गैरवाजवी लिहिलें आहे? दोही सर-कारची दोस्ती याजकरिता वाजवी असता इतके दिवस मुरवती करिता लोटले, आता किती दिवस प्रतीक्षा कराबी. बेदरचें स्वराज्य मामुल पासून घेत आलों. त्यांत तुह्मींव दिकत काढुन च्याहारुम तकुब ठेवावे असफ ज्याची रुजुवात करुन त्या अन्वयें पुढें चालावें असे तुमचें बोलण्यात. आह्मास किफायत नसतां मुरवतीकरिता महकु करुन रुजुवातीचा न्येम दोन वर्षांचा ठरला. आमचे सरकारातून अमीन रुजुवातीकरिता मुकरर करुन पाठविले असता वर्षोनवर्षें गुजरली. अद्याप ठिकाणच नाहीं. च्याहारुम वजा करून ठेवताही नुकसानही कशी कबुल होईल? तेव्हां बोलिले कीं "रुजुवात अमीन जाऊन

होत नाहीं याजकरितां माहालाचा मामुल आख असल्याचे वेळचा तुम्ही आपले दप्तरचा काढुन आम्हांस सांगावा. त्या आंखाप्रमाणे अमल देऊं. तह कीकात देखऊन याजवी आख ज्या माहलचा आम्ही शाबीत करून देऊं तेव्हां त्याप्रों पुढें अमल ज्यारी राहिल अथवा आम्ही जो ( जी ) रकम सांगु त्या प्रों प्रस्तुत अमल तुम्ही सरकारांत घ्यावा या आखास ज्याजती आख असल्यास आम्हांस शाबीत करुन घ्यावें ते वेळेस त्याप्रमाणें अमल देऊं ही तोड ठरवावी" यांचें उत्तर त्यास दिलें "की आम्ही येक आख सांगावा अथवा तुम्ही सांगाल त्या प्रा ज्यारी करावें ब्याहारुम आज परियंत ठेऊन घेतलं पुढें आणिक ठेवावें तहकीकातही करणें बाकीच आहे हें कसें पुरवेल? याजवी करावेसें ह्म(ण)णें तें हेंच की काय? नवाबाचे सरकारची फायदा पाहावी आणि श्रीमंताचे सरकारची नुकसानी होणें हें मनांतच येऊ नये हेंच दोस्तीस लाजम की काय? ब्याहारुम ठेऊन घेतल्यावर रुजुवाती आपणास काय फलफल? जर नुकसानी होईल तरी फल्फल असावी त्यापक्षी राव, पंत, प्रधान आपली नुकसानी कशी कबुल करतील? करणार नाहींत आपणही याजवी मनांत आणून पहावें" याजवर बोलिले की, "कै०स्वासी माधवरावसाहेब यांचे वेळचे अमलाप्रमाणें अमल घेतां, तेव्हा यांत नुकसानी नाहीं तहकीकात जाल्यावरही यास अधिक होणार नाहीं बरोबरच होईल कदाचित एखादे माहालास तोटा येईल" "तेव्हां यो लिले ( लों! ) की "माधवरावसाहेब यांचे वेळचे अमलाप्रमाणें ह्मणता यांसही संदेहच आहे तथापि तुम्ही ज्या हारुम मजा करितां हे कोठला? आमचा अमल आजपरियेंत ज्यारी होता त्यांत तुम्ही ब्याहारुम केला तेव्हां तेव्हां किती नुकसान जाली ही समजावी याजकरितां श्रीमंताचें ह्मणणें हेंच आहे कीं 'याजउपर ब्याहारुम सफुव राहणार नाहीं आपण ज्यारी करावें नतर रुजुवात करणें तसी सुखरस करावी' हे श्रीमंताचें ह्म (ण) णें याजवी आहे. कोणीही ऐकिल्यास या गोष्टीस गैरवाजवी ह्म(ण)णार नाहीं। आपणही बोलूं नये" या प्रों बोलणें जालियावर बोलिले की "फडण्या फ

रावा असें मनांत आलियावर दिवसगत लागावयाची नाहीं, तोंड पडलें नाहीं. नाहीं तर समजलेंच आहे. गोविंदराव भगवंत यांस पत्रें गेलीं तें श्रीमंतांची मर्जी घेऊन काय लिहितात तें समजोन बोलण्यास येईल. " या प्रो उत्तर जाले, रा. छ १६ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शुद्ध २ शके १७१६, ता; १७।४।१७९४

विज्ञापना ऐसीजे. सरकारचें पत्रा अन्वयें मुषीरुलमुल्क यांणीं बोलणें जालें ते वेळेस त्याचे बोलण्याचे उद्गार निघाले त्याचा तपसील:—

१ सरकारचे पत्रातील मार येकोन बोलिले कीं "आतांच इतके नेटानें कां लिहिले? होळकर यास बलावणीं गेलीं. ते आलियावर नेट धरावयाचा होता'. याचे उत्तर दिल्हें कीं 'राव शिंदे असतांनांच हो(ळ)करांस बोलावावें हा निश्चय ठरून पत्रें पूर्वींच गेलीं आहेत. नवाबाची श्रीमंताची दोस्ती जुज. यात कुल. यात वाजवी जावसाल. यास दुसऱ्या कोणाची दरकार नाहीं. दोस्तीचा जावसाल यास होळकराचे प्रतीक्षेचे कारण नाहीं.

१ आणखी येक गोष्ट अशी आहे कीं 'श्रीमंताचे नुकसान बंदगान अली यांस करणे नाहीं. तसेंच, बंदगानअलींचें नुकसान श्रीमंत करीत नाहींत, हा निश्चय. तेव्हां दौलतीस व उभयता सरदार याचे काहीं होत नाहीं. मगर, मदारुल माहाला याचा व माझा उभयता मझेला याजमुळें इतका प्रकार त्यास हा निश्चय करून ठरविला आहे कीं मदारुलमहाला याचा गुरु तुटेल अथवा माझा उरु मोडेल. दोहींतून येक गोष्ट होईल. ईश्वर इच्छा. काय घडेल पहावें. 'याप्रों स्पष्ट बोलून हासले. मलाही हास्य येऊन बोललो कीं 'आपले बुधीची हातवटी कोणास यावयाची नाहीं. मसलहत करण्याची जात विलक्षण पाहिली. ईश्वर आपल्यास सलामत राखो ' ' काय मनात आलें? ' ह्मणोन पुसों लागले. तेव्हां बोलिलो कीं ' अंत:करणाची जात साफ. काहीं मनात ठेवावयाचे नाहीं येक वेळ गोष्ट मनांत मनांत आली ह्मणजे तिचा जाहिराणा करून बोलत असावें. अशी छाती कोणाची आहे? बंदगान अलीचे कारभारी जें पूर्वी जाले. परंतु

आपल्या मुकाबल्यास कोणी येणार नाही ' असें बोलल्यावर ह्मणाले की 'सिधांताची गोष्ट ध्यानांत आलीयावर काय भय ? आणि संकोच करण्यास ? दोन दोन हात हेही आहेत, असें बोलले ; नंतर त्यांस ह्मटलें की ' आपले सारखें दाम येथ परियंत वाढ्न देणार नाहींत ही, आह्मांस खातर जमा आहे,

२

सदरहू प्रों मार जाला, छ १६ रमजान हे विज्ञापना,

श्री

चैत्र शुद्ध २ शके १७१६, ता १७।४।१७९४

विज्ञापना म्हैसीजें मुलीख मुलूख ह्मणत होते की मदारुल महाम यांस पहिल्यानें कोणते गोष्टींचा नट फार येत असतो प्रस्तुत स्वस्थतेचा समय पाहून ज्रुरत धरली यखादा फंद उभा राहिला ह्मणजे सर्व विसरून नरम पडतात आतां हुपार जाले यवसिंदे यांचा काल जाला यखेदे पडधील पाहावें सिकवील पुरवणी करितां करितां पुरें होईल त्यावेगळ घरांत (घरांत) दौलत आहे किती दिवस स्वस्थता राहील नाना प्रकारचे खेदपे येऊन वारद होतात दक्षण आमची असें आम्ही ह्मणवीत असतां टिपु सुलतान याचा उत्कर्ष तों परियंत आमची दक्षण अस्या ह्मणण्याचा मात्र आह्मांस कोर्टे होता ? ईश्वराचे कृपें करून त्याचें पारिपत्य जालियावर आमची दक्षण असें शब्द आतां तोंडावाटें निघु लागले याचें उत्तर त्यास दिलें की 'श्रीमंताचे दखलतीस हा दोष निघवून घावा असें नाहीं, याप्रत्थी ( पृथ्वी ) वर जे रियासत करितत सर्वांवर ईश्वराची इच्छा गालब आहे ईश्वर कोणते वेळेस काय करील हा भरवसा कोणींच मनांत आणुं नये हे खरें. या प्रों बोलणें जालें रा छ १६ रजमान हे विज्ञापना

श्री

चैत्र शुद्ध २ शके १७१६, ता १७।४।१७९४

विज्ञापना येसं चे नमावाकडुन ( न ) साहेब याचे यादी समर्थ पत्रे सरकारांत आली याची उत्तरें पोहेमवून स्वारी न येण्याचा भाव समजला ह्मणजे

नवाब बोरचीस जाणार. तेथून हैदराबादेस जावे यैसी परभारें बातमी समजली. त्यास बहुतकरून हैदराबादेस जाणार नाहींत असें असतांही जावयाचा निश्चय पूर्णपणें जाला असें समजलियावरून बाबासी व दौलासी तुह्मीं बोलावे. जे अजमासे बेदरास येणें जालें यांत सरकारचे लढे जुज यातीचे उगऊन परस्परें भेटी होणे चागले. यास्तव ही गोष्ट करुन हैदराबादेस जाणें हे सलाह या प्रों बोलणें हें कीं यावर जातील जावोत ह्मणोन आज्ञा त्यास प्रस्तुत येथें फार पौहरत जाली कीं नवाब रमजानचा महिना जालियावर हैदराबादेस जाणार यात ( त ) था नाहीं. जनान्यातीलही बातमी (मी) या प्रकारचीच तेव्हा मुषरिलमुलुक यास पुसावयासि पाठविले कीं हैदराबादेस जाण्याची खबर फार प्रगटात आलेली आहे याचा काय निश्चय जाहला तेव्हां त्यांनीं सांगितलें की मी ही असेंच लोकाचें बोलणें ऐकतों. परतु नवाब मसीं अद्याप बोलले नाहींत आणि निश्चयही जाण्याचा दिसत नाहीं. या प्रों त्याजकडील निरोप आला. याचा तपशील अलाहिदा लिहिला आहे, त्याजवरून ध्यानांत येईल. जाण्याचा निश्चय असें खचित समजलें ह्मणजे स्वामीचे आज्ञे प्रो॥ बोलण्यांत येऊन उत्तर होईल ते लिहीन. रा. छ १६ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शुद्ध २ शके १७१६, ता. १७।४।१७९४

विज्ञापना यैसीजे. नवाबाची प्रकृत बेंदरास आलियापासुन ठीक नाहीं, शरीराची भावना हैदराबादेस होती त्यापेक्षां बहुत क्षीण, शरीर फार रोड जाले. वृद्धापकाळ पहिल्या प्रों भक्षणही होत नाहीं. दरबार करुन बसतात शिकार करितात हें सर्व शोभार्थ लौकिक. हवा येथील मानत नाहीं. मनांत हुरहुर फार. चित्त येक ठिकाणीं लागत नाहीं. दौलाचे आग्रहामुळें आजपर्यंत राहिलें. अलीकडे प्रकृतीस क्रोध बहुत जाला आहे. हैदराबादेस जावें हें मनांत भरलें. बेगमा आदिकरून सर्वांनीं निकड केली, चित्त उदास जालें. तेव्हां निश्चय केला कीं हैदराबादेस रमजानचा महिना जाला ह्मणजे जावें.

दौलांनी येक दोन वेळ अर्ज केला कीं कुल्यांत बिघडती, याजकरितां च्यार महिने छावणी येथेंच व्हावी त्यास झिडकारुन उत्तर केलें कीं ' माझी कुल्यांत बिघडावयाची नाहीं माझी मी संभाळून घेईन रुकनुदौलापासून जी दोस्ती त्याची बेहद्दी आमची आहेच तुह्मास अदल जो जातीचे येऊन पटेल त्यास मदारुल महाला व तुह्मी उभयतां समजाऊन घेणें व वेदरास राहणें असल्यास राहणें तुम्ही आपलें सार्ठी आमचे कुल्यातील खलेल करणें मुनासब नाहीं आम्ही हैदराबादेस जातों ' या प्रो दोन वेळ बो( ल ) त्यावरून दौला बोलिले कीं ' हजरती येगळ मी फकरीचा माल मला कोण पुसतो ' जसी मर्जी असेल तसेंच करीन ' या प्रो बोलणें उभयतांचें जालें, मध्यें असीला जवळ होत्या, त्यांनीं मात्र हें वर्तमान बैकिलें कारखानेदार यास तयारीची ताकीदही जाली त्यावरुन गोष्ट फायद्यांत आली छ १३ तेरखेस मुषीरुन्मुल्क नबाबाकडे गेले होते खलबतही जाले कांहीं प्रकारच्या गोष्टी सांगून मर्जी हम ( ला ) घर करुन हैदराबादचें जाण्याचें राहविलें कारखाने घरांस जावें अशी वार्ता निघाली त्यास शहरास जाण्याचा गुल फार जाला हे मसलतीस ठीक नाहीं जाण्याची मर्जी असल्यास जावें परंतु पोहरस आली ही मोडेल ऐसें समजाऊन रहावयाची पोहरस मात्र घातली हा येक प्रकार दुसरा प्रकार छावणी येथेंच कराची हा निश्चय दोहीतून कोणता प्रकार निश्चयाचा हें समजल्यावर मागाहुन लिहीन रा छ १६ रमजान हे विज्ञापना.

रा छ १७ रवानगी टपालावरून

श्रीमंत रावसाहेबांस छ १७ च्या डांकेनें ह्मात्याचें पत्र.

श्री

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता १४ एप्रिल १७९४ ईसवी

विनंति विज्ञापना निर्मळ वगैरे माहाल बाबत स्वराज्याचा येवज नबाबाकडून सालाबाद अवरंगाबादेवर तनखा येती त्याप्रमाणें सन १२०२ साउची बाकी व सन १२०३ सालचा येवज येणें याजकरितां दौलास निकड केली कीं सालें गुजरोन गेली सरकारचे येवजाची तनखा यावी दौलांनी

राजाजीस तनखा वा। यैवज जफरुदौला या माहालचा देणे किती याचा फर्द करून समजावणें म्हणोन सांगितले. राव्यांजीनीं फर्द तयार करून दिली, सन १२०२ साल पैकीं दीड लक्ष आलेसे हिशोवी पेशजी तनखा यैवजी दिल्ले ते वजा करून सन १२०३ पैकीं आलेले हिशेव दीड लक्ष द्यावयाचे जमा करून सालावादी तेरा हजार सरंजामी वगैरे याजकडे दुसाला देहेतीवा। सवीस हजार दोनसें व परवणी, लोहगांव, आवढें, ठाकळी, पांचळेगांव वगैरे महालात स्वराज्याकडील अमलदानी वसूल येक लाख सतावीस हजार आटसे घेतला आहे. तो वजा करून वाकी ऐवज राहिला त्याची तनखा तयार करून देवितों येसें याचें वोलणे.' याचे उत्तर आह्मीं केलेकी ' जफरुदौला वावत महाल यैवज सरकारांत येतो. परभारें माहालीं सरंजामी वगैरे सरकारचे अमलदारानीं यैवज घेण्याची आज्ञा सरकारांतून नाहीं. त्या पक्षीं स्वराज्याकडील अमलदार पैका घेणार नाहींत. कोणे मामलेदाराने यैवज घेतला त्याच्या रसीदा दाखवल्या ह्मणजे सरकारांत विनंती लिहितां येईल' यांचे ह्मणेकीं ' श्रीमंताकडील म मलेदारानीं येवज जवरदस्तीनें घेऊन रसीदा अमीलास दिल्या नाहींत. रोशनखा वगैरेंनीं पत्रें व यैवज दिल्याचे जमाखर्च पाठविले आहेत त्यावरून हे लिहिलें? आम्हीं सांगितले कीं ' रसीदाच नाहींत त्या पक्षीं मामलेदारानीं यैवज घेतला कशावरून समजावें ? दौलाचें वोलण्यांत कीं आह्मीं रोसनखा वगैरे जागिरदारास इनामतनामे पाठविले आहेत, कीं ज्या कमाविसदारांनीं महालीं यैवज घेतला त्याजपासोन रसीदा घेऊन पाठवणें. रसीदा आणविल्या. येतील.' या प्रमाणें याचें वोलणें. त्यास सदरहु प्रों, यैवज वजा करून तनखा देवितात त्यास ये विषईं आज्ञा जसी होईल त्या प्रम,णें यासीं वोलण्यांत येईल. राछ १७ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६. ता. १४ एप्रील १७९४ ईसवी.

विनंती विज्ञापना. पो. उमरखेड पासोन शहा मिर्जा यानें यैवज घेतला. तो सरकारांत नबाबाकडून येणें. त्यास दौलाचें ह्मणें कीं येहंतषामजंग जफ-

स्दौला यांनीं चाळीस हजारचा तमसुम लेहुन घेऊन फारखती आपाजी कों-डाजी फारकुनी श्रीमंताचे सरकार तर्फेने याजावसाळास जफरुदौलापाशीं आला ते समयीं घेतली, ते वजानस आहे, त्या बमोजीब चाळीस हजाराची तनखा प्रों, वसमतेवर यांनीं दो वायद्याची तयार केली त्या पैकीं पहिले वायदा बा. वीस हजार रुपये परगणें मार चे अमील बाजीराव व सैद मुनवरखान यांनीं मज कडे यैवज दिला तोवे ऊन रसाद अमलाचे नांवें मी दिल्ही की "शाहामिर्जा यानें उमरखेडापासोन यैवज घेतला तो नबाबा कडून श्रीमंताचे सरकारांत येणें त्या यैवजीं चाळीस हजारांची तनखा तुम्हावर जाली त्या पैकीं पहिलें वायद्याचें वीस हजार रों आम्हास पावलें" या प्रों रसीद मोहगम देऊन यैवज घेतला पुढें दुसरे वायद्याचे वीस हजार घेऊन रसीद साफिनात खानाचा यैवज पात्र त्याची द्या यैसें वसमतकर अमीलाचें बोलणें पडलें ते समई हा मार राजश्री गोविंदराव भगवंत यांस लिहिला त्यांनीं राजश्री नानांस विनंति केली त्याची आज्ञा जली पत्रही मला आलें की शाहा मिर्जा यानें उमरखेडापासोन यैवज बहुत घेतला यैसें असतां चाळीस हजारावर फैसला होणार नाहीं आपाजी कोंडाजी पासून जबरदस्तीनें जफरुदौलानी फारखत घेतली ते सरकारांत कबूल नाहीं, यास्तव पहिली वीस हजारांची मोहगम रसीद दिल्ही त्या प्रों रसीद देऊन यैवज येत असल्यास घ्यावा साफिना रसीदीचा आग्रहच करुं लाग-ल्यास पहिले वीस हजार घेतले आहेत ते फिरोन द्यावे या प्रों आज्ञा जाली तेव्हां वीस हजार दुसरे वायद्याचे वीस हजार अमीलानीं आणिले ते रसीदांचे दिक्कती करितां घेतले नाहीं सांप्रत हा जायसाद दौलाशीं बोलण्यास आणिला कीं शाहामिर्जा बाबत आपल्याकडे सरकारचा यैवज येणें आपण मसमते कडून चाळीस हजार देविले त्या पैकीं वीस हजार पेशजी घेऊन रसीद अमीलाचे नांवें दिली दुसरे वायद्याचे वीस हजार रुपये अमील आम्हांस द्या म्हणतात त्यास सरकारांत ये विषईची विनंति लिहिली आज्ञा जाली कीं शाहामिर्जा बाबत मुबलक येथें आपाजी कोंडाजी पासोन जबरदस्तीनें जफरुदौलानी चाळीस हजाराचा तमसुम देऊन फारखत घेतली ते सरकारांत मंजुर नाहीं

जो यैवज उमरखोडापासोन घेतला त्याचा फडशा जाला पाहिजे. याप्रों आज्ञा आहे. याचे उत्तर दौलानीं केले कीं हे जाबसाल आहेत. तर्फेने सरकारनें विच्यारें पुढें जसा निर्णय ठरेल तसा ठरो. तुर्त यैवज आला तो घेण्याचा तुह्मापासीं अमानत असों द्यावा. त्यास पेशजी वीस हजार घेतले आहेत. बाकी वीस हजाराच्या हुंड्या आल्यात्या सावकारांचे दिवाळे निघाले. याज करिता त्या हुंड्या फिरोन दिल्या. त्यास मोघम रसीद घेऊन वीस हजार दिले तर यैवज घेतो. नाहीं तरी घेत नाहीं. रा. छ. १७ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता. १४ एप्रील १७९४ ईसवी.

विनती विज्ञापना. घासी मिया याची तबियत बहुत कसलमंद. नित्य दहा, बारा पंधरा दस्त होतात. नबाबानीं चंपाअसील नेहेमीं मियापासीं जवळ बैसऊन हकीमाकडुन दवा देवितात. दोन दोन घटिकेस घासीमयाचे तवियतीची खबर आणवितात. येक दिवस हुशार येक दिवस बेआराम याप्रमाणें मियाचें तवियतीचा अहवाल आहे. रा छ. १७ रमजान हे विज्ञापना.

सदर तारखेच्या डाकेवर व्यंकटराम दीक याजकडून चेनापटणाहुन आलेली अखबार गोविंदराव भगवंत याचे मार्फत रवाना केल्याचे पत्र.

छ. ११ ते छ. १७ पावेतों मामुल रोजनामे अखबार ( पृष्टाक ३८७ ३८८ )

छ २३ रोजीं डाकेवर.

श्रीमंत रावसाहेब यास मामुल हवाल्याचें पत्र.

श्री.

चैत्र शुद्ध १४ शके १७१६. तप्रिल ता. १७९४ इ०.

विनंती विज्ञापना. बेदराहुन कुच करून हैदराबादेकडे जाण्याचा बेत नबाबानीं योजिला होता. यास सल्लाह बेगमा आदि करून सर्वांचे संमत. फारासखाना वगैरे कुल तयारीतही डौल जाला. बाजारात तमाम साहुकार

लोक वगैरे हैदराबादेकडे नबाब जातात हे खबर गरम 'जाली दौलास धंम जल्यानतर त्यांनी खिल्वतींत नबाबांस अर्ज केला की 'हैदराबादेकडे सवारी मुबारक मुतवजे होण्याचा दाट गुल्बाग जाला आहे हे गोष्ट कुल्यातीस दुरुस्त नाहीं लोकांतही हा गुल्बाग होणें खुषनुमानाही यामप्रमाणें तीनच्यार घटका नवाबाचें व दौलाचें बोलणें होऊन ताकीद सर्वांस जाली की हैदराबादेकडे कुच असें कोणी म्हणेल त्याचे पारिपत्य होईल हे ताकीद जाल्यावरून तुर्त हैदराबादेस जाण्याची चर्चा राहिली बेदरची छावणी हेच बोलवा जाली आहे इतक्यावर जें पाहण्यात ऐकण्यांत येईल त्याची विनंती लिहिण्यांत येईल नबाबानीं यकदोन वेळ दौलास झिडकारून सांगितलें की माझी कुलियात मी संभाळून घेईन, बिगडावयाची नाहीं, तुह्मासाठीं मी आपली कुल्यात बिगडु (न) कीं काय ? तुमचे आणि मदारुल माहाला यांचे ठीक नाहीं तुह्मी येथें रहावें तेव्हां यांच्यानें पुढें बोलवेना त्यास येक दोन दिवस जाउ दिल्हे नतर जाऊन अर्ज केला की हजरतीस जेव्हां जाणें असेल तेव्हां जावें, सरजाम लांब नाहीं जवळपासच आहे परतु आजपासोन जाण्याचा पुकारा आणि शोहरत बेतन्हा होणें हें खुषनुमा नाहीं.' त्याजवरुन सर्वांस ताकीद जाली चौकीचे लोकांची छपरबदी करावयास हुकुम जाला पोहरत जाली होती ते मोडली पुढें शहरांत जावोत न जावोत वैशाखाचे महिन्याची सधि आहे त्या महिन्यांत गेले तर जातील नाहींतर जात नाहींत छावणी करतीलसें वाटतें र॥ छ १३ रमजान हे विज्ञापना

श्री

चैत्र शुद्ध २ शके १७१६, ता १७।४।१७९४

विनंती विज्ञापना छ १७ रमजानी दौलांनी रात्रीं आह्मांकडे रुका पाठविला की हजरतीकडून पादीचे मुकदम्यांत खरीता राव पंतप्रधान व मदारुल माहाला व हरी पडतजी यांचे नांवें पत्रें गेलीं होतीं त्याचे जबाब रघोत्तमराव यांचे विद्यमानें आले आहेत ते हजरतीनीं मुलाहिजा करून कित्येक मार तुह्मांसी बोलावयाकरितां ईर्षाद केला त्यास मी अर्ज केला की

येविषीचा रुका लिहुन रावजीकडे पाठवितो. ईर्षाद जाव की " रुक्का न लि. हितां त्याजला आपले येथे बोलाउन ईर्षाद बमोजीव त्यासी मार बोलण्यात आणुन त्यांजकडोन रार पत प्रधान यास व गदारुलमाहाला याजला पत्रें लिहवुन व तुम्हींही पत्रे ल्याहावीं. याजकरिता उदईक आपण यावे " म्हणोन लिहीले. त्यावरून आम्ही छ १८ रोजीं दीडप्रहर दिवसा दौलाकडे गेलो. ते मार्गप्रतीक्षा करीत होते. सर्वत्र मुत्सद्दी मंडळी वगैरेस जवाब दिल्हाच होता. आम्हीं जाताच खिजमतगार वगैरेस दुर करून दौलानी मार केला कीं " पादीचे मुकदम्यात राव पंतप्रधान यास व मदारुलमाहाला आदिकरून पत्रे पादीस रौनक आफजा देण्याविषयीं लिहून रखोत्तमराव याचे मारफत पाठविली होती. त्याचे जवाब हाल आले त्याप्रमाणें दोन पत्रे येक मदारु लमहाला याचें व येक गोविंदराव भगवत याचे येकुण दोन पत्रे वाचून पाहिलीं त्यास याचे मसविदे पेशजी तुमचे विद्यमाने आले होते त्यावरून मजकुर समजलाच होता. तथापि दोन्ही पत्रें वाचून भाव समजला कीं पादीस येण्या-विषयीं टाळा देऊन अस्ताचा वहाणा करून लिहिले आहे की राव पतप्रधान प्रथम स्वारीस निवणार तेव्हा *साअतनेक पाहिजे. ते नाहीं. तेव्हा शुक्राचा अस्त व मंगल वक्री तेव्हा येणें कसे होईल? असे भाव लिहिले आहेत. याजकरितां हाजरतीस संतोष वाटला नाहीं व मजला ईर्षाद केला कीं रावजीस बोलावून तुह्मीं व ते येऊन याचेवर जबाबाची तजवीज ठराऊन त्याजकडोन विस्तारे पत्रें लिहवावीं कीं आमचे येथें नजुम विशेष करून जाचून पाहण्याचा संप्रदाय नाहीं. लग्नाची तारीखही मुकरर केली नाहीं. राव पंत प्रधान याचे येण्याची अमद पाहून मग तारीख करार करावी. त्यास प्रस्तुत तिकडील उत्तरात अस्ताचा सबब लाउन लिहिलें आहे. त्यास तेथे नजुमी व गणक वगैरे ब्राह्मण चागले आहेत, त्यास विचारून पादीची तारीख व राव पंतप्रधान यास बाहेर स्वारीस निघण्याचा साअतनेक पाहून आह्मास इतला करावा ह्मणजे त्या प्रमाणेच शादीचा निश्चय करण्यांत येईल. साराष शादीची खुषी व राव पंतप्रधान याचे भेटीचा हेत फार आहे व याचे येण्यात रौनक

* चागला मुहुर्त

अधिक होईल जेथ वजीरत येईल याजकरिता रावजा जाली दौलास सम
प्रधान यांस व मदारुल्महाला यांस पत्रें लिहवावीं व आम हैदराबादेकडे सवारी
ह्मणोन ईर्षाद केला त्यास तुह्मी विस्तारयुक्त ल्याहावे व गोष्ट कुल्यातीस
तयार करवितों हजरतीस राव पंतप्रधान यांचे भेटीचा इषनि प्रमाणें तीनच्यार
हे गोष्ट जरूर घडावी ह्मणोन दौलाचे बोलण्यांत आलें ली कीं हैदरा
सरकारचे खरीत्याचा जबाब नबाबाकडून घेली दिल्ही ती पा ताकीद जास्या-
राजश्री गोविंदराव भगवंत सेवेसी प्रविष्ट करतील त्याजवरून ध्यानें हेच बोल्या
राछ रमजान हे विज्ञापना मी लिहि
माही
ली

श्री

चैत्र वद्य ९ शके १७१६, ता १४ एप्रील १७९४ ईसवी

विनंती विज्ञापना ऐसीजे नबाबाचे कुच्याची पोहरत फार. या विषई दौलाचे माझें भाषण होते समई या विषई सफटात पडून बयान करून बोलूं लागले याचा तपसील बहुत आहे ते वेळेस असें समजलें कीं पोहरत मुक्कामाची प्रगट केली परंतु आंतील निश्चय कुच करण्याचा तेव्हां स्वामीचे आज्ञेचें स्मरण होऊन दौलासी बोलिलों कीं "नबाब हैदराबादेहून बेदरास आले हेच ठीक नाहीं तथापि येऊन एक वर्ष राहिले आतां माघारे चालले यांत लोक काय ह्मणताल? येवढे रईस यांची हरकत व्यर्थ होणें चांगलें नाहीं त्यास त्यापक्षीं येथपर्यंत आले तेव्हां आतां हेंच लाजम आहे कीं श्रीमंत पंडित प्रधान यांजकडील जुजवियातचे फैसले होऊन परभारें खुलासा करून भेटी व्हाव्या नंतर नबाबांनीं हैदराबादेस जावें यांत शोभा नाहीं तर कांहींच नाहीं जर नबाबाचा आग्रह कुच करण्याचा आहे तर याविशीं अर्ज करावा ऐसे माझे मनांत" हे शब्द बोलताच दौलाचे मनास संतोष होऊन बोलिले कीं "माझे मनांतील गोष्ट सांगितली वास्तविक नबाबाचें येणें येथें प्रकृतीकरितां हे खरें, परंतु येथून माघारें जाणें व्यर्थ होऊं नये तेव्हां त्यास ह्मटलें की 'तुह्मी प्रकृतीकरितां असें ह्मणतां परंतु सर्व दुनिया बात असें कोणी ह्मणत नाहीं, आणिकच कांहीं बोलतात' तेव्हां बोलिले कीं नानाप्रकारचे तर्क निघतात

...ा म्हणतात भोंसल्यावर दृष्टी आहे. कोणाचें ह्मणें राव शिंदे यासीं ...े. याजकरितां येथें आले. सुरापुरकर यांजवर मोहीम इतकें. आणि ... अधिक जे मनांत आणाल ते प्रकार यांत निघतात. आणि ... आहे परंतु येक प्रकृति करिता येणें जालें हें खरें. दुसरें काहीं ...स आता व्यर्थ पहरास जाणे हे माझे मनास प्रशस्त वाटत नाहीं. ...डील फडचे ठरून सफाई व भेटी होऊन उपरांत जावें अथवा ...कडील गोडी संपादन करून त्याचे विचारें भोसले याजकडील कार्यावर ...' या प्रो. बहुत विस्तारें बोलिले याचा तपशील अलाहिदा लिहिला ... त्याजवरून ध्यानांत येईल. रा।छ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र वद्य ९ शके १७१६, ता. २४।४।१७९४

विनंती विज्ञापना होसीजे. वेदरचे राहण्याचे प्रसंगावरून दौला बोलिले कीं "श्रीमंत व नवाब उभयतांची ऐक्यताच आहे. मदारुलमहाला याची माझी चित्तशुद्ध नाहीं. याविसीं त्याचे चित्ताना सफाई करावी असे आलें तर यास उशीर लागणार नाही आणि सफाई न होतां जिदीवर आले तर इतकी जिदी करावी असें त्याचे की काहीं केलेही नाहीं. मगर जुजावियात यास फारनीकसी केली तर आदवनी आणि च्याहारुमचा पैका मागतील त्यास पंतप्रधान व नवाब दोन्हीं दौलती वाहीद मदारुमहाला याचे माझें येक अंतःकर्ण असल्यास करोडो रुपयाची किफायत करून दाखवीन. नबाबाची किफायत याचे दौलतींतील यका रुपयाची केली तर पंत प्रधान याची किफायत आठ आण्याची करीन. पंतप्रधान याचे दौलतींतील किफायत येका रुपयाची केली तर तेथें नवाबाची किफायत आठ आण्याची करून दाखवीन. येक वेळ अनुभव तरी पहावा. याचे दोन प्रकार दोही सरकारचे जुजवियातचा लढा उलगडून टाकावा. नंतर येकवर्ष होऊन द्यावें त्यात माझी परीक्षा पाहावी अथवा जुजावियात इतके दिवस राहिली तशी आणखी येक वर्ष अशीच राहुं द्यावी. मदारुलमहाला याणीं सफाई अंतःकरणपूर्वक करावी. माझी चाल करा

कायम मिजाज येकसुत्राने चाल असावी तर शोभा तो प्रकार नाहीं तेव्हां मखेदा पातपाहा मखेडे करूं लागल्यावर नजरबंद करून दौलत चालवावी हें करणें प्राप्तस्थास गाजूदीखान हाल आहेत त्याजवर बदनामी आली त्याच फेन्यांत अद्याप फिरत आहेत याजकरितां इतके खोल पाण्यांत शिरणें नको म्हणोन नवाबास इच्छा नाहीं परंतु माझी हाउस आहे या विषई येक वेळ, दोन वेळा च्यार वेळ श्रीमंतांस विनंती करीन असें करतां येखादें वेळेस तरी मनांत येईल हा सिलसिला माझा चालूच आहे राहणार नाहीं असें बोलिलें रा छ रमजान हे विनंती

श्री

चैत्र वद ९ शके १७१६ ता २४ एप्रिल १७९४ ईसवी

विनंती विज्ञापना ऐसीजे पातपाहींतील मजकुर बोलत बोलत दौल, बोलिलें कीं पातषाहा इंग्रजाचे पुठ्यांत शिरावयास करतो. कारण काय त्यास कितेक दिवस इंग्रजापासीं बगाल्यांत पातशाहाचें राहणें जालें होतें ते वेळेस त्याचे मुदारातीचे सुखाचा अनुभव त्यास आहे प्रस्तुत खाया खर्चा वेगळ हैराणगत कैदे सारखा आहे रडणें भेकणें नित्य चाललें आहे त्यास पातशाईची थोडीच आशा आहे" खायास खर्चास आराम इतकें असले म्हणजे संतोष याजकरितां येखादे वेळेस इंग्रजांनीं लालुच दाखविली तर उठोन जाईल ही येक कमाईतच आहे" म्हणोन बोलत होते रा छ रमजान हे विज्ञापना,

श्री

चैत्र वद ९ शके १७१६ ता २४ एप्रिल १७९४ इ०

विनंती विज्ञापना ऐसीजे दौलाचे सांगितल्याप्रमाणें पुरवण्या स्वामीस लिहिल्या याचीं उत्तरें समर्पक गोड आणि दावाचीं लि॥ यावीं याचें कारण मला हे पुसतील कीं 'तुम्ही पत्रें लिहिली त्याचीं काय उत्तरें आलीं' तेव्हा मला पत्रें दाखवावीं लागतील यास्तव विनंती लिहिली आहे तर छ २२ रमजान हे विज्ञापना

श्री

चैत्र वद्य ९ शके १७१६, ता २४।४।१७९४ इ.

विनंती विज्ञापना ऐसीजे दौलाचे बोलणे जाले हा मार स्वामीस लिहिला याजवेगळ काही मार आढळात आला तो राजश्री गोविंदराव भगवंत यांस लि॥ आहे. सेवेत विनंती करतीज त्यावरुन ध्यानात येईल. रा छ २३ रमजान हे विज्ञापना.

श्री

चैत्र शुद्ध १४ शके १७१६, ता. १४ एप्रील १७९४ ईसवी

विनंती विज्ञापना. दौलाचे बोलण्यात आलें की " येलंदगल, वरगळ, नलगुडा वगैरे तालुकियाचें काम ईसामियां यास सागोन तालुक्याचे बंदोबस्ताकरिता त्यांस तेथें पाठविल्या पासोन तालुक्याची लावणी व आकार ईसामियाने खातरखा केला. परंतु जमीदार वगैरे मुफसद फार आहेत त्याची तंबी होऊन तालुका निर्बंध जाला पाहिजे. याजकरिता इंग्रजी दोन पलटणे कडपे प्रांती गंजीकोय्यापासीं होतीं तेथुन गजेंद्रगडचे बंदोबस्तास रवाना केली होतीं. तीं पलटणें येलगंदलाकडे आणवून ठेविलीं आहेत. येक हजारा सवाराचीही जमियत आहे या उपरी मुफसदाचा खलल न होता तालुक्याचा बंदोबस्त होईल" याप्रा याचे बोलण्यात आलें. आणखी बोलले की, 'देवगड च्यादेही तेथून जवळ आहे.' म्हणोन हंसत हंसत बोलले. यातील तात्पर्य तिकडील रुखावर दबाव. रा छ २३ रमजान हे विज्ञापना

श्री

चैत्र शुद्ध २ शके७१६, ता १७।४।१७९४

विनंती विज्ञापना. दौलाचे बोलण्यात आले कीं आसद अलीखान मुजफरुलमुलुक यांजकडे पहिले कडपे तालुक्याचें काम होते. अलिकडे सुगुरजटपोळ कृष्णातीरचा तालुकाही त्याजकडे दिला. ताडपत्री ताडकरी, सिगणमला, येलापुर हे तालुके ईसामियाकडे होते तेही आसदअलीखान याजकडे सागितले. येवुन तेथन येकहाती बंदोबस्त तालुक्याचा आसद अलीखान याज-

कडे जाला स्वार पायेदळ जमियत सान मार यांची मजबुत आहे तालुके यांचा बदोबस्त खासरखा ठेविला आहे ह्मणोन बोलण्यांत आलें साहा हजार स्वार व पैदल साहा हजार बारा हजार जमियत 'मारनिलेची आहे, रा छ २३ रमजन हे विज्ञापना

श्री

चैत्र वद ९ शके १७१६ ता २४ एप्रील १७९४ ईसवी

विनंती विज्ञापना दौलाचे बोलण्यांत आलें कीं वाळकुंरे येथील जमीनदरा रुक्मारडी व रमारडी याजपासी शकरराव भोंग यांनी नगदी ऐवज व चीज वस्त ठेविली याचा पत्ता लागल्यावरून उभयतां जमीनदारास हस्तगत करून पाटवण्याविशई भारामल तेजवत यास येथुन लि॥ फौजे सुद्धां वाळकुंदे प्रांती भारामल आल्याचा बातमी ऐकून जमीदार फरारी जाले तेजवतानी दोन हजार जमियत ज्याबज्या त्याच शोधास रवाना केली जमीदाराचा शोध देव गड चांदे येथें आहेत हा समजल्यावरून भारामल यांनीं चांद्यात रायेले पुर षोत्तम यास दाहा स्वार व च्यार हरकारे समागमें देऊन रवाना केले हे चांद्यात जाऊन तेथील देवीचे नजीक डेरा उमा होता तेथें जाऊन रुक्मारडी व दमारडी जमनिदार कबील्यासुद्धां पाटून तेथील अधिकारी नाना फौजदार व गुंडोपंत व यादोस्करदेव याचे जिमे जमीनदार लाविले त्यांनीं उत्तर केलें की ' जमीनदार आम्हांपाशीं आहेत सेनासाहेब सुभा याजकडे सांढणीस्वारा समागमे पत्र रवाना करिता तेथील आज्ञा येईल तशी वर्तणुक करूं य, प्रो बोलून रायेल पुरुषोत्तम यास यांनीं आपल स्वार बराबर देऊन पाचकोस. वर्धा पार करून दिल्हे पुरुषोत्तम फिरोन तेजवताकडे आला त्यांनीं येथें पाठविले त्याचे जबानी वर्तमान ऐकावे ह्मणोन त्यास बोलाऊन रुबरु त्यानें हा मार सांगितला दौला बोलिले ' वाळकुंद्याचे जमीनदार शकरराव याज पासीं खजीना होता तो घेऊन चांद्यांत राहिले वजीनस तेथील अधिकाऱ्याचे जिमे केले ये विषई सेनासाहेब सुभा यांस आपलें पत्र जावें व श्रीमंतीकडू नही त्यास पत्र जावें इकडील माहसवेदार असामीस त्यांनी आज्ञा देऊन ठेवावें हें त्यास लाजम नाही ' या प्रा दौलाचे बोलण्यात आले रा छ २३ रमजान हे विज्ञापना

श्री.

चैत्र वद्य ९ शके १७१६, ता. २४ एप्रील १७९४ ईसवी.

विनंती विज्ञापना. मीर पोकद अली शिकदरज्याहा बाहादुर साहेबजादे यास पुत्र हरमचे स्त्री पासुन छ १९ माहे रमजानीं रविवारीं च्यार घटिका दिवस शेष असता जाला. नबाबास अर्ज होऊन खुषी जाली. दौलतनें अर्जी पाठविली कीं गुलाम नजर देण्याकरिता हजर होत आहेत. रात्रीं येणे ह्मणोन हुकुम जाला. त्या प्रो येक घटिका रात्री नवाब बरामद होऊन दौलाची याद केली. पागावाले वगैरे लोक हजर होऊन साहेबजाद्यास पुत्र जाल्याच्या नजरा लोकांनीं केल्या' राछ २३ रमजाम हे विज्ञापना.

श्री.

चैत्र वद्य ९ शके १७१६, ता. २४।४।१७९४

विनंती विज्ञापना. असद अलीखान यास नवाबानी रुकसत कडप्याकडे जाण्याची छ १९ माहे रमजानी दिल्ही. छ १६ रोजीं दौलाचा निरोप घेऊन खान मार वेदराहुन कुचकरून छ १७ रोजीं गेले. राछ २३ रमजान हे विज्ञापना.

श्री.

चैत्र वद्य ९ शके १७१६, ता. २४ एप्रील १७९४ ईसवी.

विनंती विज्ञापना. व्यंकटरामदीक्ष याजकडुन चेनापटणाहुन अखबार आली ते रवाना केली आहे. लौकर मजकुर ध्यानात येईल. उत्तरें रवाना व्हावयास आज्ञा जाली पाहिजे. राछ २३ रमजान हे विज्ञापना.

श्री

चैत्र वद्य ९ शके १७१६, ता. २४।४।१७९४

विनंती विज्ञापना. निस्तर किरकपात्रिक इंग्रजाकडील वकील बाहेर डेर देऊन राहिला होता. त्यास इंग्रजी दोन पलटणे नबाबाकडे नोकरीस आहेत. ती कडयेप्रातीं होतीं. तेथुन येलंगदलाकडे आणविली. हैदराबादेस पलटणे सरदार सुधां आल्याचे वर्तमान आल्यावरून पलटणातील लोक व सरदार

याची देखरेख करण्याकरिता किरकपात्रिक येथुन छ २२ रमजानीं निरोप घेऊन हैदराबादेस गेला. पलटणें पाहुन मागती बेदरास येणार. परकड इष्ट वारट वगैरे त्याचे सोबती मंगळवार पेठेंत पूर्वजागीं येऊन राहिले रा॥छ २३ रमजान हे विज्ञापना

श्री

पत्रे यादी १ शके १७१६, ता २४।४।१७९४

विज्ञापना ऐसीजे येथील ता॥छ १९ वर्तमान रमजान बुधवार पावेतों अखबार पत्री दाखल करून सेवेसी पत्राची रवानगी केली त्याजवरून ध्यानास आलें असेल, तदनतर येथील वर्तमान छ२० तीन प्रहर दिवसां नवाब जनान्या-सहित दौलाचे हवेलीस आले भोजन जनान्यांत होऊन नवाब दिवाणखा-न्यामध्यें बरामद जाले दौला व मीरआलम व आसदअलीखान वगैरे इस-मांचा सलाम जाला असद अलीखानास कडप्याकडे जाण्याची रुकसत देऊन पानदान इनायत जालें दौला व मीरआलम यांसीं खिल्यत होऊन प्रहर रात्रीस आपले हवेलीस आले छ १६ रोज गुरुवारी च्यार घटिका दिवसा लालबागामध्यें जनान्याचा बदोबस्त जाला मगरबाचे समई चादणीचे फर्षा वर नवाब बरामद जालें सरबुलदंजग व अर्जबेगी वगैरे इसमाचा सलाम जाला लखनउचे कंचनीचा नाच होता मना कंचनीस पुत्र जाला तिनें मान केली होती नजर दिल्ही. मुलास नवाबानीं हसली व बिंदिली, इनायत केली येक प्रहर दोन घटिकेस बरखास जालें छ १७ रोज शुक्रवारीं लाग (ल?) बागाचा झाडा करऊन तीन घटिकेस नवाब आले, जनान्याचा बदोबस्त जाला घासीमियाचे तबियतीची खबर आणिवली तीन प्रहर दि-वसां औरंगाबादेची अखबार गुजरली मगरबाईचे समई चबुत्र्यावर चांदणीचा फरष करऊन नवाब बरामद जाले सरबुलदंजग व खानसामाचा सलाम जाला खानसामाच्या फर्दा पाहुन च्यार घटिका रात्री बरखास जालें दौलाची अर्जी गुजरली छ १८ रोज मंदवारी तीन घटिका दिवसा लालबागामध्यें जना न्याचा बंदोबस्त जाला (म)गरबाचे समई सरबुलदंजग व अजमखान व दिव

दारखान व अर्जबेगी व खानसामा वगैरे मामुली लोक हजर जाले. नवाब कुर्सीवर वरामद जाले. सर्वांचा सलाम जाला. खानाखाने भरून सर्वांपुढें ठेविले. सर्व इसमानीं रोज्याचे भोजन केलें. पानदान देऊन तीन घटिका रात्रीं वरखास जाले. हैदरावादेहुन अलीज्यावाहादुर साहेबजादे यांची अर्जी व नजरमेवा गुजरला. प्रहर रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ १९ रोज रविवारी तीन घटिका दिवसा लालवागामध्यें जनान्याचा वंदोवस्त जाला. तीन प्रहर दिवसा दौलाची अर्जी गुजरली. मीर पोकेद अली सिकंदरजाहा साहेब जादे यांस हरमचे स्त्री पासोन पुत्र झाला. नवाबास अर्ज जाला. दौलानीं नजर देण्यास येतो असी अर्जी पाठविली. रात्रीं येणे ह्मणोन हु ( कु? ) म जाला. येक घटिका रात्रीं नवाव चादर्णीचे फर्षावर वरामद जाले. दौला व पागावाले व गफुरजंगाचे पुत्र वगैरे इसमाचा सलाम होऊन पोकद अली साहेबजाद्यास पुत्र जाला. याच्या नजरा केल्या. राछ २३ रमजान हे विज्ञापना.

## डांकराछ २ डांकवेरून

श्री

वैशाख शुद्ध ३ शके १७१६, ता. २।५।१७९४

मामुली पत्र डाकेवरोवरचें श्रीमंतांस,

श्री

वैशाख शुद्ध ३ शके १७१६, ता. २।५।१७९४

विनंती विज्ञापना. मीर पोकद अली सिकंदरज्या बाहादुर साहेबजादे यास दौलाची नात नवाबानी केली. त्याचे शादीचे निक्याचा साअत छ २९ रमजाम रविवारीं ठरून नवाबानीं सुभान अली वगैरे साहेबजादे याजकडुन सागोन पाठविलें कीं तुह्मी पादीचे सुर्ख रंगी पोपाग जवाहीर घालुन सिकंदर ज्याहा याचे हवोलिस हजर असणे त्या प्रो ते पोकद अली याचे मकानास तयार होऊन गेले. तीन प्रहर दिवसा पोकदअली आदिकरून साहेबजादे याची याद केली. हजर जाले. दौलानीं सिकंदर ज्याहा यास पोषाक्र जरी कारचोबी व जवाहीर सिरपेंच जिगा तुरा दस्तबंद भुजबंद कंठी पो-

हऱ्या जोड याप्रों पाठविले नबाबास व माहालांतही मर्से जवाहीरखाने किम्ती पाठविल्या मगरबाचे समई जनाने देवढीपासोन दौलाचे हवेली पर्यंत कनाता पडदे देऊन बंदोबस्त करउन नवाब जनान्यासहित साहेबजादे समवेत दौलाचे हवेलीस स्पाले समारंभाचा तपशील अलाहिदा पुरवणावरून घ्यानांत येईल राॅठ २ माहे षवाल हे विज्ञापना

श्री

वैशाख शुद्ध ३ शके १७१६,                                   ता २।५।१७९४

विनंती विज्ञापना मीर पोलद अली सिकंदरज्याहा बाहादुर साहेब जादे यांचा निका दौलाचे नातीसी लागावयाची साअत छ २६ रमजानी ठरून रात्रीं दौलाचे हवेलीस नबाब जनान्यासहित साहेबजादे मंडळीस घेऊन आले नवाबाचे हुकमाप्रो दौलांनी आम्हांकडे यादीचा रुका सुर्ख रंगीन कागदावर लेहुन पाठविला की तुम्हीं यावें त्यावरून च्यार घटिका रात्रि आम्हीं गेलो मीर पोलद अली, व सुभान अली व जुल फिकर अली व तैमूर अली च्यार साहेबजादे दौलाचे दिवाणखान्यामध्ये मजलस करून बसले होते, मीर आलम व इग्रजाकडील वकील मिस्तर इष्टवारट व येहतपामजंग आदि करून दरबारची इसमें तमाम अमीर मनसबदार सरदार मुतसदी हजर होते, मी जातांच मीर पोलद अली यांनी आपले जवळ बसउन पटणचे मोहिमे च्या वगैरे गोष्टी सुरु केल्या मीर आलम व इष्टवारट सहित बोलणें एक घटिका होत नबाब जनान्यांत व दौला खटपटीस होते. साहेबजादे मज्यालस करून कचन्याचा नाच होता इतक्यांत निक्याची साअत समय होतांच मिर पोलद अली यांस असील बोलाऊ आली चौघे साहेबजादे महालांत जाऊन मीर पोलदअली यासी दौलाचे नातीचा निका लागला त्यानंतर नबाब दिवाणखान्यामध्यें बरामद जाल मजला बाजुस जवळ बैसउन घेतलें सर्वांच्या नजरा जाल्या कंचन्याचा नाच होता. दौलांनी शरबताचा प्याला आपलें हातीं घऊन नबाबापुढें येऊन प्याला धरला प्रथम प्याला नबाबांनी प्राशन केला दुसरा प्याला दौलांनी पुढें केला तो नवाब प्राशन करावयास गेले तों

प्याला माघारा सरकाऊन घेतला. याप्रमाणे दोनतीन वेळा व्याहीपणाचे नात्यानें मष्करीचा अनुकार दाखविला. हा संप्रदाय करून दौलाचे हातचा प्याला घेतला. दौलानें बसावयाचा हुकुम जाल्याप्रमाणें बाजूस बसले. नबाब मजकडे पाहून बोलिले कीं " तुह्मी पार्टीकरिता त्याची गेप कोणें प्रकारची? याचा बयान थोडा सांगण्यांत सयुक्त तऱ्हेचा केल्यावरून नबाब काहीं हास्य-मुख होऊन संतोष जाले. मिस्तर इष्टुआरट इंग्रजाकडील यानें कलकतेकर जनरलाचे पत्र गुजराणिलें. तें दौलानीं वाचून दाखविलें. कचनाचा नाच समान करून खुषालखान व कल्याणखान याचे लेक येथें प्रस्तुत आले आहेत. त्याचे गायन दोन घटिका जालें. मिश्री रुपेरी वर्खाची पानदान भरून आह्मापुढें ठेविली. अमीर उमराव येरन लोक यास शरबताचे प्याले दिल्हे. याप्रमाणें समारंभ होऊन दहा घटिका रात्री बरखास जाली. रा छ २ शाबान हे विनंती विज्ञापना.

श्री

वैशाख शुद्ध ३ शके १७१६. ता. २।५।१७९४

विनंती विज्ञापना. दौलाचे बोलण्यांत आलें कीं ' रुकमाबाई व दमाबाई जमीदार वाळकोंडकर शंकरराव भोंग याची मालियेत घेऊन कबीले सुद्धा फरारी होऊन देवगडच्यांस गेले. त्याचा पत्ता तेथें लाऊन राघेल पुरुषोत्तम येथें आला. तेजवत याची पत्रें या मजकुराची रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यास गेली होतीं. त्याचा जबाब त्याजकडून आला कीं ' जमीदार चांद येथे आहेत. परंतु येकायेकीं पाठीसीं आल्यास हातीं कसे यावे? काही येक तऱ्हेने जमीदारास तेथून काढून देऊं, तुमचे हस्तगत होतील या अन्वये लिहिलें आलें ह्मणोन बोलले,' रा छ २ माहे शवाल हे विज्ञापना.

श्री

वैशाख शुद्ध ३ शके १७१६. ता. २।५।१७९४

विनंती विज्ञापना. वजीरखान वासीम वगैरे वराड तालुकियाचा अमील तेथून निघोन दर मजल बेदरास छ २९ माहे रमजानी येऊन उतरला.

समागमें पांचसें स्वार व दोनशें पायदळ दोन हत्ती याप्रमाणें सरंजाम आहे तोछ २ माहे पवाल हे विज्ञापना

थी

वैशाख शुद्ध ३ शक १७१६ ता २।५।१७९४

विज्ञापना ऐसीजे, येथील वर्तमान ता छ १९ रमाजान रविवार पावेतों अखवार पत्रीं लेखन करून सेवेसी पत्राची रवानगी केली त्याजवरून ध्यानांस आलें असेल साप्रत येथील वर्तमान छ मजकुरीं मीर पोलद अली साहेब जादे यांस पुत्र झाल्याच्या नजरा होऊन च्यार घटिका रात्रीं वरखास जालें छ २० रोज सोमवारीं पांच घटिका दिवसा नव्या वगल्यामध्यें नवाब बरामत जाले पागावाले व मीर आलम व रायेरायां, मुनसी वगैरे इसमाचा सलाम जाला दौलाची याद केली ते हजर जाले कित्येक लोकांच्या नजरा जाल्या दौला व मीर आलम यांसी खिलवत होऊन येक प्रहराचे अमलांत वरखास जाले कामाठ्याचे दारोग्यास हुकुम जाला जे साहासे कामाठी रायेचुरास पाठऊन माहाबतजंगाचे कोठ्यांतील चकमकी बदुका आणाव्या मगरबाच समई मीर पोलद अली वगैरे चौघे साहेबजादे यांजकडे खान्याचे खाने पा। रात्रीं दौलाची अर्जी व निरखबंद गुजरला. छ २१ रोजीं मंगळवारीं लाल बागाचा झाडा करून प्रातःकाळीं येक घटिका दिवसा नवाब आले मीर पोलद अली साहेबजादे यांची याद केली ते पाच घटिका दिवसां हाजर जाले त्याची नजर जाली रात्रीं जनान्याचा बंदोवस्त होऊन कंचन्याचा नाच जाला दौलाची अर्जी गुजरली छ २२ रोज बुधवारीं च्यार घटिका दिवसां लालबागामध्यें नवाब आले जनान्याचा बंदोवस्त जाला तीन प्रहरास कमलासाहुन आंबे २ व हेग्या आल ते गुजरले रात्रीं दौलाची अर्जी व धारणेचा निरखबंद गुजरला छ २३ रोज गुरुवारीं हैदराबादेपर्यंत टपा फुलें वगैरे जिन्नस येण्याकरितां बसविला दिवसा दरबार जाला नाहीं रात्रीं दौलाची। अर्जी गुजरली, छ २४ रोज शुक्रवारीं तीन घटिका दिवसां नवाब लालबागामध्यें गेले येक प्रहर पांच घटिका दिवसां मीर पोलद अलीसाहेब जादे

याचे मकानास बख्शी बेगम वगैरे बेगमा तेरा रथ गेले. पाचवे दिवसाचा समारंभ जाला. च्यार घटका दिवस शेष राहता मोतियाच्या फुलाच्या वेण्या व गजरे नबाबानी साहेबजादे याजकडे पा॥. मगरबाचे समई बेगमा हवेली आल्या. रात्री दौलाची अर्जी गुजरली. छ २५ रोज मंगळवारी दिवसा दरबार जाला नाही. रात्री दौलाची अर्जी व चारणेचा निरखनामा गुजरला. छ २६ रोज बुधवारी तीन घटिका दिवसा गुलशनबागामध्ये नबाब बरामद जाले. सैद उमरखान व जमादार वगैरेना सलाम जाला. त्याउपर हुमायुनाची याद केली. तो हजर जाला. हजामत होऊन च्यार घटिकेस बरखास्त जाले. मीर सुभानअली व जुल्फकार अली व तैमुर अली व जहांगीर अली चौघे साहेबजादे व मनसुरजंग वगैरे मरदाने हुकूम जाला की ' शादीचे सुर्वरंगी पोषाग घेऊन मीर पोकदअली साहेबजादे याचे मकानी असावे. फराषखान्याचे दारोग्यास हुकूम होऊन जनाने देवडीपासोन दौलाचे हवेली पावेतो कनाता देऊन बंदोबस्त करविल्या. तीन प्रहरास मीर पोकद अली वगैरे साहेबजादे येऊन हजर जाले. दौलानी कारचोबी पोषाग व जवाहीर त्याने मीर पोकद अली यास पा॥. येक घटिका दिवस शेष राहता दौलाचे हवेलीस जनानापुढे पाठऊन बंदोबस्त जाला. नबाब मगरबाचे समई गदीचे हाथीवर स्वार जाले. पिछाडीस सरबुलंदजंग होते. मीर पोकद अली घोड्यावर, बरकडही साहेबजादे घोड्यावर स्वार होऊन दौलाचे हवेलीस आले. जनान्याचा बंदोबस्त होऊन नबाबानी अटीचसे खाने मिठाई व वस्त्रे जव्हेर नवरीस फुले पाने या प्रो॥ सरजाम आणून चढावा चढविला. काजीस बोलाऊन पाच घटिका रात्री मीर पोकद अली याचा निका दौलाचे नातीशी लागला. त्यानतर नबाब बाहेर आले. दौलाचे दिवाणखान्यांमध्ये बरामद जाले. दौला व मीर आलम व यहेतपामजंग व सरबुलंदजंग वगैरे लोकाच्या नजरा जाल्या. रावजी आले. सलाम जाला. दौलाने परवताचा प्याला आपले हाते नबाबास दिल्हा. दौला व रावजीसी बोलणे जाले कवालाचे गायन ऐकून येक प्रहर दाहा घटिकेस बरखास्त जाले. जनान्यात जाऊन शरबत, खोरी व खाना जाला.

येक प्रहर पांच घटिका रात्रीं दिवाणखान्यामध्यें नबाव बरामद जाले मीर पोकद अली वगैरे साहेबजादेनीं नजरा केल्या काजीस पांच पार्चे इनामस जाले दौला व मीर आलम यांसीं बोलणें होऊन दोन प्रहर तीन घटका रात्रीस गर्दाचे हार्तीवर स्वार होऊन रोषनाईनें आतषबाजी होत हवेलीं दाखल जाले छ २७ रोज सोमवार दोन घटिका दिवसां नबाव लालबागांत आले रात्रीं दौलाची अर्जी गुजरली छ १८ रोज मगळवार दोन घटिका दिवसां लालबागामध्यें नवाब आले जनान्याचा बंदोबस्त जाला वजीरखान पांचसे स्वार सुद्धां येऊन उतरल्याचा अर्ज जाला रात्रीं दौलाची अर्जी व मारणेचा निरखनद गुजरला छ २९ राजीं बुधवारीं दिवसा दरबार जाला नाहीं तीन प्रहरास फरासखान्याचे दारोग्यास हुकुम होऊन जनान्याचे देवढीपासोन दौलाचे हवेलीपर्यंत कनाता देऊन बंदोबस्त केला चांदरात येकुणतिसावे तारखेस जाली चांदरातीच्या तोफा सुटल्या छ १ शवाली इदीचा समारंभ होई(ल) ता छ २ शवाल हे विज्ञापना

श्री

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ ता ७।५।१७९४

श्रीमंत रावसाहेबास मामुली हवाल्याचें पत्र

श्री

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ ता ७।५।१७९४

विनंती विज्ञापना रमजानचे रोजे छ २९ माहे मजकुर. बुधवारीं समाप्त होऊन छ १ माहे शवाल गुरुवारीं इदीचा समारंभ इदगापासीं किल्लेदार व काजी व मुला यांस पाठऊन कुतबा पढावयाचें जालें येक प्रहर दोन घटिका दिवसां तोफाचे वार करविले, साहेबजादे मीरपोकदअलीसहित याद केली, लालबागांत नवाब बरामद होऊन साहेबजादे व दौला कांहीं कांहीं लोकांच्या नजरा जाल्या छ १ते छ५ शवालपर्यंत नित्य ईदीच्या नजरा लोकांकडील होत गेल्या छ ४ रोज रविवारीं आम्हांस ईदीच्या समारंभाकरितां बोलाविल्यावरून गेलों लालबागेमधें नवाबांनीं नवा दिवाणखाना तयार केला तेथें बरामद जाले

दौलाकडील रिसाला व पागेचे लोकांची नजर दौला ज्यालें उभे राहुन आपले हाते येक येक लोकास मदत करीत होते. नजरवाले लोकाची दाटी फार होती. आमची जाताना सलाम जाला. नबाबांनी जवळचे वाटेनें दिवाणखान्यात येणे म्हणोन हाताने इशारा केला. त्याप्रा। दिवाणखान्यात येऊन नबाबांनी जवळ बाजुस जागा दाखविली तेथे बसलो. येक प्रहरपर्यंत नजरा प्रथम दौलाकडील लोकांच्या, त्यानंतर जोशारजंगाकडील, त्याजवर सलाबतखानाचे लोक, याप्रा। जाल्या. संपूर्ण नजरा होत तोपर्यंत दौला उभेच होते. दोन प्रहराचें अमलांत बरखास्त जाले. रा। छ ७ पवाल हे विज्ञापना.

श्री

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ ता. ७।५।१७९४

विनंती विज्ञापना. समशेरजंग यास नबाबाचा हुकुम जाला कीं 'हैदराबादेत तुमची थोरली हवेली च्यार मिनाऱ्याचें रस्त्यातील आहे. ते हवेली तुह्मीं शहरास जाऊन आतील असबाब काढुन खाली करावी.' याप्रा। सांगितल्यावरून छ २ शवाली समशेरजंग हैदराबादेस गेले. हवेली खाली करून येणार. समशेरजंगाची हवेली दौलास देण्याची योजना व दौलानीं आपली हवेली मीरपोलादअली सिकंदर ज्याहा साहेबजादे यास आपण द्यावी येसा बेत आहे. रा। छ ७ माहे पवाल हे विज्ञापना.

श्री

वैशाख शुद्ध ८ बुधवारशके १७१६ ता. ७।५।१७९४

विनंती विज्ञापना. महंमद अमीरखान आरब यास नबाबानी बल्हारी कुरगोड वैगेरे टिपुकडील नवे तालुके पैकी कितेक गाव कसबे येथे दाखल नाहीं. टिपुकडील तसरुफात याचे तहकीकाती करिता अमीन मुकरर करून पाठविले. खान मार तालुक्यात जाऊन तहकीकात कितेक ठिकाणची केली व करितात. परतु दखल नबाबाकडील अद्याप नाहीं. हल्ली अमीखान अरब याची अर्जी नबाबास व दौलास पत्र आले ते छ ४ शवाली गुजराणुन दौला व मीर आलम व इंग्रजाकडील इष्टवारट वकील यासी बोलणें जाले.

तहर्कीक समजल्यानतर याची विनती मागाहुन लिहिण्यात येईल रा छ ७ माहे पत्राळ हे विज्ञापना

श्री.

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ ता ७।५।१७९४

विनती विज्ञापना वजीरखान यासीमाहुन पांचसे स्वार सुद्धां आले त्याचे मुलाजमता विषई दौलांनीं अर्ज नबाबास करून आपल्याउलमुल्क गुफर जंगाचे पुत्रास इस्तकबाल पाठविले छ २ माहे शवाली वजीरखानाची मुलाजमत होऊन चाळीस इसमाची नजर जाली रा छ ७ माहे पत्राळ हे विज्ञापना

श्री

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ ता ७।५।१७९४

विनती विज्ञापना कमटाणें येथील आंबराईची रखवाळी वढन असील व येकरामुदौलाखानसामा व नुरमहमदखान करोडा यांस सांगितली गाड्याचे पाहार चौकीस आंबराइपाशीं ठेविले आंबे पक्के होतील ते बरचेवर रोज पोंहचावे असी ताकीद जाली कित्येक झाडास आंबे आले नाहींत त्यास येक कसबी कारागर यानें अर्ज केला की ज्या झाडास आंबे नाहींत त्यास वार आणुन अन्याची फसल बारमाही चालती करतो त्यावरून त्याजला मसाले वगैरे आणण्याकरितां चारहजार रुपये नुरमहमदखान करोड्याकडुन देविले बहलोलखान यांस ताकिद गेली की ' चारहजार आंबे वहण्यासुद्धां तुम्हांकडुन दररोज येत जावे ' याप्रा ताकीद जाली रा छ ७ माहे पत्राळ हे विज्ञापना

श्री

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ ता ७।५।१७९४

विनती विज्ञापना चेनापटणाहुन व्यंकटरामनाक याजकडील अखबारभाटी ते रोमेर्सी रवाना केली आहे अवलोकनें ममकुर ध्यानांत येईल उत्तर रवाना व्हावयास आज्ञा जाली पाहिजे रा छ ७ पत्राळ हे विज्ञापना

श्री

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ . ता ७।५।१७९४

विनंती विज्ञापना. दौलाचे बोलण्यात आले कीं ' चेनापट्टण येथील गौरनर इंग्रजांकडुन होता तो तगीर जाला. दुसरा गौरनर विलायतेहुन लाट आबट ह्मणोन रवाना जाला तो येत आहे. अद्याप चेनापटणास दाखल जाला नाहीं. लौकरच येईल. ' ह्मणोन बोलण्यात आले. मिस्तर इस्टवारट जवळ बसले त्यांनीं आपले मुखें हे सांगितलें. रा छ ७ पाहेषवाल हे विज्ञापना.

श्री.

वैशाख शुद्ध ८ बुधवार शके १७१६ ता. ७।५।१७९४

विज्ञापना ऐसीजे. येथील वर्तमान ता छ २९ माहे रमजान बुधवार पावतों अखबार पत्रीं लेखन करून सेवेसी पत्राची रवानगी केली त्यावरून ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान. छामारीं मगरबाचे समई तरकप महालामध्यें नबाब बरामद होऊन चांदरातीच्या तोफा सुरु करण्यास हुकुम जाला. चार घटिका रात्रीं नबाब जनान्यासहित दौलाचे हवेलीस आले. आसद अलीखान याचे पुत्राकडील चढावा मिठाईचें खाने व फुले पानें वगैरे सरंजाम जवाहिर वस्त्रेसुद्धा गुजरलीं. भोजन होऊन सात घटिका रात्रीं दिवाणखान्यामध्ये नबाब बरामद जाले. दौला व मीर आलम व पागाराळे वगैरे इसमाचा सलाम जाला. दौला व मीर आलम यासी खिलवत जाली त्यास मोतिया फुलाचे हार दिल्हे. एक प्रहर यक घटिका रात्रीं बरखास होऊन षिकारी म्यान्यामध्ये नबाब सवार जाले. रोशनीने हवेली दाखल जाले. छ १ माहे शवाल गुरुवारीं ईदीचा समारंभ सबब मीरपोलादअली ' वगैरे साहेबजादे व दौलाची याद केली. ईदगास किल्लेदार व काजी व मुला तिवांस पाठविले, ते कुदवा पढुन आले. तोफाचे बार दहा घटिका दिवसा करऊन नबाब लालबागामध्ये बराम द जाले.

मीरपोकदअली व सुभानअली व जुलफकारअली व तैमुरअली व दौला व पागवाले व येहत पामजग व मीरआलम वगैरे मामुली इसमाचा सलाम जाला ईदीच्या नजरा केल्या बरखास होऊन साहेबजादे यांस समागमें जनान्यांत नवाब घेऊन गेले त्यासहित भोजन होऊन पानदान हार होऊन साहेबजादे यांस निरोप दिल्हा ते आपले मकानास गेले रात्रीं च्यार घटिका नव्या वगस्यामध्यें नवाब बरामद जाले सरबुलंदजग व आजमखान व अर्जबेगी वगैरेचा सलाम जाला पंना भांडाचा नाच होता समशेरजगास हैदराबादेंतील हवेली खाली करणें म्हणोन हुकुम जाला येक प्रहर येक घटिकेस बरखास जाले छ २ रोज शुक्रवारीं येक प्रहर दोन घटिका दिवसा लालबागेमधें दिवाणखान्यांत नवाब बरामद जाले दौला व पागेवाले वगैरे मामुली लोकांचा सलाम जाला वजीरखानास इस्तकबाल आपल्याउलमुलुख याजला पाठविलें त्यास च्यार पारचे पारचोबी व सरपेंच वजीरखानानी दिल्हा वजीरखानाची मुलाखत होऊन चाळीस इसमांची नजर जाली कमटाणें येथील आंबराईचे बदोबस्ताकरितां मामावदन असावेस हुकुम जाला दौलासी बोलणें जालें घासामियांकडील लोकांच्या नजरा जाल्या येक प्रहर साहा घटिकेस बरखास जाले हैदराबादेस समशेरजग गेले सजावरदौला रुकसत होऊन उदगीरीस गेला अर्ज जाला रात्रीं च्यार घटिकेस बंगल्यामधें नवाब बरामद जाले सरबुलंदजग व आजमखान वगैरे लोकांचा सलाम जाला पागेकडील वारगिराच्या नजरा जाल्या सरबुलंदजंग व अजमखान व गुलाम इमाम यांस मोतिया फुलाचे हार इनायत जाले लखनउचे कचनीचा नाच होता प्रहराचे अमलांत बरखास जाले छ ३ रोज मदवारीं तीन घटिका दिवसा ( + + + + येक पान नाहीं पृष्टांक ४१८ ) लालबागामधें जनान्याचा बदोबस्त करविला नांदेडाहून खरबुजाचे बैल आले ते जोरावरजंगाकडून गुजरले दोन प्रहरीं दिवसा दौलाची अर्जी गुजरली रा छ ७ मवाल हे विज्ञापना

छ १६ रोजीं टपारवाना

श्री.

वैशाख वद्य १ शुक्रवार शके १७१६ ता. १६।५।१७९४

श्रीमंत रावसाहेब मातुश्री ह्याल्याचे पत्र. ( ता. १६ शवालचें )

श्री

वैशाख वद्य १ शुक्रवार शके १७१६. ता. २।५।१७९४

विनती विज्ञापना. नवाबाची सालगीरे छ ११ माहे शवाल रविवारीं नवाब दौलांनी नजर करावयाचा सरजाम सोन्या रुप्याचीं खरबुजें तयार करविलीं. नवाबास अर्जी पाठविली. दोन घटका दिवस असता येणें ह्मणोन हुकुम जाला. त्या प्रा। दौला सरंजामसुद्धा हजर जाले. रात्रीं दोन घटिकेस नवाब बरामद जाले. दौलानी सोन्याची खरबुजें पाच हजाराचीं व रुप्याचीं दोन हजाराचीं खरबुजें बादाम, पिस्ते आक्रोड मिश्री चिरोंजे याचे खाने पनास व पानेसुपारी लवंगा इलायची फुलें अत्तर गुलाब याप्रा। सरंजाम व गुल अनारी रंगाचा पोषाख गुजराबुन नजर केली. मीर आलम व पागावाले आदिकरून सर्वांनीं नजरा सालगिरेच्या केल्या. नाच राग रंग होऊन साहा घटिकेस बरखास जालें. रा। छ १६ माहे शवाल हे विज्ञापना.

श्री

वैशाख वद्य १ शुक्रवार शके १७१६ ता. १६।५।१७९४

विनती विज्ञापना. पावेखान बीडवाला नवाबाचे सरकारात सरदार आहे त्याजपासीं येक जमातदार मऱ्हाटा ग्रहस्त हमेषा आह्माकडे येणें जाणें घरोबा अशा रितीचा आहे, त्यानें येक वर्तमान सांगितलें कीं इंग्रजी दोन पलटणें

नवाबाकडे नौकर आहेत ते कडप्याकडून हैदराबादेस आली, ती दोन पल्टणें व गुट्टाकडील पांच येक सात पल्टणें इंग्रजी लोक जगत्याळापर्यंत गेली तें पाहून येक दोघे स्वार आले इंग्रजी पल्टणें जगत्याळाहून शाडीचे मार्गे देवगड चांदाचे रुखे ज्या जागीं विठ्ठलपंत सुभेदार भोंसल्याकडील फौजसमवेत आहे त्याजवर अचानक रात्री जाऊन छापा घालावा येमी बातमी आहे भारामल विठ्ठलपंत सुभेदारापासोन तीन कोसाचे फासल्यावर सोळा हजार फौज सुद्धा आहे त्यास नवाबाकडील पत्रें सांडणी स्वार बरावर गुप्तरूपें गेली की ' पल्टणें देवगड चांदाचे मार्गे येतात , त्याची बातमी ठेऊन तिकडुन पल्टणें व येके बाजुनें तुह्मी येकसमई भोंसल्याकडील फौजेवर हंगामाकरून फौज तार बतार करावी ' याप्रो। बातमी समजली ह्मणोन जमातदाराचे सांगणें तें येकुन मात्र घेतलें परंतु याचा विच्यार करतां मनसम्यास असी गोष्ट येत नाहीं कारण की गुटुरची पांच पल्टणें इंग्रजी इंग्रज या का माम सहसा देणार नाहींत इंग्रजाची दूरदेशी व मनसम्याचा पाळा जाय, तह सोडून भलतीच गोष्ट आपण होऊन येकायेकी कसी करतील ? त्यांत इंग्रजांस फरासीसाचे मसलतीचा पायेबंद असा नाहीं कीं तुर्त काली ।न। डोई उचलुन दुसरी कोणती येक मसलत करावी तेव्हा गुट्टाकडील पल्टणें हे गोष्ट कांहींच मिळत नाही कदाचित मुसारेह्मचे लोक नवी पल्टणें यांनी सचविली त्या पैकीं असतील तर असोत परंतु परभारा जगत्याळाक डून पल्टणें पाठवुन भोंसले यांचे फौजेवर दगा करावा हेही धोरण दिसत नाहीं जे गोष्ट दम्मानें करणें ते जाहिराणा बोलण्यांत येणार नाहीं दौला सहजी येक दिवसीं आह्मासी बोलले कीं 'यळगंदल वरंगळ तालुक्याकडे दोन पल्टणे इंग्रजी कडप्याकडुन आणविली ईसामियांनी तालुक्याचा बंदोबस्त केला त्याजपासीही जमियत स्वार आहेत पल्टणें वरंगळ प्रांतीं राहिली असतांच जुरुर वगैरे बंदोबस्त हो बोलणीं भोंसले यांजकडील फौज जवळ आहे आपलीही जमियत नजीक हा दाब दाखऊन बोलले याची [illegible] आहे यावरून वाटतें कीं दगा करण्याचा

मननना असता तर पत्रणे व स्वाराचा दाब बोलण्यात न येता. हा विच्यार पाहता यातनी सांगितली ते अशीच काहीं दिसते. येथीलें वर्तमान ते ध्यानांत यावें वास्तव विनंती लिहिली असे. रा छ १६ पवाल हे विज्ञापना.

श्री

वैशाख वद्य १ शुक्रवार शके १७१६ ता. १६।५।१७९४

विनंति विज्ञापना येथें वर्तमान ऐकण्यात आल्याची विनति.

टिपुचे पुत्र पटणास पोहचल्या नंतर टिपुनें पटणाहुन कुच करून हुन-कोट्यास आला. तेथुन पिळगुट्यास येणार. दहा हजार स्वार व तीन हजार बार या प्रा। जमियतगुतीस टिपुकडील न न वर्तमान.

महमद अमीनखान आरब सरहा-देचे तहकीकाती करिता बरद्दारां-कडे गेलें होते ते छ १९ रम-जानी पागटुरास आल्याची खबर. असद अलीखान वेगनपलीस जाऊन पोंहचले.

कलमे नुमार तीन याप्रा। वर्तमान दाट आहे. टिपु पीलगुट्यास आल्याचें व गुतीवर फौज पाठविली या वर्तमानाची तहकीकात करून मागाहून लिहि-ण्यात येईल. आलफखान करनुळकर यांचें पत्र शडमल ह्मणोन नबाबाचे येथील दप्तरचें मुत्सदी आहेत त्यांस आलें. त्यात सदरहु टिपुकडील मजकुर लिहिला होता. ते पत्र मारनिलेनी दौलास दाखविलें. दौलांनी उत्तर त्यास केलें की ' आपल्या तालुक्यात फिरण्यास ज्याचा तो मुखतियार आहे. ' याप्रमाणें वर्तमान ऐकिलें ते लिहिलें असे. रा छ १६ माहे पवाल हे विज्ञापना.

श्री

वैशाख वद्य १ शुक्रवार शके १७१६, ता. १६।५।१७९४

विनंती विज्ञापना. वेदगान छावणी ( पृष्ठांक ३२२-३२४ गहाळ )

पृष्ठांक ४२५ चालू.

. . . .

कबीला.

१ हामीदुल्लाखान रुस्तुम यारजंग याचा कबीला ज्याहाआराम बेगम नबाबाची कन्या.

१ मीरकुदद्दुलाखान इंवारतयावजग यास नवाबाची कन्या ज्यानी वेगम यांची लेक तिचें नांव साजिदा वेगम

१ मीर पाहाबुदीखान

१ मीरफतेअलीखान सिपह सालारजग इमारतयारजंगांचें मधु येकमात म्हणजे येकोदर

३ गोरी वेगम वसालतजंगाची स्त्री यांजपासीं हैदराबादेंत आहेत

१ नसरुल्लाखान

१ फतहमखान

१ परजंभ

———

३

———

८

एकुण आठ पुत्र हैदराबादेंत आहेत रा छ १६ मोह पत्राल हे विज्ञापना

श्री

वैशाख वद्य १ शुक्रवार शक १७१६ मखवार ता १६।५।१७९४

विज्ञापना येसीजे—येथील वर्तमान येथील वर्तमान ता छ ५ मोह पत्राल सोमवर पावेतों अखबार पत्रीं लेखन करून सेवेसी पत्राची रवानगी केली त्यावरून ध्यानास आलें असेल तदनतर येथील वर्तमान छ भारी च्यार घटिका दिवसा नबाब लालबागामध्यें येऊन जनान्याचा वदोवस्त करविला दिवसां दरबार जाला नाहीं रात्री दौलाची अर्जी व धारणेचा निरखबंद गुजरला छ ९ रोज मगळवार तीन घटिका दिवसां लालबागामध्यें जनान्याचा बदोवस्त जाला रात्रीं येक प्रहर येक घटिका दिवसा चांदणीचें फर्षावर नबाब बरामद जाले. सरबुलदग व रायेराया व मुनषी यांचा सलाम जाला कवालाचें गायन येकुन येक प्रहर च्यार घटिकेस वरखास जाले छ ७ रोज बुधवारी दिवसा दरबार

जाला नाहीं. रात्रीं साहा घटिकेस चांदणीचें फर्शावर नबाब बरामद जाले. सुरखुलदजंग व अजमखा व रायेराया व मुनशी व अर्जबेगी वगैरे मामुली लोकांचा सलाम जाला. कबालाचे गायन येकिले व रायेराया यांच्या फर्दा पाहुन येक प्रहर पाच घटिकेस बरखास जाले. छ. ८ रोज गुरुवारीं तीन घटिका दिवसां लालबागामधें नबाब आले. जनान्याचा बंदोबस्त जाला. दाहा हाथी सवदागीर हजर जाले. साहा घटिका दिवसा खिडकी बाहेर नबाब आले. पागावाले व अर्जबेगी व रायेराया वगैरे इसमांचा सलाम जाला. हाथी पांच व हातन्या पांच पाहिल्या. सात घटिकेस बरखास जाले. घटिका दिवस शेष असता जोरावरजंग तालुक्यांत जाण्याकरिता रुखसती विषई दौलाची अर्जी गुजरली. त्यावरुन पांच घटिका रात्रीं नबाबानीं रुखसतीचें पानदान दौलाकडे पाठविलें. जोरावरजंग रफादुलमुलुक यास तालुक्यांत जाण्याची रुखसत जाली. छ ९ रोज शुक्रवारीं येक घटिका दिवसा लालबागामधें नबाब येऊन जनान्याचा बंदोबस्त जाला. दिवसां दरबार नाही. रात्रीं दौलाची अर्जी व धारणेचा निरखबद गुजरला. छ १० रोज मदवारी तीन घटिका दिवसां लालबागामधे जनान्याचा बंदोबस्त जाला. दिवसा खैरसला. रात्रीं मामुली लोक हजर होते. त्यास जबाब जाला छ ११ रोज रविवारी प्रातःकाली दौलांची अर्जी गुजरली. त्यास हुकुम जाला जे मालगिरेचा सरंजाम दोन घटिका दिवसा राहता घेऊन येणें. कबुतरखाना व चिनीची बासनें वगैरे सरंजाम हैदराबादेकडे रवाना करण्याचा हुकुम (द) रोगे यास जाला. तीन प्रहरास आसदअलीखान याची अर्जी नबाबास व दौलास पत्र बैगनपलीहून आले तें दौलानी अर्जीसहीत नबाबाकडे पाठविले. दोन घटिका दिवसा शेष असतां दौला सालगिरेचा सरंजाम घेउन हजर जाले दोन घटिका रात्रीं नबाब दिवाणखान्यामधें बरामद जाले. दौला व मीर आलम व पागावले व रायेराया वगैरे मामुली इसमांचा सलाम जाला. दौलानीं पोषाक व खरबुजें सोनेरी रुपेरी व मेवाखाने गुजराणिले. चंदा कंचनीचा नाच होता. दौलांस फुलाचा हार दिल्हा. साहा घटिकेस बरखास जाले. छ १२ रोज सोमवारी च्यार घटिका दिवसा नबाब कबुतरखान्यापासीं

आले सैदमुनवरखान वगैरेचे सलाम जाला, फकुतरें पाहून हैदराबादेकडे रवा ना करण्याचें सांगितलें सालगिरेचा बवर्चीखाना पाहिला साहा घटिकेस लालबागामध्ये येहून जनान्याचा बंदोबस्त जाला चिमणाराजे औरंगाबादेहून बेदरास येउन उतरले याचा अर्ज जाला रात्री दौलाची अर्जी व धारणेचा निरखबंद गुजरला छ १३ रोज मगळवारीं च्यार घटिका दिवसा नवाब लालबागामधें येऊन जनान्याचा बदोबस्त जाला दौलाची अर्जी प्रहर दिवसा गुजरली दिवसा दरबार जाला नाहीं रायचुरहून चकमकी बंदुखा माहबतजंगकडील नवाबांनीं आणविल्या त्या कामाठ्या समागमें आल्या चिमणाराजे यांस इस्तकबाल आफ्चशाउलमुल्क गफुरजंगाचे पुत्र यांस पाठविलें चिमणाराजे यांनीं त्यास तीन पारचे पोषख व दुशाल किनखाब व येक घोडा या प्रा नियाफत केली, सिरपेंचही दिल्हा रात्रीं दौलाची याद केली ते हजर जाले च्यार घटिकेस बंगल्यामधें नवाब बगालमध्यें बरामद जाले दौला व मीरआलम व पागावाले व रायेरायां व मुनषी वगैरे मामुली लोकांचा सलाम जाला चिमणाराजे यांची मुलाजमत होऊन सात इसमांची नजर जाली बसालतजंगाचा चेला मरमतखां याची मुलाजमत नजर जाली पना मांडाचा नाच होता असदअलीखानाचे पुत्रास तीन हजारी मनसबा आलमनगारा जाला दौला व मीर आलम यांसी खिलवत होऊन प्रहर रात्रीं बरखास जाले छ १४ रोज बुधवारी लालबागाचा मार्ग करऊन च्यार घटिका दिवसां नबाब आले जनान्याचा बदोबस्त जाला रा छ १९ माहे शवाल हे विज्ञापना

वैशाख वद्य ८ शके १७१६ गुरुवार ता २२।५।१७९४

छ २२ रोजीं टपा रवाना पुण्यास

मामुली हवाल्याचें पत्र रावसाहेब पेशवे यांस

छ २२ माहे शवाल मुकाम बेदर

श्री

वैशाख वद्य ८ शके १७१६ गुरुवार ता २२।५।१७९४

विनंती विज्ञापना विस्तर किरकपात्रीक इमजाकडील वकील भागानगरास गेला होता तो येथें आला तो अबदाईत राहिला कारण की पहिला

वकील मिस्तर कनवी मंगळवार पेठेंत सेव्याचे वाड्यांत राहात होता. नंतर नवाब मंगळवार पेठेंत राहिले तेही जागा नवाबाचें तसरुफात होती. भिंती वगैरे जागा पाड पाड करून खराब केली तसेच जागेमध्यें इष्टवर होता. साप्रतचा तरीक आंबराईंत राहिल्यास इष्टवर जाऊन त्यास मंगळवारांत येऊन राहावयाविसी आग्रह केला. त्यावरून उभयता मिळोन जागा पाहावयास आले. जागा मरमततलब आहे सबब दुरुस्ती करावयास माणसें लाऊन मागती उभयतां आंबराईत जाऊन राहिले आहेत. जागा तयार जाल्यानंतर मंगळवारात रहावयास येणार. रा छ २२ षवाल हे विज्ञापना.

श्री

वैशाख वद्य ८ शके १७१६ गुरुवार ता. २२।५।१७९४

विनंती विज्ञापना. कडपे तालुक्यांत जमीनदारांनीं हंगामा केला आहे ह्मणोन बोभाट आल्यावरून येथुन असदअलीखान याची रवानगी केली खान मजकुर कडपे तालुक्यात जाऊन पोंहचुन प्रथम नारायेणराज जमीदार अडक तालुक्याचा त्याचें रहाते मकान कसबें अडक जागा बाकी येका अंगास पहाड व तीन अंगास मैदान किला जमीदारें जागा मजबुत व मुस्तकीम आहे तेथें मोर्चे लाविलें आहेत. जमीदार मजकुर याचाही सरंजाम किल्यांत मजबुत आहे ह्मणोन वर्तमान. याखेरीज आणिक जमीदाराची सस्थानें कडपे तालुक्यात येणेंप्रो.

१ मटलेवार उपालवाडा.
१ नासेवाले मुत्यालपाड.
१ संगापटण येमलेवाला.
१ पुललेचरु ता। खमम.
१ नरसापुर.

---

५

अडक घेतल्यानंतर पाच मकानें पुढें घ्यावीं तर जमीनदाराचा बंदोबस्त मकानें कलब झाडीचीं आहेत. रा छ २२ षवाल हे विज्ञापना.

मार्ग करून देतों म्हणोन बोलणें आहे दौला कबुल करीत नाहींत नित्य रद-बदल दाट आहे फखरुद्दौला औरंगाबादेहुन निघोन आले मोरिखे मुरादही ये णार रा छ २२ पवाल हे विज्ञापना—

श्री

वैशाख वद्य ८ शके १७१६ गुरुवार ता २२।५।१७९४

विनंती विज्ञापना नबाबाकडील पागा व जमातदार वगैरे लोक चराईस गेले तीनच्यार हजार पावेतो जमयत येथें आहे पावसाळा समीप छावणीचा बोल ठेरे मध्या व करारें होतात प्रस्तुत धारण येणें प्रो। आहे

जोरी

ज्येष्ठ शु० ४ शके १७१६ रविवार ता १।६।१७९४

* * * * * *

( पूर्वांक ४४० ) (पृष्ठ ११२ ते ११९ गहाळ )

प्रो चालावे तेव्हां अगोधरचा तहनामा बाहाल राहिला की नाहीं याप्रो आमचे बोलणें लिहुन पाठवावें तहनाम्याच्या नकला आणवाव्या म्हणोन सांगितलें यात्रिसी जसी आज्ञा येईल त्याप्रो। बोलण्यांत येईल रा छ २ जिल्काद हे विज्ञापना

श्री ६

ज्येष्ठ शु॥ ४ शके १७१६ रविवार ता ।१।६।१७९४

विनंती विज्ञापना या प्रांती टोळधाड छ १९ शवाली मौजे आदोन्या वरून छ ११ रोजी जनवाड्यास मुक्काम जाला तेथुन चिटगोप्यार्चे रुखे कलबर्गे प्रांती गेली लमानवधि करोडो टोळ आकाशमार्गे जात असतां अभ्र छायेप्रो छाया पडावी जेथें मुक्काम व्हावा तेथील झाडास पान राहीना ज्या गांवावरून टोळ धाड गेली तेथील गांवकरी वेसीबाहेर आडवे जाऊन साकर खोबरे दुध दही गुळ याप्रा सरंजाम आणुन ठेवीत गेले बेदराहुन तीन कोस जनवाडा येथें मुक्काम जाला होता रा छ २ माहे जिल्काद हे विज्ञापना

— —

ज्येष्ठ शुा ४ शके १७१६ रविवार ता १।६।१७९४

श्री ९

विनंति विज्ञापना ऐसीजे. आदवनी प्रकर्णी स्वराज्याचा फडच्या होणें या विशई नवाबानीं राजश्री नानास पत्र लिहिलें होतें त्याच जबाब आला कीं आदवनीकर याचे येथील सर्व वडीलपणें नवाबानीं पाहावें. सरकारचे स्वराज्याचा फडच्या करावा अथवा आमचे सरकारातुन कोणी पाठऊन बंदोबस्त त्याचे घरचा पाहुन स्वराज्याचा फडच्या करुन घ्यावा. असी मर्जी असल्यास * * * (पृष्ठांक ४४१) गहा * * च उधार आहे. यास्तव तहनामे भोसले काढीत नाहींत. घरातील भावाच्या घालमेली यांत तहनामे गल्हाटे असे ह्मणतात. नवाबाचे ह्मणणे आमचे जवळ नकला आहेत ह्या पाहाव्या भोसल्याचे ह्मणे असल काढाव्या, त्या मंजुर हे बोलतात. असल तहनामे विठलसुंदर याचे गारतीचे वेळेस अफरातफरीक जालें परतु त्यच्या नकला नानाजीपत याचे हातच्या पहिल्या आहेत. आज आह्मी नव्या लिहिल्या नाहींत. या प्रमाणें व द प्रतिवाद. बादमीचे स्वारींत खास मुधोजीबावा होते, ते वेळेस जाला. मला माहित आहे. तहनामा धरुन बोलु लागल्यास भोसले काइम हेतील. बादामीवर असेंच जाले. याजकरिता घरात्र रितीनें भोसलें याजकडील तहनाम्शाच्या नकला आणुन स्वामींनी पाहाव्या नंतर यासी बोलावयाचा निश्चय पका होऊन आज्ञा- यावी. यास उत्तर समर्पक द्यावे लागतें. तहनामा धरुन हे बोलुं लागल्यास त्यास उत्तर तहनामा पाहुनच द्यावे जर तहनामा कायम करून उत्तर देणे ठीक नाहीं असें असल्यास तहनामे हरवले आणि मागल्या तहनाम्या प्रा अमलात काये आले तेव्हां तो तहनामा कबुल नाहीं असे ह्मणोन नवाच तहनामा करावयास जबरदस्ती पाहिजे असे ह्मणावे तर हाली सरकारचे पत्र नबाबास आलें यात मुधोजी भोसले याचे तहनाम्याचा दाखला आहे त्यात पहिले तहनाम्याचा उधार आहे इकडुनही अडचण. इतका तपसील लिहावयाचा कारण जे स्वामी पुढें प्रसंगी ह्मणतील

की तुम्ही नीट बोल्त नाहीं बोलण्याचे प्रकार सर्व ध्यानांत यावे याचा नि श्चये खचित करून आज्ञा यावी त्या धोरणावर चालत जाईन ता छा २ जिल काद हे विज्ञापना

छ ९ जिलकाद अखबार

ज्येष्ठ शु। ६ शके १७१६ बुधवार ता ४।६।१७९४

रवाना छ ६ आवाल

श्री

विज्ञापना ऐसीजे येथील वर्तमान ता। छ १९ माहे, शवाल सोमवार पावे तो अखबार पत्रीं लेखन करून सेवेसी पत्राची रवानगी केली त्यावरून ध्या नास आले असेल तदनतर येथील वर्तमान रात्रीं दौलाची अर्जी व धारणेचा निरखनद गुजरला घासीमिया यानीं नबाबास मल्हाजमत केली होती त्याचा सरजाम मिठाई दोडमण वजन व फुलें गुलाब पानें सुपारी व पचवीस मोहरा नजर गुजरली छ २० रोज मगळवारी लालबागामध्यें तीन घटिका दिवसा नबाब आले कुहीरचे आबे जनान्यांत वटवडा करून दिल्हा रात्रीं दौलाची याद केली. ते हजर जाले पांच घटिका रात्रीं नबाब नवे बंगल्यामध्यें बरामद जाले मीरआलम व पागावाले वगैरे मामुली इसमाचा सलाम जाला मिस्तर किरकपात्रीक वकील इग्रजाकडील आला त्यानें कल कत्याचे जनरालचें पत्र गुजराणिले रोशनराव यानीं शादीची नजर केली लखनउचें कपनीचा नाव होता दौला व मीर आलम व किरकपात्रीक यांसी खिलत जाली येकप्रहर येक घटिकेस मरखास जाले छ २१ रोज बुधवारी दिवसा दरबार जाला नाहीं व्यकटराव सुरापुरकर आल्याचा अर्ज जाला त्यास इस्तकबाल राउराजीचे भाऊ आपाराव व राउराजीचे पुत्रास पाठविलें दौलाची याद केली व्यकटराव यांनीं राउराजीचें घरुमह पुत्रास पोशाग व मदेचच दोन दिल्हे पांच घटिका रात्रीं बगाल्यामध्यें नवाब बरामद जाले दौला व पागावाले व रायेरायां वगैरे मामुली लोकांचा सलाम जाला

व्यंकटराव सुरापुरकर यांची मुलाजमत पांच इसमाची होऊन नजर जाली. दौला व व्यैकटराव यासी दोन घटका बोलणे जालें. लखनउचें कंचनीचा नाच होऊन यक प्रहर तीन घटिकेंस बरखास जाले. छ २२ रोज गुरुवारीं दिवसां दरबार नाहीं. रात्री दौलाची अर्जी व धारणेचा निरखबंद गुजरला. छ २३ रोज शुक्रवारी दिवसां लालबागेमधें जनान्याचा बंदोबस्त जाला. रात्रीं दौलाची अर्जी गुजरली. छ २४ रोज मंदवारीं लालबागेमध्ये तीन घटिका दिवस नवाब आले. जनान्याचा बंदोबस्त जाला. वहलोल खानाकडील अर्जी गुजरली. रात्री कंचन्याचे ताफे बोलाऊन नाच रागरंग अतषबाजी रोषनाई जाली छ २५ रोज रविवारीं दिवसा दरबाराची खैर सला. रात्रीं पाच घटिकेस नवाब दिवानखान्यामधी बरामद जाले. दौला व पागावाले मुनसी व रायेराया वगैरे इसमाचा सलाम जाला. दौलासी खिलवत जाली. भोसल्याकडील पत्र माधवराव रामचंद्र यानीं गुजराणिले. येक प्रहर येक घटिकेस बरामद जाले. छ २६ सोमवारी दिवसा लालबागेमधें जनान्याचा बंदोबस्त जाला. रात्रीं साहा घटिकेस दिवानखान्यामध्यें नवाब बरामद जाले. दौला व पागावाले व रायेराया वगैरे मामुली इसमाचा सलाम जाला कादरखान अमील खममेठ याची मुलाजमत नजर जाली. रावजीकडे, येण्याविसीं सांगोन पाठविल्यावरून आले. सलाम जाला. दौला व रावजीसुद्धा खिलवत जाली. व्यंकटराव सुरापुरकर यास आदवनी रायेचुर वगैरे माहालाचे काम सांगितले. खिलवत इनायत जाली रुखसतीचें पानदान दिल्हे. महमद अमीखान आरब याची अर्जी दौलानी गुजराणिली. यक प्रहर च्यार घटिकेस बरखास जाले. छ २७ रोज मंगळवारी प्रातःकाळी दौलाचे हवेली परियंत खाच देण्यास हुकुम जाला. दौला व गफुरजंगाकडील व असदअलीखानाचा जनाना लालबागेंत येऊन बंदोबस्त जाला. गोपाळ पेठचे जमीदारानें चोवी बंगला दोनखणी तयार करऊन नबाबास पाठविला तो गुजरला. दिवसा दरबार नाहीं. रात्री दौलाची अर्जी गुजरली छ २८ रोज बुधवारी दिवसा लालबागामधे जनान्याचा बंदोबस्त

जागा रात्री दौलाची अर्जी व धारणेचा निरखबंद गुजरला नाचरागरंग मस्त पत्राजी रोशनाई जाली गवानी मीर्धा यांचे घरास आग लागुन दग्ध जाले. अर्ज जाला छ २९ रोज गुरुवारी प्रहर दिवसा रुहाबागामधे नवाब बरामद जाले सेरखडमरखान वगैरेचा सलाम जाला लालनहजामाची याद केली हजामत होऊन येक प्रहर तीन घटिकेस बरखास जाले रात्री महलोल्खानाकडील अर्जी गुजरली छ १० रोज शुक्रवारी दिवसा खेरसला. रात्री मीरपोकद अली याचे कवील्याकारिता मिठाई पताम खाने व फुले चंगेऱ्या व पाने सुपारी इलाची लवंगा वद म मिश्री खारीक खोबरे वगैरे सरंजाम हीसा मुदौला अर्जबेगी व यकरामुदौला खानमामा याजसमागमे नवाबानी दौलाचे हवेलीस पाठविले, पोषाग यक व जवाहीर आंदद पाच या प्रो सरंजाम दौलाचे हवेलीस आणिला, दौलानी अर्जी पाठविली चंदाकचनीचा नाच होता छ १ माहे जिल्काद मंदवारी यक घटिका दिवसा लालबागामधे नवाब आले जनान्याचा बंदो व जागा रात्री दौलाची अर्जी व धारणेचा निरखबंद गुजरला छ २ रोज रविवारी दिवसा दरबार जाला नाही रात्री च्यार घटिकेस फुलाचे हार दोन दौलाकडे पाठविले दौलाची अर्जी गुजरली छ ३ रोज सोमवारी दिवसा खेरसला रात्री दौलाची सिदी अबदुल याची गजीकोटयाहुन अर्जी आली त्यामुधा गुजरली छ ४ रोज मंगळवारी दोन घटिका दिवसा लालबागामधे जनान्याचा बंदोबस्त जाला रात्री पांच घटिकेस दिवानखान्यामधे नवाब बरामदजाले दौला व पागवाले व रायेराया व मुनशी वगैरे इसमाचा सलाम जाला व्यंकटराव मजेमार जमीदार हासनुरकर यास रुखसत जाली कचनाचा नाच पाहुन यक प्रहर यक घटिकेस बरखास जाले छ ५ रोज बुधवारी हुमणाबादेहुन तोफ लांबी दाहा गज दोन गिरे आली जिनसीत दाखल जाली. दिवसा दरबार नाही रात्री दौलाची अर्जी गुजरली या छ ५ माहे जिल्काद हे विज्ञापना

सदरहु पत्रे श्रीमंतास अखेर साला परियेत मालुम

# महाराष्ट्र इतिहास.

## खर्ड्यांच्या लढाईचा पत्रव्यवहार.

### ( गोविंदराव काळे यांचें दफ्तर. )

## सरकारी—नानास.

श्री.

वै॰ ( शके १७१५ ज्येष्ठ शु. २ सोमवार )

माघ॰ विनति ऐसि जे. छ. २६ ( वै० व. १३ गुरुवार ) रोजीं बाबाराव छ यस्ताचे सागितल्यावरून आमचे घरास चार घटका दिवस शेप राहतां आले. परस्परें आगतस्वागत बोलणे आले. राव म॥र यांनी तिकडील म॥र व आपले कर्ण्याचा व मजबुतीचा भाव सर्व सागितला की, "मी पाचच्यार वेळा राजश्री नानाकडें गेलों होतो. त्याचेही बोलण्यात सर्व प्रकारे स्वच्छता आहे कोणेही प्रकारे तर्फेनचे जाबसालाचा उलगडा व्हावा. येविपयीं मजलाही आज्ञा केली होती, त्याप्रमाणे सर्व दरजे मी मध्यस्तासी बोलोन यांची मर्जी हमवार केली आहे, त्यास प्रस्तुत मदारुलमहाम याचीं पत्रे व यादी आपल्याकडे आल्या असतील त्या काढाव्या, त्याची भवनि न भवाते करून कलमें नेमात आणावीं." याचे उत्तर मीं यासी केले कीं, "पत्रें अथवा यादी अद्याप आल्या नाहींत. येतील. त्यास, येथून यानीं दसखते ठरावून गोविंदराव व रघोत्तमराव याजपाशी दिल्या आहेत; त्या दसखताची तेथे भवति न भवति होऊन त्याजवर मदारुलमहाम जवाब लिहितील ते आल्यानतर यांनी मजूर करून नेमांत आणावे; ह्मणजे फडन्या. त्या यादींच्या नकला आह्मापाशीं

आहेत, परंतु तेथून करार होऊन आल्या नाहींत मग भवति न भवति केल्यांत फल काय ?" याप्रा। यासीं बोलणें जालें बाबाराव यांचें ह्म(ण)णें कीं, "प्रस्तुत यादी आणि पत्रें मदारुलमहाम यांजकडून आपल्याकडे आल्या ऐसें कल्याणराव यांनीं लिहिलें आहे" मी बोललों कीं "यादी आल्यास त्या तर तुह्मासी छपावून ठविते? येणार आहेत पहिल्या यादी पहावयाच्या असल्यास आहेत पाहाव्या त्याजवर दसखतें कसी करावीं त्याचे मसोदे ठराविले त्याचा निश्चयही अद्याप पका नाहीं गोविंदराव तेथें बोलून सरकारची आज्ञा येईल त्याप्रमाणें बोलण्यात येईल" ऐसें सांगितलें त्याजवरून ते कल्याणराव यांजकडे ऐसेंच लिहून पाठवितील—ध्यानांत असावें रा। छ ३० सवाल हे विनंति

श्री

(शके १७१५ ज्येष्ट शु २ सोमवार)

विनंति ऐसीजे सावतखान राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांजकडोन वस्त्रें पादीचे रस्मीयातीचीं घेऊन आले तीं नबाबास पावतीं कलीं मध्यस्तास पादीचीं व गमीचीं वस्त्रें होतीं तीं यावीं याचा विच्यार पडला कीं यांचे पुत्रास मरून फार दिवस जाले नबाबांनी आपला पुत्र यांस देऊन मनोधारण केलें तेव्हां गमी राहिली नाहीं आतां गमीचीं वस्त्रें दिल्यास कसें पडेल नकळे ह्मणोन याचा विचार कोणास पुसावयाचा आहे ? यांचें यांसच पुसोन घावें, यांस पुसल्यास हेही नका असें ह्मणतील याज कारितां मध्यस्तांस पुसलें कीं, सेनासाहेब सुभा यांचे येथील दोन प्रतींचीं वस्त्रें आपले नांवें आहेत यांचे देण्याचा विचार कसा ? यांचें उत्तर मध्यस्तांनीं केलें कीं गमीचीं वस्त्रें आहेत तीं आमचे समक्ष न आणितां तोषेखान्यांत देवावीं, व पादीचे रस्मीयातीचीं वस्त्रें आहेत तें (तीं) मात्र आणावीं त्यास त्याप्रमाणें केलें मारोशा लोभ दोन वस्त्रांपावेतों सुटला नाहीं रा। छ ३० सवाल हे विनंति

श्री.

( शके १७१५ ज्येष्ट शु. २ सोमवार. )

विनंति ऐसी जे. मनसुकराये कायत पेशजी जोरावरजंग मरहुम यांजकडोन प॥ आंबेजोगाई व पा॥ सेलगांव पा॥ परळी येथील अमीलीचे कामावर होता. त्याजवर माहासबा काढोन कैदेंत ठेविले. तेथेच मृत्यु पावला. त्याचा पुत्र ब्रजलाल भोंसल्याचे येथे नोकर होऊन सांप्रत सावतखान आले यांचे बराबर भोंसले यानी पाठविल्यावरून आला. सर्वान्या भेटी गोष्टी जाल्या. दोनच्यार दिवस जाल्यानतर जोरावर जंग मरहूम यांचे मामा व विश्वनाथपंत वकील यानीं नबाबास अर्ज करून मध्यस्तांस सांगितलें कीं, याचा बाप-जोरावरजंग याचा माहासबेदार-कैदेत मेला ते समई सर्व जिनस आज नास (?) जरजवाहेर ब्रिजलाल नागपुरास घेऊन जाऊन तेथे आश्रय करून राहिला. हल्लीं आला आहे. आमचा फडच्या करून देवावा. त्यावरून लाला मा॥र यास आणून बसविले. सावतखान यास नबाबाचा निरोप जाला. मध्यस्ताचा होणे तों लाळाची हे दशा याजकरिता छ. २७ रोजीं मध्यस्ताकडे येऊन फार रद्बदल केली कीं, मजसमागमे आला आहे. याजकरिता यास बसवू नये. मध्यस्ताचें ह्म ( ण ) णे कीं, तुह्मी आपला जिमा करून लिहून द्यावे कीं नागपुरास गेल्यानतर यास पोहचाऊन देऊ, नाहीं तर याचे जिम्याचा जाब करू. त्यास सावंतखान लिहून देण्यास अनमान कारितात. याजमुळें च्यार दिवस खानाचे जाण्यास तामुल जाला आहे. हे रदबदल जाल्यानतर खान मा॥ यानी मध्यस्तास सांगितले कीं, पांचा हजाराचे कापड गढवालचे भोसले याचे येथे जाणार त्याचे महसूल माफीचे दस्तक देवावे व दाहा बाहेरी परीद्याचे सिकारी सिकाकोल राजबंदरीहून येणार त्याचें एक दस्तक एकून दोन दस्तकें देवावीं त्यावरून मध्यस्तानीं दोन दस्तकें आपले मोहरेचीं करून देवावीं. रा॥ छ. ३० सवाल हे विनंति.

श्री.

( शके १७१५ ज्येष्ट शुद्ध २ सोमवार. )

विनंति ऐसी जे—आजपावेतों पागावाले, सराफ, साहुकार, मुतसदी वगैरे

मडळसि छपरवदी करण्याविषयीं नवाबाची आज्ञा जाली नव्हती छ २७ रोजीं सर्वत्रांस ताकीद केली कीं आपलाली ऊपरवंदी करावी त्यावरून उप राची तयारी होत आहे नवाबाचे महालांतील बायका नव दाहा आसामी हैदराबादेंत आहेत त्यास आणावयाकरितां समशेरजंग व तेजपा पांडे यांची रवानगी करणार आहेत छ ३० सवाल हे विनंति

श्री

( शके १७१५ ज्येष्ठ शु २ सोमवार )

विनंति ऐसी जे व्यंकट रामदीक्ष याजकडून चेनापट्टणाहून साप्रत दोन अखबारा व दोन लखोटे पत्राचे आपले नांवें आले एकूण च्यार पत्रांची रवानगी केली आहे अवलोकनें सविस्तर मजकूर ध्यानांत येईल उत्तरें रवाना करावयास आज्ञा व्हावी रा। छ सवाल हे विनंति

श्री

(शके १७१५ जेष्ठ शु २ सोमवार )

विनंति ऐसी जे सेनासाहेब सुभा यांजकडून सांवतखान नबाब व मध्य स्तास छम्मकर्णी पोषाग व जवाहीर घेऊन आले आमचे नियमानें मध्य स्ताची भेट व नबाबाची मुलाजमत जाल्याची विनंति पेशजी लिहिल्यावरून ध्यानांत आलें असेल छ २७ शवालीं मध्यस्तांनीं सांवतखान यांचे रुखसतीविषीं नबाबासे अर्ज केल्यावरून खान मा। याज पाशीं सेनासाहेब सुभा यांचे पत्रांचे जाबाब देऊन रुखसत दिल्ही सर्पेच इनायत केला, खानासमागमें राजश्री भवानी काळे यांनीं आपल्याकडील लाला मिजमल यास दिल्हें त्याचीही रुखसत होऊन शिरे दिल्हे या उपरी मध्य स्ताचा निरोप घेऊन आह्मांकडे येणार. येथून खान मा।र रवाना जाल्याचें वर्तमान मागाहून विनंति लिहितों रा। छ ३० सवाल हे विनंति

---

अखबार ई।। छ १९ माहे शवाल ता।। छ, २९ मिनहूपर्यंत

( शके १७१५ वै० व० ५ गुरवार–ज्येष्ठ शु० १ रविवारपर्यंत

छ ६ रोज टपा रवाना.

श्री.

(शके १७१५ जेष्ठ शु. ७ रविवार.)

राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनंति ऐसी जे. इकडील वर्तमान पेशजी छ. ३० माहे शवाली पत्राची रवानगी केली आहे. त्यावरून तपसीलें ध्यानात आले असेल. सांप्रत येथील वर्तमान, अलाहिदा पुरवणीपत्रीं विनंति लिहिली आहे, त्यावरून ध्यानास येईल. उत्तरे रवाना करावयास आज्ञा जाली पाहिजे. रा॥ छ. ६ माहे जिल्काद हे विनंति.

श्री

विनंति ऐसी जे–नबाबाकडील फौज व गाडद याची सुमारी शोध करून दप्तराच्या यादी तलाशाने मेळवून अलाहिदा तपसिलाच्या यादीं पाठविल्या आहेत.

बितपसील–

२ स्वाराच्या–

१ येकदर फौज सुमारी;

१ रिकाब हमराही.

२

२ पयेदल–

१ येकदर सुमारी,

१ रिकाब हमराही.

२

४

ऐकूण च्यार यादी पाठविल्या आहेत. अवलोकने ध्यानात येईल. रा॥ छ. ६ माहे जिल्काद हे विनंति.

यादी फौज स्वार जमियत-नबाबाचे सरकारांत अमोजीव जामीता दफ्तर--

२१८७० जागीरदार-

७०० रावरंभा निंबाळकर
१०० कल्याणराव जगदेवराव निंबाळकर
१० बाळा बाई
५० भवानराव निंबाळकर
५०० तेजसिंग खंदारकर
२०० पदमसिंग खंदारकर
१५० जोवसिंग खदारकर
२०० दारकोजीराव पाटणकर
७५ साबाजी घाटगे
६० चव्हाणकर सिंदे
५० मानसिंगराव हके
२५ रुस्तुमराव पांढरे
१०० अवज्या उल्मुल्क
७५ महंमद अजमखां बिस्यापुरी
४०० महंमद हुसेनखां घवाले
३० दावरजंग
२५ हसन अल्लीखां
७५ महंमद सुल्तान खां
१५० सैद दाउद अटी खां
५०० महंमद हिंदायेतुल्ला खां
२०० महमद रहिमान खां
१०० महमद कबीर खां
३०० छेदी खां

२०० जमालखां लोहानी
३०० महमद हींदायेत खा
७०० रफाउलमुलुक
११० मीर दौरा पिसर मरिआलम
२५ सैद रसूल
१००० महमद रोषन खां.
८०० महमद सुभानखा व मोहीब अली
१००० सलावतखा
२५ सैदउसमाईल
७५ सैद अहमद
५० सैद निज्याम
१५० नामदार खा
२००० वजीर खा
५०० महमद अमीवा आरब
१०० बदरुदौला
१००० बहलोल खा
१०० अलावलखां
५०० अलहयावरुदौला
५०० सनावरुदौला
१५० हसेन खां विज्यापुरी
२०० सिकदरुदौल
२२५ चिमणा राजे
३०० राये राया
१०० गोविंदराव कृष्ण
७५ माणको माधवराव
१०० रघोतमराव

२९० शंकरराव भोंग
९० त्रिमलराव
४००० असद अलीखां
२५०० मल्कईसा
१००० सिद्दी अबदुला
१०० नारायणराव वशीपायन

२१८७०

८००० पागा
९००० शमपुल उमरा
३००० सयेफुलमुलुख

८०००

६४०१ रिसाल्दार
२१९० शमपुल उमरा
२००० सयफुलमुलुख
६०० वहादर अलीखा
७० जी तनखां
१३ अवदुल करीम
२९० कुतुव उलउमरा
१९० आमन उलमुल्क
९०० पुजान उलमुल्क
३२ वखत्यार जंग
१६० ज्यानेसीर जंग
९० कामदाद खां
१७ हपम व कुनत जंग

२९ अजमन मुलुक
१०० फतउदी महमदखां
१८ महमद जहीरुदीखा
६३ महमद जीवनखा
९३ यमीनुदौला
७० सयेद हसनखां

६४०१
१००० मनसबदार व सायरचे लोक अजमासे

३७२७१
१२२०० नवनिगादास्त करार जावीता
५००० महमद अजम बीडवाला
२००० रामचद्रराव मुगीकर राजे
२००० स्वाराज निगादास्त मा। तेजवत भारामल
२७०० स्वराज मुतफर्कात मा।रोशनराये
५०० ।सिवबा महजारी नागपुराहून आला तो.

१२२००

४९४७१
येकुणवनास हजार च्यारसे येकाहत्तर स्वाराची फौज येकंदर दफ्तराची. पैकीं वीस हजार मोजदाद रिकाब हमराही; बाकी फौज रोषनखा व दौलतखा व असदअलीखा वगैरेकडील तालुक्यात ज्याबज्या सदरहू प्रो आहे. छ. ६ जिलकाद सु।। अर्बाति सैन मया व अलफ.

१ आरबी सन ११९४–फसली १२०३–हिजरी १२०७.

यादी फौज स्वार स्वारीसमागमें हमराही रिकाब नवाबाचे सरकारांत हजर.

४७५० जागीरदार—

१५० राव रभाजी निंबाळकर
२०० तेजसिंग खंदारकर
१५० पदमसिंग खंदारकर
५० दारकोजीराम पाटणकर
२५ साबाजी घाटगे
४० चडचणकर सिंदे
२५ हक्के
२०० अफय्या उलमुल्क
२५ दावरजंग
२० हसनअलीखां
७५ सुल्तानखां
२०० दाउदअलीखां
१५० रहिमानखां
१०० कबीरखान
७५ आदेखान
१०० जमालखा लोहानी
२० सैद रसूल
१०० सलाबतखा
७५ सैद इसमाल व सैद अहमद
१०० नामदारखां
१०० बदरुदौला
१०० अलावलखां
२०० अल्हयावरुदौला
२०० सनावरुदौला

१०० हसनखां विज्यापुरी
१०० सिकंदरुदौला
२०० चिमणा राजे
२०० रायेराया
१०० गोविंदराव कृष्ण
३० माणको माधवराव
४० नारायणराव येशवंतराव
६०० असदअलीखांपैकीं.

---

४७५०[1]

५५०० पागा--

३००० शमशुल उमरा
२५०० सयेफुलमुलुक

---

५५००[2]

---

१०२५०

४७७५ रिसालदार---

१५०० शमशुल उमरा
१५०० सयेफुल मुलुक
५०० बहादर आली खा
५० जीवन खां
१२ अबदुल करीम

---

१ याच यादाची दफ्तरी जमा २१८७० आहे हें मागील यादीवरून वाचकांनीं ताडून पहावें.

२ पागेची दफ्तरी यादींतील जमा ८८०० आहे.

२०० कुतबुल उमरात्र

१२९ आमनउमुल्क

४०० पुज्यान उलमुल्क

२९ बखत्यारजेंग

१२९ ज्याने सीरजंग

९० करीमदाद खां

१७ हपम व फुवत जंग

२० अजमन मुल्क

७९ फतउदी महमद खान

१६ महमद जहीरुदी

९० जीवन खां

६० यमीनुदौला

९० सैद हसन

---

४७७९[1]

---

१९०२९

९००० नव निगादाप्ती पौ[2] हजार

२००० महमद अजम बीदयाला

१००० मुंगीकर राजे

९०० राजे तेजवंत पौा

१००० रोशनराये पौा मुतफ़रकात

---

१ रिसालदारांची दफ्तरी यादींतील संख्या ६४०१ आहे

२ पैकीं

५०० सिवा महजारी

५०००[1]

२००२५

वीस हजार पचवीस स्वार रिकाब हमराही बेदरापासून पाच कोस, दहा, पंधरा, वीस, पचवीस कोस ज्यावजा उद्गीर, निटूर, हसनाबाद, कौलास या तालुक्यात चराईस आहेत. —— —— स्वार बेदरावर नवाबापाशी —— —— माहे जिलकाद सु॥ अर्बा‍निसैन मया व अलफ. ( रविवार तारिख १६ जून १७९३ इ. )

श्री.

( शके १७१५ ज्येष्ठ शुद्ध ७ )

यादी गाडद प्यादे वगैरे जमीयत पयेदल नवाबाचे सरकारात व॥ जाबीता दफ्तर

१४४५० रिसाले कदीम.

५०० फौजदारखा
५०० महमद जहीरुद्दी
३०० येतमादखा
१०० जीवनखा
२०० गालबुदौला
१५० गुलाम महदखा
४५० रसूलखा
४५० मुसाइसमत
२५ नवाजषअलीखा
६०० ऐमीनुदौला

---

१ ही जमा दफ्तरी यादींत-१२२०० आहे.

१९० सेखअली महमद

७९ सेखहसनखां

१०० महमद ताहेर

३०० दिलावरदौला

३०० महमदमुजफर

१२०० अबदुल करीम

७९० सैद उमरा

१००० तेजसिंग हजारी व शाहमहमदखां

२०० सेख जधे

३०० महममद शाबान

४०० ज्यानेसारजग

२०० रायेराया

२००० सयफुल मुल्क

१००० रफाउल्मुल्क

२०० मीरगौरा

३००० तैनाती हैदराबाद

---

१४४९०

१०८७ गाडद मुमा रेहममये मुसाफेर व मुमा

१७००० प्यादे

१०००० असदअलीखां

२००० मल्क ईसा

२००० सिदी अबदुला

१००० अमीखां आरब

२००० अलहयावरुदौला

१७०००

११५० कामाठी

८०० जमाल अलीखा

२०० महमद दिलेर

१५० काजम अलीखा

११५०

५०० कारीगराज व गोलंदाजान व वरकदाजान रिसाले राये तुळजाराम.

१२०० पटाल बायकाची

४४३००

चवेतालीस हजार तीनशे गाडद कुल पयेदलची जमीयत दफ्तरची. पैकीं तेरा हजार रिकाब हमराही बमोजीब याद आलाहिदा. बाकीची जमीयेत तालुकियात आसद अलीखा वगैरे ठिकाणी आहे. छ. ६ माहे जिलकाद. सु॥ अर्बातिसैन मयाव अलफ. ( रविवार तारीख १६ जून १७९३ इ. )

श्री.

(शके १७१५ जेष्ठ शु ७ )

यादी गाडद पयेदल रिकाब हमराही नवाबाचे सरकारात हजर.

७००० कदीम रिसालेपैकीं

५००० मुसा रेहमु जमीयेत करार येकदर तेरा हजार; पैकीं मोजदाद हैदराबाद येथे ८००० पैकी,

२००० तैनाती हैदराबाद कीले गोलकुंडा व रखयाली शहर.

गर्म पंचवीस पठाण निवडक होते भेट होऊन सेनासाहेब सुभा यांचे पत्र व वस्त्रें, ल्यावीं आह्मांस होतीं सीं, खान मा।र यांनीं दिलीं मध्यस्ताची व हुजुरची मुलाजमत केव्हां हें विचारिल्यावरून ' अस्तमानीं हाईल ' याप्रा। सांगोन खान मा।र यांस निरोप दिला आपले स्थळास गेले रा। छ २४ सवाल हे विनंति

श्री

वैशाख व ११ मंगळवार शके १७१५.

विनंति ऐसि जे—सांवतखान आमची भेट होऊन गेल्यानंतर मध्यस्ता कडे आह्मी सांगोन पाठविलें की, " सेनासाहेबसुभा यांजकडून सांवतखान आले आमची भेट जाली खान मा।र यांस हुजुरचे आपले भेटीकरितां बादमगरबा घेऊन येतों ' याचें उत्तर मध्यस्तांकडून आलें ' फार उत्तम आहे खानमा।र यांस आपलें समागमें घेऊन अस्तमानीं यावें " खानास इस्तकबालीविपईं माधवराव रामचंद्र यांनीं मध्यस्तास अगोदर विचारिलें होतें " इस्तकबालाचें प्रयोजन नाहीं " याप्रा। त्यांनीं सांगितलें. नेमा प्रमाणें अस्तमानीं आह्मीं मध्यस्ताकडे जाऊन खान आले त्यांची भेट करविली सेनासाहेबसुभा यांचें खरितापत्र व वस्त्रें जवाहीर मध्यस्तांस आणिलें तें खानांनीं पावतें केलें आगतस्वागत बोलणें जालें मध्यस्तांनीं नबाबाकडे अर्ज करविला की " गोविंदराव, सेनासाहेबसुभा यांजकडील सांवतखान यास मुलाजमतीकरितां घेऊन आले ईर्षाद यात्री यांजला समागमें घेऊन बंदा हजर हाईल " च्यार घटका रात्रीं नबाब लाखबागेनजीक चौद णीचे फर्शावर मारामद जाले येण्याविषईं मध्यस्ताकडे हुकुम आला मध्यस्त, मी सांवतखानांसहित नबाबापासी जाऊन खान मा।र यांची मुलाजमत करविली सेनासाहेबसुभा यांजकडील खरितापत्र व त्यासमवेत वस्त्रें, जवाहीर गुजराणिलें चंदा कंपनीचा नाच होता मध्यस्त व मी समीप होतों असद अलीखान प्रकर्णीं खमम येथील हाथींचा जगलातला व चौमीना वगैरे प्रकर्णीं बोलणें जालें मध्यस्तांनीं मारगिरीकरितां नबाबास जवाहीर यावयाचें

आणिले ते दाखविले. इत्यादिक होऊन फुलाचे हार बहुत प्रेमाने नबाबांनी आझास व सांवतखान यास दिले. याप्र॥ खान मा॥र याचे मुलाजमतीचा तपसील कचा ध्यानांत यावा सबब विनंति. रा॥ छ. २४ सवाल हे विनंति.

**श्री.**

वैशाख व ११ मंगळवार शके १७१५

विनंति ऐसी जे—सेनासाहेब सुभा याजकडून पोषाग व जवाहिर सांवतखान यांसमागमें नबाब व मध्यस्त व आझाम षादीसमधे आल्याचा त॥—

५ नबाबास पादीसमधे—

२ पोषाग—

१ गुलाबी रंगाचा पाच पाचे (?) दुषाला किमखाबासहित.

१ बगाली पोषाग चादणी पाचपाचेमय दुषाला किमखाब.

—

२

३ जवाहीर आदत—

१ कठी मोत्याची.

१ सरपेच.

१ जिगा.

—

३

—

५

४ मध्यस्तास—

२ पोषाग—

१ षादीसमधे आबामीरंग पैठणी जामेवार व दुषाला किमखाब.

१ मालमीचा पोषाग मखेम रंगी
—
२

२ जवाहीर दागिने—
१ सरपेंच
१ जिगा
—
२

—
४

१ आलाम पोषाग पार्चीमभे —
१ नियट पैठणी
१ मेला पैठणी
१ जामेवार
॥-किमखाब
—
३॥

मदरहप्र॥ वर्ख व जवाहीर स्वान मजकूर योनी ममागमें आणिली ती प्रविष्ट जाली, रा॥ छ २४ सवाल हे विनति

श्री

वैशाख व ११ मंगळवार शके १७१५

विनंति ऐसी जे—मध्यस्तांनी नवाबास सालगिरेचे समारभांत आपले तर्फेने जवाहीर गुजराणावयाकारितां खरेद केलें छ २२ सवाली आली मध्यस्ताकडे मोंसतस्वान यास घेऊन गेला तेसमयीं मध्यस्तांनी बोलण्यांत आणिलें कीं " हजरतीस सालगिरेकरितां द्यावयास जवाहिर तीन तऱ्हेचें घेतलें तें तुम्ही पाहावें पसंद होईल की नाहीं हें सांगावें " या प्रा॥ बोलून तीन जोड जवाहीर दर जोडांत पटी, सरपेंच, जिगा, भुजबंद, दस्तबंद, मुरासकण्ठा

याप्रा हि्याचा जोड एक व जमरूप पाचेचा जोड एक व तिसरा माणकाचा ऐकूण तीन जोड जवाहिर दाखविले. जवाहीर उमदे किमतही भारी. आह्मी पाहिल्यानंतर तसेच नबाबाकडे गेले. जवाहिराचे खोन मध्यस्तानीं समागमे घेऊन नबाबास दाखविलें. त्यानीं एक एक रकम पाहून मजकडे पाहावयास देत गेले. पाहून ज्या रकमेची जसी तारीफ करणे तसी केली नबाबास पसंद जाले मालगिरेच्या विशी मध्यस्त गुजराणार. ध्यानात यावयाकारिता विनंति. रा छ २४ शवाल हे विनंति

श्री

वैशाख व ११ मंगळवार शके १७१५.

विनंति ऐसी जे-अमद अलीखान मुजफरुलमुल्क कडप्याहून येथे आले. मध्यस्ताची भेट हजर (त ची मुलाजमत जाल्याचा तपशील पेशजी विनंति लिहिल्यावरून ध्यानात आले असेल. खान म॥ र यानी मध्यस्तास सांगितले कीं " खमम तालुकियात सागवानी लाकडे बहुत आहेत. एक एक लाट बारा गजी, दहा गजी. आठ गजी याप्र॥ लांबी. लपेटही त्याच अन्वये याप्र॥ लांकडे सागवानी व शिशाचीही आहेत " हे सांगितल्यावरून मध्यस्तानी छ. २२ शवाली नबाबास लाकडाचा अर्ज केला. खान म॥ र ही जवळच होते " खममहून लाकडे बेदरास नवे शहराकरिता आणावी " हा अर्ज मध्यस्तानी केल्यावर नबाबानी उत्तर केले कीं " बारा गज लांबी लाट आणवयाच्या त्या छकड्यावर काहीं येणार नाहीत." मध्यस्त बोलले " दुरुस्त आहे, तख्ते करावे लागतील. तेव्हा असा मातबर चोवीना येईल शिशाची लाकडेही अशीच मातबर आहेत. ते (तीं) ही आणवावी. " हजरत बोलले. " सिशाचे लाकडाची इमारत दुरुस्त नाही " मध्यस्तानी अर्ज केला 'बादशाही माहलास सिशाचे लाकडाचे काम शाहाज्याना (पुढे बद रहाळ)

श्री.

ज्येष्ठ शु. ७ रविवार शके १७१५.

विनंति ऐसी जे, हैदराबादेहून नबाबांनीं बेदरास तोफा आणविल्या होत्या,

त्या येथें छ २९ गवाली दाखल जाल्या तीन थोर, मध्यम मात, लहान पांच एकूण पंधरा तोफा निवडक येऊन पोंहचल्या लाल्बागेनजीक आणून ठेविल्या बाकी तोफा हैदराबादेहून येत आहेत २॥ छ ६ जिल्काद हे विनंति

## श्री

ज्येष्ठ शु ७ रविवार शके १७१५

विनंति ऐसी जे, इंग्रजी तैनात पल्टणें यांचे सरकारात नौकर—तनखा असदअलीखान याजवर चनूर कडपे ना( तुकिया ) ऐवजीं तीस हजार व चिटवेल तालुकिया ऐवजीं बत्तीस हजार एकूण बासष्ट हजारांच्या तनखा तैनात केल्या होत्या तो ऐवज पोंचला नाहीं ह्मणून बोभाट आल्यावरून मिस्तर किनवे दिलावरजंग यांनीं, येथें त्यांजकडून मवलवी आहे त्यांस व मीर आलम यांस, पत्र लि॥ कीं, "पल्टणास ऐवज करार बमोजिब पावत नाहीं तनखा ज्यांजवर होतात त्यांजकडून ऐवज पोंहचण्याची हरकत होती यास्तव असदअलीखानही हजूर आले आहेत त्यांसी तनखाचे ऐवजाची सबब करून मागील फैसला व पुढील पल्टणीचे दरमाहाचा बंदोबस्त असा कीं बोभाट न पडे याप्र॥ करणें " ह्मणोन पत्रें आल्यावरून मीर आलम व मवलवी यांनीं या मजमुनाचे रुके छ २९ गवाली मध्यस्तांस पाठविलें आह्मी मध्यस्तांपासीं असतां असदअलीखानास मध्यस्तांनीं हा मजकूर लिहिला जबाब केला कीं " मशारह ऐवजाच्या तनखाची कियांतील साहुकारावर दिल्या होत्या हवी यांचे मारफत रसाद घेऊन तीस हजार देव पले नसल्यास येथें फडच्या कारीनों बाकी ऐवज तेथें उपरस्माची फटम देविले त्यांत नुकसान सबब ऐवज न घेतला असेल याची जसी इर्षाद त्याप्र॥ फैसला होईल " याप्र॥ खानाचे बोलण्याअन्वयें मवलवीस जबाब मध्यस्तांनीं पाठविला जालें वर्तमान ममजाव्याकरितां विनंति र॥ छ ६ जिल्काद हे विनंति

श्री.

ज्येष्ठ शु. ७ रविवार शके १७१५.

विनंति ऐसी जे —निर्मळ वगैरे माहालावावत तनख्याचे वसुलाकरिता सरकारांतून कारकून मखो जिवाजी अवरंगाबादेस गेल्यानंतर फकरुद्दौला व अर्जीमुद्दौलानी ऐवजाचे बोलणे मा।।रनिल्हेच जाले. याचा तपसील वजिनस त्याचे पत्र आले व मध्यस्ता— . दौलास नाकीद लिहुण पाठवण्याचा राजश्री.... . व यानी आज्ञाप्रमाणे लिहिल्यावरून मध्यस्ता जवाली सविस्तर बोलण्यात आले. व पत्राची नकल. .दाखविली. त्यावरून मध्यस्त बोलले की, " तनख्याचे ऐवजाचा फैसला मागेच जाला असता सुभेदारीचे बंदोबस्ताकरिता आरसा जाला याउपरी ऐवजास गुंता नाहीं नगदीच ऐवज पदरी पडे याप्र।। जगंधन साहुकाराचा दुकान तेथे आहे त्याजवर काहीं ऐवजाची चिठी व काही अर्जीमुद्दौल्याकडून फैसला करवितो परंतु माजी अमलदाराकडून तनख्यांपैकी वसूल काय पावला व वाकी काय राहिली हे खचित समजले पाहिजे लेहून आणवावें. त्याप्र।। फैसला करून देवितो. " त्यावरून विनंति की, एकंदर तनखा वावत सरकाराचा ऐवज सुभ्याकडून येणे त्यापैकी वसूल पोहचला तो वजा होऊन वाकी ऐवज येणे किती याचे तपसिलाची याद दफ्तरांतील शोधोन इकडे रवाना करावयास आज्ञा व्हावी. र।। छ. ६ जिलकाद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ शु. ७ रविवार. शके १७१५.

विनंति ऐसी जे—टिपुसुलतान याजकडून. ......जोडी समागमे नवाव व मध्यस्तास पत्रे आली.....मध्यस्ताचे बोलण्यात की " दुसरे हप्त्यावावत.... टगिरीकडे पहिल्याने पाठविला. पेशजीचा करार की कडपे प्रांती ऐवज पोंहचवावा. ऐसें असता व्यंकटगिरीकडे पाठविला. तेथून आणावयाची सोय नाहीं सवव इकडून लाड साहेवास लि।। होते. साप्रत कडपे तालुकियात करारवमोजीव दुसरे हप्त्याचा ऐवज, पाठविला आहे. तेथून आणवून

घ्यावा " ५।प्र।। पत्रांत मजकूर ह्मणोन बोलले त्याचे पत्राच जवाबही यानीं मुनषीकडून तयार करविलें आहेत शुतरसवारास एक दोन दिवसांत रवाना करणार र।। ७ ६ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ शु ७ रविवार शके १७१५

विनंति ऐसी जे—लाड कारनवालीस यांजकडून नवाब व मध्यस्तास पत्रें आलीं तीं हैदराबादहून फिनवीनें आपले अर्जासमवेत मसलतीकडे येथें पाठविलीं त्यानें गुजराणिलीं पत्रा ही तयार करविले पत्रांतील मजकूर काय याचा समजण्यात आला नाहीं याहूम तहकीक विनंति लिहिण्यांत येईल र।। छ ६ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ शु ७ बुधवार शके ७११५

विनंति ऐसी जे—सेना साहेब सुभा याजकडून सावतखान ल्हासमधी जवाहीर वस्त्रें नवाब व मध्यस्तास घेऊन आले मुलाजमत होऊन पोषाग जवाहीर पत्रें गुजराणिलीं नवाबाची रुखसत घेतली सरपेंच दिल्हा मध्यस्तांनीं पान दान देऊन निरोप दिल्हा आह्माकडे आले घराऊ बोलणें बोलून निरोप देऊन नागपुरास रवाना जाले यांचे समागमें राजनी भवानी काळो यांजकडोन लाल अजमल होता त्याजकडे जोरावरजंगाकडील लडा सबब त्यास च्यार दिवस अटकाव जाला होता याचा म।। पेशजी लि।। आहे सांप्रत छावणि पुई सांवतखान यानीं रदबदल केली कीं ' माहेबगयर आला जाली तेव्हा माझें जाणें कसें होतें ' यावरून सुटका होऊन खानाचे समागम लालाचीही रवानगी जाली र।। छ ६ जिल्काद विनंति

श्री

ज्येष्ठ शु ७ रविवार शके १७१५

विनंति ऐसी जे—मेलगीरराव देशमुख चीच गोलकुंडा येथें होता त्यानें बोलणें त्रिमलराव व्यंकटेश सुरापुरकर यांचे विशमानें मध्यस्तांनीं हो

ऊन तूर्त मल्हारराव यांचे सुटकेची परवानगी जाली. मल्हारराव यांचे भावाच्या दोन मुली उपवर—लग्नाच्या त्यांचे लग्नास्तव सुटकेविषई अर्ज केल्यावरून मल्हारराव बायकोसहित किल्यातून सोडून चिचोलीस रवाना करण्याचे ठरले लग्न होताच त्यास हजर करावे, हा जिमा विमलराव यांनी रुजून सोडविले. पुढे लग्न होऊन हजर करण्याचे समई काय ठरेल त्याप्र॥ विनंति लिहिण्यात येईल रा॥ छ० ६ जिलकाद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ शु. ७ रविवार शके १७१५

विनंति ऐसी जे—नबाबानीं श्रीमंतास पत्र पेशजी पा॥. त्याचा जबाब सरकारातून रघोत्तमराव याचे विद्यमानें रवाना जाला. याचा इतला राजश्री गोविंदराव यांणीं इकडे लिहिला आणि जबाबाचा मसावदाही पाठविला. त्यावरून मजकूर समजला त्यास मसविदा मध्यस्तास दाखविला असता त्यास कांहीं त्यात गोड वाटावयाचें नाहीं. सबब मसविदा जवळ ठेऊन पत्र त्याजकडे परभारा आल्याचें वर्तमान समजल्यावरून मध्यस्ताकडे कोन्हेरपत यास पाठवून त्यास विच्यारिलें कीं "जबाब आपल्यापासीं आला की नाहीं." याजवर मध्यस्ताचे बोलण्यात आले त्याचा तपसील गोविंदराव यास लिहिला आहे. मा॥रनिले विनति करतील. त्यावरून सविस्तर ध्यानात येईल. रा॥ छ. ६ जिलकाद हे विनति.

श्री.

ज्येष्ठ व. २ मगळवार शके १७१५

राजश्री नाना स्वामीचे सेवेसी.

विनति ऐसी जे—इकडील वर्तमान पेशजी.......पत्राची रवानगी केली त्यावरून ध्यानात ( आले असेल ). साप्रत येथील वर्तमान नबाब व मध्यस्ताचे बोलण्यात आल्याअन्वये तपसीलें आलाहिदा पुरवणी पत्रीं विनंति लिहिली आहे. त्यावरून अवलोकनात येईल. उत्तरें रवाना करावयास आज्ञा जाली पाहिजे. रा॥ छ. १९ जिलकाद हे विनति.

श्री

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५

विनंति ऐसी जे—नवाबाकडे साळगिरेचे नजरेकारितां आम्ही मध्यस्तास हित गेलों लालबागेमध्यें बरामद जाले साहेबजादे सिकंदरज्याहा मीर पालाद अली व सुभानअली होते मीर आलम व पागेवाले सर बुलंदजंग आदि करून तमाम सरदार, मनसबदार, मुतसदी हजर. सर्वांच्या नजरा जाल्या मध्यस्तांनीं जवाहिराच्या किस्ती व पोषाग दोन च्यार तन्हेच व मिठाईचे खोन व छेल्या तास बादलीनें मढवून तन्हत न्हेच्या तयार केल्या त्या व चेंडू सोनेरी व रुपेरी एक खोन भरून व शेहरा म्हणजे मुखावली ( मुडावली ? )यास तास मोत्याची झालर लाऊन तयार केली तें याप्रा खोन आणून गुजराणिले हा सर्व सरंजाम नवाबांनीं पाहून घेतला मध्यस्त व मी व मरिआलम समीप होतों इंग्रजाकडील मिस्तर इष्टवट आला कचन्यांचे ताफेही पुढें हजर होते नजराचे लोकाची दाटी फार. आणि लालबागेंतील मकान आटोपसीर सबब नाच मना झाला कि-ल्यांतील विहिरीस मोटा लाऊन त्याचा नहर बांधून आणिला त्याची चादर झडत होती पांच सहा घटिकापर्यंत निपस्त राहिली मध्यस्थ, मा व मीर आलम, ईष्टवट या चौघांसी बोलणें जालें याचा तपसील आलाहिदा विनंति लिहिल्यावरून ध्यानांत येईल रा छ १९ जिल्काद हे विनंति.

श्री

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५

विनंति ऐसी जे—साळगिरेचे नजरांचा होत असतां नवाबास मीप मध्यस्त व मी व मीरआलम होतों नवाबांनीं आम्हांकडे मुखून बाल ण्यास आरंभ केला कीं " हिंदुस्थानांत राव शिंदे यांजकडील सरदार फौज

सुधा आहेत. त्यांसीं व होळकर यांसीं पहिली लढाई मातबर होऊन होळकर याची सिकस्त जाली. पुन्हा लढाईचे इराद्याने महेश्वराकडून जमीयेत कुमकेस आली. त्यासहित होळकर याजपासीं जमा व पोख्त सरंजाम जाला इतक्यावर लढाई जाली असता कसे घडेल ? हा दाबरोआब सर्वांत दिसो लागला. अशा समयात सिंदे याजकडील सरदारासी व होळकरासी सलूखाची .... .. ठरून आखबारा आल्यावरून चिता-. . .... जाली होती कीं सरदार आपसांत समजोन म.... .... जाला. सुलह ठरली. हे फार चांगले जाले. ऐसें असतां मागाहून मल्हारराव होळकर आले. त्यानीं, आपले वडिलास निर्भर्छनापूर्वक वहुत काहीं बोलून, सेवटीं लढाई न करी त्यास फलाण्या शपथा याप्रा ज्या गोष्टी न बोलावयाच्या त्या बोलण्यांत आणून, जग सुरू केली. सिंदे यांजकडील फौज सरंजाम मजबूत. लडाईचा ताब्रा न सोसता होळकराकडील मोड जाला. कितेक सरदार शिपाई लोक बहुतकरून ठार व जखमी झाले. कितेक फरारी होऊन पसपा (?) जाले. त्यांचा पाठलाग सिंदे यांजकडील लोकानीं केला. लुटले गेले. याप्रा वर्तमान आले. त्यावरून वाईट वाटलें. कारण कीं राव पतप्रधान याचे दौलतीतील उभयता सरदार .... .... मातबर आपसात असा कलह वाहडणे हें स-.. . .... नाहीं. त्यांत एकवेळ लढाई पहिली जाली. . .... . . फौजैचा जमाव होळ करापासी चागलाच जम-.... .... दाबाचे पोटीं सलुख ठरला. इतक्यानें दाब सलाबत मोठी होती. ने मल्हारराव यांचे ज्याहेलीमुळे हे खराबी ! मोटा सदमा गुजरला." याप्रा नवाब बोलत असता मध्यस्तानीं मधीं छूट चालविली की "दोनही सरदार उमदा. हजरतीस समान. बलकी होळकर याची भेट व दाट परिचय आहे. असा काहीं सिंदे याजकडील भेटगोष्टींचा दंडकही नाहीं. होळकरावर हे नौबत गुजरली, सबब खफगांस जागा." याप्रा बोलणे झालें. रा छ. १९ जिल्काद हे विनंति.

श्री

ज्येष्ठ व २ मंगळवार शके ७११५

विनंति ऐसी जे—होळकर सिंदे प्रकर्णी ल्ढाईचें बोलणें चालत असतां मध्यस्तांनीं बोलण्यांत आणिलें कीं "हजरतीकडून राव सिंदे यांसी दोस्तीचा सिलसिला ठेवण्याची स॥ कीं राव पंतप्रधान यांचे तर्फेनें हिंदुस्तानचे बंदोबस्ताचे कामांत राव सिंदे शाहल्यानाबाद आदिकरून बादशाही कामावर सरगरम यास्तव त्यांसी दोस्ती ठेवणें लाजम व सल्हा दौलत बादशाही बंदोबस्तांत राव पंतप्रधान याजकडून जो मुखत्यार तेथें राहील त्यासी दोस्ती व ऐगानगतीचा सिलसिला ज्यारी करणें प्राप्त आहे" याप्र॥ नबाबाचे समक्ष मध्यस्तांनीं बोलण्यांत आणिलें ध्यानांत यावें, यास्तव विनंति रा॥ छ १९ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५

विनंति ऐसी जे—नबाबाचे समक्ष मध्यस्तांनीं बोलण्यांत आणिलें कीं "मिस्तर बैद इंग्रज पल्टणाचे जमियेतसुद्धा महेश्वरा आहे त्याबाई यांनीं तुकोजीराव होळकर कुमकेकारितां रवाना केला तो मार्गी येत असतां सिंधाकडील सरदारास बातमी समजल्यावरून त्यांनीं अंबोजी इंगळे यांस पांच हजार फौजेनसी त्याचे तोंडावर रवाना केलें एकाएक येऊन इंगळे यांचे फौजेसी व इंग्रजी पल्टणासी मुकाबिला जाहला तीनच्यार पल्टणें इंग्रजी लोक मारून लुटून ताराज केले या प्र॥ वर्तमान आलें यावरून ताजुब होतो कीं इंग्रजी पल्टणें चार असतां पांच हजार सवारांनीं लुटून घ्यावीं असें सर्वथैव घडूं नये ज्या गोष्टी न घडावयाच्या त्या घडतात तस्मात् जिकडे येश तिकडे हे सर्व प्रकार होतात" याप्र॥ बोलले रा॥ छ १९ जिल्काद हे विनंति

श्रीं

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५.

विनंति ऐसी जे—नवाब नी, मिस्तर ईष्टवट व मीर आलमसमीप असता, आह्मांसी बोलण्यात आणिलें कीं "लाड कारनवालीस यांजकडून टिपु सुलतानसमंधी तहनाम्याची याद आली. त्याची नकल मदारुलमहाम याजकडे पाठवण्याकारिता तुह्माकडे दिल्ही. तुह्मी रवाना केल्यासही फार दिवस जाले. अद्याप त्याचा जवाब तिकडून आला नाहीं. जवावाकारितां याची निकड आहे. त्यास मदारुलमहाम याजकडून जवाव किती दिवसात येईल?" याचे उत्तर आह्मी केले कीं "तहनाम्याची नकल इकडून रवाना केली ते मदारुलमहाम यानीं पाहिली. जबावही लौकरच तिकडून येईल." याजवर ईष्टवट याने अर्ज केला कीं "लाड साहेब यांजला विलायेतीस जाण्याची त्वरा. या जवाबाचीं इंतजारी करून राहिले आहेत. याजकारिता जबाव लौकर गेले पाहिजेत. येविषई पैहम तिकडील निकडीचीं पत्रे येतात." यावरून नवाबांनीं आह्मास मागती सांगितले की "तुह्मी मदारुलमाहम यास आणीक लेहून जवाब.... पोहचेत ऐसे करावे." त्यावरून विनति की तहनामेप्रकर्णीं जवाब ठरले असतील. रवाना करण्यास सत्वर आज्ञा व्हावी. रा॥ छ. १९ जिल्काद हे विनति.

श्री.

ज्येष्ठ व. २ मंगळवार. शके १७१५.

विनंति ऐसी जे—नवाबानी बोलण्यात आणिले कीं "विलायतीमध्ये इंग्रजाचे बादपाहासी व फरासीसासी विगाड जाला. लडाई मचून राहिली आहे." याप्र॥ बोलत असता मध्यस्तानीं बयान केला की "फरासीस सर्व रयेत येक आवा जमून त्यानी आपले बादपाहास जीवे मारिले दौलतीचा सर्व कारभार रयेत लोक कारितात. दोन टोपीवाले यासी व फरासीसासीं लडाई जाली त्यांत फरासीस गालब पडले. कितेक फिरंगी टोपी-

वाले यांसी फरासिसाचे म(ण) गें की वादपाहाचें प्रयोजन नाहीं, वादपाहावांचून दौलत सर्वांनी चालवावी हा सुलस केला—बहुत जमले कमकसर सात आठ ( लाख ) मनुष्य जमून आहेत जबरदस्ती भारी। इंग्रजाचे वादशहास मोटा मनसबा पडला कीं हें खूळ कोणेंही प्रकारें तोडलें पाहिजे यास्तव इंग्रजांनी वरकड टोपीवाले याचे वादपाहास अनुकुल करून घेऊन फरासिसाची तंबी करावी हा नक्षा बांधिला व क्षण हिंदुस्थानांत जेथें फरासीस आढळेल तो मारून टाकावा फरासिसाची कतल करावी यात्रा।। बेत केला सदरहू—अन्वयें ज्याचज्या बंदर जातीचे जनराल व गौरनर यांजला हुकूम पोंहचले फुलचरीचें मकान फरासिसाचे सिकमांत आहे तें घेऊन बंदोवस्त करावा. यात्रा।। चेनापटणचे गौरनराकडे हुकूम आला आहे फुलचरीचा इरादा करणार तेथील जनरलानें ही तयारी केली आहे इतक्यावर मसलत कोणे कसी जाईल पाहावें हा मोटा हजुमा आहे " यात्रा।। नवाब व मध्यस्ताचे बोलण्यांत आलें ईष्टवट जवळ होता, त्याचेंही बोलणें याच अन्वयें पडलें वर्तमान ध्यानांत यावें, यास्तव विनंति रा।। छ १९ जिल्काद हे विनंति

श्री

ज्यष्ठ ब २ मंगळवार शके १७१५.

विनंति ऐसी जे— मिस्तर ईष्टवट याचे रुबरू इंग्रज फरासिसाचे विघाडाचा बयान नवाब व मध्यस्ताचे बोलत असतां इष्टवट बोलला कीं " इंग्रजाचे वादपाहानें फरासिसासी जंग करण्याचा सरंजाम करून तयारी केली हे बातनी फरासीसास समजल्यानंतर त्यांनीं आपली मजबुती करून लढाईस सिद्ध जाले लढाईचे अगोधर इंग्रजाकडील जाहजें दर्याहून येत असतां फरासीसांनीं जामियतसुधा जाहाजावर चालून जा जाहाजें जबरदस्तीनें नेली त्याजवर येक लढाई इंग्रज फरासीसासी होऊन इंग्रजांनीं त्यांचीं जाहाजें कांहीं आणिलीं यात्रा।। वर्तमान आलें " ऐसें बोलण्यांत

सारांश इंग्रज फरासीसाची लढाई रुबकार आहे. दोहींकडूनही जमाव, सामान सरंजाम पोख्त. काय घडते पाहावे. ही वर्तमानें सरकारातही मालिट वगैरे कडून आलींच असतील. येथे ऐकिले त्याची विनति लि॥ असे. रा॥ छ. १९ जिलकाद हे विनंति.

### श्री.

ज्येष्ठ व. २ मंगळवार शके १७१५

विनंति ऐसी जे—मिस्तर किनवी दिलावरजंग हैदराबादेस आहे. बेदरास येणार होता. परंतु तब्बियेत आराम नाही. मांदगी! सबब तेथे राहून त्यांनीं आपले तर्फेनें मिस्तर ईष्टवट यास रवाना केले. ईष्टवट बेदरास येऊन नबाबाची मुलाजमत जाली. साप्रत ईष्टवट व मवलवी दोघे दरबारी जानसालास येथे आहेत. किनवी दिलावरजंग हैदराबादेहून अद्याप आले नाहींत. रा॥ छ. १९ जिलकाद हे विनंति.

### श्री.

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५.

विनंति ऐसी जे–राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांसी व वेंकोजी भोंसले उभयेता बंधूत कलह होऊन सेनासाहेब सुभा यानीं त्या कलहात आपले कपाळावर ताव्या मारून घेतला. असी आखबार नवाबाचे येथे आली. खरे लटके याचे वर्तमान—तेथे वर्तमान आले असेल तें खरे. वर्तमान ऐकून आश्चीर्य वाटले. रा॥ छ. १९ जिल्काद हे विनंति.

### श्री.

ज्येष्ठ व. २ मंगळवार शके १७१५.

विनंति ऐसी जे—पेशजी गोविंदराव याचे लिहिण्यात म॥र आला होता कीं "उमरखेड वगैरे प्रांतात खुर्दा नघा पडतो. त्याची जमाबंदी होती. याजमुळे सरकारचे नुकसान फार. दरसाल कमाविसदारास सरकारातून

नुकसान मुजरा द्यावें लागतें त्यास याचा मजकूर मध्यस्तासी बोलून प्रांतांत मोगलाईकडील मा( मल्त ) तेथील बंदोबस्त व पैशाचा ठराव करून त्याहावें ह्मणजे इकडोनही उमरखेडकर कमाविसदारास ताकीद अमलांत येईल ह्मणोन सरकारची आज्ञा निकडीची आहे त्यास मदरहू मा।र मध्यस्तांसी बोलून बंदोबस्त करून लौकर त्याहावें " ह्मणोन लि।। होतें त्याजवरोन मध्यस्तांसी बोलणें जालें यांणीही आपले माहलातील नुकसानीचा बयान फार सांगितला, व उमरखेडकराचा बयान फार केला एक उमरखेडकराचा बंदोबस्त जाला ह्मणजे आह्मी आपले माहलांत बंदोबस्त करावीतों ह्मणोन नेम करून शाहआलमबादशाह याचे नांवें सिका व पैसा निखालस तांब्याचा दाहा मासे असावा याप्रा।। करार करून सैदमुजवरखान यांस यांणीं आपलेकडील माहलचे टांकसाळेचे अमीनीचें काम करार करून नवाबाचे मोहरेनसी सनद करून पाठविली ही सांगितलें कीं "तुह्मीं मदारुलमाहम त्याहावें व ऐक पत्र आपले नांवें दिल्हें तें रवाना पावेतों जागाजागाचे पैसे खोटे चालीचे ते ते यांचे येथें अमीलांनीं पो।। होते तेही पाहाण्यास पो।। आहेत अवलोकनें ध्यानांत येईल उमरखेडांत पैसा होणें तो दाहा मासे वजनाचा व्हावा ऐसी ताकीद कमाविसदार यास व्हावी आणि मुशीरुलमुल्क यांचे पत्राचे उत्तराविषई आज्ञा व्हावी रा।। छ १९ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ व १ बुधवार शके १७१५.

विनंति उपरि. बाळाजी रघुनाथ यांची रवानगी लौकर करावी येथें रिकामे आहेत येथें कामें फार तटलीं यास्तव मा।।रनिल्हेस सत्वर रा।। करावें रा।। छ १६ जिल्काद हे विनंति

# महाराष्ट्र इतिहास.

## खर्ड्याच्या लढाईचा पत्रव्यवहार.

### ( गोविंदराव काळे यांचें दफ्तर; खासगी. )

श्री.

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मंगळवार.)

विनंति उपरि "येक हजार बंदुखा तीन नमोण्याप्र॥[1], खरीद करण्याच्या, पैकीं पुणीयांत इंग्रजी व फरासीसी दोन मासल्याच्या मिळतात. त्या, नमोण्याचे बंदुखाहून, वजनास आदसेर पावसेर जाजती आहेत." इत्यादिक तें॥ लिहिल्या अन्वये मध्यस्तासी बोलले. नमोण्याच्या बदुखा जुन्या, सबब नवे खरीदीच्या बंदुखा वजनास यापेक्षां अधिक हें कारणही सांगीतलें. याजवर मध्यस्त बोलले कीं—"थोर बदुखाचे दोन नमुणे पाठविले त्याबमोजीब इंग्रजी व फरासीसी बंदुखा पुण्यांत मिळतात. नेमाप्र॥ च्यारसे त्या व दुसऱ्या च्यारसे एकूण आठशा बंदुखांची खरीदी व्हावी. नव खरीदीच्या बदुखा जुन्यांहून अलबता वजनास आदसेर पावसेर जाजती असतील, याची चिंता नाहीं. परंतु पुण्यात नव खरीदीच्या बदुखा, याची किमत इंग्रजी बदुखाची कसी व फरासीसीस काय पडतें? हे कांहींच गोविंदराव ह्यांनीं न लिहिलें व रवोतमराव याजकडूनही लिहिण्यात आले नाहीं; हे काय"[2] या प्र॥ बोलले. त्यास इंग्रजी व फरासीसी बदुखांची किमत चौकसीने लेहून पाठवावी. त्या प्र॥ मध्यस्तासी बोलतां येईल रा॥ छ २४ संवाल हे विनंति.

---

१ प्रमाणें. २ तपशील. ३ रवाना.

श्री.

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मंगळवार)

विनंति उपरि "आलेमानी भाक्टी बंदुख, नमोण्या कारिता सांडणी स्वाराबराबर, यांनीं येथून—सदरहू प्रा॥ दोनशें बंदुख खरीद करण्याकारिता—पाठविली त्या बेताच्या बंदुखा पुण्यांत मिळत नाहींत, मुंबईहून आणविल्या येतील परंतु तेथील जनराळास मिस्तर कीनवी दिलावरजंग याचे पत्र यावें सरकारातूनहीं पत्राविषयीं मदारुल माहाम यांस वीनंति केली" इत्यादिक तपशील, तुमचे लिहिल्या बमोजीब, मध्यस्तास सांगितला यांनीं उत्तर केलें कीं—"कीनवी दिलावरजंग हैदराबादेहून येथें अद्याप आले नाहींत, आल्यानंतर पत्राविषयीं त्यांस सांगू" याप्रा॥ यांसि बोलण्यांत आलें रा॥ छ २१ सवाल हे विनंति

श्री

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मंगळवार.)

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी विनंति उपरि. औरंगाबादेस तनख्याचे वसुलाकरितां कारकुन गेला त्याचें पत्र सरकारांत आलें त्याची नकल पाठविली त्यावरून मा॥र समजला छ २२ रात्रौं मध्यस्तासी बोलण्यात आलें व सखो सिवाजी कारकुन तनख्याचे वसुलास औरंगाबाद येथें गेला त्याचे पत्राची नकलच वाचून दाखविली फकरुदौला व अजीमुदौला दोघांकडून तनख्याचे ऐवजास दिलासिये बोलणें हें मध्यस्ताचे ध्यानांत आणोन दिल्हें मध्यस्त बोलले कीः—"सुभेदाराचे घालमेलीमुळें ऐवजास दिरंगाई लागली याउपरी कांहीं ऐवज जगधन याचे दुकानीहून व कांहीं अजीमुदौलाकडून फडश्या करवितों" परंतु "एकंदर तनखा ऐवजाच्या येथून पेशजी केल्या त्याप्रों अहसनुदौला व रूपावंत यांचे नियमानें वसुल पावला असेल तो वजा जातां ततीमा ऐवज काय राहिला हें

१ छ—चंद्र म्हणजे मुसलमानी तीथ छी १५ पर्यंत शुक्ल पक्षाची व पुढें कृष्ण पक्षाची समजावी २ पुरवणी ३ मजकूर.

समजले पाहीजे. त्यास, ऐवज आला किती व येणे किती याची चौकसी करुन मागाहून लिहितों " ऐसे तुह्मीं लिहिले. त्यास, बाकी ऐवज तनखा प्रों वसुल पावला तो वजा जाऊन, किती येणे त्याचा तपशील लवकर लेहून पाठवावा. त्या प्रों मध्यस्तासी बोलोन जगधनाचे दुकानावर व अजीमुदौला यांस निक्षूण पत्रे घेऊन पाठविण्यांत येतील— उत्तर सत्वर यावें. रा छ. २४ सवाल हे विनंति.

श्री.

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मंगळवार.)

विनंति उपरि.

१ "शमसुल उमरा बहादुर याचे षादीकारिता ममईचा जिन्नस खरिदी करविला. याजकरितां पंधरा हजारांची हुंडी त्यांजकडील पाठवावी" ऐसें लिहिले त्या प्रें॥ अजमसाहेब यासी बोलणें जालें. यांचे ह्मणणे कीं " ममईचा जिन्नस पाच सात हजारांचा खरिदी करविला. पधरा हजार कशावरून गोविंदराव यांनीं लिहिलें" त्यास, पांचसात हजाराचा यांनीं आणविल्या प्रों जिन्नस खरीद व्हावा. पंधरा हजाराचे प्रयोजन नाहीं. अधिक खरिदी करूं नये. याचे ऐवजाची हुंडी याजपासोन घेऊन येकादो दिवसीं रवाना होईल.

१ "मोहराचे खरिदीच्या ऐवजाची हुंडी लौकर यावी;" ह्मणोन लि[१]॥. त्यास, येकादो दीवसांत हुडी रवाना होईल.

२ दोन कलमे. रा॥ छ. २४ सवाल हे विनंति.

छ. ३० रोजी रवाना टपा.

श्री.

मित्ती शके १७१५ ज्येष्ठ शुद्ध २ सोमवार.

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी,—

विनति उपरि. तुम्हाकडील पत्रें छ. १६ व छ. १८ रवानगीचीं छ. २१

---

१ लिहिलें.

१ छ २१ शवाली पावलीं. याजपैकीं कांहीं उत्तरें पहिलीं पाठविलीं बाकीचीं तयार जालीं एकादे दिवसांत रवाना होतील सांप्रत इकडील सविस्तर मा।र मध्यस्तासी बोलणें जालें याजवर बाबाराव आम्हांकडे आले याचा ता। राजश्री नाना यांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून कळेल पेशजी इकडून रवानग्या जाल्या त्यांसहित येणेंदर पत्रांचीं उत्तरें व तिकडील वर्तमान विस्तारें लेहून पाठवावें तुमचे पत्राचे जाब उल्डेक रवाना होतील रा। छ २० सवाल हे विनंति

मीहे जिल्काद तर्फ जेष्टमास छ २ रोज मंगळवारीं पत्रें डांकेवर रवाना

श्री

राजश्री गोविंदराव स्वामिचे सेवेसि,

विनंति उपरि. तुमचीं पत्रें छ १६ शवालचीं येथें छ २१ मिनहून पावलीं याचीं उत्तरें कांहीं यापूर्वी रा। केलीं बाकी राहिलीं तीं सांप्रत पा। आहेत दुसरीं तुम्हांकडोन रवानगी छ २९ शवालचीं पत्रें छ २१ रोजीं पावलीं त्याचीही उत्तरें हल्लीं पा। आहेत त्यावरून सविस्तर मा।र कळेल पहिल्या रवानग्यांचे पत्रांच्या येथून फार झाल्या. कितेक मा।राचीं उत्तरें येणें आहेत ती व तिकडील वर्तमान पैहाम लिहून पा। जावें रा। छ २ मीहे जिल्काद हे विनंति

श्री

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मंगळवार.)

विनंति उपरि. " लार्ड कार्नवालिस याजकडून तहनाम्याची याद नवाबाकडे आली त्या यादीची नकल येथून छ ३० सावानी तुम्हांकडे रवाना केली ती नकल त्या रवानगिचे पत्रांत पाठविली ऐसें लिहिलें परंतु नकल आली नाहीं याचा शोध तेथें पहावा हल्लीं दुसरी नकल पाठविली ते

१ ह्या दिवशीं जंत्रीवरून वैशाख शुद्ध ४ बुधवार शके १७१५ हा मिती पन बाराचा फरक होतो तो मुसलमानी व आपली पद्धति भिन्न असल्यामुळें होय

२ पाठविलीं ३ पाठवीत

पावली. राजश्री नानांनी पाहिली. या उपरी भवति न भवति करून उत्तरें, ठरेल त्या प्रा॥ पाठवीन. " ह्मणोन लि॥. त्यास छ. ३० माबानीं इकडून नकलसहित पत्राची रवानगी केली ऐसे असतां 'नकल आली नाहीं.' हे लिहिल्यावरून आश्चर्य झाले. येथे दफ्तरांत शोध बहुत करून पाहिला. परंतु रवानगीचे समयीं नकल केली ते येथे नाहीं. दुसरी नकल पाठविली ते येथे पोहचली. भवति न भवति जाली असेल. उत्तरें ठरल्या प्रा॥ सत्वर लेहून पाठवावे. त्या प्रा॥ मध्यस्तासी बोलण्यात येईल. रा॥ छ.२ जिल्काद हे विनंति.

## श्री.

(शके १७१५ वैशाख वद्य १९ मगळवार.)

विनति उपरि. मध्यस्ताचे पत्राचा जबाब, राजश्री नानाकडून छ १६ शवा-लचे रवानगींत पाठविला तो छ. २१ रोजीं पावला. मसविद्यावरून सविस्तर मार ध्यानात आला. पत्र मध्यस्तास जबाबाचे प्रविष्ट केलें. कळावे रा॥ छ. २ जिल्काद हे विनंति.

## श्री.

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मगळवार)

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेशि,

विनंति उपरि. " बनवरी वगैरे बदोबस्तास बाजू राहून वलि हुसेन खा फौजसरंजाम समवेत जाणार. गजिंद्रगड तालुक्याचाही बदोबस्त करतील " याची इतला लिहिण्याविषयीं मध्यस्तांनीं सांगितल्याप्र॥ पेशजी इकडून लिहिले होते. त्याचें उत्तर तुह्माकडून आले कीं:—" पापण्णापंत याचा कारकून पाच सहा महिने येथें आला आहे. राजश्री भाऊही होते. मोठे काजी याचे जलसे होऊन टिपु सुल्तान याचे तहप्र॥ गावखेडी सोडून देविलीं; व तहपासोन वासलातिचा ऐवजही माघारा देविला. सनदापत्रे —कांहि गुंता राहिला नाहीं. रामराव दोचौ दिवशीं जाणार. " इत्यादिक लि॥ मध्यस्तास सांगितलें. संतोष पावोन बोलले कीं, " मोठी गोष्ट व चागली ती जाली. इतका प्रकार तेथे जाला. परंतु रवो-

समराव याजकडून आम्हांकडे ये विषयींचा लेख अद्याप आला नाहीं येईल" या प्र।। बोलणें झालें रा। छ २ जिल्काद हे विनंति

श्री

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मंगळवार.)

विनंति उपरि. "रोशनखानप्रकर्णी त।। लिहिल्याप्र ।। राजश्री नाना यांजपाशीं पका निर्णय करून लिहितों" ह्मणोन लिहिलें उत्तम आहे ! निर्णय होऊन लौकर ल्याहावें त्याप्र।। यांसी बोलण्यांत येईल सैदमुजबरखान यांनीं धोंडो मोरेश्वर यांजला मध्यस्ताकडे पाठविलें मे।।रनिलेनीं कचें पकें वास्तव्य मध्यस्तास येकांतीं समजाविलें उदईक धोंडो मोरेश्वर यांस मागती रवाना करणार. पाहावें—कधीं कोठें जाणार ! रा।। छ० २ जिल्काद हे विनंति

श्री

(शके १७१५ वैशाख वद्य ११ मंगळवार)

विनंति उपरि "वराडचे खुर्दामुळें दोन्ही सरकारचें नुकसान याचा नक्षा व्यक्त करून सांगतों याप्रा पेशजी मध्यस्तानीं सांगितल्या अन्वयें इकडून लिहिलें होतें त्यास खुर्दाचें लौकर ल्याहावें मार्गाचे रितीनें उमरखेडचा बंदोबस्त मदारुल्महाम करतील हें तुह्मी लिहिल्या प्र।। मध्यस्तास सांगितलें यांनीं तिकडील प्रांतीं, खुर्दा,[1] कोणते माहलीं कसी चाल[2] याचे पैसे, अधेले, पाठऊन देण्याकरितां सैदमुजबरखान यांस लिहिल्यावरून त्यांनीं वसमत, माहूर, वासीम, परबणि, हाटें उमरखेड—वरोंडी—इत्यादिक महालचे पैसे मासल्याकरितां पाठविले ते पुण्याकडे रवाना करण्याकरितां मध्यस्तांनी आम्हाकडे पाठविले व तमाम प्रांतीं अमुक मासांचा पैसा चालावा हा नक्षाही ठरविला याच्या यादीही यांनीं तयार करविल्या प्रा देणार. ते घेऊन मागाहून रवाना करण्यात येईल रा।। छ० २ माहे जिल्काद हे विनंति

श्री

(शके १७१५ वैशाख वद्य १२ मंगळवार)

विनंति उपरि वावले प्रकर्णी वगैरे मा।र पेशजी मध्यस्तासी बोलण्यांत

---

१ मद्यार २ बन्हाडांतील

आल्याचें यांपूर्वी लि।। आहे. छ. २३ रोजीं मध्यस्तांसमीप रावरंभा असतां बावले संबंधीं पाटिलबावा व कल्याणराव यांस आपलीं व बाबाराव याचीं पत्रे देवावीं या प्र।। बोलण्यात आले. त्यानीं रावरभा यास विचारलें. हे बोलले "कीं वावले पानगलीं आले तेव्हा वाजीद होऊन ' तीस हजार द्यावे म्हणजे फारकत देतो ' ऐसे बोलत असता ते समई फडच्या न केला हें बजाजी पंतास पुसावे." बजाजीपत बोलले "पंचवीस हजार, आह्मी वावल्यास घ्या ह्मणत होतो. वावल्याचे ह्मणणे 'तीस हजार द्यावे' या प्र।। होते." रावरंभा बोलले:—"मागे असा सोयेवार फडचा होत असता तो राहून हली पंचवीस हजार तूर्त द्यावे, फडच्या पुढेच, तेव्हा ऐवज तरी वावल्यास किती ह्मगून द्यावा"" आह्मी बोललो—" याचा जाब-साल पाटीलबावापासी पडला. बाबाराव याचे विद्यमानेच ठराव झाला. त्यास विचारावे." त्यावरून, बाबाराव तर दरबारी नव्हते, हरराव यांस मध्य-स्तानीं विचारले. "जो फडच्या पचवीस हजारावर पानगली होत होता तो आता वावल्या पंचवीस उगेच घेऊन, पुढे पन्नास हजार यावे, पाउण लाख द्यावे हें बोलतो ह्याचे काय "? हरराव बोलले. "वावले कजियेदलाल कोणाचे ऐकावयाजोगे नाहीत." मध्यस्तास ह्मटले "आपण येविषयीं पाटीलबावा, कल्याणराव यास पत्रे द्यावीं." त्याचे बोलणें " कल्याणराव यास पत्र देतो, पाटीलबावास देत नाहीं. कारण कीं बीडचे कजीये हजारों पडतील; त्याच्या भीडा घालतील, यास्तव त्यास पत्र लिहित नाहीं. बाबाराव यानीं राव सिंदे कल्याणराव व आबा चिटणीस याजला पत्रें लेहून द्यावीं " या प्र।। हरराव यास ताकीद केली. ' आपलेंही पत्र कल्याणराव यास देतों ' याप्र।। बोलले. पत्रे आल्यानतर रवाना होतील वावले याचीं पत्रें रावरंभा यास आलीं. त्यात ' कारभारी याकडोन फडच्या होत नाहीं ' हा गिल्ला करून लिहिलें: पत्रें रावरंभा यांनीं आह्मांस दाखविलीं. साराश रावरंभाचे दौलतीस चागले पडावे ह्मणोन केले. तथापि असे पडून त्याचे गावी काही नाहीं; याप्र।। होते. मुगुटराव वावलेयानी आठरा हजाराचे

घेल्याकरिता वसिलेदाराकडून मसाल्यामबत ऐवज येणे येविषयीं बाब त्यांनी आम्हांस पत्रें व याद पाठविली सरकारचें पत्र मध्यस्तास आलें व हरि नारायेण यांस बाबल्यांनीं लिहिलें आहे तीं पत्रें मध्यस्तास पावतीं झाल्यावर ठरेल त्या प्रॉ॥ लिहिण्यात येईल रा॥ छ० २ जिल्काद हे विनंति

श्री

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं

विनंति उपरि 'घाबले प्रकर्णी पत्रें तुम्ही पाठविण्याचा ता॥ पेशजीं लिहिला होता. त्याप्र॥ मध्यस्तासी बोलणें जालें' इत्यादिक पेशजी लिहिल्यावरून कळलें असेल मध्यस्तांनीं बाबाराव यांस पत्रें देण्याची ताकीद केल्यावरून बाबाराव यांनीं पत्रें आपलीं दिल्हीं तीं रा॥ केलीं आहेत बि॥

१ पाटीलबावांस

१ आबा चिटणिस

१ कल्याणराव

१ हरि नारायेण यांचे पत्राचें उत्तर

४

येकूण चार पत्रें खुलीं बेगोंदे पा॥ आहेत प्रयोजन असल्यास देऊन बंदोबस्त करणें तसा करून घ्यावा मध्यस्तांनीं 'आपलें पत्र कल्याणराव यांस देतों' ह्मणोन बोलले पत्र आलें ह्मणजे रवाना करूं. पाटीलबावांस मध्यस्त आपलें पत्र देत नाहींत याचा ता॥ अलाहिदा त्यांचे बोलल्या प्र॥ लिहिल्यावरून कळेल रा॥ छ० २ जिल्काद हे विनंति

श्री

पु॥. राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

विनंति उपरि "बजाजीपंत व बक्षी व जामदार याजला दप्तराचा

१ वितपर्यंत–सार्थ कलम्या मुलाखाप्रमाणें

२ गोंद–डिंक लावल्याशिवाय

तगादा रावरभा यांनी केला हे मध्यस्तासी आमचे बोलणे झाले; दर्याफ्त होणार" इत्यादिक पेशजी लिहीण्यात आलेच आहे. छ. २२ सवालीं दोन प्रहरास मध्यस्तांनीं जलसा केला. रावरंभा आले; बाबाराव व हरराव याजलाही बोलाऊन आणिले. बजाजीपत, बक्षी, जामदार आणून दफ्तराविषयींची भवति न भवति जाली. मध्यस्तानीं आम्हांकडे येण्याविषयीं सागोन पाठविलें. त्यास, अस्तमानी सावतखान यांस घेऊन जाण्याचे, सबब दोनप्रहरीं जावयास अवकाश न जाला. दुसरा चोपदार आला कीं 'आपल्याकडून कोणास पाठवावे.' त्यावरून माधवराव यास पाठविले. आडीच प्रहरपर्यंत जलसा जाला. 'उदईक याच समयीं निर्णय सागतो' याप्रा। सागोन, ते दिवसी इतके जाले. अस्तमानी आह्मी गेलो तेव्हा जाला मा।र मध्यस्तानीं सागितला. 'उदईक जलसा आणिक होणार' याप्रा। बोलले. त्यावरून छ. २३ रोजीं मध्यस्ताकडे अगोदर रावरभा, बजाजीपत वगैरे गेले. दोनप्रहरा आह्मीही गेलो. बक्षीचे हतची एकंदर याद दफ्तराची पाहावी ह्मणोन मध्यस्तानीं दिल्ही. त्यात कितेक दफ्तरे सरबमोहर[1]; व कितेक बेमोहरेचीं[2] याप्रा। लिहिलीं,—त्यातच बीबीकडील दफ्तर लिहिलें आहे. बक्षीचे ह्मणणे—"बजाजीपंत दफ्तरें सागत गेले. मी लिहीत गेलो. जामदाराने उचलोन ठेविलीं". मध्यस्त आह्मास विचारू लागले—' ह्याचे कसे ?' आह्मीं उत्तर केले ' ज्याचे जिमेस त्याने द्यावे.' रावरभा याचे ह्मणणे 'दफ्तर लाल छींटाचे.' बक्षी, बजाजीपंताचे बोलण्यात ' पाढरे रुमालाचे' ; जामदारास फुरसीस केली, त्याचे ह्मणणे ' वरता सफेत रुमाल आत छीटाचे लाल.' याजवर मध्यस्तांनीं तर्क केला की.—दफतर कोठे गेले नाहीं त्यातच आहे. रावरभा यांनी पाहता ' लाल छीटाचे नाहीं, वरते सफेत कपडा आहे, ह्मणोन सापडले नाही' ऐसें त्याचे ह्मणणें. यानीं काहीं दफ्तर सोडून पाहिले नाहीं. त्यापक्षी तेथेच आहे. मोहराचीं दफ्तरे तितकीं आणावीं

१ सरबमोहर—सही शिक्का यथास्थित असलेलीं.

२ बेमोहरेचीं—मोहरच नाहीं अशीं

२००० ग्यानचंद मारवाडी
८०० आंदाप्पा कोरपे
९०० सलमखान
२०० सुभाना माहर.

१६९००

सोळा हजार पांचशाऱ्या वराता केल्या होत्या त्या माघाऱ्या फिरल्या सबब ऐवज चारा या प्रा॥ रावरंभा याचें बोलणें

श्री.

विनंति उपरी. " सुरापुरकराकडील करार जाल्यांत तथा नाहीं वागवून घेणें मंत्रीकडे व्यत्यास पडूं नये ऐवजही येतो व्यंकटराव उप्पावर असतील त्यास जपावें गोपाळ आपा त्यांचे त्यांजकडे पाठवावा " इत्यादिक लिहिलें त्यास सुरापूरकराकडील मजकूर मंत्रीसी बोलण्यांत आला यांचें बोलणें कीं–" एक महिन्याचा करार असतां, आपण या कामाचे दरमीयान, बदल खातर आपली, ह्मणोन आठ महिने सबुरी केली शेवटीं पैशास ठिकाण नाहीं कितीही दिवस वाट पाहिली तत्रापि शेवटीं हेंच याजकारितां सुरापुरकरास एक वेळ थोडीशी चमक दाखविल्याशिवाय त्यांचे डोळे उघडत नाहींत हें पक्कें समजलें यास्तव हा उद्योग याजवर करणें जरूर. शेवटीं सभेट करणें तो आपले विचाराशिवाय होणार नाहीं परंतु कांहीं त्यांजला समजूं द्यावें " या प्रा बोलले आह्मी यांचीं उत्तरें केलीं कीं ' करार बमोजीब ऐवज सुरापुरकराकडून येईल परंतु आपण वागवून घेतलें पाहिजे ' मंत्रीचें बोलणें " आणीक किती वागवावें? येक महिन्याचे आठ महीने झाले अद्याप प्रथम दिवस वागविण्याची रीत अशीच असते कीं काय? हें आपणच सांगावें " याजवर बोलणें फार जालें गोपाळ आपाचा मा॥र यांसी बोलावा तर यांचे ऐवजास ठिकाण नाहीं यामुळें यांची मर्जी नाईकावर ग्वपा त्यांस गोपाळ आपाचा मा॥र बोलल्यास

रुचणार नाहीं हे समजोन तूर्त गोपाळ आपाचा जाबसाल बोलण्यात आला नाहीं. दोन लक्ष रुपये तूर्त पाठविणार. त्यात लाख पुण्याकडून व लाख परभारा येथे पाठवावे. ऐसा बेत. परंतु तोहीं ऐवज नाहीं. पुण्याकडून येणें त्याची अवस्था तसी. येथे येणे तो अद्याप पैसा नाहीं. मंत्रीसी भिडेने सुरापुरकराविषयीं किती बोलणे आगेजीचें होते? हे त्याचे गांवीं नाहीं. त्यापक्षीं याचे येहसान अंगावर घेऊन त्याजकडून काहींच अमलात न यावे. याप्र॥ कोठ पावेतों दिवसगत करावी? हे काहीं चागलें नाहीं. यास्तव इकडूनही सुरापुरकरास बहुत काहीं लिहिण्यात आलें. तुह्मीही हे सर्व प्रकार लेहून ऐवजाची तोडजोड आठ पंधरा दिवसात होत असल्यास ल्याहावे. तो प्रकार त्याजकडून घडणे असाध्य. ऐसे असता मंत्रीसी बोलणें तसे अंग टाकून बोलता येईल. याची नजर तूर्त त्याजवर वाकडे चालीची दिसती. ऐवजाची सरबराई होऊन आल्यास बोलूनच फेदफे करण्याची शकल ठरवितां येईल. नाहीं तर केले कर्तव्य व्यर्थ होऊन बखेडा पडतो. हें मनन करून त्यांजकडे लिहिणे ते ल्याहावे व इकडे खुलासा उत्तर पाठवावे. त्याप्र॥ समजोन बोलता येईल. सुरापुरकर याचा प्रतरणेचा कारभार, बोलावें त्याप्र॥, काहींच अमलात येत नाहीं. लबाड कारभार त्यांत हर्फ येण्याचा प्रकार. याजकरिता बेजार जालो. कृष्णाजीपंत तुह्मांपासीं बजावून गोष्टी सांगतात, तितकेच! परिणाम सुधा नाहीं. पार पडणे ईश्वराधीन आहे! र॥ छ० २ जिल्काद हे विनति.

२५

श्री.

विनति उपरि.

येथून छ. २२ रमजानापासोन छ. ८ माहे हाल पावेतो पत्राच्या रवानग्या सात केल्या. तीं पत्रे पावल्याचा ता॥ तारीखवार लि॥ तो समजला

कलम— " " ' ' ' ' १

पाटील बाबा कूच करून मानवडीवर आले, नदीकडील जमीन काळवट, दिवस पर्जन्याचे, हें कारण लिहिल्यावरून समजलें कलम— १

"राजश्री नानास पत्रें अपालीं येतात, ते जावाकारितां मजपाशीं देतात मला समाधान नाहीं सबब जाब तटले बोभाट लेहूं नये" म्हणोन लि॥ त्यास तुमची प्रकृत स्वस्थ जाली असेल नानाकडील पत्राचे जाब फार येणें ते तयार करून लौकर पाठवावे परचेवर जाब येण्यास आळस करूं नये कलम— १

रामचंद्र दादो यांच दोन रुखोटे त्यांचे चिरंजीव माधवराव यांस पावते झाले कलम— १

"सावकार, सराफ, मातबरांनीं हात आटपले तमाम लोकांची दिवाळी निघतात" म्हणोन लि॥ त्यास पुण्यांत साहुकाराची आसी अवस्था हे गोष्ट कठीण ! येथेंहि ही साहुकारांत हुंडीपांडी करण्याची दिक्कत फार तूर्त आहे कलम— १

"वाबयाहून ताईबाईकडून हरिकाळा आला मिरज प्रांतीं वगैरे पाऊस दोन तीन जाले पुण्याकडे पर्जन्य नाहीं" म्हणोन लि॥ त्यास मृग नक्षत्राचे पाऊस कांहीं जाले न जाले? धारण कसी? हें ल्याहावें इकडेही पर्जन्य जाले कलम— १

"गंगाधरराव रास्ते यांस वेड लागलें, रामचंद्रराव बारळ, बाळाजीपंत ढेकण्यांचा काळ झाला, लक्षुमणराव व्यथिस्त, उदास, काशीस जाणार, सुळ येती," इत्यादिक लि॥ तें समजलें ईश्वरी इच्छा! कलम— १

२६

"दत्तपुत्र केडगांवकराचा घेणार, बापु व बाबा दोन्हीकडील संधान राखून त्रितियपंथ करणार," हे लिहिल्यावरून कळलें दत्तकपुत्र कोणता घेतला? सरकारांतुन ठराव कसा जाला? हें कच्चें ल्याहावें कलम— १

"मारडकर घाईस आले, मी व आपाजी बाबाजी कांहीं मदत करून पाहातों" म्हणोन लि॥. त्यास देश, काळ, समय येक प्रकारचा. यास्तव

मदत करणें तें वहुत समजोन पाहून करावी. पेच न पडे ऐसें जाल्यास करावे. कलम— १

श्री.

विनंति उपरि. राजश्री कल्याणराव कवडे छ. १४ शवाली राजश्री नानाकडे आले. आपले खासगत कामाची विनति करून 'नबाबाकडील कामे उगवावीं, मध्यस्तासी स्वच्छता असावी, हे काम मला सागून पहावे' इत्यादिक वोलण्यावर उत्तर जाले—कामें उगवल्यावर काय गुता? इतके जाले आसता बाहेर लोकापासीं जसा स्वभाव त्याप्रमाणे वोलणे. त्याच अन्वये इकडे मध्यस्ताकडेही वजाऊन पत्रे आलीं. हा मा॥र मध्यस्तानीं आह्मासी वोलण्यात आणिला. याचीं उत्तरे प्रत्युत्तरे, प्रथम मध्यस्त आह्मीच, मागाहून बाबाराव यांस वोलाऊन घेऊन, वोलणे जाले याचा कचा त॥ 'बाबाराव आह्माकडे आले' इत्यादिक राजश्री नाना यांचे पत्रीं लिहिल्यावरून कळेल. सारांश ज्याचा जो स्वाभाविक धर्म त्यानी त्या प्रे॥च करावे हा त्याचा मार्ग. समजणारास सर्व समजते. तुम्हापासी कल्याणराव येऊन वोलले त्याचाही मा॥र समजला. या प्रकर्णी राजश्री नानास पत्रे लिहिलीं त्याची उत्तरें लैकर यावी. रा॥ छ० २ जिल्काद हे विनंति.

श्री.

विनंति उपरि, "होळकराकडील बापूजी होळकर व कासीराव याच्या व सिंद्याकडील गोपाळराव याच्या परस्परे भेटी जाल्या; कलह राहीला." ह्मणोन लि॥, ते कळले. त्यास, मल्हारराव—तुकोजी बावाचे पुत्र—मागाहून गेल्यावर मागतीं त्यानीं कलहास आरभ केला, ऐसें ऐकण्यांत. तर वास्तव्य ल्याहावे. रा छ २ जिल्काद हे विनंति.

श्री.

विनंति उपरि. छ. १३ शवालचीं आह्माकडील पत्रे पावल्याचा दाखला छ. १६ मिनहुचे रवानगींत तुह्मी लिहिल्यावरून कळला. कलम— १

" राजश्री पाटील बावास समाधान नाही, सीतज्वर येतो, राजश्री नाना

व तात्या समाचारास गेले होते, त्यांचे स्त्रीसही समाधान नाहीं " म्हणोन लि॥, तें कळलें पाटील बावास अलीकडे समाधान कसें ? हें ल्याहावें कलम— १

"गोविंदराव गायकवाड यांस सरकारांतून वस्त्रें दिल्हीं, परंतु सरंजामी होऊन जाणें होत नाहीं, मानाजी गायकवाड बडोद्यांत हुशारीनें राहून सरकार नजरेचें संधान लाविलें " हा ता॥ समजला सरकारांतून दोघांतून कोण ठरेल हें ल्याहावें कलम— १

"श्रीमंतांची स्वारी हत्थी व वाघाची लढाई पाहावयाकरितां छ १७ रोजीं गेली," हें लिहिल्यावरून समजलें अलीकडे नवल विशेष ल्याहावें कलम–१

"*राजश्री परशरामपंत भाऊ तासगांवास गेले, मुल जाली, सांप्रतचे* कामाकरितां करवीरास जाणार, सरजाम करितात, सरकारांतून तोफा रवाना होणार " म्हणोन लि॥ त्यास सरकारांतून भाऊकडे तोफा किती गेल्या ? भाऊ अद्याप तासगांवींच आहेत ? किंवा करवीराकडे ? हें वर्तमान आलें असल्यास ल्याहावें सावंताकडून बोलणार सरकारांत येणार, जें ठरेल तें लेहून कळवावें कलम— १

सागवानी लांकडाचा व बंदुखाचा मा॥र. लिहिला त्यास यापूर्वी येथून स॥ वार लि॥ आहे त्यावरुन कळेल कलम— १

कलमें सुमार साहा र॥ छ० २ जिल्काद हे विनंति

श्री

विनंति उपरि.

१ "अजमसाहेब यासि बोलले 'सध्या हुंड्या घेऊन पाठवाव्या'

१५००० ममईचे खरेदीबदल

३०००० मोहरा खरेदीबदल

४५०००

पंचेचाळीस हजाराच्या हुंड्या सत्वर घेऊन पाठवाव्या दिवसगत लागों नये" म्हणोन लि॥ त्यास, ममईची खरिदी पंधरा हजारांची करावयाची नाहीं पांच सात हजारपर्यंत करणें ऐसें यांचें बोलणें तेव्हां पांच सात हजार काय

देतील तो व मोहराबाबत तीस हजार सदरहूचे हुंडीविषयीं आह्मीं त्याज-कडे सांगून पाठविलें. त्यास, "प्रस्तुत हुंडी होत नाही. पुण्याचे हुंडीचा भाव साहुकारांत सेकडा साडेचार, पांच, साडेपांच, असा असोन हुंडी होत नाही. याजकरितां ऐवज आपल्यापाशीं देतो." याप्रा यांचे ह्मणणे. आमचें बोलणें कीं एथें ऐवज घेऊन खरेदीचे तेथें उपयोगी काय? अगर हुंडावनसुद्धां ऐवज दिल्यास हुंडी करितां येईल. त्यास हुंडावनसमेत ऐवज दिल्यास तु-ह्मास लेहूं. ऐवजाचा भरणा कसा करतात त्याप्रा लेहूं. तोपावेतो तुम्ही तेथें खरेदी न करावी. याजकडून ऐवज येण्यास दिवसगत लागल्यास ताण बसेल वास्तव लेहूं तेव्हां खरेदी करावी.

१ "शमपुल उमरा याचे पादीकारितां सरजाम आणावयास श्रीरामास मुंबईस रवाना केलें. मजपासी तर ऐवज नाहीं. तेव्हां मानुरकर का। दार यांनी एकोणीस हजार ऐवज भरला. त्यापैकीं बारा हजाराच्या हुंड्या करून श्रीरामासमागमें दिल्या" ह्मणोन तुह्मी लि।। त्यास बारा हजाराचाहि जिन्नस खरीदी करूं नये. पांच निदान साहापावेतो खरीदी करवावी. ह्मणोन आज-मखां यानीं सांगोन पाल्यास मुजरद मनुष्याबराबर तुह्मीं श्रीरामास मुंबईस लेहून पाठवावें. १ "सिदी इमामखा याचीं मोतीं खरीदी करणें. त्यास पु-ण्यांत माहाग, सबब मुंबईस खरीदी कराविली" ह्मणोन लिहिल्या प्रा सिदी इमाम यास सांगीतलें. 'उत्तम' ह्मणाले. परंतु फार दिवस जाले.

---

३

कलमे सुमार तीन रा छ. २ जिल्काद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ शु. ४ बुधवार शके १७१५.

विनंति उपरि.

१ राजश्री हरिपंत तात्या व आबा चिटणीस तात्याचे बागांत भोजनास गेले. तेथें खिलवत झाले. याचा ता।। लिहिला व येथून तुह्मास कुफिया लि-

हिलें होतें, त्याची उत्तरें तुम्हीं लिहिल्यावरून ध्यानांत आलें त्यास तुमचे लिहिण्यावरून तर खर्चातिसें वाटतें जोंपर्यंत हिंदुस्थानांत गेले नाहींत, तों पर्यंत आमची खातरजमा होत नाहीं

१ बेदरच्या गोष्टीविषई सेज लि॥ येथें नाहीं बल्की मागील फडचे व पुढें स्वच्छता व्हावी ऐसी कल्याणराव यांची आर्जू ह्मणोन लिहिलें त्यास ईश्वर असेंच करो !

१ साहासें चाळीस मोहरा खरीदी केल्या ह्मणोन लि॥ त्यास तूर्त इतकेंच पुरें करावें याचा ऐवज व आणखी खरीदीचे ऐवजाची तरतूद करूं तेव्हां खरीदी करावी

---

३

कल्में सुमार तीन रा॥ छ २ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ शु ४ बुधवार शके १७१५

विनंति उपरि "पुण्यांत दुखण्याचा सपाटा भारी! सीतज्वरानें बहुत लोकांस हैराण करून पाडलें. कितेक जीवें गेले, कितेक दुखणाईत, कांहीं नव उमेदी. कितेक कुणकुणतात" त्याचा नांवनिसीवार ता॥ लिहिल्यावरून फल्ला मोठा उपद्रव जाला! हल्लीं मृगसीतळाई पडल्यापासोन शम जालें असेल तुमची प्रकृत आतां कसी आहे? निस्तोप आरोग्य जाल्याचें ल्याहावें या दिवसांत प्रकृतीस तुह्मीं फार सावधपणें जपून अवपथपथ्यास आळस न करितां प्रकृत नीट राखावी चिरंजीव तात्यास मधुरा जाला होता मोठी चिंता प्राप्त होती श्रीकृपेनें आराम जाल्यावरून समाधान वाटलें रा छ २ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ शु ४ बुधवार. शके १७१५

विनंति उपरि साहुकाऱ्यांत येथें हुंड्यांचा भार पुण्याचे हुंडीचा असा

जाला आहे की एकनें च्यार, साडेच्यार, पाच प्रा। येथें ऐवज घेऊन पुण्यांत हली सिक्याची शंभराची हुंडी करावी. याजकारिता साहुकार बरोबर फिरतात कीं 'पुण्याची हुंडी द्या.' परंतु मिळत नाहीं. अशी चडचड हुंडीची जाली आहे. आम्हाकडे दाहा पाच जण आले. हुंड्या मागितल्या. दाहा वीस हजाराची हुंडी येथून केल्यास सांप्रत सोयही हुंडावन मिळावयाची चागली. परंतु तुह्मीं पुण्यांतील साहुकारसराफानी हात आटोपिल्याचे लिहिल्यामुळें हुंडी न केली. 'हुंडी दहा पांच हजाराची करावी,' ऐसें तुमचे उत्तर आल्यास करूं. नाहीं तर प्रयोजन नाहीं. उत्तर लौकर यावें. हा भाव पुढे ठरतो याचा नेम नाहीं. तूर्तकाळीं मात्र भाव याप्रा। जाला आहे. रा। छ २ जिल्काद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ शु. ४ बुधवार शके १७१५

विनंति उपरि. तेजवंत भारामल यांनीं सांगितले की " खासगत आह्मास मोतीं पुण्याहून आणावयाचीं; येविषई गोविंदराव यास लेहून मोतीं आणवावीं. त्याचा ऐवज येथें देतों " त्यावरून मोत्यांचे किमतीचा अजमास व सुमारी मोतीं वि. ॥

४०० कि॥ (किमत) मोतीं, दाणें १००. दर ४ प्रा।.
६०० कि ॥ दाणे १०० दर ६ प्रा।
५०० कि॥ दाणे ५० दर १० प्रा।

२५०

१५००

येकूण मोतीं सुमार आडीचशें, किमत दीड हजार. याशिवाय भावसिंग चौधरी जिनसीकडील यास जोडी नथेची—तीनसें, निदान च्यारसें, सेवटीं पांचसे पावेतो किमतीची—उत्तम. या प्रा। सदरहू मोतीं खरीद करून पाठ-

वावीं. ह्मणजे ऐवज यांजपासोन येथें घेतां येईल रा॥ छ. २ जिल्काद हे विनंति

छ ६ जिल्कादीं टप्यावर. खानगी पत्रें

श्री

ज्येष्ठ शु ७ रविवार, शके १७१५

राजश्री गोविंदराव स्वामींचे सेवेसी

विनंति उपरि. छ. २९ माहे रमालची तुह्मीं पत्रें पा॥ तीं छ ३० माहे मा॥रीं पावलीं त्यांची उत्तरें—" श्रीमंतांस पत्र नबाबांनीं पा॥ होतें त्याचा जवाबाचा तरजुमा हिंदवी पाठविला त्यास श्रीमंतांचें उत्तर तयार करविलें चिटणिसास मसविदा करून दिल्हा पत्र होऊन आलें ह्मणजे रवाना करितों " ह्मणोन लि॥ त्यास, ऱ्या हेतूस्तव पत्र लिहिलें कीं श्रीमंतांकडून त्याचें उत्तर ज्यासमयीं यावें तेव्हां न आलें नबाबाचे पत्राचा जावटी येथें येऊन पोंचला तुह्माकडून मसविदाही आह्मास आला आद्याप श्रीमंतांचें उत्तर नाहीं आतां जें उत्तर येणें तें, आह्मीं पत्र लिहिलें त्याचें उत्तर, कधींतरी आलें इतकेंच फळ! रा॥ छ ६ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ शु ७ रविवार शके १७१५

विनंति उपरि. नबाबांनीं श्रीमंतासी पत्र पाठविलें त्याचे जवाबाचा मसविदा हिंदवी पाठविला त्यांत परस्परें नोंका छाऊन जबाब लिहिला त्याचे कुन्हे ध्यानांत येण्याकरितों आलाहिदा पुरवणी तुह्मीं लिहिली त्याप्रा॥ अक्षरश: मननांत आलें हा मसविदा मध्यस्तास वाचून दाखविल्यांत त्यां जला कांहीं खुपी व्हावयाची नाही, हें समजोन त्यांस न दाखवितां मसविदा आपल्याजवळ ठेविला पत्र जबाबाचें रघोतमराव यांजकडून आस्यांचें वर्तमान समल्यावरून मध्यस्ताकडे कोन्हेरपंत यांस पाठवून त्यांजला विस्था

रिले कीं श्रीमताकडून हजरतीचे पत्राचा जबाब रवाना जाला. ऐसे आम्हा-कडे लिहिलें आले. त्यास पत्र आले कीं नाहीं? उत्तर केले कीं " पत्र आले. परंतु अद्याप हजरतीस गुजराणिले नाहीं. गुजराणिल्यानंतर पत्रांतील भाव काय याची तन्हा तुम्हास होईल." याप्रा बोलले. रा॥ छ. ६ जिल्काद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ शु. ७ रविवार शके १७१५

विनंति उपरि. नबाबाचे पत्राचा जबाब श्रीमताकडून खोतमराव याचे विद्यमाने याजकडे आला. तो नबाबानीं मध्यस्त समीप असता वाचून पाहिला. छ. ९ जिल्कादीं मध्यस्ताकडे कोन्हेरपतास पाठऊन विचारिले कीं "श्रीमताकडील जबाब आला तो हजरतींनीं पाहिला कीं नाहीं" मध्यस्त बोलले " मी जवळ असता पत्र अक्षरशा हर्फबहर्फ पाहिले त्यावरून हजरतीची मर्जी बहुत खफा जाली. आणि बोलले कीं मागती याचा जबाब राव पंत प्रधान यांस भी लिहितो" याजवर मीं अर्ज केला कीं " पुन्हां या पत्राचा जबाब लिहिण्याचे कारण नाहीं; येकवेळ पत्र लिहिले. त्याचा जबाब तिकडून या तन्हेचा आला. आता पत्र लिहिल्यानंतर तिकडून जबाब काय येईल? तकरारीने तकरार वाढेल. यांत फायदा नाहीं. सबब मागती पत्र लिहिण्याचे मवकुफ करविले." याप्रा मध्यस्त बोलले. रा॥ छ. ६ जिल्काद. हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ शु. ७ रविवार शके १७१५

विनंति उपरि. नबाबानीं श्रीमताकडील जबाब आला तो वाचून पाहते समई जवळ कोणी गृहस्थ होते. त्याजला कोन्हेरपंत यानीं पत्र वाचते समईचा प्रसंग विचारिल्यावरून त्यानीं सांगितले कीं " श्रीमताचे पत्र नबाब वाचीत होते, ते समई नबाब हास्यमुखे वाचून वरचेवर हांसून बोलत होते. त्यात मध्यस्तांनीं अर्ज केला कीं ' पीर मुर्शद! या पत्राचा झाडून मजमुन हजरतके खतका जबाब लेकिन् गुलामके उपर सब मारका ' याप्रा मध्यस्त

अर्जे करित गेल्यानंतरही नबाव पत्रांतील मजमुन एक एक पाहून हांसत होते, याप्रा समीपचे गृहस्थाचे मुखें ऐकिलें त्यावरुन लिहिलें असे सारांश मध्यस्तांनीं सांगितलें त्यांत ' पत्र वाचून हजरतीची मिजाज खफा, ' दुसरे वर्तमान, तेंच समयींचे, दुसऱ्या

२९।३६

कडून अंतरगींचें याप्रा, यावरून यांतील कयाम कसा तो पाहावा रा छ ६ जिल्काद हे विनंति

श्री.

ज्येष्ठ शु ७ रविवार शके १७१८

विनंति उपरि " ताटांत सांडलें काय? वाटींत सांडलें काय? पाटीलबावाही समजस। दौलतीची काळजी सर्वांस आहे दुसऱ्यांनीं तमारे पहावें हें कोणास गोड वाटेल कीं काय? समजोन वहिवाट चाल्ली " ह्मणोन लि॥ त्यास असेंच असावें हें चांगलें हीच इच्छा आहे। कलम १ " करनुळकरांचें कसें टरलें हें त्याहावें दोहींकडे सिलसिला राखावा ह्मणोन लि॥ " त्यास, इब्राहिमखां याचा कारभार करून मध्यस्तांनीं त्यास पागदुरी बसविलें अलफखानाचें राजकारण पक्कें करून रणदुला येथें येणार. येथें आल्यावर कारभारही बोलण्यांत येईल सध्याचा काळ वाजबीवर नाहीं जबरदस्त असेल त्याचा आहे आह्मीं दोंहींकडे सिलसिला ठेविला परंतु घडणार असेल तसे घडेल। कलम— १

"लांकडाचे खरेदीस ऐवज धाडयास तात्यास आपण लि॥ कीं ' एक लाख बत्तीस हजार जगधनास पावले बाकी राहिला ऐवज तो आपण द्यावा ' त्यास, मी तो तात्यासी उत्तर केलें कीं कमकसर दीड लक्ष पावले असतील त्यास ऐवज यापेक्षांही अधिक पावला असावा आपण लिहिलें त्यांत थोडा याचें कसें आहे तें त्याहनयास आज्ञा व्हावी " ह्मणोन ता॥ लिहिलें व त्याची याद पाठविल्यावरून समजलें त्यास तुह्मास समजावयाजोगी याद तयार करविली आहे एका दो दिवसांत रवाना करूं. त्या बराबरच्या पुरवणीचा जाब ता॥ वार लेहूं ह्मणजे सर्व समजण्यांत येईल कलम— १

"माळीटाकडून याद आली. त्याविषयीं सल्लाह पाटीलबावांस पुसावी ऐसें ठरलें. त्याचें येणें होऊन ठरेल तसें उत्तर लिहीन" ह्मणोन लि॥. त्यास लौकर उत्तर यावें. कलम— १

" नन्हुमलास तीन हजाराच्या हुंड्या दिल्या. याचा ऐवज देतों. याउपरि हुंडी होऊं नये. घासीमियाकडे माझा ऐवज येणें त्याची याद मागाहून पाठवितो" ह्मणोन लि॥. त्यास हुंडी इतक्यावर करीत नाहीं. परंतु तुमची याद लौकर यावी, ह्मणजे समजेल. कलम— १

"पालख्यांचे दोन सरंजाम पाठविले. याविषयीं बाळाजी हरि याचें लिहिलें आलें त्यास, येथून साडणीस्वार पाठवून सरंजाम आणवितो. पसंद पडल्यास घेतील. नाहीं तर माघारा रवाना होईल. निदान–निदानची किंमत आज्ञा यावी" ह्मणोन लि॥. त्यास सरंजामाचे किंमतीची याद पेशजी टप्यावर तुह्माकडे पा॥ आहे. त्यात निदान किंमतच ठराऊन लिहिलें आहे. तेव्हढ्यावर ठरत असल्यास ठेवावा. नसल्यास माघारा रवाना करावा. कलम— १

"बालाघाट वगैरे बाबतीची मामलत बाळाजी महिपतरायाकडील याचा मा॥र व बाजी खंडेराव सरदेशमुख याचा ता॥ मागाहून समजोन उत्तर लिहिण्यांत येईल. कलम— १

"वासीमियांकडील तीन हप्ते जाले. त्यात दोन तर आलेच असतील. पैकीं सखाराम अनंतास साडे सत्तावीस जाता बाकी ऐवज रदकर्जास पावल्यास व्याज कमी होतें. रदकर्जास ऐवज पावला नाहीं, तेव्हा काय व्यवस्था? याची समजूत पडत नाहीं." ह्मणून लि॥. त्यास, तुह्मी लिहिल्याप्र॥ हप्ते आले असते तरी तुमचे लिहिणें नीटच तीन हप्त्यात एक तो ऐवज निमे आला. याचा ता॥ मागाहून लेहु. तेव्हा समजूत पडेल. कलमे सुमार आठ. पा॥ छ. ६ जिल्काद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ शु ७ रविवार शके १७१५

विनंति उपरि. "औरंगाबादचे तनख्या ब॥ वसूल किती व बाकी किती

याची याद पाठवितों " ह्मणोन लिहिलें परंतु याद येत नाहीं तुह्माकडून याद येण्याचा उसीर यास्तव याद लौकर यावी कलम— १

"करनुळकराकडे ऐवज फसला येविषयीं स्वस्थ असो नये तगाद्यास कोणी पाठवावे भिवरायास फजीत करून ल्याहावें " ह्मणोन विस्तारें लिहिलें, तें कळलें त्यास तगाद्यास पाठविणें अथवा भिवरायास पत्र लिहिणें–दोहींतही फळ नाहीं अलफखानास येविषयीं आह्मी पत्र पाठविलें होतें त्याचा जाब आला की रणदुलाखां बाहदुर तेथें येत आहेत दरबारचा जावसाल होऊन आपल्या सिद्दी ऐवजाचें ते बोलतील त्यास रणदुलाखानही लौकरच येणार आहेत ते आल्यावर येविषयीं त्यांसि बोलणें होईल तें लिहून पाठवूं कलम १

" बाळाजी रघुनाथ यांस दिवटी आबदागिरीची नेमणूक आहे खिजमत गाराची नव्हती त्यास याद पा॥ त्याजवर करार होउन यावा " ह्मणोन लि॥ त्यावरून यादीवर करार करून पा॥ आहे कलम १

" वसमतचे ऐवजाचें अद्याप ठरलें नाहीं निश्चय करून लिहितों याचें कारण दरबारची गोष्ट आजची पंधरा दिवसांवर जाती " ह्मणोन लिहिलें त्यास, यास उपाय तुमचा काय आहे ? परंतु कामाची खराबी ! कलम १

" रावरंभाकडील तालुक्यास तगई देणें वगैरेचे जाब हरिपंतास सांगून लिहविलें मागाहून पाठवूं " ह्मणोन लि॥ उत्तम आहे जाब लौकर यावे कलम— १

मारवाडकराचें दिवाळें वाजलें याचा त॥ लिहिला तो कळला कलम १

दुखणीं होऊन माणसें फार मरतात याचा त॥, लिहिला तो कळला कलम— १

मुकुंद जोशी याचे इनामाचे दुमोहरी विषयीं वारंवार सूचना तेथें होती त्याचा बयान लिहिला तो सर्व कळला कोन्हेरपंतास या उद्योगास लाविलें परंतु तुह्मी मुकुंद जोशी याची दुमोहरी सनद इतकीच सूचना लिहीत असावी कलम— १

कलमें सुमार आठ रा॥ ७ ६ जिल्काद, हे विनंति

श्री.

ज्येष्ठ शु. ७ बुधवार शके ७११५.

यादी बाळाजी रघुनाथ याजकडे आफ्तागिरा व मशालची याची तैनात सरकारातून पावत आहे व खिजमतगार नि|| आहे. त्यास तैनात पो| रोजमरा द्यावा लागतो. स|| (सबब) महाराजानीं कृपा करून खिजमतगाराची तैनात आवलसालापासून सरकारातून करार करून देविली पाहिजे. तैनात दरमहा ५ पांच रुपये दरमहा येणेप्र|| करार चाकरी बारमाही व कबज आकार याही शिरस्ते बमोजीब येणेप्र|| करार.

छ. ६ माहे जिल्काद आर्बातीसईन सन फसली १२०३ मु|| बेदर.

तैनातपैकी रोजमरा दरमहा रुपये ४ चार एकमाही रोजमरा नेमणुक येणें प्र|| करार.

तेरीख आवलसालापासून छ. २९ शवाल आर्बा तीसैन मयां व अळफ येणेप्र|| करार.

---

छ. १९ जिल्कादी रवाना पुण्यास टप्यावर.

श्री.

ज्येष्ठ व. २ मगळवार शके १७१५

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी.

विनति उपरि. तुह्माकडून फार दिवस जाले, आलीकडे पत्र येऊन तिकडील वर्तमान कांहीं कळत नाहीं. त्यास, हे दिवस पत्रे वरचेवर येऊन समजावयाचे. अशा प्रसंगी आळस होतो, हे चागले नाही. राजश्री नानाकडील पत्राचे जाब वहुत तटले. त्यासुधा तुह्मी आपले पत्राची उत्तरें व वर्तमान पैहाम लेहून पाठवावे. अलीकडे प्रकृत कसी आहे? दरबारास जाणें येणे इत्यादिकचा त|| ल्याहावा. इकडील वर्तमान, सिंदे, होळकर यांचे लढाई प्रकर्णी वगैरे नवाब व मध्यस्ताचे बोलण्यात आल्या अन्वये त|| मा||र राजश्री नाना यांचे पत्रीं लि|| आहे त्यावरून कळेल. उत्तरे लवकर रवाना करावीं.

चार महिन्यापासून खासगत तुह्मास पत्रें लिहिलीं त्यांतील नुकते व चुटके उत्तरें यावयाजोगें बहुत लिहिण्यांत आलीं, परंतु बहुतो पत्रांचीं उत्तरें आलीं नाहींत त्या गोष्टी मागती आठवत नाहींत तुमचे विसरण्यांत आलें अथवा आळसामुळें किंवा दुखण्याकारितां उत्तरें न आलीं हें खरें. उत्तर पत्राचें न आलियावर चैन पडत नाहीं समजण्यात येत नाहीं याविसी वारवार किति लिहावें? लिहितो थकलों आतां ईश्वर तुह्मास प्रेरणा करील ती खरी रा॥ छ १९ जिल्काद हे विनंति

### श्री

ज्येष्ठ व २ मगळवार शके १७१५

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी विनंति उपरि. राजश्री जीवनराव पोंढरे समशेरबहादर येथें आले भेट जाली यांनीं आपलें वर्तमान सांगितलें इतक्यांत तुम्हांकडील पत्रें आलीं कीं " राजश्री हणमतराव सभापत यांचे विद्यमानें मा॥रनिलेकडून कर्जावावत वगैरे ऐवज येणें याजकरितां सन १२०२ सालचे मोकाशाची मामलत त्यांजकडील आटकाऊन पोंढरे मा॥रनिलेकडे मामलतीचा वसूल न जाय ऐसा, वंदोबस्त व्हावा " ह्मणोन लिहिलें व ऐवज येणें त्याची याद पाठविली यावरून समजलें मा॥रनिलेसही बोलण्यांत आलें कीं "आमचे ऐवजाचा फडच्या जाल्यासिवाय मामलतीचा ऐवज तुम्हांकडे पावणार नाहीं " या प्र॥ बोलून सजावरदौलाकडील आवराद निटूर दोनी माहालाचे मोकाशाचा ऐवज अनामत ठेवण्याविषई त्यास सांगोन वदोवस्त केला सिदी इमाम याजकडील वेदरचाही वंदोबस्त होत आहे वसूल यापूर्वी हणमतराव यांजकडे पावला तो वजा जाऊन वाकी ऐवज अनामत राहील कोटगीर, हुर्से, पोतंगल घांसीमियाचे भरण्यांत सन १२०१ पावेतों आले पुढें सन १२०२ सालचाही ऐवज वद करविला जीवनराव यांचें वोलणें कीं "आपले ऐवजास काय गुंता आहे? वाजवी हिसेबाचे रुईनें जो ऐवज असेल त्याचा फडच्या आपण टाऊन देतील तसा करीन " आगचेंही बोलणें कीं ' वाजवी एवज आमचा साथ

घेऊ. गैरवाजवी होणार नाहीं." या प्र॥ जालें. र॥ छ. १९ जिल्काद हे विनति.

**श्री.**

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५

विनति उपरी. जीवनराव पांढरे यानीं एकान्ति घराऊ रीतीने बोलण्यांत आणिले कीं "पहिलेपासोन आपल्याशिवाय दुसरे कोणाचा आश्रय नाहीं. आणि आपल्यासी ई॥पासून माझी चाल कशी हे सर्व ध्यानांत असेल. पुढेहि आपण सागतील तशी वर्तणूक करीन. नेम करून देतील त्या प्र॥ राहीन. महालचा कारभारही सर्व आपल्याकडे ठेवून जशी नेमणूक होईल त्यात तफावत न येता चालेन. पेशजीं ऐवज आपल्याकडील घेतला, तो आदा केला किती? ऐसे असोन मजकडून माहालासमधीं जो ऐवज पावला तो गोविंदराव यास पावला न पावला होहि कळेना. कारभारी याचे हाती मोहर देऊन मुखत्यारीचे काम सागितले त्याची वर्तणूक व चाल कसी याचा बयानकारिता विस्तार! गोविंदराव याजकडे तरि ऐवज पावला असल्याम चिंता नाही. माझे उपयोगावर आहे. ते न होता दरम्यान कळेल तसी धादल केली आहे. दोन च्यार कलमावरून प्रत्ययासही आले. ई॥ पासोन त्याजकडे हिसेब येणे हेही केवळ माझ्याने होते असे नाहीं. आपले आश्रयावर होईल. आपला ऐवज एकदर व्याजसुद्धा किती? त्यात वसूल पोहंचून बाकी निवळ किती राहिला याचे वास्तविक समजावे. फडच्या करून ध्यावा. आपले ऐवजास मजकडून कसूर सहसा व्हावयाचा नाही" या प्र॥ फार बोलले. आह्मीहि याची खातर जमा करून सागितले कीं "जो ऐवज वाजवी असेल त्याचाच फडच्या करून घेऊ. कोणी गैरवाका समजाविल्यास ध्यानात यावयाचे नाही. हिशेबाच्या कच्या यादी आहेत त्या गोविंदराव यास लेहून आणवितो." या प्र॥ सांगितले. त्यास पाढरे याजसमधीं हिसेब वाजवी ऐवजाचे असतील त्या यादी कच्या पाठवाव्या. बाकी राहिले ऐवजाची तडजोड करून घेता घेईल. यांचें बोलणे कीं "हणमतराव यानीं गैरवाका सम-

जाविल्यावरून गोविंदराव यांनी याद पाठविली त्यांत पसतीशाची रकम फिता ह्मणोन लिहिली असा हिसेब येऊं नये खरें असेल तें लिहिलें यावें त्याप्र॥ हजर आहे" याप्र॥ बोलणें त्यास हिसेबांच्या यादी जो ऐवज खचीत दिल्हा व व्याजसुधा हिसेब ठरला तो ता॥वार लौकर यावा. र॥ छ १९ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ व २ मगळवार शके १७१५.

विनंति उपरि. जीवनराव पांढरे यांनी आपल्याकडील हिसेब आणिला त्यांत हणमंतराव यांचे वियमानें माहाल समंधी वगैरे ऐवज बहत पावला यांचे हिसेबी फाजील निघते तुह्माकडून याद आली त्यांत बाकीचा ऐवज येणें या हिसेबास व यादीस कांहींच मिळत नाहीं यावरून हे याद हण-मंतराव यानी सांगितल्याअन्वयें पाठविली ऐसें दिसोन आलें त्यास पांढरे यांजकडे जो ऐवज हिसेब ठरून वाजवी निघाला त्याच्या कच्या यादी न-कला आह्माकडे पाठवाव्या व जीवनराव यांजकडून फडच्या कसा करून घेणें याचेंहि खोलून लिहावें त्याप्र॥ समजून होईल आपले ऐवजास यांचें कांहीं वाकडेपणाचें नाहीं त्यापक्षीं आपणही यांसि सरळपणें खरें तें सम जाविल्यांत काय बाध आहे? जीवनरावही थोर उमदा मनुष्य! पहिलेपा-सोन याची चाल दुसरी नाहीं पुढेंही "आज्ञेप्र॥ सांगाल तसी वर्तणूक क-रीन" ऐसें निखालसतेचें बोलणें त्याअर्थी त्याचा खुलासा घराउ लेहून पाठवावा व यादी हिसेब लौकर यावे र॥ छ १९ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५

विनंति उपरि. जीवनराव पांढरे यांचे व कारभारी यांचे यांकडे आले त्यांनी कांहीं विच्यार मागें पुढें न पाहतां मन माने तसी धूम केली आहे ह्मी जीवनराव यांचे ह्मणणें "आपले मांडीवर मान आहे" त्यापक्षीं अन्याय

व्हावा हे कांहीं चांगलें नाही. व त्या करण्यात फायदा तरि कोणता ? वाजवी तेच का न घडावे. येविसीं तेथे तुह्मास कदाचित रकारनामक याची भीड पडत असेल. त्यास येविषीं मुरवत व भिडेचा सकोच पडल्यास आह्मावर टाकून बोलावे ह्मणजे चिंता नाहीं. परतु भिडेमुळे वचनी गुतू नये. खरे वास्तविक ते खुलाशाने इकडे लेहून पाठवावे. तेथे तऱ्हे तऱ्हेने गैरवाका सांगितल्यास त्याजवर न जाता कचा हिसेब व कर्तव्य ते लिहून पाठवावे. त्याप्रा बदोबस्त कारिता येईल रा। छ. १९ जिल्काद हे विनंति.

## श्री.

ज्येष्ठ व. २ मगळवार शके १७१५.

विनंति उपरि. गोपाळराव पाढरे तेथे आले आहेत. जीवनराव याचा त्याचा प्रकार तुमचे माहीतगिरीतच आहे. साप्रत जीवनराव याचे व कारभारी याचे वैमनस्य. यास्तव ते काहीं गोपाळराव यास चिमटा घेऊन फद उभा करतील. रकारनामक तुह्मास बोध करून नानाप्रकार समजावितील. ते मनात न आणिता, बोलतील ते ऐकून घेऊन आतून जीवनराव याचे लक्ष चित्तापासोन ठेऊन गोपाळराव समधी नवीन दरज काहीं न चाले, पूर्वी नेम जाला त्या प्रा। त्याने आपला दरसाल ऐवज घेणे तो घेऊन स्वस्थ राहावे, दौलतीचा कारभार जीवनराव याजकडे सर्व ठरल्याप्रा चालावा, ऐसा बदोवस्त जरूर करून ल्याहावे. कारण कीं जीवनराव याची चाल आपल्यासि बहुत घरोब्याची व निखालसपणे आहे. यात तथा नाहीं. तो प्रकार बदमामलीचे सिरोमणी, सर्व भाताचा वैश्वदेव करून पाहता कशास काहीं ठिकाण नाही. हा स्वभाव पुर्ता विचार समजला हे तुमचेही मनात आसावे. साराश गोपाळराव वगैरे हरयेक फद उभे राहिल्यास त्याचे निराकरण करून जीवनराव याजकडे लक्ष राखून बदोवस्ताच्या शकली ल्याहाल त्याप्रा येथें पके कारिता येईल. या गोष्टीचा वाच्यांश तेथें न होता येहतीयातीने या बदोबस्तात मन ठेवावे. जरूर! रा। छ. १९ जिल्काद हे विनंति.

श्री

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५

विनंति उपरि. रघुनाथ बाबुराव साहुकार पुण्यांतील यांजपासोन जीवन राव पांढरे यांनी पेशजी मामलत संबंधे कर्ज घेतलें होतें त्यांत वसूलही बहुतकरून हणमतराव सभापत यांचे विद्यमानें पावला कांहीं ऐवज देणें त्यास, सांप्रत हणमंतराव यांची चित्तशुद्धी नाहीं तुफान करून रघुनाथ बाबुराव यांचे देण्याचा तोटा मनस्वी समजावितात यास्तव त्यांचे देण्याचा अजमास याजकडील वसूल काय पावला व बाकी राहीलें काय' हें तुम्ही समजोन घेऊन त्याची आकसात वदी बाजवी ऐवजाची ठरावून पाठवावी "नेमप्रमाणे ऐवज पावता करीन' ऐसें जीवनराव यांचें बोलणें, त्यास, हणमतराव यांचे समजावित्यावर न जातां रघुनाथ बाबुराव यांचा हिसेब खचित समजोन घेऊन ऐवजाची वायदा मुदत ठरवून त्याहातें यास आळसावाडें न टाकितां जरूर करून त्याहातें ग॥ छ १९ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ व २ मंगळवार शके १७१५

विनंति उपरि राजश्री रावरंभा यांनी दफ्तराचें झट बजाजीपंत वगैरेकडे उपिलें होतें याची पंचाईत मध्यस्तापामी होऊन ठरलें त्याचा स॥ पूर्वी लिहिल्यावरून कळला असेल बजाजीपंत व बक्षी व जामदार ऐसे दफ्तराचे शोधाकरितां हैद्राबादेस गेले होते तेथून दफ्तरें आणिलीं, बाजीस दाखविलीं त्यांत तें दफ्तर सांपडलें बाजींनी यांस सर्वांस मागितलें कीं "आमचें दफ्तर आह्मास सांपडलें" या प्र॥ जालें बजाजीपत वगैरेवर आळ रिकामा आला होता तो दूर जाला तुह्मास कळावें सबब लि॥ असे मध्यस्थानी बाजीदवत आह्मांस सांगितलें कीं 'रूमाल—कागद सांपडलें ऐसें बाजीसाहेबांचें ह्मणणें मुबा रक" ह्मणोन आह्मी बोललों " नाहक पंच ब्राम्हणावर आणिला होता आतां

पार पडला." बाजी आम्हासी बोलले की "वरची गोष्ट मुषीरुल्मुल्कपर्यंत बजाजींनी कशास नेली?" याचे उत्तर त्यास आह्मी केले की हा दोष बजाजीकडे किमपि नाही. माझी ताकीद बजाजीस होती कीं मुषीरुल्मुल्क याजपाशी गोष्ट न काढावी आणि आम्हीही याविसी बोललो नाही. तुम्हीच जामदार आदिकरून प्रथम मुषीरुल्मुल्क याजपासी घेऊन गेला. नतर मध्यस्ताचे बोलावण्यावरून बजाजीपतास पाठविले. ऐसे असता आपण बजाजीपत याजकडे फायष केली याचा दोष ठेवितात हे मलाच आश्चिर्य जाले." याजवर बाजींनी काही उत्तर केले नाहीं. आणखीच गोष्ट काहडली. साराश मऱ्हाटे काबाडीचे! ईश्वर या कारभारातून तुम्हास कधी सोडवील याचे नवस करितो. रा॥ छ. १९ जिल्काद हे विनति.

श्री.

ज्येष्ठ व २ मगळवार शके १७१५

विनति उपरि. बटाल्याकडे दोन तनखाबाबत साडे चौतीस हजार रुपये येणे. त्याचे वसुलास तिमणा नाइक पाच महिने बसोन निकड सतत केली. तेव्हा पधरा हजार रुपये वसूल जाला. ऐवज त्याजकडील प्यादे बादरका समागमे देऊन नाइक मा॥र यानी रवाना केला तो येथे पावला. पनास रुपये परत होऊन बाकी नन्हुमल याचे दुकानी जमा केला. 'बाकी साडे एकुणीस हजार येणे. त्याची निकड होत आहे. परतु दोन महिन्यासिवाय तूर्त ऐवज हातास येता दिसत नाहीं." याप्र॥ नाइक यानी लिहिले. मध्यस्ताची ताकीद बटाले यास पाठऊन निकड करणे तितकी करिता येईल. याजवर ऐवज वसूल, येईल तेव्हा प्रमाण॰ रा॥ छ १९ जिल्काद हे विनति.

छ १९ रावरभा यानीं

भागानगराहून.

श्री

ज्येष्ठ व ७ मंगळवार शके १७१५

राजश्री याथिराजीत राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

पो गोविंदराव कृष्ण सा नमस्कार विनंति उपरि, येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जावें विशेष—मौजे शिरसांव पा हवेली परंडा जागीर—राजश्री राव रंभाजी जयवंत निंबाळकर यांची—तेथील व मौजे देगाव पा बारसी या दोगावचे सिवेचा कजिया बहुत दिवस सा पांच चाहूर जमीन आज पावेतों मोहगम पडिक आनामत असतां साल्गुदस्ता मौजे देगाव व कादेल्गाव पा बारसी या दोगावांनीं अनामत राण जबरदस्तीनें पेरलें तेव्हां सिरसांवकराचा त्याचा कजिया जाला बारसीकर कमाविसदारांनीं सरकारांत गैरवाका समजाऊन सिरसांवची जमीन—कदीम पांच चाहूर कजयाची व जदीद साडेबारा चाहूर येकूण—साडेसतरा चाहूर जमीन सिरसांव येथील जप्त केली कमाविसदारांनी वाडा बांधून जमीन वहिवाटावयास लागले येविषई राव मारनिले यांनीं तुह्मास पांच चार वेळा लि। सिरसावकर रयेत येक वर्ष पुण्यांत बसले परंतु बंदोबस्त न जाला दिवस लावणीचें त्यांत याची जमीन देगांवकर व कादल्गांवकर जतीचे राण पेरतात सा सिरसांवची रयेत उठोन नेदरास आली. गांवची खरावी जाली राव मारनिले यांचें ह्मणें कीं "याप्र॥ गैरवाजवी होणें हें उचित कीं काय?" त्यावरून लि॥ असे तरीं साल्गुदस्ता मौजे मा।राचा माल व ऐवज नेला असेल तो माघारा देवऊन वाजवीचे रुईनें नवी जमीन रेटली तिची मोकळीक व्हावी कदीम पांच चाहूर कजियाचा निर्णय होऊन ठरेल त्या प्र॥ दोहीं गावांनीं वर्तावें येविषीं तुह्मीं राजश्री नाना यांस विनंति करून बंदोबस्त करून घ्यावा र॥ छ० १९ जिल्काद बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति

श्री.

ज्येष्ठ व. ३ बुधवार शके १७१५.

छ. १६ रोज रवाना टपा.

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी—

विनंति उपरि. जफरुदौलायहतेषामजग याचे बोलणे कीं " माझे बापापासून श्रीमंताचे दौलतखा तुमचे दोस्तीचा सीलसिलाही कदीमपासून असें असता माझे कामावर आपण कांहींच मुतवजे होत नाही. हे अपूर्व आहे! पानगलचे मुकामीं मध्यस्त आलजपूरचे काम मजकूर सागत होते ते वेळेस आपण खातर केली असती तर माझें काम होतें. श्रीमंताचे दौलतखाह तुमची दोस्ती कधीं कधीं उपयोगीं पडावी " इत्यादिक बहुत गिला केला. त्याचें उत्तर त्यांस दिल्हे कीं " तुह्मीं ज्या गोष्टी बोलिला त्या खऱ्या. परतु इतके दिवस या विषईचा तुह्मास खियालच नाहीं. जर खियाल असता तर आजपर्यंत स्वस्थ का बसलां? तुमचे बाप सरकारचे दौलतखा हें समजोन निर्मळचे मोहिमेचे वेळेस मदारुल माहम यानीं तुह्मांविषई आमचे बरोबर नवाबास कित्येक गोष्टी सागून पाठविल्या तेव्हा हजरतानी मान्य करून आह्मास सागितलें. त्याजवरून ज्यांत तुमचें खैरखाहीची गोष्ट ती सांगून पाठविली. हजरतींनी ही मान्य करून लढाई मोकूफ करून तुह्माकडीलजबाब सवालाचे इंतज्यारींत होते. सेवटीं तुमचे असमजसपणाचे बोलणे पडलें: तेव्हा आह्मी लाचार होऊन निरोप घेऊन पुण्यास गेलों. सेवटीं जे व्हावयाचे ते झालें. आह्मी बोलत होतों त्याचे शतांश तरी तुम्हास कांहीं लाभ जाहला? कांहीच नाहीं! त्याजवरून आमचे मनांत निश्चये की अद्याप दुनयार्यांचे उंच नीच गोष्टींविसीं प्रवीणता नाहीं. आणि तुमचे बापाची काय माई याची ही माहितगारी नाहीं. तेव्हां तुमचा विश्वास खातरजमा कोण तऱ्हेचा कसा मानावा? याजकारिता या गोष्टीचा गिला आह्माकडे नाहीं. तुह्मी हुशीयार जालीयावर पुढें तुह्मासच बरे वाईट कोणतें हे समजत जाईल. " ऐशा कितेक गोष्टी सांगितल्यावर सावध होऊन बोलिले कीं

" जें मार्गे आलें तें गुदस्ता आतां मदारुल माहम यास माशी पास असावी मात्रे दौलतखाहीचा सिलसिला कायम करावा मदारुल्माहम व हरि-पंतजी यांस पत्रें लिहून देतों हीं पाठवावीं मात्रे कार्याविषयीं तुम्ही मध्य-स्तापासीं सई करावी मदारुल्माहम यांचे रुक्षाखेरीज मी नाहीं याची खातरजमा जसी पाहिजे तसी करून देईन त्यांत अंतर पडावयाचें नाहीं " म्हणोन बहुमताप्रकारें बोलिलें, त्यावरून त्याची खातरजमा केली " मदारुल माहम यासही लिहितों उत्तर येईल नंतर टिकडील खातरजमेचा प्रकार तुमची बोलण्यांत येईल " याप्र॥ बोलण्यांत आलें आस्थाही लावून ठेविली आहे हा मजकूर राजश्री नानास श्रुत करावा रा॥ छ १६ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ व ३ बुधवार शके १७१५

विनंति उपरि जफरदौलायहतेशामजंग यांनी राजश्री नाना व तात्या यास पत्रें दिल्हीं तीं पाठविली आहेत प्रविष्ट करून उत्तरें घेऊन पाठवावीत यांनीं आमचें नांव लिहिलें आहे तिकडून पत्रें येतील त्यांत आमचें नांव असावें किंवा नसावें याची सल्लाह राजश्री नाना, तात्या सांगतील तसें करावें मनांत सशय आला याजकरितां लि॥ असे पत्रांत दोस्तीचे खातरजमेचा मजकूर लिहावा उत्तर लवकर यावीं म्हणजे खातरजमा त्यास वाटेल दिवस गुन न लागावी रा॥ छ १६ जिल्काद हे विनंति *

श्री

ज्येष्ठ व ८ बुधवार शके १७१५

विनंति उपरि, जफरउद्दवला यांचे मनांत मध्यस्तापाशी यांनी साहित्य केलीयांस मात्रे कार्य होईल मध्यस्ताची जात म्हटल्यास याचे उपयोगी तसे करतील परंतु याचा मोहभंग कशास करावा ? या अर्थी जंग यासही आस्था लावून ठेविली की प्रसंग पाहून मध्यस्तासी बोलावयासी येईल प्रयत्न तुमचा असावा त्या वेळेस आम्हींही साहित्य करूं इतके मधाचे ओठ लावून

* पारसी पत्राची नकल नानाचे नांवाचे शुनावर व मजकुरी बाग आहेत

ठेविले आहे. समयानुसार घडावयाचे तसे घडेल राजश्री नाना, तात्यास पत्रे आहेत त्याचे जाब पाठविण्याची अडचण मनांत येईल त्यास उगीच दोस्तीचीं पत्रे आलीं त्याचा जाब लिहिल्यास बाद यावयाचा नाहीं. तहनाम्यांत कलम ओवलें आहे. उपयोग काय ऐसे म्हणतील त्यास दौलत आहे तेथे उपयोग सर्वदा पडतच आहे कोणते वेळेस उपयोग पडेल त्याचा न्यमे नाहीं आपण होऊन पैगाम आला त्याचा मार्ग कुंठित का करावा? सिरसिला असल्यास उपयोगच आहे. यातील प्रकार बहुत आहेत. प्रसंगोपात ध्यानांत येतील. याजकरितां पत्राचीं उत्तरें पाठवावयास आनुमान नसावा ऐसी विनंति करावी. रा। छ. १६ जिल्काद हे विनति.

श्री.

ज्येष्ठ व. २ बुधवार शके १७१५.

विनति उपरि. राजश्री बाबाराव मध्यस्तापाशीं बोलत होते कीं राजश्री तुकोजी होळकर यांचीं पत्रे मदारुलमहाम यास आलीं कीं सियामी आमसी हा प्रकार उपस्थित जाहला, हा तेथील आज्ञाव्यतरिक्त नाहीं त्यास त्यांची जमीयेत फार, इकडील थोडी, याजमुळे लढाईचा प्रसंग आसर जाहला. पुढे कसी आज्ञा? केलें कर्म सिद्धीस तर गेलें पाहिजे याचें उत्तर लवकर यावें ऐसीं पत्रें आली त्याजवरून मदारुलमहाम आंदेशात पडले आहेत. पहावें काय जबाब देतात. याप्रमाणे वर्तमान ऐकिलें त्याजवरून लिहिलें आहे. खरें खोटें नकळे. याचा शोध तुम्हांसही तेथे लागला असेल. लिहून पाठवावें. रा। छ. १६ जिल्काद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ व. ९ मंगळवार शके १७१५.

भावसिंग चौधरी याने पत्र मागितले सबब.

राजश्री याविराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

पो। गोविंदराव कृष्ण सा। नमस्कार विनति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लि। जावें.

विशेष राजश्री गोपाळ नाईक वानवले यांचा ऐवज शंकरदास साहुकार हैदराबादकर यांजकडे सतराशें रुपये मुद्दल याजकरितां यांचा मूल मनुलाल यास पैठण येथें वानवले यांनी अटकाविलें येविषयी रोशनराव व भावसिंग चौधरी यांनी बहुत वेळ आम्हांस सांगितल्यावरून वानवले यांस पत्रें पाठविलीं, परंतु मनुलाल याची सुटका जाली नाहीं सांप्रत भावसिंग चौधरी याचे मारिफात साहुकारी निशा सतराशें रुपये मुद्दल घेण्याची खातरजमा मशर्ते मनुलाल येथें आल्यावर ऐवज घ्यावा याप्र॥ घेऊन वानवले यांस पत्र समागमें जासूद देऊन पैठणास पाठविलें त्यास म॥रनिलेनी मनुलाल यास मोकळीक करूं नये येथें पाठविल्यास उत्तम कदाचित व्याज वगैरे बाद करूं लागली ऽ यास्तव तुम्हांस लि॥ त्यास शंकरदास याजपासी देण्याघेण्याचा आहवाल काहीं नाहीं यांचा वस्तवांनीं गाहण ठेवून चौधरी यानें मोठे बलानें साहुकारापासून निशापाती केली आहे यास्तव व्याज वगैरे तंटा कांहीं एक न करितां मुद्दल फडच्यांत समजोन मनुलालास सोडून रवाना करावें आम्हापासी पोहचते करून द्यावे, या प्र॥ वानवले यांस तुम्ही परभारा लेहून सदरहू प्र॥ अमलांत आणीत ऐसा बंदोबस्त करावा रा॥ छ २२ जिल्काद बहुत काय लि॥ लोभ कीजे हे विनंति

छ २३ रोजी टप्यावर रवाना पत्रें

श्री

ज्येष्ठ व १० बुधवार शके १७१५.

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

विनंति उपरि तुमचे पत्रांपो॥ मामलत समेतें वासीमियां व मरबुलंग जंगाकडील ऐवजाचा व जगधनाम ऐवज पावल्याचा मार लिहिला होता, त्याचे जाब हल्ली पा॥ आहेत त्यावरून ता॥ कळेल राजश्री नाना यांस पत्रें लि॥ आहेत त्यावरून दिनचर्या वगैरे वर्तमान कळेल वरचेवर लिहून पत्रें रवाना करीत जावीं इकडील पत्राचे जाब येणें फार तल्पे आहेत. छ, १२

जिल्कादची तुह्मांकडील पत्रे छ. १८ माहे मारीं पावलीं. याचीं उत्तरें उद-ईक रवाना होतील. रा छ २३ जिल्काद हे विनंति. चिनापटण आखबार पा आहे हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ व. १० बुधवार शके १७१५.

विनंति उपरि घासीमीया व सरबुलंदजंगा बाबत तीन हप्त्याचा ऐवज येणे दोन हप्त तरि जगधनाकडे पावले असावे ऐवजाची व्यवस्था कसी? आज्ञा यावी ह्मणोन ता। लिहिलेल्यास उभयतांकडील ऐवज महमद अजीमखां यांचे मारफातीनें आला त्याचे झाडयाची याद आलाहिदा ता। वार लिहिल्यावरून कळेल. सरबुलंद जंगाकडील ऐवजाचा फडन्या जाला थोडी बाकी येणे रा-हिली. घासीमीयांकडे भरणा भारी कारभार वोडग्रस्त. आरंभापासोन खांसाहेबास निकड करण्यांत गुंता नाहीं परंतु आजपर्यंत ऐवजाची सरबराई जाली नाहीं. तीमाराव व गोविंदराव पालीमलार दोन आमीलाकडून वसूल तीन्याणव हजार पांचशे पावला. काहीं माहली मामलेदाराकडे फडन्या होऊन रसीदाही आल्या. त्या रुजु करण्याकरितां चिमणलाल आला होता. साप्रत तिमाराव ही आले. खां साहेबास निकड लाविली आहे. पाच सात दिवसांत हिसेब रुजू होऊन बाकीचा फडन्या कसा करून देतात हें समजोन लिहिण्यांत येईल. रा छ २३ जिल्काद हे विनंति.

श्री.

यादी महमद अजीमखां यांजकडे घासीमीयां व सरबुलंदजग यांजकडील माहाला बाबत स्वराज्याचे मामलतीचा ऐवज येणें ता। सन १२०१ पावेतों.

११९४१४८= वेमोजी वदस्तेऐवज मारनिले रुपये

१९८१९४।।।-।। सरबुलंदजंग म।।

४००७१९।-।। घासीमीयां म।।

११९४१४८=

ता।

४१९४१४८= तीन हप्त्यांनी घ्यावे

१००००० रसीदा रजवातीकरितां तहकूफ ठेविले ते

११९४१४८=

१११९।।=।। व्याजती सरबुलंदजंग यांजकडील रसीदाची रजवात पा नगली मा। विठ्ठल बाबा व भवानीपंत यांनी करू बाकी आठेचाळीस हजार काहडेली होती, त्यांती कितेक कलमें हल्ली हिसेबी सरबुलंदजंग यांजक लागू जाली सबब इजाफा——

१७११९०।।।=।

रुपये

१७०१२४८=। सरबुलंदजंग यांजकडील

११०१७ मा। श्रीमलराय आमीन पा। आल्ट गु

जोटी ७५०० किता

२५१७ किता

१००० माहराजा खंडेराव तनखा प्रो

११०१७

२०००० रामचद्र जोसी साहुकार यांजकडोन रोख.

२५३४७ जिवाजी बाबुराव आमीन नीलगेकर यांजकडोन

१२५०० किता

९००० ३५००

१२८४७ देविले सखारामें अनत

९००० ३८४७

१२८४७

२५३४७

१४६५३ तनखा सिर्दा इमामखा यांजवर प॥ चितापूर ऐवजी.

४४९।- जीवाजी बाबुराव याजकडून रोख वसूल.

१८३७६ तनखा ता॥ मानुर वसूल गोविदराव भगवत याजकडे.

६५७४२॥।=। रसीदा मामलेदारास माहली वसूल पावल्याच्या रुजु.

१७०६३४८=॥

९३५०० घासी मियांकडील

६०५०० तिमाराव हारि.

१०००० कि॥ रोख.

४८००० कि॥ चिटी.

२५०० म॥ जमनादास

६०५००

३३००० गोविंद रघुनाथ आमीन पाली मल्हार
२५००० किता
८००० किता

---

३३०००

---

९३५००

---

२१४१३४८॥
पो। भरणा ———— रुपये
९६३९८ मक्कारात
८०९२५ रदकर्ज जगधन साहु
२८००० रामचंद्र जोसी पो।
९००० जिवाजी बाबुराव पो।
८००० १०००
१८९२५ निमाराव हरि पो।
९९२५ ९०००
२५००० गोविंदराव पालीमलार पो।

---

८०९२५
४००० गणपतराव व्यंकटेश
२००० रामचंद्र जोशी पो।
२००० जिवाजी बाबुराव पो।

---

४०००

११४३२ जासूद सेनानी व डांकवाले व चेनापटण.

१०००० गु॥ गोविंदराव भगवंत.

निमाराव हरि पो॥ व्हाडा

म॥रनिले पासी.

१४३३ वरात सरकारची.

मु॥ माहदाजी विठल २,०५९

पो॥ आदा गोविंदराव

याजकडून १२६ पुण्यात

५०० चिटी मुरुम.

६२६

बाकी ——————— रुपये

११४३३

४० रामचंद्र गुणाजी, यास रोशनखान षसेहुकर याचे तहकी कातीकारितां रवाना सेहुखर्चास रोख रोख

९६३९८

१०६३२२।=। मामलेदार स्वराज्याकडील यास आदा

२५६७ गोविंदराव कृष्ण बाबती पा आलंदगुंजोटी सन १२०१ बा॥ ६५६७ पो पेशजी बालाजी व्यंकटेश याचे विद्यमाने वसूल ४००० बाकी हली वि॥ त्रिमलराव.

१००० फतेसींग भोसले मोकासा पा। सारवाड जगदेव
राव कोकाटे व॥ गु॥ रामचंद्र गुणाजी रोख

२२३२॥ गोविंदराव कोकाटे मोकासे पा॥ वासरब त॥ सीर
फूर बाकी त॥ सन ११९९ रुपये २१३२॥ हा॥
पर पो॥ हैदराबादी नख्त वसूल ३०० बाकी
हाली गु॥ जोती भास्कर.

२७१०० रंगो प्रल्हाद म॥ सखाराम अनंत
१२८४७ गु॥ जिवाजी बाबुराव
९००० ३८४७

१२८४७
१४६१३ जनरखा सिदी इमाम

२७१००
१४०० गोपाळराव धोंडदेव तव्यावकर त॥ मुल्ग
पा॥ उदगीर बाकी त॥ सन ११९९
रुपये २००० पो॥ आदा
५०० पुण्याम नि॥ गोविंदराम भगवंत
१०० हैदराबादी जयराम गोविंद कारकून
नि॥ मशारनिल्हे

९०० बाकी हाली
६१७४२॥।=। रसीदा सर बुंदेजगायकवाड मा
मन्दारास माहाली मसुल पाव
त्याच्या आल्या त्या

८८० गोविंदभट मोकासी मौजे मुधोळ प॥ निटूर बाकी त॥ सन ११९९ हा॥ पट राहिले ते.

१०६३२२।=।

२०२७२०।=।

बाकी सिल्लक—————————————रुपये

६१४१३॥।–

त॥

८३०० तिमाराव हहि ४८०० पौ॥ वसूल रुपये ३९७०० बाकी येणे.

( ९९ ) १४९९ व्यंकटीदास यांजकडे सिलक.

१८४७६।– गोविंदराव कृष्ण याजकडे.

६००० भाहदाजी खडेराव तनखा प॥

६९६७ गोविंदराव पालि मलार ८००० पो

१९०० जिवाजी बाबुराव ३९०० पो

४००९ नन्हुमल पो

४४९।– जिवाजी बाबुराव नगदी.

१८९१६।–

पो रामचन्द्र गुणाजी खर्चास

४०

बाकी—————————————रुपये

२९३७९ गोविंदराव भगवंत याजकडे.

७००० रावरंभाजी जयवंत निंबाळकर,

१४१०० गु॥ व्यंकटीदास

३००० रा॥कर पो

१९०० जगवल हा॥

३९०० २०००

१४१००

२१०० म॥ जमनादास भगल पो

१००००

पो खुदी खुशालचंद किसनदास याजवर

नन्हुमलाकडे जमा १०००० बाकी येणें

१८३७९ स॥ मानुर ह॥ तनखाच्या ऐवज

२८३७९

१००० नन्हुमल याजकडे १०००० पो रोख

१७३७॥ रोख सीलक

११४१३॥।~

बाकी ऐवज महममद अजीम खां यांजकून

येणें ———————————————————— रुपये

२११४९६॥≈

स॥

४१९७।~॥ मर बुलंदजंग यांजकडे जमा

१७४८३१॥ ॥।

पैकी वसूल १७०६३४८≈।

बाकी येणें ———————————————— रुपये

२६४॥।~॥ म॥ निले काढोन

१९६२॥ बाकी जिवाजी बापुराव.

४१९७।~॥.

३०७२५२।~। सरदारुदौला याजकडोन जमा.

४००५७९।=॥

पो वसूल ९३५००

वांकी ग्रेणें ——————————————— रुपये

३०७२५९।~॥

———

३११४९६॥=

श्री.

यादी ऐवज आडा सन १२०२ सला सती सईन मया व अलफ

जमा ——————————————— रुपये

३०००० सरकारातून हुंडया पुण्याहुन वि॥ गोविंदराव भगवंत खुशालचंद किसनदास वगैरे साहुकारावर आल्या ३ त्याजबाबत.

२८५०३ सोमभूपालराव गदवालकर याजकडून.

२५००० हा॥रो खा असल.

३ जासुदास खर्चाबा॥

३५०० व्याजह॥ हिसेब.

———

२८५०३

———

५८५०३

——————————————— रुपये

५२००० सरकारांत रदकर्ज जगधन साहु.

३०००० साहुकारी हुंड्या ह॥

२२००० गदवाल कराप्र॥

१२००० १००००

———

२२०००

———

५२०००

१०० गोविंदराव कृष्ण गद्यालकराप्रो रोख

१२७० गोविंदराव भगवंत यांजकडे गद्वाळकराप्रो

१००० वरात मल्हेरीर ना। भागवत

२७० वरात सुब्रह्मण्याचार्ये

---

१२७०

४३३ परत व्याज मल्हेरीर ना। व सुब्रह्मण्याचार्ये यांचे वराते हा।

---

१८१०३

बाकी गदवालकराकडून——————— ३०० रुपये

श्री

ज्येष्ठ व १० बुधवार शके १७१५

विनंति उपरि जगधनाकडे रदकर्जी ऐवज पावला असावा पहिले हस्याबाबत दीडलक्ष व गद्वाल्कराबाबद सव्वीसहजार व घटाले साडे सतरा व हुंडया बाबत तीस व वसमतेपो वीस हजार या प्रा। दोन लक्ष चाळीस हजार पावले असावे ऐसें असता येक लाख वतीस हजार पावल म्हणोन लेख हे काय? येविषी ता। लिहिलें, त्यास मामलेदारा बाबत ऐवज आजपर्यंत आला व गद्वाल्कराकडील हुंडया बाबत तीस हजार एकंदर जमा धरून याचा भाव दोन यादी आलाहिशा पाठविल्यावरून घटाल्याकडील पंधरा हजार आले पो परत वजा पनास जाता चौदा हजार नऊशें पंनास रुपये नदुमल याचे दुकानी जमा केले आहेत वसुमतेपो वीस हजारहि साहुकाऱ्यांत आहेत जगधनाकडे दिल्हे असते परंतु वसमतेचे ऐवजाची परवानगी पाठीलीं ऐसें तुम्ही लिहिल्यावरून ऐवज साहुकाऱ्यांत ठेविला परवानगी अद्याप आली नाहीं त्यास घटाल्या बावत व वसमतेचा ऐवज जगधनाकडे द्यावा ऐसें लिहिल्यास भरणाकरितां येईल उपर यावें दुसरे वीस हजार वसमतचे मनाच्या बाबत खोळंबून पडले आहेत. याजविषी दोन च्यार वेळ लिहिले असतां

उत्तर नाही यास काय करावे. ' येक वेळ नानास स्मरणपूर्वक यादींत लिहून पुसावे म्हणजे पहिले वीस हजार येतले त्या सुद्धा मावारे यावे किंवा कसे हे समजेल. पुढे वीस यावयाचे ते घ्यावे न घ्यावे हेहि समजावे म्हणजे तसे करावयासी येईल हे काम निरोप अडचणीचे नाही. या विषई राजश्री नानाचे पत्र घेऊन पाठवावे. म्हणजे पुढे पाहीं चांगले रा॥ छ २३ जिल्काद हे विनंति.

श्री

ज्येष्ठ व. १० बुधवार शके १७१५

विनंति उपरि.

पान वाल्याचाट येथील गामतन सन १२०२ चीनले गावकर व रहदारकरकानी केली गाजी वाकी वाल्याजी महिपतराव यानी लिहून दिल्ही. त्याप्रो॥ पंचवीस हजार त्यास यावे. वाकी नवे मागलदारानी निशा केली. दोघाचाहि ऐवज एकदाच देणे लागेल, आपण जमा करून ठेविला असेल ह्मणोन लि॥ त्यास वावतीवाल्याचा ऐवज ता॥ १२०१ पावेतो एकदर वासीमिया मरवुलदजगाचे भरण्यात आहे. वसूल आला त्याचा झाडा लिहिल्यावरून कळेल. वाकी ऐवज वासीमियाकडून आला ह्मणजे जमा होईल. वावतीवाल्याकडे माहली वसूल पावला, तो वजा होऊन हिसेबी वाकी निघेल ते घ्यावयास येईल. कलम १

वाजी खंडेराव सर॥ मुम याचे हप्त्या व॥ ऐवज देणे ते हाका मारितात, ऐवजाची निकड करितात. ऐवज रोख असावा आगर नवाबाचे रदकर्जास पावावा म्हणोन लि॥ त्यास वाजी खंडेराव यास ऐवज देणे पैकी हरीपंतास रोख दहा हजार तुम्ही दिले आहे शिवाय माहली फडचे होऊन रसीदा आल्या. हिसेबी वाकी राहील त्याची रुजुवात त्याजकडील लक्ष्मण सगो येथे आहे त्यासि करून जो ऐवज देणे तो वासीमीयाकडून ऐवज आला म्हणजे द्यावयास येईल, अथवा तुम्हाकडे पत्र पाठवू त्या प्र॥ तुम्ही तेथें द्यावा. कलम १

दोन कलमे रवाना छ २३ जिल्काद हे विनंति.

श्री

ज्येष्ठ व ११ गुरुवार शके १७२५

छ २४ रोज रवाना टपा पुण्यास

राजश्री गोविंदराव स्वामीचें सेवेसी विनंति, उपरी तुम्ही छ १२ जिल्कादची पत्रें पाठविलीं तीं छ १८ माहे मजकुरीं पावलीं त्याचीं उत्तरें

१ राजश्री आबाचिटणीस व तात्या जोसी यांस बेदरी पिकदाण्या पाहिजेत याजकरितां चार पिकदाण्या चांगल्या घेऊन पाठवावयासी आज्ञा म्हणोन लि॥ त्यास नबाब येथें आल्यापासून जकातीचे उपद्रवामुळें माल निघत नाहीं कारीगराचे मुचलका घेतले आहेत याजकरितां पिकदाण्या मिळत नाहींत पूर्वी बेदरी सरंजाम फर्मायेपी आह्मी करविला त्यांत पिकदाण्या आहेत बाळाजी रघुनाथ यास सागून त्यापैकीं प्रस्तुत दोने पिकदाण्या चांगल्या बारामतीहून आणवून उभयतां दोन घेतल्या कलम

१ मिस्तर मालीट यानें सरकारांत विनंति केली कीं दिलावरजंग यास लाड साहेबाचें पत्र आलें कीं नबाबाचा इरादा पुण्याकडे यांत आमची खुषी नाहीं ऐसे नबाबासी स्पष्ट बोलावे, त्यास यांचा उद्गार मध्यस्त ओपटे जवळ कारेतात किंवा जिरवितात हे समजावें म्हणोन लि॥ त्यास मध्यस्ताचा उद्गार अद्याप निघाला नाहीं उणेपणाची गोष्ट याजकरितां कळविणार नाहींत असें वाटतें कलम

१ होळकर यांचे पुत्र मल्हारराव गेले यांनीं आपु होळकर यांचे भियमानें सिंधाकडील गोपाळराव यासी स्नेह जास्त असतां तो मोडून पुन्हा विरुद्ध करून लढाई केली पीकस्त खाऊन फरारी झाले याविषयीं दोन तीन पुरवण्या तपसीलवार लिहिल्या याजवरून सर्व मजकूर ध्यानांत आला आर्भकाचे बुद्धीनें जें करणें त्याचा परिणाम समज कचा आहे, परंतु बादलौकिक याइट झाला. कलम

१ इग्रजासी व फरासिसासी लढाई विलायतेंत सुरु जाली याचा तपसिले मजकूर लिहिला तो कळला. येथेंहि हें वर्तमान कळले, त्याजवरून राजश्री नानांचे पत्रांत पेशजी लिहिले आहे. कलम.

१ मालीट वगैरे बोलणें लिहितो ह्मणोन राजश्री नानाचे पत्रांत दाखला कोठें नसावा ह्मणोन लिा तें समजले. तसेंच घडले. कलम.

१ कोणी मुसलमान स्वार ठेवीत होता तो धरला, बीडवाल्याचे नांव घेतो. लोक ठेवावे त्याचा दस्ता ऐवज व्याज वगैरेचा तपसील लिहिला तो सर्व कळला.

त्यास स्वारापासून दस्तऐवज लिहून घेणे तो सप्रदाय येथील संप्रदायास मिळाला. गुंता नाहीं. यांस वर्तमान कळले, दबून राहिले, बोलत नाहींत. कलम.

---

६

साहा कलमखाना छ. २४ जिल्काद हे विनति.

श्री.

ज्येष्ठ व. ११ गुरुवार शके, १७२५.

विनंति उपरी. "आवरगाबादचे तनख्यापैकीं आजपावेतों वसूल आला त्याची याद पाठविली त्याजवरून ध्यानात येईल. मदारुलमाहम रोज कळवितात तेव्हां उगेच खाले पाहवे. असो! हाल्लीं वसूल जाऊन बाकी येणे त्याची याद पाठविली. मनन होऊन मध्यस्तासि बोलोन जगधन सावकार याजवर चिठी द्यावी. अथवा रद कर्जा ऐवज काहीं देऊन बाकी जगधन यांजवर चिठी द्यावी. सारांश ऐवज याउपरि सत्वर ठिकाणी लागावा म्हणोन लिा " त्यास तुमचे लिहिल्याप्रमाणें मध्यस्तासि दोन तीन वेळा बोलणे जाले. तुम्हाकडील वसूल बाकीची याद आली ती बाजिनस यास दाखविली. त्याजवरून याचे येथे बाळाजी नायक व आहृन नुदौला याचे मोहरमनी वसुलाची यादी आली आहे, एक लाख येकावन हजार दोनशे

रुपये सव्वा तेरा आणे १९१२००॥।~। याच्या रसीदाच्या नकलाहि आ-ल्यात, त्या याणीं दाखविल्या त्यास तुम्हीं यादी पाठविली त्यास व यांज कडील वसूलाचे यादीसीं मुकाबला पडत नाहीं बाकीचे ऐवजाची चिठी जगधन याचे दुकानीं द्यावी याजपैकीं कांहीं ऐवज रदकर्जात लाऊन द्यावा हुंडावणीचा मा॥र तुमचे लिहिण्याप्रमाणें दोन रु॥ सेकडा बोलण्यात सरासरी आला आहे येविषीं मध्यस्तांचें बोलणें कीं मी याचा मा॥र राज्याजीसी बोलतो ते तुम्हांस सांगतील त्यास पांच सात दिवस राज्याजी आपले लग्नाचे गडबडींत आहेत मध्यस्तांचें याचे बोलणें जालें नाहीं याउपरि राज्याजी दरबारास गेल्यानतर जसें ठरेल तसें व यांजकडील वसुलाची यादी आली आहे त्याच्या व रसीदाच्या नकला वगैरे मागाहून रवाना करण्यांत येतील सध्यां तुम्हांस कळवयाकारिता मा॥र लिहिला आहे रा॥ छ २४ जिल्काद हे विनंति

श्री

ज्येष्ठ व १२ शुक्रवार शके १७१५

विनंति उपरी कल्याणराव प्रकर्ण —

१ "कल्याणराव यांस आणून जलसा करणें हें कशावरून तुम्हीं लिहिलें ऐसें राजश्री नानानीं मला पुसिलें यांचें उत्तर मी केलें कीं, कल्याणराव मजकडे येऊन आपल्यासि असें बोलणें जालें म्हणोन सांगत होते, त्याज वरून लिहिलें तेव्हां बोलिलें कीं, कल्याणराव यांस इतके चिकटून घाव यांचें नाहीं, याजकरितां वरच्यावर उत्तर सांगितलें त्याचा ग्रंथ इतका मध्य स्तापर्येत जाला " म्हणोन विस्तारें मा॥र लिहिला तो कळला त्यास भि सरा गृहस्थ कामांत आला, तेव्हां थोड्या गोष्टीवरून मोठे ग्रंथच होतील, असाच काल आहे आणि प्रसंगहि सर्व नमुदीतच आहेत याजकरितां बहुत सावधपणें वर्तत जावें इकडेहि सुचविणें असेल तें सुचवावें आळस करीत न जावा कलम १

आदमनी वगैरे कलमें निवडून पाठविणार त्या कऊआंची याद पाठ-

विली ती पावली. ठराव करून याद येईल ते वेळेस उलगडून लिहावें. ह्मणजे त्याप्रमाणे मध्यस्तासि बलावयास येईल. कलम — १

"फर्दी कामाच्या दाखवीत नाहीं असे तो ह्मणता नये. याजकरितां आदवनी वगैरे औघड कामे आहेत त्याची भवति न भवति करून रघोत्तमराव यांस सांगावें; आपलेकडे लिहून पाठवावें; यांत कल्याणराव यास बोलावु नये, आपण बाबाराव यांस घेऊन मध्यस्तासि बोलावे. आह्मी फैसल्ले करून देवितों ऐसे ह्मणतात याचाहि अनुभव याजवरून समजण्यात येईल." ऐसा बेत ठरला ह्मणोन लिहिलें; त्यास यांतील एक गोष्ट असी आहे कीं आता तोडमोडीचा जाबसाल करू नये. तोडमोडीचा प्रकार कोठपर्यंत कीं, सोहलतीनें, स्नेहाचे रीतीने जाबसाल करते तर सर्व होत. तो प्रकार वास्तवीक नाहीं. आमचेच मानेवर बसून आम्हांकडील सरकारचे कामाचा फैसला न कारितां वरती आणखी इच्छा ठेवणें अश्या चालीस तोडजोडीच्या कारभार कां करावा? याजकरितां कुलफडश्या बाजवीचे मार्गे करून घ्यावा. तरच कलमाचे फडचे. ऐसे नेटानें, केलियास चांगले. पोचट कारभार करणें असल्यास दाब राहील हे समजलेच आहे. दौलतीचे कपाळी असेल ते खरे! यास कोणाचा उपाय नाहीं. कलम—

तीन कलमे र॥ छ. २४ जिल्काद हे विनति.

श्री

ज्येष्ठ व. १२ शुक्रवार शके १७१५.

विनंति उपरि.

१ हुंडी केलियास बद्यामुळे तोटा पडतो याचा तपसील लि॥ तो कळला . कलम.

१ नावनिसीवार पत्रकाची नकल पाठविली ती पावली कलम—

१ राजश्री नानाकडील जाब सरासरि पाठविला तो पावला कलम —

१ राजश्री रामचंद्र दादो यांचें पत्र त्याचे चिरंजीस होते तें पावतें केलें. कलम—

जनार्दनपंत चेनापटणकर यांचे पत्र पावलें, नागपुरास जवाहीर आलें म्हणोन लि॥ व त्याचे बंधूचे पत्र त्यांचे नांवामें पाठविलें तेंहि पावलें त्यास मध्यस्ताचे कानावर घालून ते सांगतील त्याप्रमाणें जनार्दनपंत यांस लिहिण्यांत येईल कलम—

१ "सिदी इमामखान याची मोतीं आलीं बाळाजी व्यंकटेश यांजबरोबर पाठवितों" म्हणोन लि॥ त्यास सिदी इमाम यास कळविलें कलम—

१ "भारामल व भावसिंग याची मोतीं आणिलीं" म्हणोन लि॥, तें कळलें कलम—

१ "पांडोबा बारामतीस गेला चिर सौ॥ दुर्गाबाई पावली" म्हणोन लि॥ तें कळलें कलम—

१ "घासीमीया याजकडील ऐवजांत माझा ऐवज येणें त्याची नांवनिसी वार याद पाठविली त्यास दोन हप्त्यांचा ऐवज येईल त्यांत मासेकडील ऐवज जमा करावा घासीमीयाकडील दोन हप्ते उगवले असे मामलेदार यांचे सांगण्यांत" म्हणोन लि॥ त्यास तुम्हीं यास पाठविली त्याप्रमाणें घासीमीया यांजकडील हप्त्याचा ऐवज आला म्हणजे तुमचा ऐवज जमा करून लिहून पाठवूं दोन हप्ते उगवले किंवा नाहींत याचा तपसील काल तुम्हांकडे याद पाठविली त्याजवरून कळेल कलम—

१" पमपुल उमरावांचे पादीबद्दल जिनस मंबईहून खरेदी होऊन आला, लवकर एकदोन दिवसांत येथुन रवाना होईल " म्हणान लिहिलें तें कळलें अजमसाहेब यास तुमचे लिहिल्याप्रमाणें कळविलें कलम—

" पालखीचे सरजाम फार चांगले आहेत सरकारांत दाखऊन ठरेल तसें लिहीन म्हणोन लि॥ तें कळलें कलम —

१ बाळाजी रघुनाथ यांस पाठविण्याविसीं आज्ञा त्यास श्रीमंतास विचार तां " यांव " म्हणतात, तेव्हां जाण्यार त्यास आणीक एक महिना लागेल जाण्यार पाटील कुळकर्णी यांविसी मनसवा आहे इकडील ठीक न पडल्यास पाल्छाचें करावें, याचा ताला माल्म पाहणें याजकरितां दिरंग " म्हणो

लिो. त्यास ठीक पडो, अथवा न पडो! पाटलाचे करावयाचेंच. तिकडील ठीक जाल्यास पर्याय पाटलासी करणे तो निराळा; तेथील ठीक न जाल्यास पर्याय वेगळा. दोन प्रकार करण्याचे आहेत; त्यांतून एक प्रकार प्रसंगानुसार करावा. तिकडील ठीक न जालें तर करावयाचें. नाहीं तर न करावें असें होऊं नये. जसें तेथील ठरेल त्या धोरणासारखें इकडील करावयाचे; परंतु करावयाचें खरें! या कामास बाळाजीपंत याचे रहाण्याचा उपयोग काहींच नाहीं. बाळाजीपंत असला तरी तुम्हीं पत्रांत मा॥र लिहिल्यावरच कळेल. बाळाजीपंत आपले बरोबर पत्र मात्र घेऊन येईल; इतकेंच! विशेष काम नाहीं. येथें बाळाजीपंत यावेगळ फार खोळंबा हें तुमचे ध्यानातच आहे. लिहावेंसें नाहीं. याजरितां इतकें लिो. बाळाजीपंत यांस इकडे पाठविणे त्यांतल्या कामाची खराबी नाहीं; असे आह्मांस वाटते. तुमचे मनांत काय असेल ते असो!

रवाना छ. २४ जिल्काद हे विनंति.

श्री.

ज्येष्ठ व. १२ शुक्रवार शके १७१५.

विनंति उपरि. बाळाजी व्यंकटेश व येमाखिद्मतगार आला तो कारभार ठरला. दस्तक हुजरे सिव करवितों. गुजराथ प्रांत नेमांत; परंतु श्रीमताचें म्हणणें मावळही खांचर आहे. चिंता नाहीं! याची भवति न भवति होऊन उदईक तें लिहीन. साराश करावें ऐसे जालें. आपण निशा घेतली असेल तो ऐवज हस्तगत होये ऐसें करावें. इकडून कार्य जाले. तिकडे दिकत न पडावी याचा विच्यार करून उत्तर आधीं यावें. उत्तर आलियावर दस्तक हुजरे देऊन सेमास पाठवीन तो पावेतों खोळंबा. यास्तव उत्तर सत्वर यावें म्हणोन लिा' त्यास निश्या घेतली परंतु त्यांत थोडीसी आटक आहे. सयद तुम्हांकडून कार्य करून त्याजपासी गेला म्हणजे त्यांनीं चिठी येथें सावकारास पाठवावी; म्हणजे ऐवज हातास येईल ऐसें आहे.

त्यास दस्तक हुजरे तयार करून सयद याजबरोबर पाठवावे ऐवजाची चिठी त्याची घेऊन पाठवितील नतर दस्तक व हुजरे त्यास रुजु करून धावे याप्रमाणें सैदास सांगून करावें, अथवा सैदास म्हणावें कीं, चिठी ऐवजाची घेऊन या, मग दस्तक हुजरे देईन" याजकारितां येमाची व सैदाची अगो धर जल्द खानगी तिकडे करून चिठी आणवावी तुमचे विच्यारें करणें करावें? खातरजमा ऐवजाची कसी? हे सैदास पुसून करावें आतां आम्हा पासीं सावकाराची चिठी आहे परंतु त्यांत करार कीं, "दुसरें पत्र परवानगीचे आणून दिल्हे म्हणजे तेवेळेस पत्र पावतांच रु॥ देईन" याजकारितां सैदास सांगून चिठी आणवावी आणि कार्य करावें सैदाचे खानगीस आळस करू नये मावळ अथवा गुजराथ श्रीमंतांचे व त्यांचे युक्तीस येईल तसें करावें सैदास पाठवून मावळांतील खांचराचा प्रकार कळवावा; आणि चिठी ऐवजाची आणवावी मग दस्तक हुजरे यावें, हें बरें। याजवर सैदाचे तुमचे युक्तीस येईल तसें करावें ऐवजाविसी करें बोलण्यांत आलें? आम्ही लि॥ त्याप्रमाणें किंवा कसें? हें सयेदासही कळवावें रा छ॥ २४ जिल्काद हे विनंति. लि॥ त्यांत उणें बोलण्यांत आलें असल्यास सयेदास कळवू नये अधिक बोलण्यांत आलें असल्यास सांगावें हे विनंति

श्री

ज्येष्ठ व १२ शुक्रवार शके १७१५.

विनंति उपरि. राजश्री अंताजी निराजी यांनीं मारवाडीहून ऐवजाच्या हुंड्या पुण्यास पाठविल्या कांहीं हुंड्या सोलापुरीहून बापु सिवदत यांचे दुकानीहून केल्या कांहीं तुळजापुरीहून लिंगापा नाइक यांचे दुकानच्या हा कारभार बापुदेव सोलापूरकर यांचे मार्फतिनें केला दोन हजार रु॥ हुंड्यासिवाय ज्याजती अंताजीपंत यांनीं भरणा केला तो ऐवज बापुदेव यांस अंताजी पंतांनीं निकड करून मागितला. सबब बापुदेव सोलापुरास जाऊन त्यानें आपले पत्तीनें चौघा सराफासीं ऐवज घेऊन सोळाशें रु॥ अंताजीपंत यांचे यांस दिले ऐसें असतां राजश्री रामचंद्रपंत सुभेदार व रामचंद्र तिमाजी यांनीं

अंताजीपंतास पत्रे पाठविली कीं, आमचा माल सराफापासून तुम्हीं नेला, तो देणें. त्यास हा कारभार परभारा बापुदेव याचे विद्यमानें ऐवज देऊन हुंड्या घेतल्या. इजाफा ऐवज पडला तो बापुदेवापासोन घेतला. ऐसें असोन सोलापूरकर अंताजीपंत याचे आगी लाऊन लिहितात; व बखेडा करणार यास्तव तेथे तुह्मीं या गोष्टीचा बंदोबस्त करून ल्याहावे. कितेक सोलापुराकडील बोभाट! याजकरितां अंताजी निराजी यानीं तुम्हाकडे कारकून पत्र देऊन पुण्यास पाठविला आहे. वरचेवर मारडीकडील कामाचा बंदोबस्त करीत जावा. रवाना छ. २४ जिल्काद हे विनंति.

## श्री.

ज्येष्ठ व. १२ शुक्रवार शके १७१५.

विनंति उपरी. राजश्री जीवनराव पाढरे याजविषईंचा मजकूर पेशजी तपसिले तुम्हास लिहिला आहे, त्यावरून कळले असेल. पत्राची उत्तरें लवकर रवाना करावीं, व हिसेबाच्या यादीच्या नकलाहि पाठवाव्या. ह्मणजे आपले ऐवजाची तोडजोड याजपासून ठराउन घेउन पुढील क्रम यथास्थित चालेल. उतरे लिहिल्या मजकुराची सविस्तर खोलून पाठवावीं. र॥ छ. २४ जिल्काद हे विनंति.

छ. २४ रोज पत्र अनंदराव नरसिव्ह याजवळ दिल्हे ते.

राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी.

पो॥ गोविंदराव कृष्ण सात नमस्कार विनति उपरि. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावे. विशेष आबदुल गनीखा हाकीमजी पुण्यांत आहेत त्याचा तुमचा सहवासही विशेष ह्मणोन राजश्री आनंदराव नरसिव्ह याचे साागण्यात. त्यास हाकीमजी स्नेहास योग्य मनुष्य याजकरितां त्यांचा अगत्य वाद धरून हरयेकविषई साहित्य करीत जावें. र॥ छ २४ जिल्काद बहुत काय लिहिणे? लोभ कीजे हें विनंति. माहे जिल्हेज उर्फ आषाढ मास.

छ. रोज पत्र पचभाई यानीं मागितल्यावरून दिल्हे.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

पो गोविंदराव कृष्ण स॥ नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित असावें विशेष मौजे मोंढणी उर्फ मामुराबाद रसुलपुरा पा रावेर हा गांव हाली सरकारांतुन मीर मुराद आलीखान बाहादूर पंचभई यांस इनाम आहे त्याचे बंदोबस्ताविसीं पेशजी मिरफेत अलीखान बहादूर पुण्यास आले राजश्री नानाची भेट घेतली बंदोबस्ताविसीं हुजुरे पत्रें करून दिल्हीं आणि मौजे मारी जागीरीचे अमलाचा दखल करून दिल्हा त्याप्रमाणें चालत आहे परंतु स्वराज्याचे, अमलाचा बंदोबस्त होत नाहीं थोपटेकर कमाविसदार याजकडून मौजे मारी आनंदराव नामें कारकून आहे ते यांस नाना प्रकारें दिमती घेऊन उपद्रव करितात याजमुळें हे हैराण होऊन बामाट सांगतात पेशजी यांचे बंदोबस्ताविसीं तुम्हांस जाते समई नबाबानीं व मध्यस्तानीं मार सांगीतला, व वाटणी वगैरेच्या यादी तुम्हापाशीं दिल्या आहेत तुम्हीं सरकारांत बोलून बंदोबस्त करून दिल्हा नाहीं म्हणोन हालीं खान मार यांनी नबाब बदगान आलि यास अर्ज केला त्याजवरून आम्हांस ईर्षाद केला कीं तुम्ही मदारुल महाम यांस पत्र लिहून बंदोबस्त करून देवावा स्वराज्याचे अमलाच्या पाणीं दोन शकलें सांगितल्या आहेत एक तो वाटणी करून घ्यावी त्याप्रमाणें कमाविसदार घेत जातील, अथवा स्वराज्याचे अमलाचा मक्ता ठरावून घ्यावा त्याप्रमाणें हे सालाबाद ऐवज दाखल करीत जातील, फरफरमास व सोयरे वगैरे यांस हिसा नाहीं ते यांचे वहेवटींत राहीऊ ह्या दोन शकलांतून एक शकल ठरावुन दिल्यास गांव यांजकडे निर्वध चालेल म्हणोन इर्षाद केल्यावरून आम्ही राजश्री नानांस आपले हातें पत्र लेहून खुलें तुमचे पत्रांत घातलें आहे हें तुम्ही वाचून पाहून, गाद लावून, पावतें करून, पेशजीच्या यादी तपसीलवार तुम्हापासीं आहेत त्या दाखऊन, याचा बंदोबस्त करून देवावा येविसीची येथें किती किरकिर आहे हे सर्व तुमचे समजण्यांत आहे याजकरितां उत्तम रीतीनें नानांस विनंति करून बंदोबस्त करून देणाए व खान

मार यांचे सांगण्यांत कीं गोविंदपंत नाना कोण्ही कारकून तेथें आमचा वकील ह्मणून आला आहे तो आमचेच पैशुन्यच्या गोष्टी सांगतो. त्यास त्याचे बोलणें मंजूर नसावें. याजकरिता तुह्मास लिहिलें आहे कीं गोंविंदपंत यांचे नाहीत; आणि त्यांचे सागणे सरकारातही मंजूर न व्हावें. रा। छ. १ जिल्हेज बहुत काय लिहिणे ? लोभ किजे. हे विनति.

मध्यस्थ व राजे रायेरामा यांचे मागितल्यावरून पत्र लिहिले असे.

श्री.

आषाढ शु. १ मंगळवार शके १७१५.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

गोविंदराव स्वामीचे सेवेसीं.

पो। गोविंदराव कृष्ण सा। नमस्कार विनति. उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेष मौजे विरमपूर उर्फ वालेपांसरी वगैरे गांव पा। नेवासे हे गाव नवाब वदगानअली याचे सरकारातून महमद रुस्तम अलीखान याचे जातीचे जागीरींत होऊन सनद खासमोहरी जाली. ऐसीयास राजश्री माहाराव निंवाळकर यांणीं राजश्री मोरो हारि कमावीसदार पा।मारिकर यांस सांगोन खान मजकूर यांचा दखल होण्यास दिकत केली व सन १२०२ सालचा यैवज आमानत ठेविला आहे. खान मजकूर यास देत नाहींत. त्यास याचे बंदोबस्ताविसी गोविदराव भगवंत यास पत्र द्यावें ह्मणोन मध्यस्तानीं व राजश्री रायेरामा बहादूर यांणीं सागितले. त्याजवरून हे पत्र लिहिले असे की येविसीं राजश्री नानास विनंती करून देहाये मजकूरचा अमल दखल बदगान अलीचे सनदे प्रमाणें करून देवावा. कदाचित माहाराव व मोरो हारि दिकत करतील तरी त्यासही सरकारातून ताकीद करवावी. रा। छ. २९ जिल्काद बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे. हे विनंति.

माहे जिल्हेज उर्फ आषाढमास.

ठ ६ रोजीं सखाराम अनंत नि॥ सरा मुत्यानीं मागितलें सवय

श्री

आषाढ शु ७ सोमवार शके १७१५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

पो गोविंदराव कृष्ण सा॥ नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लि॥ जावें विशेष, राजश्री रगो प्रल्हाद नि॥ सरदेशमुख यांचे मामलतीचा ऐवज ता॥ सन १२०१ पावेतों त्यापैकीं साडे सतावीस हजार आह्मी नगदी वसूल येथें सखाराम अनंत नि॥ मारनिले यांस दिल्हा पन्नास हजार रुपयाची चिठी, तुह्मी तेथें मत्रीस मारनिलेचे मामलतीबाबत, राजश्री हरिपंत तात्या याची देविली सो ऐवज अद्याप पावला नाहीं ह्मणोन रंगोपंत यांजकडील पत्री बोभाट आला त्यास चिठी देऊन फार दिवस जाले अद्याप ऐवज पटला नाहीं याचें कारण काय येविषीं तात्या यांस विनंति करून ऐवज यांचा यांस पावता जाल्यास पेंचांतून मोकळे होतील येविषीं पेशजी ही ऐक दोन वेळा लिहिलें त्यास सदरहुप्रा यांजकडील मामलतीसमंधें ऐवज पावे तें करावें यासिवाय माहालींही वसूल मारनिलेकडे पावला त्याच्या रसीदा आल्या पन्नास हजारांचा भरणा जाला ह्मणजे यांजकडील उलगडा होतो यास्तव लिहिल्याप्रा घडावें रा॥ छ ६ जिल्हेज बहुत काय लिहि लोभ किजे हे विनंति

छ ७ रोज टपा रवाना

आषाढ शु ८ मंगळवार शके १७१५

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

विनंति उपरि इकडून पत्राच्या रवानग्या पेशाम बहुत जाल्या त्याचीं उत्तरें फार येणें तीं यात्रीं सांप्रत रानरंभाप्रकर्णी वगैरे मार आलाहिदा लिहिल्यावरून कळेल परफड इकडील वर्तमान राजश्री नाना यांचे पत्रीं लिहिलें आहे त्यावरून समजेल वरचेवर पत्रें पाठऊन वर्तमान लिहित जावें रा॥ छ ७ जिल्हेज ० विनंति

घावे त्यावरून बाजीचा रोखा घेऊन पांच हजार रुपये दिल्हे रा छ ७ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ शु ८ मंगळवार शके १७१५

विनंति उपरि राव रंभा यांचे ह्म(ण)णें कीं साल्गुदस्तां मोहरमाबाबत साडे सात हजार कर्ज आपल्याकडे होतें तें माहवारीचे ऐवजांत दरमाहा एक हजार प्रा तीन हजार वजईचे पोटीं आदा जाले माहे जिल्कादपर्यंत मोहरमचा ऐवज फिटून दीडहजार रुपये जाहले इजाफा जाले आहेत. याचें उत्तर आह्मीं केलें कीं मोहरमचा ऐवज किती व कोटून कोठपर्यंत वजा घेतला असता फडच्या हें आह्मांस ठाऊक नाहीं गोविंदराव यानीं माहवारीऐवजीं तीन हजार वजा घेत जावें ऐसें लिहिल्यावरून तीन हजार मात्र वजा होत आले परंतु यांत मोहरमाबाबत किती ॰ व पटणचे स्वारीचे वगैरे कर्ज किती ॰ हें समजलें नाहीं याजीचें ह्म(ण)णें आपण लिहून पाठवावें यावपरि मोहरमचा ऐवज वजा न करितां माहवारी देत जावी त्यास मोहरमाबाबत ऐवज तुह्मीं यांस किती दिल्हे आहे व त्याचा करार कोणते महिन्यापासोन वजा किती करून घ्यावयाचे ॰ याचा तपशील लिहून पाठवावा व पटणचे स्वारीबाबत वगैरे कर्ज कोण महिन्या पासून कोठवर आदा व्हावयाचें हेंही त्याहावें त्याप्रा समजोन करितां येईल उत्तर लौकर यावें रा छ ७ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ शु ८ मंगळवार शके १७१५

विनंति उपरि रावरंभा यांचे बोलण्यांत कीं फरमाळ्यांतील खर्चाबाबत दोन हजार रुपये माहवारीचे ऐवजीं वजा घेण्यांत आले त्यांस करार असा नाहीं कीं ताल्क्यांतील कारखान्याचा खर्च माहवारींत मजुरा घ्यावा ऐसें असतां तो देखील खर्च माहावारींत वजा करून रोखे घेतात तसे देतों याप्रा मध्यस्तासी बो(ल)ले त्यांनीं वजाजीपतास विचारिलें कीं याचा म्याहदा ठरला आहे त्यांत हें कलम कसें उगवलें आहे ॰ यानीं सांगितलें येक म्याहदा गोविंदराव याजपासीं व

हें हरिपंत याचे माहितगारीनें समजोन त्याहावें त्याप्रा माहवारीचे ऐवजीं रोख्यांत चौदा हजार रुपये जिल्हेज पर्यंत धजा झाले आहेत बाकी येणें किती तें ल्हावें त्याप्रा यांसी बोलतां येईल रा छ ७ जिल्हेज हे विनंति

श्री

यादी रामरभाजी जयवंत निंबाळकर यांस ऐवज भरणा ईा माहे राबल कार्तीकमास सन १२०२ ता माहे जिल्हज आपाढमास सन १२०३ बा रोखे—

रुपये

१०७००० माहवारीबाबत रोखे

१०००० माहे राबल कार्तीकमास———————१
१०००० माहे राखर मार्गशीर्ष———————१
१०००० माहे जावल पौष———————१
११००० माहे ज्याखर माघमास———————१
७००० किता माहवारी
४००० कर्जाबाबत व्याजती

११००००
११८०० माहे रजव फाल्गुणमास———————२
११००० माहे साबान चैत्रमास———————२
११००० माहे रमजान अधिकवैशाख———————२
११००० माहे सवाल वैशाखमास———————२
११००० माहे जिल्काद ज्येष्टमास———————२
११००० माहे जिल्हेज आपाढमास———————२

१०७००० १७

९००० माहवारी मीनाये बा रोखे

६००० माहे जाखर माघमास मा म्यकटीदास
६००० माहे रजब फाल्गुण मास मा ननुमल
६००० माहे साबान चैत्रमास मा ननुमल
१६००० माहे रमजान आधिक वैशाख मा ननुमल
६००० माहवारी बाबत
४००० स्वारी खर्चाकरिता

१००००

६००० माहे सवाल वैशाख मास मा ननुमल
१७५०० माहे जिल्काद ज्येष्ठ मास मा ननुमल
६००० माहवारी बा
१५०० मोहरमाबाबत ५००० पैकी

७५००

९५०० माहे जिल्हेज आषाढ मास मा ननुमल
६००० माहवारीबा
३५०० मोहरमाबा ५००० पैकी

९५००

७७०००
२५००० रदफर्जाबा वजा पटणचे स्वारीबाबत व मोहरम मिळोन
२००० माहे राखर मार्गशीर्ष
२००० माहे जावळ पौषमास
३००० माहे जाखर माघ
३००० माहे रजब फाल्गुण

२००० माहे साबान चैत्र.

२००० माहे रमजान अश्विन.

२००० माहे सवाल वैशाख.

२००० माहे जिल्काद ज्येष्ठ.

२००० माहे जिल्हेज आषाढ.

---

२५०००

१४००० कारखान्यासाठी खर्चाबाबत

२००० माहे आखर माघमास.

२००० माहे रजब फाल्गुण.

२००० माहे साबान चैत्र.

२००० माहे रमजान अश्विन.

२००० माहे सवाल वैशाख.

२००० माहे जिल्काद ज्येष्ठ.

२००० माहे जिल्हेज आषाढ.

---

१४०००

---

११६०००

एक लक्ष सोळा हजार रुपये माहे जिल्हेज आखरपर्यंत सदरहुचा जमा-खर्च करावा. छ. ७ जिल्हेज आर्बातिसैन सन फसली १२०३.

यादी राव रंभा यांजकडे ऐवज भरण्याचा आंडा सन १२०२ फ़ी बाबत कार्तिक ता॥ जिल्हेज आषाढ सन १२०३ नगदी भरणा बा॥ याद रु॥ ७७००० पो॥ आदा गोविंदराव याजकडून.

२०००० नगदी परभारा.

५००० माहे रावल मा॥ ननुमल.

९००० मा। जमनादास हुमणावाडे मावत हुंडीचे माहे रावर.
१०००० ननुमल दोन माही ऐवज पुण्याहून सरबरा (*)केली
९००० सखाराम बाळाजी कडून
१००० रघुनाथ पंताकडून

१००००

१९००० हुंड्या पुण्यावर केल्या
९००० भगवंत नाईक बुडख याची माहे रावल
२००० ननुमल याचे निषमाने माहे साबान
९००० किता ननुमल याचे मारफत माहे रमजानीं
२९०० । २९६०० २०००
१९००

९०००
३००० भगवंत ना। बुडख याची माहे सवाल

१९०००
१०००० पुण्याहून हुंडी खुशालचंद किसनदास याचे दुकानची पाटविली ते

४९०००
बाकी येणे ——— रुपये
२८०००

ता।
७००० गुा व्यंकटीदास रुपये १७००० पौ हुंडी मा वजा

१०००० बाकी

२१००० गुा ननुमल.

---

२८०००

यकूण आठावीस हजार रुपये मुवादला माहे जिल्हेज आपाढ मासपं
पडला पुढें श्रावण मासापासोन माहवारीचा भरणा आलाहिदा छ. ७ म
जिल्हेज आर्बातिसैन सन फसली १२०३.

श्री. 1813

आषाढ शुद्ध ८ मंगळवार शके १७१५.

विनंति. उपरि रावरंभा प्रकर्णी मार. मौजे जवळे हा गांव बांदलाकडे हे
तो तुह्मी त्यास कर्ज देऊन आपल्याकडे करून घेतला. बांदल वारला, स
बाजीनीं त्या गांवची जप्ती हल्लीं करविली ऐसें ऐकलें. त्यास आपला ऐ
बांदलाकडून किती येणें हे ताा वार ल्याहावें ह्मणजे यासी बोलून ऐवजा
फडच्या होईल तेव्हां गांव स्वाधीन करावयाचा. उत्तर लौकर यावें. रंभा
याजकडील जप्ती बसून यावी. कलम ————————

तगई प्रकर्णी व बावले समंधीं उत्तरें पेशजी पत्राचीं आयाप अ
नाहींत, पाठवावीं. कलम ————————

वजाजी पंत दफ्तराचे पेंचांतुन मोकळे जाले. मध्यस्तापर्यंत पंचा
जाली. यामुळें बाजीची मर्जी यांजवर कांहीं उदासीन आहे. एक वेळ म
स्तासी व बाजीसी वजाजीपंताविषीं बोलून बंदोबस्त होईल तो मागा
लिहूं. कलम ————————

उंदरतण्याचा पाटिल येथें आला आहे. त्याचे भावाबंदाकडे
हजार रुपये बाजीचें येणें. सबब यानीं चिठी केली. याचा मार वास्तविक व
तो ल्याहावा. त्याप्राा बोलून बंदोस्त करतां येईल. कलम ————————

वराता बाजीनीं पेशजी साडे सोळा हजाराच्या केल्या, त्या फिरव

ऐवज पावला नाहीं येविषीं मध्यस्तांनीं सांगितल्याप्रो। पेशजी लिहिलें, त्याचें उत्तर यांत्रे कलम ——————————————————— १

बाजीनीं गोपाळराव वकीस पुण्याकडे रवाना केलें सिरसाव्रचे जावसाल करितां ह्मणोन बोलतात, परंतु आंतून बावाराव यांचे विद्यमानें पाटील बाबा कल्याणराव यांजकडे गेले ऐसेंही ऐकण्यांत त्यास तेथे याचा शोध करून काय डौलावर आले हें सावधगिरीनें बातमी ठेऊन त्याहावें येथील बंदोबस्त करणें तो करितां यईल कलम ——————————————— १

---

६

कलमें सुमार साहा रा। छ ७ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ शुद्ध ८ मंगळवार शके १७१५

। विनंति उपरि, ननुमल यांचे विद्यमानें येथून पेशजी तुम्हावर हुंड्या नऊ हजाराच्या व भगवंत नाईक याजकडील तीन हजाराच्या ऐशा रावरंभा यांचे माहवारी समंधें केल्या पैा काहीं ऐवज पावला व बाकी देणें तो दिल्हा नाहीं येविषींचा बोभाटा पुण्याकडून हरदो साहुकाराकडे आला त्यास हुंड्यांचें काम नाजूक, तुह्मांस सर्व माहीत, याअर्थी येथून पेशजी हुंड्या केल्या त्याचे मुदतीप्रो। ऐवज पावता केला असल्यास उत्तम नसल्यास ऐवज देऊन भरपाया करून घ्याव्या व ऐवज पावता झाल्याचें इकडे लिहावें त्याप्रो। उभयतांस सांगून हुंड्याबाबत ऐवज पावला नाहीं याजमुळें ननुमल व भगवंत नाईक बहुत घाबरे आम्हीं खातरजमा करून सांगितलें कीं हुंडीस हरगीज दिकत होणार नाहीं तुम्हास सूचनार्थ लिो असे ऐवज पोंचवून उत्तर पाठवावें रा। छ ७ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ शुद्ध ८ मंगळवार शके १७१५

विनंति उपरि शंकरदास साहुकार हैदराबादकर यानकडे घानवळे हरबाजी

ना॥ यांचा ऐवज सतराशें रुपये याजकरिता पैठणात गोपाळ ना॥ यानीं शंकरदासाचा पुत्र मनुलाल यास आटकेत ठेविलें. रोशनराव व भावसिंग चौधरी यानीं रदबदल फार केली; सबब तीन च्यार पत्रे वानवळे यास पाठविलीं, तुह्मासही लिो, परंतु अद्याप त्याची सुटका जाली नाहीं. साप्रत भावसिंग चौधरी यानीं शंकरदासाची हवेली गहाण ठेउन वस्तवानी तडामोडा करून सतराशे रुपयाची साहुकारी खातरजमा करून दिल्ही कीं मनुलाल येथे येताच साहुकारानें सतराशें रुपये द्यावे; व्याजाचे काहीं ह्मणों नये. याप्रा ठरून आह्मीं गोपाळ नाइक वानवळे यास मुजरद जासुदाबरावर पत्र पा आहे की याप्रा ऐवज मनुलाल येथे आल्यावर फडच्या होतो या पत्रावर वहुतकरून वानवळे मनुलाल यास इकडे पाठवितील. कदाचित् व्याज वगैरेची हरकत केल्यास तुह्मी साफ तिकडून त्यास लेहून रगोवा नाइक यास सागोन मनुलालाची सुटका होऊन इकडे पाठवीत ऐसे करावे. रा। छ. ७ जिल्हेज हे विनंति.

श्री

आषाढ शुद्ध ८ मगळवार शके १७१५.

विनंति. उपरि राजश्री आनदराव नरसिंह येथें आले, भेट जाली, वर्तमान समजलें. मारनिलेनीं हलीं पत्रे पुण्याकड दिल्हीं आहेत तीं रवाना केलीं बि॥

१ तुमचे नावे लखोटापत्रे पाहून उत्तरें यावीं.

१ मालोजी राजे घोरपडे याचा लखोटा

१ अवदुल गनीखां हकीमजी आदितवार पेठेत.

१ वालंमा देसाई गुंड मटकलकर लखोटा सिदगीर गोसावी याचे मठात अथवा आपाजी बाबाजी आठवले याजपासी द्यावा.

—

४

सदरहू च्यार लाखोटे जिकडील तिकडे पावते होऊन उतरे येतील तीं इकडे रवाना करावीं. रा छ. ७ जिल्हेज हे विनंति.

टपा रवाना पुणें छ. १९ रोज.

आषाढ व १ बुधवार शके १७१५

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं

विनंति उपरि तुह्मी छ २९ माहे जिल्कादचीं पत्रें पाठविलीं तीं छ. ५ माहे जिल्हेजीं पावलीं याचीं उत्तरें राजश्री नानाचे नांवाचीं पत्रें दिल्हीं सर्व मजकुर समजला म्हणोन लिहिलें तें कळलें कलम ——— १

होळकर महेश्वरास येणार म्हणोन लिो तें कळलें इंदुरास आले आलीकडे हि येतील. सरदारीची मजा राहिली नाहीं श्री नायेक, बाळ नायेक आणि वेम सलहत—तीन गोष्टी येके ठिकाणीं चवथा आईकार, तेव्हां ईश्वर त्या सरदारीची आबरो ठेवील तर ठेवो। कलम ——— १

सुरापुरकराचे कारभारी येथें आले, सरकारांत बोलुन येकोपा ठरला, देवदुर्ग नजर वगैरे ठराव जाहला, नवाबास साहित्यपत्रें दिल्हीं, इत्यादिक तपसील या उपरि लिहीन म्हणोन लिो त्यास साहित्यपत्रें व गोपाळ आपा यानीं ल्वकर यावें, देवदुर्गप्रकर्णीं याचें मनांत विपरीत आलें आहे तिकडे फौज मध्यस्तानीं कांहीं बंदोबस्तानिसीं पाठविली ऐसें ऐकण्यांत शोध घेऊन बोलण्यांत येईल परंतु तिकडून पत्रें जरूर ल्वकर यावीं म्हणजे बोलण्यास दुहेरी नेट पडेल विस्मरणांत येऊं नये कलम ——— १

राजश्री पाटील बावा सरकारवाड्यांत दोन वेळ व येक वेळ नानाचे येथें आले होते तीन खलबतें जालीं श्रमतांचें दैव थोर। राजश्री नाना, तात्या, पाटीलबावा, तिघेहि थोर समंजस, तिघांसही दौलतीची काळजी आहे, इत्यादिक मजकूर लिहिला तो कळला, त्यास ईश्वराजवळ हेंच मागणें आहे त्रिवर्गाची ऐकता (ऐक्यता) यांतच दौलतीची बोहबुदी आहे कलम ——— १

बाळाजी व्यंकटेश व येमा खिदमतगार आले ज्या कामास आले तें होत आहे त्यास आपली निशा होऊन चिठी आली पाहिजे, यानिसी कसें म्हणोन लिो त्यास निशा जाली. परंतु येक चिठी येणें त्याचा खोळंबा आहे त्यविषई पूर्वी लिो आहे त्याप्रमाणें सैदास सांगून चिठी आणून पाठवावी त्या प्रहस्ताकडील पत्र आम्हास आलें होतें, त्याचा जबाब आम्हीं पाठविला की

चिटी लवकर यावी. त्याविसीं खोळंबा आहे, ताकीदपत्रे तयार आहेत, चिटी आली म्हणजे पत्रे तुम्हासी पोचतील. त्यास येविषईं तुम्ही सैदास सागून करवावें कलम.——————————————————१

पांच कलमे रा छ. १५ जिल्हेज हे विनंति, चीनापटणच्या दोन आखबारा पा। आहेत. प्रा करावें; हे विनंति.

श्री.

आषाढ व. १ बुधवार शके १७१५.

विनंति. उपरि तूर्त मोठा कारभार सिंदेप्रकर्णी. प्रातःकाळी तर बनत नाहीं. तृतीये प्रहरीं दरबार. त्या अवसरात जितका कारभार होईल तितका; प्रस्तुत घरचे कामामुळे तर दुसरीं कामे होतच नाहींत; इत्यादिक मजकूर लिहिला तो सर्व कळला. त्यास दौलतीचे काम मोठें. यास दोन वेळ दरबार जाल्याखेरीज कसें होईल ? दुसरें, दरबारचे जाबसाल तटून राहतात आणि त्यांचे तगादेहि लागत असताना जाब मिळत नाहीं. याचा खियाल इतर दौलतदार काय करतील तो करोत ! कलम ——————————————१

जाबीतजंगप्रकर्णीं पत्रे पावतीं केलीं. उत्तरे घेऊन पाठवितों. गोविंदराव खटपट फार कारितात ऐसें बोलिले म्हणोन लिहिले ते कळले. त्यास उत्तरे लवकर पाठवावी. यास दिरंग पडला म्हणजे मनुष्यास उमेद राहत नाहीं आमचे खटपटीचे रूप करणे खावंदाकडे. कोणते म्हणाल त्यास जाबसालाचें उत्तर होऊन गोष्ट मार्गास लागली म्हणजे करावें त्याचें सार्थक. नाहीं तर वंध्यामिथुन; ऐसे होते हे तात्पर्य. कलम——————————————१

सरकारचे फरापखान्याचा सरंजाम पानगलास आटकावावा आणि नबाबाकडील लांकडाविसीं आम्ही दस्तके द्यावीं कीं काय ऐसें राजश्री नाना आपल्यास लिहिणार ह्मणोन लि। ते कळलें. पत्र आलियावर त्याचे उत्तरही समर्पक लिहिण्यांत येईल. कलम——————————————१

वराड प्रातांतील खुर्द्याची चाल कसी असावी याचा नेम आपण लिहिला व खुर्दा पाहवयासी पाठविला त्याजवरून उमरखेडकर यास राजश्री नानांनीं ताकीद केली याचा मजकूर लिहिला तो समजला. कलम ————१

पाटील बाबास ल्यानी मेजवानी सरकारवाड्यांत जाली त्याचे खीस मस्तु प्राप्त जाला म्हणोन श्रीमंतास आहेर घेऊन गेले होते इत्यादिक लिों सें कळलें कलम—१

टिपूचे मसलतीविसी पुढें तीही सरकारांनी कसें चालावें याची याद आपणाकडून आली व मालीटही निकड करीत आहे हररोज घोळ—पाटीलबावाचें एकमत, राजश्री नानाचे एकमत—म्हणोन लिों तें कळलें त्यास पाटीलबावाचें म्ह(ण)णें दौलतीचे दाव्यांचें परंतु सर्वांची येकवाक्यता होऊन घडणें कठिण। याजकरितां नाना म्हणतात हेंच खरें. परंतु त्यांतहि येखादी दरज राखून जात्यास चांगलें संकट आहे। केवळ हात बांधून देणें हेंहि चांगलें नाहीं न दिल्यास गत नाहीं याविसी खावंदास समज होऊन आंगेजीनें करावें तर परीणाम नाही तर नाना तरि काय करतील? दौलतीचे नसीबीं असेल तेंच घडेल आणि करणें प्राप्त ! जाब लवकर येत नाहीं याजकरितां नित्य येथील निकड आहे त्याचा बयान काय लिहावा? कलम—१

नवाबाकडील लोकडाचे खरिदीस रघोत्तमराव यांजकडील कारकुन गेला खरीदी पुरू झाली ऐवजाची चिठी आपण तात्यावर दिली. त्यास ऐवज देतात ह्मणोन लिों तें कळलें याप्रकर्णी मध्यस्त वाजुरांत बो(ल)ले त्याची पुरवणी आलाहिदा लिहिली असे कलम—१

पुण्यावर आरंभापासून पाउस नाहीं वर्कंत्र सर्वत्र आहे याचा विस्तार लिहिला तो कळला. त्यास रघोत्तमराव याची आखबार छ २९ जिल्हेजची नबाबाचे येथें आली त्यांत चवथे माहेमारापासून पर्जन्य पडत आहे ह्मणोन लेख होता आतां जाहलाच असेल इकडे पिकाचे उपयोगी पर्जन्य जाले. कलम १

आठ कलमें रा छ १९ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ ब. १ बुधवार शके १७१५.

विनंति उपरी

——सर्व समजोन आहे हरयेक कामास दिवसगत लागती असें वाटतें परंतु

१ जुजयातीचे सात फलमें ठाविली त्याची नकल रघोत्तमराव यांनी केली ह्मणजे त्वकर आपणेकडे पाठवितों ह्मणोन लिो तें कळलें त्यास त्वकर लिहावें त्याचा सिधांत काय ह्याही लिहावा त्या धोरणानें बोलाव यासी येईल फलम—

१ रामचंद्र दादो यांचे चिरंजीवाचे नांवाचे लाखोटे पावते केले फलम—

१ मुकुंद जोसी याचे जमिनीचे दुमोहरीचे तयारीस पुरवात केली फलम —

१ बाळाजीपंत यांजवर बाजीनी नाहक पेंच आणला याविसीं आपण त्यास बोधरूप च्यार गोष्टी सांगून यांचे त्याचे मिळवून घावें ह्मणोन लिो त्यास तसेंच होईल फलम—

१ सुरापुरकर याजकडील भरणा—

१००००० सुरापुराहून रोख यैवज बापु सिवदत्त याचे मारफत आला तो नबाबाचे खजान्यांत पावता करून तुमचें नांवें आह्मी रसीद लिहून सुरापुराकडे पाठविली

५०००० पन्नास हजाराची आर्जी रघोत्तमरावबाची तुह्मी पाठविली ती मध्यस्तास प्रविष्ट केली

५०००० बापु सिवदत्त याचा रोखा आषाढ वद्य १ मुदतीचा पाठविला तो पावला त्याचें बघू ह्मणाले भरणा जाली यावर तुह्मांस लिहून पाठवूं

---

२०००००

सदरहु अन्वयें भरणा जाला रघोत्तमराव यांजकडील यैवज पैकीं दाहा हजार कोणास देविले ? बाकी तसेंच असू देणें ह्मणोन लिो याप्रमाणें मध्यस्तांनी नवाबापासि तपसीलवार बयान केला फलम— १

---

८

९ येकूण आठ कलमें रा। छ १९ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ वद्य १ बुधवार शके १७१५.

विनंति उपरि.

१ जीवनराव पांढरे यांचे प्रकर्णी हिशेबाचे कागदपत्र कचे पाठउन देतो. त्यास हणमंतराव येथे आहे. तसाच गोपालराव जिवाजीपंत तर साहीत्यावर! फत्तेसिंग निमित्य पाहतात. याजकरिता समेटून करीत करीत करावें. आनंदराव तेथे आहे त्याचे तोडावर हात फिरवावा. जीवनराव, आपण याचा विचार करून लिहावे. तसे करीन ह्मणोन लिौं. त्यास तुह्मी लिौं त्याप्रमाणेंच तोडावर हात फिरवून ढकलावें; परंतु त्याचे हातीं यैवज मात्र जाऊं नये; यैसें जीवनराव याचे ह्म(ण)णें. आनंदराव यान्या चाली खोट्या. सजावरदौलाकडील यैवज निठुर वगैरे आपल्या कर्जाच्या यैवजांत ध्यावा ह्मणोन तुमचीं पत्रें आलीं. यावरून त्याकडे आह्मीं सांगून पाठविले. यावरून आनंदराव यानीं मध्यस्तास सांगविले कीं मामलतीसमंधे जीवनराव यांजकडे सरकारचा यैवज येणें त्यात माहाल लाउन दिल्हे आहेत आणि निठुरचा यैवजही लाविला आहे हा ध्यावा. त्याजवरून त्यानीं रायरायांस विचारिलें. याणीं सागितलें:—त्याचे दस्तयैवज पाहून सागेन. यैसा प्रकार आनंदराव याचा. याजकरितां तुह्मी कोठेपर्यंत झाकीत बसाल? तथापि तोंडावर हात फिरवून तुह्मास लिहून पाठऊं. जीवनराव यांचा पक्ष दरबारी. तेथें सोडूं नये, खचित असावें, याविषई आलाहिदा पुरवणी लिहीली आहे. ती रघोत्तमराव यास दाखवावी. कलम—— १

१ तात्या वेंक यांजकडील वीस हजार रु॥ त्याविसीं फार निकड समजून आपाजी बावाजी यांजकडून येक महिन्याची खातरजमा करविली. त्रिमलराव बावद सा हजार त्याविसीं बोलतात त्यास आग्याचा यैवज ठेऊं नये; आपल्याकडून हुंडी जालीयास पाठवावी ह्मणोन लिौं. त्यास वीस हजाराचा हवाला आपाजीपंत यांचा दिल्हा. बरें केलें! साहा हजार त्रिमलराव बाबत येथें मारनिलेकडील सदाशिवपंत यांस दिले. हुंड्या

पाठविण्याविसीं लिों, त्यास तूर्त सेयें, नाहीं बाळाजीपंत यांची लष्कर रवानगी केलियावर सर्व समजून हुंडी पाठविण्यांत येईल आपाजी बावाजी व सुर्ही मापलेकडील हिशेब मारीनेलेवरोबर पाठवावा कलम— १

१ श्रीनेरीकर स्वामी यांस सरकारांतून हजार रुो देविले म्हणोन सांगितलें, त्याजवरून दिल्हे म्हणोन लिों तें कळलें कलम— १

१ सुकलाल याजकडील हिशेब कितेब समजला आसाल. बाळाजीपंत याजबरोबर सर्व सांगून पाठवावे कलम— १

—

४

च्यार कलमें रा। छ. १९ जिल्हेज हे विनंति नबाबाकडून येक मद्दस्त फौज ठेवावयाकरितां आला, त्यास धरले याचा मजकूर लिहिला तो कळला

श्री

आषाढ शु॥ १ बुधवार शक १७१५

मध्यस्ताचा उद्गार निघाला तो राजश्री नानास लिहिला आहे. त्याजवरून कळेल हे विनंति

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेशी विनंति उपरि छ १३ जिल्हेजीं ईदीचे नजरेकारितां आह्मी नबाबाकडे गेलों मध्यस्त समीपच होते लोकांच्या नजरा ह्मान्यानंतर मध्यस्तांनीं अर्ज केला कीं, पुण्याहून चोबीना खरेदी करविला, त्यापैकी पंचायैसी हजार रुपयाचा खरीदी जाला पांचगजी नाना मिळाल्या साहागजी व सातगजी तेथें नाहींत. सबब संगमनेराकडे खरीदी करण्यास गोविंदराव भगवंत यांनीं एक कारकून व रघोत्तमरायाकडील एक यात्रा रवाना जाले आहेत दोन लाख रुपयापैकीं पंच्यायेसी हजाराचा चोबीना खरीद जाला बाकीचा तेथें होणार. त्यास कोंकणपटीचा चोबीना भीमेचे पाण्यानें तार्फे बांधून कलमर्यास येईल तेथून बेदरास आणावा लागेल तार्फे बांधण्याकरितां लोकडें खरीदी

करावीं लागतील येसेंही रखोतमराव यानी लिहिले. सदर्हूप्रों चोवीना कलबुर्ग्यास येईल, मुजाका नाहीं. लेकीन संगमनेर प्रांतीं जो चोवीना खरीदी होईल तो गंगेचे पाण्याने वंजरासंगमास आणावयाचा पहिला वेत होता. परंतु यांत मोठी अडचण आहे कीं वंजरा-संगमास चोवीना दाखल जाल्यानंतर तेथून वेदरास वंजरेचे पाण्याने येणें मुष्कील. सबब कीं, वंजरेचा वोव फार नीच आहे. तेथून येणार नाहीं. ज्या ठिकाणी चढवून आणावयाचा तेथून आणावयास प्रयत्न फार. याकारिता वंजरासंगमास चोवीना न आणितां गंगेचे पाण्यानें नादेड येथे आणावा. तेथून वेदरास आणावयाची तजवीज वंजरेने अथवा भारबरदारी पाठवून खुष्कीतून जशी सोये तशी करिता येईल. याप्रो। अर्ज केल्यावरून गंगेचे पाण्याने नादेडास चोवीना आणावा याप्रो। नबावानीं फर्माविले. भीमोवाने कलबर्ग्यास येणार याची सलाह कशी? ह्मणोन महमद अजीमखा यांस मध्यस्तांनीं विच्यारिलें. त्यानी सांगितलें कीं कलबर्ग्यानजीक फेरोजाबाद व शाहाबाद हे दोन गांव भीमातीर तीन कोस कलबर्ग्यापासोन आहेत. तेथें चोवीना आणवावा. तेथून भारबरदारी सरंजाम पाठवून वेदरास आणावयाची तरतूद होईल. याप्रो। बोलणे जालें. रखोत्तमराव यांनीं मध्यस्तास लाकडाविषयीचा मार लि॥. त्यावरून मध्यस्तानीं सदरहूप्रो। बयान केला. याजवर हे बोलणे जालें. लांकडाविषींचा व बंदुखाचा मार तुह्माकडून इकडे कांहींच लिहिण्यात आला नाही. येथे बोलणे जालें ते कळावें सबब लिहिले असे. रा॥ छ. १९ जिल्हेज हे विनंति.

श्री.

आषाढ वा १ बुधवार शके १७१५

विनंति. उपरि मध्यस्तांनीं नबाबास अर्ज आह्मी समीप असतांच केला कीं चोवीना खरीद करण्याकारिता हरि पंडतजी यांजकडून यैवज येणें. त्याचे पत्र, येक लाख बयाणा व हजार रुपयाचें, याचे घेऊन पुण्यास पो। होते. त्यापैकीं सत्तर हजार रु॥ नगदीं देतों, बाकीचाही कांहीं यैवज येथें देवितों,

व तेथुन कांहीं गोविंदराम यांजकडून देवितों याप्रा तात्यांनीं रघोत्तमराव यांस सांगितलें याप्रों रघोत्तमराव यांनी लिहों ह्मणोन मध्यस्तांनीं अर्ज केला त्यास तात्या यांनीं यैवज तर्थे किता पटट्या व वावयाचा किती आणि आह्मां-कडून किती देविवणार हें तुह्मीं कांहींच न लिहों त्यास याचा तपसील आधीं इकडे ल्याहावा ह्मणजे येथुन ऐवज देणें लागेल त्याची तरतूद आगाऊ जाली पाहिजे यास्तव आधीं सूचना ल्याहावी रा छ १९ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ वा १ बुधवार शके १७१५

विनंति उपरि रावरंभा यांस यैवज तुह्मीं पुण्याकडे गेल्या ता जिल्हेज आखर पावेतों येकदर दिल्हा याचा ता पेशजी लिहिल्यावरून समजला असेल साडे सोळा हजार रुपयाच्या वराता रावरंभांनीं हरिपंतावर आपल्या यैवजाच्या केल्या होत्या त्या फिरोन आल्या येविषी त्यांनीं मध्यस्तास थोमाट सांगितला मध्यस्त आह्मासी बो(ल)ले त्याचा तपसील तुह्मांस लेहून फार दिवस जाले परतु उत्तर आलें नाहीं त्यापैकीं जाधव मारवाडी यास येक हजार रुपये देण्याची निकड रावरंभांस भारी बसली त्यांनीं मारवाड्याकडे नवाबाचे सरकारचा यैवज पटीबाबत, त्यांचे मागें चोपदार सबब, वाणींनीं या वरातेपैकीं यैवज त्यांस लाऊन दिल्हा दोन महिन्याचा वायदा तोही होऊन गेला मध्यस्त आह्मासी बो(ल)ले येक हजार रुपये यास वराती यैवजीं द्यावे तुम्हाकडून उत्तर आल्यानंतर द्यावे येसें होतें परंतु इकडून जी पत्रें लिहिण्यांत येतात त्यांचीं उत्तरेंच येत नाहींत प्रसंगास तर अशा अडचणी पडतात यैवज देणें प्राप्त ते-हां वरात व कवज घेऊन येक हजार रुपये दिल्हे कळावें तुम्हीं म्हणाल कीं, रावरंभांकडे यैवजाचा भरणा वेमुबलग जाला हा यैवज उगवेल कसा ? त्यास हें सर्व खरें आहे परंतु येथें मध्यस्तांसी बोलण्यांत येतें उत्तर येसच नाहीं येथील तर निकड या तऱ्हेची—अचडण ! तेव्हां समजोन यैवज द्यावा लागतो. उपाय नाहीं ! या

स्तव पत्राचे मार याची उत्तरे वरचेवर लिहित जावी. त्याप्रो मध्यस्तासीं बोलण्यात येत जाईल रा। छ. १९ जिल्हेज हे विनंति.

श्री.

आषाढ वा। १ बुधवार शके १७१५

विनंति. उपरि राजश्री जीवनराव पाढरे यांजकडे यैवज येणे. यास्तव पा। अवराद व निटूर या दो माहालाचा यैवज मोकाशाचा आटकाऊन ठेवावा व मारनिलेचे आणि आनदराव सभापत याचे रहस्य करून द्यावे इत्यादिक मार तुम्हीं लिहिला. त्यावरून सजावलदौला याजकडे सागोन दो माहालचे मोकाशाचा यैवज सन १२०२ सालचा आटकाऊन ठेविला. जीवनराव याचे आनदरायाचे रहस्यही करून द्यावे या तजविजींत असता आनंदराव यानी परभारा सजावरुदौलाकडे राजयाजी याचा निरोप पाठऊन यैवज आम्हाकडे न द्यावा यैसे सागितले होते व मध्यस्तासही परभारा सुचविले कीं, हसनाबाद व येकहळी हे दोन माहाल पांढरे याजकडे नवावाचे सरकारचा यैवज येणे त्या यैवजीं सरकारात घेतले आहेत. त्याचप्रा। सरकारचे रदकर्जी आवराद निटूरचा यैवज द्यावा याप्रो सागोन यैवज आपल्याकडे येणे असता असी दिकत घातली हेही मध्यस्ताकडूनच आम्हास समजले. आह्मीं उत्तर केले कीं, दोन माहाल पहिलेच आपले रदकर्जी आहेत. आवराद व निटूर हे जीवनराव याजकडे चालते माहाल. याचा यैवज घेण्याची सा। काय? तेव्हा मध्येस्तानीं राजयाजीस सागितले कीं, याचा दस्तयैवज पाहण्यावर ठरले आहे. साराश तुम्हीं लिहिले की, आपला यैवज येणे सा। ते माहालचा यैवज आटकाऊन जीवनराव याजकडे न द्यावा. त्याप्रों केले असता आनंदराव यानीं परभारा याप्रो उपस्थित केले. यावरून आश्चिर्य वाटते कीं तुमचीं पत्रें येतात तीं कसीं! रघोत्तमराव यांचेंही पत्र आले तो प्रकार कसा? आणि वर्तणुकींत आनंदराव याची चाल हे! तुम्हींच समजावे. रा। छ. १९ जिल्हेज हे विनंति.

श्री

आषाढ शा १ बुधवार शके १७१५

राजश्री गोविंदराव स्वामींचे सेवेसी

विनंति उपरि प्यादे दि॥ रामजी नाईक गलांडे नि॥ सरकार यास पेशजी माहागाईमुळें पटणचे स्वारींत व हैदराबादीं आगाव ज्याजती रोजमरे च्यार, खर्चास नाहीं सा॥ दिले, तो यैवज उगवून घेतला पाहिजे येविषयीं तुह्मास जातेसमयीं सांगितलें होतें परंतु अद्याप यैवजाचा फडच्या करून घेतला नाहीं तर येविषीं राजश्री नानास विनंति करून यैवज उगवावा न उगविल्यास हे गरीब बुडतात, व आपला यैवज फसतो याची काळजा आपणास असावी याजकरितां लिहीं असे तर हें काम आवीं करून घ्यावें येविषीं वगाजी प्यादाही तुह्मा समागमें स्मरण धावयास दिल्हा आहे तर यैवज उगवून घ्यावा रोजमरे तैनास इजारा करून घेण्याची याद तुमचे रूबरू केली होती ती रोजमुरे याचा यैवज उगऊन घ्याउ त्याज समागमें करून घ्यावी पेशजी रोजमरे आगाव पावले च्यार व यासिवाय तुह्मी गेलियावर आणखी येक रोजमरा ईजाफा, खर्चास नाहीं, ह्मणोन दिल्हा येकूण रोजमरे पांच याचा यैवज घ्यावाकडून उगविला पाहिजे याजकरितां हे पेचांत, व आपला यैवज उगविला पाहिजे तर सरकारांत बोलून यैवज उगवावा ह्मणजे हे पेचांतून निघतील, व आपलाही यैवज उगवेल तर पत्र पावतांच कामाचा फडच्या करून घ्यावा रा॥ छ १९ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ शा १ बुधवार शके १७१५

विनंति उपरि राजश्री मानाजी बळवंतराव देवकाते यांचे पतक सरकारांतून आमचे तैनात आहे त्यास सांप्रत मारनिल्हेस सरंजामसुधा हुजूरचाकरीस येण्याविषीं सरकारची आज्ञा जाली आहे त्यास येविषीं तुह्मी विनंति करून देवकाते यांस हुजूर चाकरीस येण्याचा मनाई व्हावी

इकडे चाकरीची नेमणूक त्यापक्षीं सरकारचाकरीवर हजर आहेत. रा॥ छ १९ जिल्हेज हे विनंति.

छ १७ जिल्हेजीं येहतषामजंग यांनीं मागितलें सबब.

श्री.

आषाढ वा॥ ३ शुक्रवार शके १७१५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं.

पो गोविंदराव कृष्ण सां॥ नमस्कार विनति. उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लि॥ जावे. विशेष येहतषामजंग नफरुदौला मुबारनुल मुल्क बाहादुर यांनीं शहर ब्रह्मणपुर येथें किनखाब वगैरे जिनस दाहा हजार रुपयाचा खरीदी करविला. ते जटील कारीगर यांजकडून चौरती कलाबतू तयार तीन हजाराचा करविला. त्यास कारेगर परवानगी मागतात. याजकरिता बाहादुर मवसूफ यांनीं बहुत अगत्यवादानें आम्हास सांगितलें. त्यावरून लिहिलें असे. त्यास येविषीं राजश्री नाना यांस विनंति करून ब्रह्मणपूरकर सुभेदार यांस राजश्री पाटिलबावा यांचें पत्र कलाबतू व किमखाब वगैरे जिनस दाहा हजारांचा खरीदी करतील त्यास महसूल वगैरे मुजाहिमत न करिता न्हादारीचें दस्तक वगैरे बंदोबस्त करून देऊन जिनस रवाना करावा. याप्रो॥ निक्षूण ताकीद महमद ईसफ तुम्हास सांगतील त्याप्रों॥ द्यावी. रा॥ छ १७ माहे जिल्हेज बहुत काये लिहिणे? लोभ किजे हे विनंति.

छ २० जिल्हेजीं शमसुल उमरा यांनीं मागितलें सबब.

श्री.

आषाढ वा॥ ७ सोमवार शके १७१५.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी.

पो॥ गोविंदराव कृष्ण सां॥ नसस्कार विनंति. उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित जावें विशेष तो मानूर मौ॥ वीड हा तालुका नबाब शमसूल उमरा बाहादुर यांजकडे आहे. तेथील अमिली अबदुल समदखां यांजकडे

आहे खान मार यांनी आपल्याकडून तर्फे नरसिंगराम नायब यांस ठेविलें त्याजकडे हिसेबकितेबाचा लढा सबब त्याजला कैद केलें त्यास तेथील मोकासी माहरण्वर वगैरेनीं राजश्री पाटिलबावा यांस गैरवाका समजाऊन तालुकियास लोक पाठवून उपसर्ग करणार ह्मणून बोभाट झाला, त्यावरून राजश्री नाना यांस पत्र दिल्हें आहे येविषीं तुह्मी विनंति करून बंदोबस्त करावा तालुकियांतील जमीदारास पुण्यास येण्याविसीं पत्रें पाठविली वगैरे उपद्रव फार केला आहे यातव येविषीं बोलून बंदोबस्त करून लेहून पाठवावें हमयुल उमरा यांजकडील पागेचा तालुका तो नवाबाचा खासगत तालुका यास्तव याचा बंदोबस्त जरूर होणें येणेंकरून नवाबास संतोष हें समजावें र॥ छ २० जिल्हेज बहुत काय लिहीणें हे विनंति

छ, २१ जिल्हेजी रावरंभा यांनी मागितलें सबब

श्री 

आषाढ वद्य ८ मंगळवार शके १७१५.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेशी पो गोविंदराव कृष्ण सा। नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लिहीत जावें विशेष मौजे जवळें पा। हवेली परंडा हा गांव माधवराव बादल यांजकडे होता त्याजकडून तुह्माकडे रदकर्जी गांव आहे त्यास बादल मार यांचा काल जाला सबब त्या गांवची जप्ती राजश्री रावरंभाजी जयवंत निंबाळकर यांनी करून कायत यास येथून राजश्री गोपाळराव बक्षीसुद्धां जप्तीचे बंदोबस्तास पाठविलें त्यास तेथें बाबूराव बल्लाळ यांनी बादला-कडील पैका येणें सबब गांवतजप्तीस दिकत केली याचा बोभाट यांजकडे आल्यावर मारनिलेनीं आह्माकडे सांगोन पाठविलें कीं गोविंदराव यांचा ऐवज बादलाकडे किती? त्यांत जवळें येथील वसूल काय पावला? व बाकी ऐवज येणें किती? याचा हिशेब आणल्याना त्याप्रा। फडच्या होईल जप्तीस दिकत होऊं नये त्यावरून लिहीलें असे तरी बादल यांजकडे ऐवज येकंदर किती, त्यांत वसूल पावणें व बाकी येणें याचा हिशेब तावार

पाठवावा. रा। छ २१ जिल्हेज बहुत काय लिाँ ? लोभ किजे हे विनंति.

भावाजी बलाळ आवरादकर नि॥ राजश्री हरिपंत तात्या यांचे सांगितल्यावरून पत्र लिहिलें असे.

श्री.

आषाढ बा। १० गुरुवार शके १७१५.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी. पो। गोविंदराव कृष्ण सां। नमस्कार विनंति. उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत असावें. विशेष. राजश्री हरिपंत तात्या याजकडील दुमोहरी सनद मौजे आवराद शाहाज्यानी पा। उदगीर येथील सनदेकरितां राजश्री भावाजी बलाळ येथें दोनशें रुपये घेऊन आले होते; त्यास सनद तुम्हाजवळ आहे. तरी आवाजीपंत तुम्हास पत्र लिहून सनद त्यास देवितील त्यास दोनशें रुपये घेऊन सनद द्यावी. रा। छ. २३ जिल्हेज बहुत काय लिहिणें ? लोभ किजे हे विनंति.

छ. २३ जिल्हेजीं डाकेवर.

श्री.

आषाढ बा। १० गुरुवार शके १७१५.

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी.

विनंति. उपरि अलीकडे तुम्हाकडून फार दिवस पत्रें [illegible] काांहींच कळत नाहीं. याचें कारण काय ? सांप्रत [illegible] मार वगैरे इकडून-त॥ लिहिलें आहे त्यावरून कळेल. [illegible] पत्रें पा। आहेत. त्यावरून इकडील मार समजेल. [illegible] कडील मखबार व पत्र चेनापटणाहून आलें [illegible] जाब पाठवावे. इकडील पत्रांचीं उत्तरें येणे [illegible] वरचेवर करीत जावी. रा। छ २३ [illegible]

श्री.

आषाढ शा १० गुरुवार शके १७१५

पुा राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

विनंति उपरि निर्मळ वगैरे माहालावावत स्वराज्याच्या पैवजाच्या तनखा औरंगाबादचे सुम्याघर पेशजी घेतल्या त्यापैकीं वसूल सरकारांत पावला; व बाकी येणें त्याची याद तुम्हीं पाठविली त्याप्रों मध्यस्तासी बोलण्यांत आलें यांजकडे अहसनुदौला व रूपावंत यांनी वसूल पावल्याचें पत्र व रसीदाच्या नकला पाठविल्या त्यासी व आपले यादीसी मुकाबिला करून येकंदर याद ठरविली ती पाा आहे त्यावरून ताा कळेल. राा छ २१ जिल्हेज हे विनंति

श्री.

आषाढ शा १० गुरुवार शके १७१५

यादी — जानीतजंग मरहुम यांजबावत माहालचे स्वराज्याचा पैवज नवा बाचे सरकारांतून ताा सन १२०१ व सन १२०२ पौ आलक हिसेबी याच्या तनखा अहसनुदौला व रूपावंत यांचे नांवें जाल्या होत्या.

रुपये

४७३९९१॥।=।

पौ वसूल धमोजीवर्फ मोहरी अहसनुदौला बाहदुर व रूपावंत ताा रजब सन १२०१ हिजरी १९१२००॥।-। रुपये

ताा

१२४९०४॥।≈ बा रसीदाच्या नकला

९१९०४॥।= रसीद बापूजी रामचंद्र व लक्ष्मण तुकदेव निाा गोविंद कृष्ण गोडबोले मुाा कोपरगांव छ १९ रमजान सन १२०२ फसली

९००० रसीद सखोजीबाजी कारकून निाा सरकार छ १९ रमजान सन १२०२ फसली

७२००० रसीदा चिंतामण हरी.

५०००० छ. ६ शवालची रसीद.

२३००० छ. ५ मोहरमचे पत्र.३०१९२॥।≡।.

पौ यैवज पटला नाहीं. यैसें पत्रांत सबब मजुरा दिल्हे नाहींत. ७१९२॥।≡। बाकी रुपये.

---

७३०००

---

१२४३०४॥।≡

१६८९५॥।-। तनखादारास वसूल दिल्हा ह्मणोन अहसनुदौला व कृपावंत यांनीं नवाबास लिहिलें. परंतु सदरहूची रसीद नाहीं. सबब यैवज मजुरा होणार नाहीं. येसें आमचें बोलणें. यावरून मध्यस्तांनीं आपलें पारसी पत्र अहसनुदौलास दिल्हें कीं सदरहू सोळा हजार आठसें पंच्याणव रुपये, सवा चौदा आणे तनखादारास दिल्हे असल्यास रसीद पाठवावी. दिल्हे नसल्यास सदरहू यैवज द्यावा. याप्रों पत्र दिल्हें सबब वसुलीं घातले.

---

१४१२००॥।-।

यास ता ——————————— रुपये

९४०९८।≡ हा याद रुजु दफ्तर सरकार पुणियाहून आली.

५६३०४॥।≡ कोंपरगांवची वरात ९९००० पौं.

५००० सखो जिवाजी.

१४७९३॥ पोत्यास आले.

१८००० कुराणाकडील वरात जाली त्यास पावले.

---

९४०९८।≡.

९७१०२।=। ज्याजती वसूल

१०२०६॥व्हा रसीदा चिंतामण हरि.

१०००० किा रसीद.

२१००० किा रसीद

७१०००

पां-पुणियाहून याद झाली त्यांत

१४७९१॥ पोत्यास झाले

१८००० कुरणास्तळील वरासी हां.

३२७९१॥

बाकी ज्याजती

११८९१॥।=। तमखादारास वसूल पावला पैसे सुभेदारांनी लिहिलें येविषयी मध्यस्ताचें पत्र घो तें.

९७१०२।=।.

३१११२००॥।-।

बाकी रुपये

१३२७९०॥।=।.

तपसील

१०१००० जगधन साहू यांचे दुकानीहून पटणचें, त्यांत मध्यस्ताचे विद्यमानें सवातीन लक्ष रुपये कर्ज, सरकारांत राजश्री हरिपंत तात्या यांनी घेतलें, त्या पैकीं

१००००० रदकर्ज सवा तीन लाखाचे रोख्यामार्गे वसूल घातला.

२००० सदरहू लाख रुपये औरंगाबादीं देणें त्याचे हुंडावणी बाबत.

१०२०००

२२०७९०॥।=। हुंडी चिठी औरंगाबादेवर जगधन साहू याचे दुकानीं नगदी ई॥ छ २० माहे जिल्हेज पासोन दोन महिन्याचे मुदतीनें छ २० सफरी द्यावे यामों.

३२२७९०॥।=।.

तीन लक्ष बेवीस हजार सातसें नवद रुपये सवा पंधरा आणे बाकी तनख्याबमोजीब त्याचा फडच्या सदरीं लिहिल्याप्रों छ २३ जिल्हेज मु॥ बेदर अर्बा तिसईन.

श्री.

आषाढ वा १० गुरुवार शके १७१५.

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी.

विनंति. उपरि तनखाचे येवज पौ सरकारात वसूल औरंगाबादचे सुभ्याकडून पावला याचा मुकाबिला पुण्याहून याद आली त्यासी व यांजकडील तेथून सुभ्याचें पत्र व रसीदांसी कारितां कोंपरगांवची वरात व सखो जिवाजी येकूण दोन रकमांचा ताळा यादीसी व रसीदांसी नीट पडला यासिवाय राजश्री दाजीबा यांच्या दोन रसीदा येक पंनास हजारांची व दुसरें पत्र तीस हजार येकसें न्याणव रुपये सवा पंधरा आण्याचें पैकीं तेवीस हजार येवज पटला ह्मणोन पत्रांत लेख येकूण त्र्याहातर हजार रुपये पत्राप्रमाणें येवज वसूल लिहिला. व यापौ पोत्यास दाखल व कुरणाकडील वरातेबाबत येवज पुण्याचें यादींत बतीस हजार सातसें साडे त्र्याणव रुपये ह्या रकमा यांचे हिसेबीं आलाहिदा नाहींत. त्या पक्षीं त्र्याहातर हजारांत असतील. सबब वजा जातां चाळीस हजार दोनसें साडेसहा रुपये पुण्याकडील यादीसिवाय

ध्यावती वसूल राजश्री दाजीबा यांचे पत्रान्वयें पावला याची रुजवात तेथें पाहावी ह्मणजे समजण्यांत येईल,

रा छ २१ जिल्हेज हे विनंति

श्री

आषाढ वा १० गुरुवार शके १७१५

पुा राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी

विनंति उपरी तनखावाबत यैवज येकंदर पौ वसुल वजा होऊन बाकी तीन लक्ष बेवीस हजार सातसें नवद रुपये सवा पंधरा आणे निघाले, यापैकीं पटणचे स्वारीत मध्यस्ताचे विद्यमानें जगधन साहुकार यांचें कर्ज सवातीन लक्ष राजश्री हरिपंत तात्या यांनी सरकारांत घेतलें त्या यैवजीं हलीं येक लाख रुपये वसूल त्या रोख्यामागें घातला यैवज औरंगाबादी पावयाचा सबब तेथील हुडावन दर सेंकडा दोन प्रों दोन हजार रुपये यांनी घेतला हुंडावनीचें बोलणें बहुत होतें परंतु सेवटीं दोन रुपये प्रों ठरलें सारांश येक लाख रुपये रदकर्जी वसूल पावला पेशजी जगधनाकडे मरणा सर बुर्दल्जंग वासीमिया वगैरे यैवजबाबत एक लक्ष बतीस हजार नऊसें पंचवीस जाला हलीं हे लाख पावले यासिवाय येथून पत्र राजश्री हरिपंत तात्या यांस मध्यस्तांनी पेशजी मोबीना खरीदीकारितां येक लाख च्याणव हजार रुपयाचे मागितल्यावरून दिलें त्यापैकीं तेथें वसूल काय दिल्हा हें लेहून पाठवावें. ह्मणजे येकंदर वसूल रुजू करून रोख्याचा हिसेब व्याजसुधां करून पाठविण्यांत येईल तनख्याचे ऐवजीं लाख रुपये हुडणावळसुद्धां रदकर्जी यावे म्हणोन तुमचे लिहिण्यात आलें, त्यावरून दिल्हें आणि या कीची जगधन याजवर चिठी घेऊन पा आहे चिठीप्रमाणें साहुकारां दुकानावर यैवज घ्यावयाचा अहसनुदौला यांस सोळा हजाराविसीं पत्र मध्यस्तांचें पौ आहे हें रवाना करून तगादा करून यैवज घ्यावयास ढील पडूं नये. रा छ १३ जिल्हेज हे विनंति

श्री.

आषाढ वा। १० गुरुवार शके १७१५

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी.

विनंति. उपरी तनख्याचे ऐवजापैकीं बाकी दोन लक्ष चाळीस हजार मानसे नगद रुपये सवा पंधरा आणे निघाली. यापैकीं स्वकार्जाबाबत ऐवज वसूल होणारा ऐवजी येक लाख व हुंडावन औरंगाबादेशी दोन हजार वजा जाता बाकी दोन लक्ष वीस हजार मानसे नगद रुपये सवा पंधरा आणे याची चिठी औरंगाबादेवर जगजीवन साहू याचे दुकानीं घेऊन पा। आहे. चिठीचा वायदा शा। छ २० जिल्हेज पासोन छ २० मोहरम येकूण दोन महिन्याचा आहे. सदरहू मुदतीस शेट ऐवज द्यावा यानीं ठरावून चिठी लिहवली पा। आहे. सदरहूप्रो। तनख्याबाबत ऐवजाचा फडच्या जाला. मुदतीप्रो। जगजीवनाचे दुकानीहून औरंगाबादीं सदरहू ऐवज घेऊन रसीद द्यावी लागेल. त्या रसिदीचा नकल पा। आहे. त्यास सरकारातून ऐवज घेण्यास जातील त्याने आपले नांवची रसीद सदरहू नकलेप्रा। देऊन ऐवज रोख घ्यावा. रा। छ २२ जिल्हेज हे विनंति.

श्री.

आषाढ वा। १० गुरुवार शके १७१५

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी.

विनंति. उपरी तनख्यापैकीं बाकीचे ऐवजाची चिठी औरंगाबादेवर जगजीवनाचे दुकानची दोन महिन्याचे मुदतीची पाठविली. येविशीं राजश्री नाना तुम्हास म्हणतील कीं तनख्याचे ऐवजास इतके दिवस जाले. आताही मुदतीची चिठी घेण्याचें कारण काय होतें? त्यास मध्यस्त सदरहू मुदतीची चिठी देऊ लागले तेव्हा आह्मी बोललों कीं तनखा आपण दिल्हा. त्याचे हस्तबंदीच्या मुदती कशा? आणि सुभेदारानीं ऐवजाचा फडच्या अद्याप न केला. हल्ली ऐवजास वायदा न करितां नगद फडच्या करून द्यावा. याजवर मध्यस्ताचे म्ह(ण)णे

कीं हे चिठी वर्तेरीक हुडी आहे दोन महिन्यांची मुदत कांहीं विशेष नाहीं येविषीं मदारुल्महाम यांस माहे तरफेनें तुह्मीं ह्मणून जरूर सदरहूप्रा करावें मुदतीस नेमाप्रा नगदी यैवज दुकानीहून जगधनाचे घ्यावा यासा दाट रदबदली बहुत कांहीं केली त्यास विचार पाहतां मध्यस्त दोन महिन्याचे मुदतीची चिठी देतात येविषई इकडून लेहून राजश्री नाना यांची आज्ञा आल्यावर करावें तरी पत्रें जाऊन तिकडून जाब येणें, त्याजवर यांसी बोलणें या खालेंच महिना पंधरा दिवस जातात त्याजवर यांची चिठी घेऊन औरंगाबादेस पोंहचणें याचा आरसा पाहतां तितकेंच पडतें, बोलण्याचालण्याखालेंच दिवसगत लागोन सरकारी यैवजास लाबण पडती, हें समजोन सेवटीं मध्यस्तास सांगितलें कीं औरंगाबादेस चिठी पावल्यानतर दोन महिन्यांची मुदत येसें आपलें ह्म(ण)णें हें तर सहसा कबूल होणार नाहीं चिठी पोंहचताच फडच्या व्हावा तेव्हां मध्यस्तांनीं ठराऊन नेम करून सांगितलें कीं चिठी पावल्यावर मुदतीची शर्त नाहीं आज छ २० जिल्हेजपासोन दोन महिन्यांनीं यैवज फडच्या करून घ्यावा यात्रा होऊन जगधनाचे दुकानची चिठी श्री छ २० जिल्हेजपासुन छ २० सफर दोन महिन्याचे मुदतीनें सदरहू यैवज फडच्या करून धावा येसी घेऊन पा आहे सदरहु अन्वयें तुह्मीं विनंति करावी सरकारांतून चिठी औरंगाबादेस रवाना करून करारप्रमोजीव यैवजाचा फडच्या करून घ्यावा दोन महिन्यांचे फायद्याचें कारण जगधन याचे दुकानांत यैवज थोडा दोन महिन्याचे मुदतींत त्याजकडे भरणा होईल चिठीस दिकत न पडावी याजकारितां इतकें बोलणें ह्मणून मध्यस्त बो (ल) छे रा छ २३ जिल्हेज हे विनंति

पुा राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी,

श्री

आषाढ बा १० गुरुवार शके १७१५

विनंति उपरि तनखाचे यैवजांपैकीं एकंदर वसूल मुग्यांनीं नवाबाकडे

लिहिला येक लक्ष येकावन हजार दोनसें रुपये सेवा तेरा आणे. पैकीं तनखादारास वसूल सोळा हजार आठसे पन्याणव रुपये सवा चौदा आणे दिल्हा ह्मणून लिहिलें. परंतु सदरहु ऐवजाची रसीद नाहीं. तेंव्हा आह्मीं मध्यस्तासी बो (ल) लो कीं हा यैवज वसुलीं मजुरा पडणार नाहीं. याची रसीद नाहीं त्यापक्षीं यैवज कोणास पावला? मजुरा काय ह्मणोन द्यावा? याजवर मध्यस्त बो(ल)ले कीं आपलें पत्र अहसनुदौलास निक्षूण देतो, सदरहू यैवज श्रीमताकडून वसुलास आले असतील त्यास दिल्हा असल्यास रसीद दाखवावी. रसीद नसल्यास फडच्या करून देणे. याप्रा बोलून अहसनुदौलास पारसी पत्र मध्यस्तांनीं दिल्हे, ते पा। आहे. हें पत्र त्याजकडे पाठवून यैवज दिल्हा असल्यास उत्तम. पावला नसता अहसनुदौलाकडून फडच्या करून घ्यावा. रा। छ २३ जिल्हेज हे विनंति.

.श्री

आषाढ वा १० गुरुवार शके १७१५.

पु॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेशी,

विनंति. उपरि तनखा वा॥ ऐवजाविषयीं यादी व पत्रें—प॥ बि॥.

४ रसीदाच्या नकला

१ बापूजी रामचंद्र याची ५६३०४॥।=.

१ सखो जिवाजी याची ५०००.

२ दाजीबा याचे नावच्या.

१ किता ५००००

१ कि॥ ३०१९२॥।=। पौ २३०००.

——

२

——

४

२ मध्यस्तार्चे पत्र अहसनुदौलास रुपये ११७९९॥।~।

१ पारशी पत्र

१ हिंदवी तरजुमा

—

२

२ चिठी जगधन साहु याचे दुकानावर छ २० जिल्हेजपासोन दोन महिन्याचे मुदतीनें रुपये २२०७९०॥।=। व त्याचा हिंदवी तरजुमा

१ औरंगाबादी यैवज जगधनाचे दुकानीहून घेतल्यानंतर रसीद देण्याचा मसविदा रुपये २२०७९०॥।=।

१ याद यैकंदर झाडयाची

——

१०

पत्रे सुमार दाहा—रसीदाच्या नकला, यैवजाच्या चिठ्या, मसविदा, तरजुमा, यादीसाहित पा आहेत पावल्याचें उत्तर पाठवावें रा छ २३ जिल्हेज हे विनंति

रसीदाच्या नकला.

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री

राजे कृपावत बहादुर स्वामीचे सेवेशीं

पो बापुजी रामचंद्र व लक्ष्मण तुकदेव नि॥ गोविंद कृष्ण गोडबाले मु॥ कोपरगांव सा नमस्कार विनंति उपरि तुम्हांवर बरात सन १२०२ चे ऐवजीं नबाब बंदगान आली यनीं श्रीमंत पंतप्रधान बाबत निर्मळचे चौथाई सरदेशमुखी यैवजीं दिल्हया त्या ऐवजी श्रीमंतांनीं कोपरगांवचे खर्चास रुपये ७९००० पंच्याहत्तर हजार देविले त्या येवजीं तुम्ही आम्हांस माहलोमाहली बराती लाऊन दिल्या व कांहीं यैवज रोख बाबत रुपये ५६३०४॥।= छपन हजार तीनसें पावणें पांच रुपये तीन आणे पावले यासीवाय माहलपैकी जाजती वसूल, तुम्हीं बराता दिल्या त्यांपैकी लागु जाहल्यास, बरातीचे यैवजी

मजुरा देऊं. आमच्या फिरकोळ पावत्या तुह्माजवळ महालांत दिल्ह्या आहेत त्या रद असेत. रा छ १३ रमजान सन १२०२ शके १७१५ प्रमादी नाम संवत्छेरे वैशाख आधिक शुा १५ सन सलास तिसईन बहुत कार्ये लिा² हे विनंति. सरकारची वरात पाऊण लक्षाची तुमचे हवालीं केली असे हे विनति.

**श्री.**

आधिक वैशाख वद्य १ शनिवार शके १७१५.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

बळवतराव व्यकटेश राजे कृपावंत बाहदुर सुभा औरगाबाद स्वामीचे सेवेसी.

पौ सखो जिवाजी कारकून निा सरकार कृतानेक सां नमस्कार विनति. उपरी नवाब निज्याम आलीखान बाहदुर यांनीं सरकारचे यैवजाच्या तनखा तुह्मावर दिल्ह्या त्याचे यैवजीं येथें खर्चास पावले ईा छ १ माहे रजब ताा छ १५ रमजान पावेतो यैवज पावला तो रुपये ५००० पांच हजार पावले असते. या पांचा हजारा पौ राजश्री नारायणराव भवानीदास वकील याजजवळ तुमचे नांवची पावती साडेतीन हजाराची आलाहिदा छ ४ शाबानची आम्हीं दिली आहे ते रद असे. सु॥ सलास तिसईन मया व अलफ, छ १५ रमजान सन १२०२ वहुत काय लिहिणे² हे विनंति.

**श्री.**

वैशाख शुद्ध ७ शुक्रवार शके १७१५.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री,

बळवतराव राजे कृपावत बाहदुर स्वामीचे सेवेसी.

पो चिंतामण हरि साा नमस्कार विनंति. उपरि येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिा जावें. विशेष आपण पत्र छ २९ माहे रमजानचे पाा तें पावलें. श्रीमंत पत प्रधान यांच्या वराती पौ हुंडया पनास हजाराच्या जीवनदास अंबाजीदास यांच्या दुकानच्या पाठविल्या त्या पावल्या. लिहिले कीं वरातेची नकल व हप्तेबदीची नकल पाठवावी. त्यास मागाहून नकला

पाठ्यून देतों त्याप्रो यैवजाचा भरणा करावा तीर्थरूप राजश्री तात्या येथें जेष्ठ शुा पंचमीस दाखल झाले राजश्री सदाशिवपंत यांनी लिा आहे त्यावरून कळेल राजश्री हरबाजी नाईक चाबूक सवार यांचे नांवच्या चिठ्या लौकर पाठवाव्या रा छ ६ शवाल बहुत काये लिा लोभ कीजे हे विनंति

श्री

राजश्रि विराजित राजमान्य राजश्री,

बळवंतराव राजे रूपावत बाहादुर स्वामीचे सेवेशीं —

पो चिंतामण हरि साा नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणुन स्वकीयें कुशल लिा जावें विशेष तुम्ही पत्रें छ २१ व छ २४ जि ल्कादचीं पाठविलीं ती पावली लिा मार सविस्तर कळला सरकारचे वरातीचे येवजीं रुपये

२३००० हुंडी थान १ पीतांबर जीवनदास यांजवर चांदवड रुप याची चलनी

७१९२॥।≡। चिठी राजश्री त्र्यंबकराव राजाराम कमादार अतूर व खुलदाबाद याची मुदतीची

येकूण तीस हजार येकसें ब्याणव रुपये सवा पंधरा आणे याच्या पात्या पावल्या त्याजपैा तेवीस हजार रुा पितांबर जीवनदास याजकडाल चां दवड छापी सुलाखी पटले मुदतीबमोजीब बाकी सात हजार येकसें पा षणे त्र्याणव रुपये सवातीन आणे याची चिठी श्रावण शु॥ १९ निमे व भाद्रपद शु॥ १९ निमे या प्र॥ घ्यावे म्हणोन लि॥ त्यास श्रावण मासचा हप्ता अद्याप पटला नाहीं त्याजवरून राजश्री सदाशिवपंत यांस ताकीद केली मा॥र निले त्र्यंबक राजाराम का॥दार यांजकडे मुजरद जासूद रा॥ केला आहे तुम्हीं त्याजला ताकीद करून मुदतीप्रो ऐवज देवावा त्याकडील रा॥ आल्यानंतर पावती पाठवूं ऐसीं हजार रुपयाचा भरणा हल्लीचे ऐवजा

सुद्धा केला ह्मणोन लि॥. त्यास पेशजी पंनास हजार रुपयांचे पत्र अलाहिदा गेले आहे हल्लींचे ऐवजाचा मा॥र सदरीं लिहीला आहे त्यावरून कळेल बाकीचे ऐवजाचा भरणा सत्वरच करितों ह्मणोन लि॥. त्यास येथील हुंड्या पाठवाल त्या शाहाजोगाच्या पाठवाव्या. राजश्री शामराव बलाळ याजकडील मा॥र व कलमबंदीची याद पा॥ ती सदाशिवपंत यानीं दाखविली. त्यावरून श्रीमत राजश्री नानास विनंति केली. त्याचे उत्तर नवाब आहसनुदौला बाहादुर यांस श्रीमंत नानानीं लि॥ आहे त्यावरून समजेल. आटोळे यांस ताकीद पत्राची परवानगी सरकारची घेतली. मागाहून लौकरच रवाना करूं. कारंज्याचे फवारे जलद रवाना करावे. वरकड मा॥र राजश्री सदाशिवपंत लिहीता कळेल. दुसरा ऐवज लौकरच रवाना करावा. रा॥ छ ५ मोहरम (भाद्रपद शुद्ध ७ गुरुवार शके १७१५) बहुत काय लि॥² लोभ कीजे हे विनंति.

श्री.

पारसी चिठी जगधनाचे दुकानीं औरंगाबादेवर
रोशन राये याचे मोहोरनसी.

पारसी चिठीचा तरजुमा
हिंदवी राजे रोशन राये
याचे मोहरे नसी.

चिठी बइस्म बिरजलाल सभूनाथ साहू दुकान बुलदे खुजस्ते बुनियाद अंकी मुबलग २२०७९०॥।≡ याचे निमे एक लाख दहा हजार व तीनसे पंचाणव रुपये साडे सात आणे होतात. चौथ व बाबती व सावोत्रा वगैरे रावपत प्रधान बाबत माहालात सुभे महमदाबाद वगैरे ता॥ सन १२०१ फसली व आलल हिसेबी सन १२०२ फसलीचे तनखाप्रो॥ अहसनुदौला बाहादूर व राजे कृपावत याजकडे बाजबुलतलब होते त्याचे मुबादला आजमुलउमरा बाहादूर यानीं देविले. त्यास राव पतप्रधान याजकडे जो कोणी पैका न्यावयास येईल त्यास येथून रसीदांचा मसोदा दुकानास पा॥

आहे त्याप्र॥ रसीद घेऊन छ २० जिल्हेज सन १२०७ हिजरी पासोन दोन महिन्याचे वायद्यानें पावते करावे पुढें मुवल्ग मा॥र सरकारचे खजान्याचे हिसेबीं या चिठीप्रों व रसिदीप्रों मुजरा व मुदसूब होतील

३२२७९०॥।≡

पे॥ १०२००० येक लाख दोन हजार याची चिठी लस्कर फेरोजीचे दुकानावर दिल्ही बाकी

२२०७९०॥।≡

छ २० जिल्हेज सन १२०७ हिजरी

रसीदीचा मसविदा पा॥ आहे

या प्रो रसिद पावी

राजश्री जगधन साहू दुकान बुल्दे

औरंगाबाद गोसावी यास —

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रे॥ फलाना फलाना प्रहस्त नि॥ श्रीमंत राजश्री पंत प्रधान मंकी २२०७९०॥।≡। मुवल्ग दोन लक्ष वीस हजार सातसें नव्वद रुपये सवा पधरा आणे बावद चौथ व बाबती व साहोत्रा वगैरे व॥ महालांत सुभे महमदाद वगैरे ता॥ सन १२०१ व आव्वल हिसेबी सन १२०२ तनखापो आहसनमुदौला बाहादूर व राजे कृपावंत यांचे जिमेस बाजबुल्सलब येणें होते त्याचे मुबादला नवाब निजामुदौला बाहादूर यांचे कारपरदाज यांनीं हुंडी सदरहू रुपयांची औरंगाबादेस तुमचे दुकानीं दोन महिन्याचे वायद्याची राजश्री गोविंदराम कृष्ण यांचे विद्यमानें करून दिल्ही त्यास सदरहू रु॥ हुंडीप्रो तुमचे दुकानीहून आह्मास पावले हे रसीद लि॥ सही बहूत काय लि॥ ॰ मिती, तारीख, सन

श्री

आहसनुदौला व राजे कृपावंत यांनीं आपले मोहरेनसीं वसुलाची याद पाठविली व रसिदीच्या नकला पाठविल्या त्यांत १६८९१॥।~। याची

रसीद नाहीं. हे मजुरा द्या ऐसें मध्यस्ताचें ह्मणेंगे. याजवर आमचें बोलणें. रसीद नाहीं. तेव्हां मजुरा देत नाहीं. तेव्हां मध्यस्तानीं फारसी पत्र आहसनुदौलास दिल्हें. त्याचा तरजुमा मुबलग १६८९५|||≈|सोळा हजार आठसें पच्याणव रुपये सव्वाचौदा आणे, येक लाख ऐकावन हजार दोनशे रुपये सव्वा तेरा आणे. पै|| तनखाचे ऐवज पै|| बाकीबाबत चौथ व बाबती व सावोत्रा वगैरे राव पंत प्रधान बाबत माहलांत सुभे महमदाबाद तालुके जफरुदौलात रुपये दिल्हे नसल्यास सदरहू रु|| जलद निशा करून रसीद घ्यावी.

## श्री.

आषाढ वा॥ १० गुरुवार शके १७१५

पु|| राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं:——

विनंति. उपरि मीर मुरादअली वगैरे पंच यांस सरकारांतून मौजे भोडणी पा॥ रावेर हा गाव आहे. तेथील दखलही याजकडे सरकारची पत्रे व हुजरे जाऊन जाला. स्वराज्याचे अमलाकारिता चोपटेकरकर क|| दाराकडील आनंदराव कारकून याची कटकट भारी. बेमोईन ऐवज घेऊन उपद्रव लागतो. यास्तव नवाबानीं सांगितल्यावरून व मुरादअली याचे हमेषा ह्म (ण) णे कीं बंदोबस्त असा व्हावा कीं मामुलप्रों स्वराज्याचे अमलाची वांटणी जागीर सुधा व्हावी, अथवा मक्ता स्वराज्याचा ठरावा. त्याप्रों दरसाल ऐवज घेत जावा. ज्याजती उपसर्ग होऊ नये. येविषींच्या यादीही तुह्मापासीं दिल्ह्या. ऐसें फत्तेआली याचे बोलण्यात. त्यावरून राजश्री नानांस व तुह्मांस पत्रे खानमा॥र याजपासीं दिल्ही. व डाकेवरही हलीं रवानगी केली असे. येविषीं मुरादआली यानीं तुह्मास व त्याजकडून तेथें गृहस्थ आहे त्यास दोन पत्रे ये|| तीन लाखोटे पारसी पा॥ आहेत. त्याचे त्यास द्यावे; व नाना यांस विनंति करून याचे कार्याचा बंदोबस्त करून इकडे ल्याहावे. याचे सांगण्यांत तेथील स्वराज्याचा मामुल चौथाई तीन हिसे व सरदेशमुखी सेकडा साडे बाराप्रों आहे. याप्रों ठराऊन बंदोबस्त व्हावा. ज्याजती तोसीस सायेर फर्मास वगैरे कादार करितात

ते न व्हावी ठरावाप्रों साल बसाल फडच्या करून घेत जावा याप्रों कार्यदारास सरकारांतून ताकीद होऊन इकडे ल्याहावें छ २१ जिल्हेज हे विनंति

गोविंराव वुरटे यांनीं पत्र मागितलें सबब

श्री

आषाढ वा १० गुरुवार शके १७१५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

गोविंदराव स्वामीचे सेवेसीं ––

पो गोविंदराव कृष्ण साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लि॥ जावें विशेष राजश्री नागोराव वुरटे का॥ भूम येथें राहतात यांचे घरगुती कजियाकरितां गुदस्तां मारनिछे पुण्यास आले होते ते समई तुह्मीं राजश्री बाबुराव बलाळ कादार यांस पत्रें दिल्हें कीं सदरहू प्रों वुरटे मार वर्तणूक करितील यास काहीं उपद्रव न द्यावा त्याप्रमों बाबुराव यांनीं मान्य केलें आणि मारनिलेही करारामों सिद्ध असतां सांप्रत तुह्मांस कोणीं गैरवाका समजाविल्यावरून बाबुराव यांस दुसरें पत्र तुह्मीं पाठविल्यामुळें त्यांनीं त्यास उपसर्ग लाविला ह्मणोन कळलें, त्यावरून लि॥ असे त्यास पेशजी येक वेळ करार ठरल्याप्रों वर्तणूक व्हावी ऐसें असतां मागती उपसर्गाचें कारण काय? यास्तव बाबूराव बलाळ यांस निक्षूण पत्र देऊन तुह्मीं ठरावेल्याप्रों व्हावें रा॥ छ २३ जिल्हेज बहुत काय लि॥? लोभ कीजे हे विनंति

माहे मोहरम श्रावणमास छ ३ रोजीं डाकेवर

श्री

श्रावण शुद्ध ४ रविवार शके १७१५

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं:–––

विनंति उपरि तुह्मीं छ २१ माहे जिल्हेजचीं पत्रें पा॥ तीं छ २७ माहे मारीं पावलीं टिपूचे पुढील मसलहतीचे प्रकर्णी लाड बाहदूर याद माठी सी

मुषीरुन मुळीक यांनीं राजश्री नानाकडे पाठवावयासीं दिल्ही. त्यांचा निश्चय ठरून येक फर्द ठरली. त्या प्रकर्णी श्रीमंताचा खरिता नवाबास व आमचे नावें सरकारचे पत्र व फर्द याप्रो। पा। ते पावले. मध्यस्ताकडें तेच दिवसीं सागून पाठविलें. त्याचे उत्तर जालें की आज बदगान आली माझे येथे येणार, याजकरिता उदईक यावे. त्यावरून दुसरे दिवसीं गेलों. मध्यस्तास फर्द दाखविली. बोलणें जालें. नंतर बोलले कीं हजरतीस आर्जी करून तुह्मांस सागून पाठवितों त्या वेळेस यावे. दुसरे दिवसीं मीरआलम यांस बोलाऊन आपले घरीं मसलहत केली. तिसरे दिवसीं दरबारास येण्याची सूचना जाली. त्यावरून गेलों. आम दरबार भरला होता. नबाबास पत्र सरकारचे गुजराणलें. नतर दोन तीन घटकापर्यंत नवाब व मध्यस्त व मीरआलम व मी चौघासी खलबत जालें. भवति न भवति होऊन सेवटीं नवाब बोलले कीं टिपूची चाल कसी याविसीं आणि या तहनाम्याप्रकर्णी मध्यस्त आपले घरीं तुह्मासीं बोलतील तें समजोन घ्यावे. ऐसें होऊन बरखास्त जाले. त्या उपारि दुसरे दिवसीं मध्यस्ताकडे गेलो. येक प्रहर बैठक होऊन मीरआलमसुधा बोलणे जालें. त्याचा त॥ लिहूत मागाहून रवानगी करण्यात येईल. पत्रें पावलीं. बोलणें जाले याचा इतला व्हावा ह्मणोन सरसरीं पत्र लि ॥ असे. भवति न भवति जाली याचा त ॥ आणि याचीं उत्तरें मध्यस्त सांगणार. यास आणखीं येक बैठक होऊन निश्चय सागतील तो लिहिण्यात येईल. र॥ छ ३ माहे मोहरम हे विनंति.

श्री

श्रावण शुद्ध ४ रविवार शके १७१५.

पु ॥ राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी—

विनंति. उपरि छ २६ माहे जिल्हेजची रवानगी ती छ १ माहे मोहरमीं पावली. व इकडील पत्रें राजश्री नानास गेलीं त्याचे जाब व तुह्मी काहीं म॥ र लिहिला तो कळला. याची उत्तरे मागाहून लाकरच पाठविण्यात येतील. र ॥ छ ३ माहे मोहरम हे विनति.

श्री

श्रावण शुद्ध ४ रविवार शके १७१५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी —

पो॥ गोविंदराव कृष्ण सां। नमस्कार वीनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित असावें विशेष राजश्री राजे व्यंकटप्पा नाईक बळवंत बहिरी बहादूर सुरापुरकर संस्थानिक यांजकडे नवाबाचे सरकारचा ऐवज नजराणा बाबत येणें त्या ऐवजीं मा॥र निळेनीं राजश्री बापु शिवदत्त साहुकार यांचे मारफतीनें रुपये १००००० येक लाख पाठविले हे नाईक म ॥ र निळेकडील वेणू गोपाळ कारकून यांचे गुजारतीनें पोंहचऊन आजीमुलउमराव बहादुर यांसी पावते जाले सदरहू येवजाची रसीद नवाबाकडील आल्यानंतर नाईक म ॥ र निळे यांजकडे रवाणा होईल र ॥ छ १४ माहे जिल्हेज सु ॥ आर्बा तिसैन मया व अलफ, सन फसली १२०३ शके १७१५ आषाढ शु॥ १५ मु ॥ बेदर. बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनंति

छ ७ माहे मोहरम

श्री

श्रावण शुद्ध ८ गुरुवार शके १७१५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी —

पो गोविंदराव कृष्ण सां। नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित असिलें पाहिजे विशेष, तुम्हीं पत्र पा तें पाऊन लिहिला मार समजला माहादू गवळी याची मुक्तता जाली परंतु याचा मुचलका नवाबाचे सरकारांत गुंतला आहे, तो आला नाहीं याजकरितां मागतीं राजश्री पाटीलबावा यांनीं सांगून पा। व समक्षही सांगितलें त्यास याचा कागद काढवोन देण्याविसीं आज्ञा व्हावी बाळू गवळी वारंवार गैरवाका समजाऊन कजिया करितो त्यास निक्षून ताकीद व्हावी याविसीं पाटीलबावास फार अगत्य आहे म्हणोन लि। त्यास हालीं बाबाचे वडिलांचें पत्र आलें

याजवरून राजश्री राज्याजी यांस पत्र होतें तें काहाडोन आणोन पा आहे. पावेल. पावलियाचें उत्तर पाठवावें. बाळू गवळी येथें नाहीं. तो आलियावर त्यासही ताकीद केली जाईल. रा छ ७ मोहरम बहुत काय लिा ? लोभ कीजे हे विनंति.

श्री.

श्रावण शुद्ध १३ सोमवार शके १७१५

मोहरम छ ११ रोज, मालोजी कीरपंत यांनीं मागितल्यावरून दिल्हें.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं:—

पो गोविंदराव कृष्ण सां नमस्कार विनंति. उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित जावें. विशेष, राजश्री मालोजी कीरपंत धारासिवकर हे तुह्माकडे पुण्यास येतील. त्यांजजवळ पेशजी तुह्मास व राजश्री हरिपंत तात्यास पत्रें दिलीं आहेत, त्याप्रा यांचे रोजगाराची सोय करून द्यावी. हालीं मालोजीचा भाऊ नारायणराव कीरपत यानें बालेवाटीं जमीयेत करून दंगा केला. याचा बोभाट पुण्यास गेला. सबब मालोजी कीरपंत तेथें आल्याउपा-रांतीक हा नारायेणरायाचा भाऊ ह्मणोन यास सरकारातून वगैर तगादे करतील. त्यास मालोजी भाउ. परतु उभेतांच्या तीन च्यार पिढ्या गुजरल्या. व येके जागांही नाहींत. त्यापक्षीं याजकडे नारायेणराव यांजविसीं कांहीं खटला नाहीं. रा छ ११ मोहरम. बहुत काय लिो ? लोभ कीजे हे विनंति.

श्री.

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५.

टपा रवाना छ १६ मोहरम.

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं:—

विनति. उपरि तुह्माकडील पत्रें छ २१ व छ २६ जिल्हेज व छ ३ मोहरमचीं रवाना जाली तीं छ २७ जिल्हेज व छ १ व छ ८ मोहरमीं पावलीं. याचीं उत्तरें आलाहिदा लिहिलीं आहेत त्यावरून कळेल. रा छ १६ मोहरम हे विनति.

श्री

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५.

विनंति उपरी इम्रजांकडून पुढील टिपूचे मसलहतसमंधीं पारसी याद आली. त्याची भवति न भवति पाटीलबावा यास घेऊन राजश्री नाना व साल्या यानीं करून येक कल्माची फर्द ठराविली यांतील हुस्न लिहिलें परंतु बोलावयाचे नाहींत गोविंदराव यांनीं नवाबासी असें बोलणें ह्मणोन पाटीलबावांनीं सांगितलें तो प्रकार लिहिला आहे परंतु केवळ तसेंच बोलण्यानें इंम्रजापासीं ते सांगतील याजकरितां सहजांत बाराय मसलहत गोष्ट बोलावी व सरकारचें पत्र व याद पाठविली आहे ती नवाबास याचा जबाब काय ? मनांत वाईट मानितील इत्यादिक मदारुलमाहम यांचे मनांत यावी कीं नाहीं? मध्यस्तांनीं नवाबास अर्ज केला कीं हजरत फरमावितात याचप्रमाणें मदारुलमाहम यांचे मनांत परंतु सात दफे इंम्रजांकडील न ठरावितां मुख्य सर फर्दच करार करावी ऐसा आग्रह मदारुलमाहम याचा नाहीं मगर माहदजीराव सिंदे व हरिपंततजी यांनीं हे शकल काहडून समजाविलें असेल यामुळें उपाये नाहीं रा छ १६ मोहरम हे विनंति

श्री

श्रावण वा ३ शनिवार शके १७१५

विनंति उपरि, आपले पत्राचे कांहीं जाब लेहून श्रीमंत राजश्री नानाकडे विनंत्या करावयास पाठविले त्यांनीं कांहीं विनंत्या करून दिल्हातीं पुसावयाच्या ह्मणोन पुढकें ठेविलें काल कागद काहडून दिल्हे तेव्हां मी बोललों कीं तारीख शिवाय जिल्कादची पडली आज येकवीसावी जिल्हेज उत्तर जालें कीं गोविंदराव असें समजतील नानांनीं पत्रें करून दिल्हीं गोविंदराव यांचे आळसामुळें येक महिना रवानगीस जाला येसें बोलल्यानें तर मी हसून उगाच राहिलों, ह्मणोन लिहों तें कळलें त्यास पत्रें येक महिन्याचे अंतऱ्याचीं आलीं असतां याविषीं आम्हीं कांहीं लिहिलें नाहीं तर ह्मणतील कीं गोविंदराव यांना कांहीं सूचना केली, याजकरितां नानाचें पत्रांत

गिला लिहिला व तुह्मासही पुरवणी आलाहिदा लिहिली आहे. दाखवावी. त्याजवर काय बोलतात हे अगत्य ल्याहावे. र॥ छ १६ मोहरम हे विनति.

श्री.

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५.

विनंति. उपरि, नानांची पत्रे छ २१ जिल्कादचे तेरखेची छ २१ जिल्हेजीं तुम्हीं रवाना केलीं, याचे बहुत आश्चीर्य जाले. इतके दिवस पत्रास का लागले याचे कारणही तुम्हीं लिो नाही. नानापासींच पत्रें इतके दिवस राहिलीं असे ह्मणावे तर येक तेरखेस सर्व पत्रावर विनंत्या जाल्या. तेंव्हा पत्रे आपल्यापासीं कशास ठेवितील ? तस्मात् तुह्मापासीं पत्राचा लाखोटा दिल्हा तो कोठें गैर विल्हेस पडला होता. तो जेव्हा सांपडला तेंव्हा पाठविला. ऐसे मनांत आले. त्यास हें राजकारणाचे काम. नाना याजकडील पत्राचेकडे आमचे नेत्र असतात. पत्राचे जाब आल्यावर त्या आज्ञेप्रा येथें बोलण्याची धोरणे चालतात. हे प्रकार तुह्मास समजत नाहींत ऐसे नाहीं. परंतु आलस्यामुळे विस्मृति होती. येविषई तुह्मास तेथे रागे भरून सांगावे असे कोणी नाहीं. याजकरिता राजश्री नानाचे पत्रात तुमचा गिला लिहिला आहे, याजमुळे तरी काळजी धराल. त्यास इत:पर असे घडू नये. पत्राचे जाब लिहिण्यासही तुह्मांसीच देतात. असे असता इतके दिवस लागणे हे तुमचे कालहरण. परराज्यात आह्मी राहिलो. येथे व्यवहार सर्व तिकडील पत्रावर. जर पत्रें लौकर न येत तर कसे करावे ? त्यास-या पत्राचें येकदां दोनदा मनन करून काळजी ठेवावी. ॥ छ. १६ मोहरम. हे विनंति.

श्री

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५

विनंति. उपरि, श्रीमंत राजश्री नानानीं आज्ञा केली कीं गोविंदराव यानीं आमचे नावे पत्र लिहू नयेत. श्रीमंताचे नावे विनतिपत्रे लिहीत जावीं, तीन प्रकरणे मात्र लिहू नयेत. मध्यस्त जवाहिर व ज्याफत नजर वगैरे वगैरे नबाबास करितात हें येक, शिकारी प्रकरण दुसरे वायका प्रकर्ण तिसरे,

तीन मार येतील ते आलाहिदा आमचे नांवें त्याहाते बाकी मार श्रीमंतां चे नांवें लिहीत जावा येणेंकरून त्यांस माहितगारी होईल ह्मणोन राजश्री नानाचे आज्ञेवरून लिो त्यास तीन प्रकरणांच्या तेरिक्त सर्व मार माहित गिरी होण्याकरितां लिहित जावा ह्मणोन आज्ञा केली हें उचित परंतु आम्हाप राजकारणाचे उंच निंच प्रकार व लिहिण्यांतील तोडजोडी घ्यानांत नाहींत आल्म जशानीचा पुर्ते मनन न होतां भलतेंच मनांत येईल, बोलतील याविषीं बहुत अंदेशा मनांत आले परंतु येक खातरजमा चित्ताची आहे कीं पत्रें वाचून दाखविणें, आंतले भाव, गर्भ समजावणें ते राजश्री नाना आपले स्वरु समजावितील त्यापक्षीं चिंता नाहीं परंतु तुह्मीही विनंति करावी कीं आपले समक्ष पत्रें दाखऊन जेथें घ्यानांत न ये तेथें समजाऊन सांगावें आणि समक्ष पत्रें श्रीमंतांस दाखविलीं तरच पाहतील पाठीमागें पाहणार नाहींत पत्रें पाहणार नाहींत तेव्हां घ्यानांतही येणार नाहीं हा पूर्वीचा संप्रादाय ठाऊक आहे, त्यावरून लिहिलें असे अलीकडील प्रकार कसा हें काहीं समजलें नाहीं हल्लीं पत्रें श्रीमतांचे नांवें लेहून खुला लखोटा पाठविला आहे नाना यांस प्रथम दाखऊन आज्ञा करितील त्याप्रा श्रीमंतांचे सेवेंत प्रविष्ठ करावीं रा छ ११ मोहरम हे विनंति

श्री

श्रावण व ३ शनिवार शके १७१५

विनंति उपरि, औरंगाबादेवर ऐवजाच्या तनखा घेतल्या तो यैवज कांहीं आला, कांहीं नाहीं, येविषयीं दफ्तरची याद पाठवावी ह्मणोन आज्ञा आली त्यावरून पेशजी याद पा, व हल्लीं याद दफ्तरची घेऊन पा आहे बाकी येणें फार. निकड होऊन जगधनावर चिठ्या घ्याव्या ह्मणोन लिो, त्यास पेशजीच्या यादीवरून येथें रसीदांसी रुजुवात पाहता काही मिळेना येथें रसिदांच्या रुजुवातीनें ऐवज बाकी येणें निघाला, त्यापैकीं येक लाख यांचे कर्जात देऊन बाकीची चिठी जगधनावर घेऊन पेशजी पाठविली व

रसिदांच्या नकला वगैरे या प्रकर्णी ता। पेशजीं लिहिल्यावरून समजलाच असेल. त्याप्रा। दफ्तरीं रुजुवात पाहून चिठीप्रा। ऐवज आणावयास कारकून तिकडे रवाना करावा. काहीं लडा ऐवजाचा रसिदापैकीं असल्यास लेहून पाठवावें. रा। छ १६ मोहरम हे विनंति.

श्री.

श्रावण व. ३ शनिवार शके १७१५.

विनंति. उपरि.

१ जफरुदौला याचे पत्राचे जाब तयार करविले. मुनषीकडून पत्रें तयार होऊन आलीं ह्मणजे लौकर पाठवितों. मतलब पत्रातील समजावयाक-रितां मसविदा पा। आहे. श्रीमंत नानांनीं येविषीं आपल्यास पत्रें लिहिलीं. दिवस येक प्रकारचे. करणे बोलणे बहुत समजोन होत असावे हे भाव घराऊ श्रीमंतांचे पत्रांत आहेत ह्मणोन लिो. त्यास, मसोदा पावला. पत्रें पारसी तयार लौकर पाठवावीं. नानानीं पत्रांत लिो अर्थ तितके खरे. परंतु कांही चळवळ केल्यासिवाय दुसऱ्याचे समजतही नाहीं. कर्तानां समजूनच सांभाळून उद्योग करावा, इतकें समजोन तेथील आज्ञेप्रा। करीत आहें. इतकें विच्याराने करीत असता सांभाळणें नाना याजकडे आहे. कलम—

१ इंग्रज समंधें सरकारचें पत्र व इंग्रजास करार करून देण्याची फर्द ठराविली ती छ २२ जिल्हेजीं रवाना केली. ती पोंहचून हजरतीसीं बोलणीं होऊन जाब सत्वर पाठवावे. जाब कधीं येतील ह्मणोन श्रीमंत दिवस मोजितात, ह्मणोन लि।।, त्यास पत्रें आल्यावर दुसरे रोजीं जाऊन मध्यस्तास, नवाबास दाखविलीं; नंतर त्याची भवति न भवति होऊन उत्तरें ल्याहवयाचीं सांगितल्याप्र।। लिहिली आहेत. मोहिमेचे दिवस होते, याज-कारितां नवाबाकडून जाब होण्यास च्यार दिवस लागले. त्यास छ मा।रीं जाब रवाना केले आहेत. हे प्रविष्ट करावे कलम:—

दोन कलमे रा।। छ १६ मोहरम हे विनंति.

श्री

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५

विनंति उपरि वसमसेवरील तनखाचा ऐवज वीस हजार घेतला, व वीस हजार साहुकारांत पडला राजश्री नाना यांची परवानगी घेऊन पाठवितों, ऐसें तुम्हीं लिहिल्यास किती दिवस झाले ! परवानगी येत नाही साहुकाऱ्यांतील प्रकार विलक्षण जाला आहे, यास्तव ऐवज यावयाचा नाहीं, ऐसें तरी निक्षून समजल्यानंतर तसेंच सांगावयास येईल उत्तर ८ दिवसांत यावें आळस करू नये रा।। छ १६ मोहरम हे विनंति

श्री

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५

विनंति उपरि स्वराज्याकडील जुजयातीच्या फर्दी आठ पुढील तोंडी लाविल्या हें समजोन आहे असें असतां बाबाराव भो (छ) त्यानें फडचे होत असल्या अवश्य व्हावे यांत सरकार काम जाल्यास उत्तम ! हेच इच्छा आहे यास्तव बाबाराव यांस घेऊन करावें येणेंकरून निमित्य यारलें त्यांचीही उमेद समजेल याचा त ।। येक दोन पुरवण्या लिहिल्यावरून सर्व कळेल त्यास तुम्ही लिहिल्या अन्वयेंच करावयास येईल परतु, यांत येक निश्चय सरकारचा असावा कीं जे फर्द ठराऊन पाठविली याप्र।। जाल्यास ऐकावयाचें दुसरी तोडजोड नाहीं असा निश्चये असल्यानंतर बाबाराव यांस घेऊन केल्यास चिंता नाहीं यात सरकारचे मुख्यामाफीक—तोडजोड न पडतां कलमें उगवून आल्यास सरकार काम जालेयास चिंता नाही बाबाराव यांसही दरमियान घेतलें आणि तोडजोड ठरूं लागली तर कांहींच नाही हें तुमचे समजण्यांत असोन याजवर लक्ष असावें रा।। छ १६ मोहरम हे विनंति

श्री

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५

विनंति. उपरि या फर्देप्र।। नवाबही कबूल करितील असें कोणी येक

करून बाजवी निर्गीळितार्थ ठराऊन रघोत्तमराव यांचे हवाली आठ फर्दा केल्या याच्या नकला त्यांनी करून घेऊन फर्दा माघाऱ्या आल्या ह्मणजे परवांचे दिवसीं आपल्याकडे रवाना होतील, ह्मणोन छ ३ माहे मोहरमीं तुह्मी लिा त्यास आह्मी छ ९ मोहरमीं ऐकावयास मध्यस्तांनी बोलाविल्या वरून गेलों ते वेळेस त्यांनी मार केला की आठ फर्दा दफेच्या आपल्याकडे आल्यास की काय ? तेव्हां आह्मीं सांगितलें येणार येका दोन दिवसां येतील तेव्हां बो (ल) ले कीं रघोत्तमराव यांनी आठ फर्दा पाठविल्या त्यास मोहरमेचे दिवस गेल्यानंतर तुह्मी फर्दा पाहव्या ठराव करून सांगावे तसें करावयास येईल याप्रमाणें बो ( ल ) ले तुह्मी फर्दा परवां पाठवितों ऐसें लिहिलें त्या अद्याप आल्या नाहींत मध्यस्त मस्करीच्या स्वभावानें -आह्मास ह्मणतात कीं तुह्मी सांगाल तसें करीन त्यास तोडजोडीचा प्रकार जे समई त्या वेळेस हें बोलणें नीट आता तो कांहीं प्रकार राहिला नाहीं आता जसें तेथून ठरून येईल तितकें बोलून हो अथवा नाहीं इतका समजावयाचा प्रकार असें दिसोन येतें त्यास फर्दा रवाना करावयास राजश्री नाना तुह्मांस सांगतील ते वेळेस तोडजोडीचाही कांहीं प्रकार सांगतात किंवा लिा या प्रमाणें व्हावे, तोडजोड नाहीं याचा निश्चये खुलासा कसा ? हे लिहून पाठवावें या प्रकर्णी खोलून लिहिण्याविषई आळस करूं नये प्रसंगास तुह्मांकडून पत्रें येऊन आह्मांस केलें असें व्हावें ही पुरवणी नानास दाखवावयाची नाहीं, तुह्मांस कळावें सबब लिा असे उत्तर लौकर यावें कलम —

१ तुकोजी होळकर महेश्वरास आले शरीर समाधान नाहीं ह्मणोन लिहिल्यावरून कळलें कलम—

१ पालखीचे दाल, सरंजाम पाठविले ते सरकारचे पालख्यांस लाऊन पाहिले, तो सरंजाम थोर होतो यास्तव परत केले, ते बाळाजीपंत सेवेकरा-बरोबर पाठवितों ह्मणोन लिा तें कळलें त्यास बाळाजीपंत पुण्यांत आले किंवा इकडे आले किंवा कांहीं कामगिरीस गेले हें कांहीं समजत नाहीं

त्यांचें पत्रही आम्हांकडे येत नाहीं. मग कोणे प्रकारचे आणि त्यांची रवानगी तर होत नाहीं ! यास काय करावें ! ईश्वर इच्छा !

४

फडके प्यार रा॥ छ १६ मोहरम हे विनंति.

श्री.

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५.

विनंति. उपरि,

| | |
|---|---|
| मानाजी गायकवाड मृत्यु पावले. गोविंदराव याचा पुत्र म्हणून नेला होता. स्वार दनका धरावे असा तेथील येत. आल्ले नाहीं म्हणोन शिंदे हे कळले. कलम १ | रावोजी आंग्रे याचा काळ जाला. मनुखान गुलामानें प्रवेश केला आहे. ऐसी व्यवस्था जाली. सबोन हुजूर आ-णायाची तरतूद होत आहे म्हणोन शिंदे हे कळले. कलम १ |

ऐकूण कलमें दोन. पुण्यात रोगग्रस्त असाम्या उलगडणें कठीण—निराजी विठ्ठल, नारायणराव पारसनिसाचे चिरंजीव, रामचंद्रभट पोंगसे इतके शिंदे यातून कोणते उलगडले तें ल्याहावें. सिदगिरीबावा गोसावी यांनी दोन लाखोटे—आनंदराव नरसिंह याचे नावें येक, व बाबाराव याचें नावें येक, व मोर जोशी याचें पत्र आमचे नावें—ऐसीं पाठविलीं तीं पा॥. दोन पत्रें आनंदराव नरसिंह याचे हवाली केली. साप्रत आनंदराव यांनी लाखोटा दिल्हा तो पा॥ आहे, प्रविष्ट करावा. रा॥ छ १६ मोहरम हे विनंति

श्री.

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५

विनंति. उपरि. बाळाजी व्यंकटेश व येमा कामास रवाना केले होते त्यास बाळाजीपंत काल आले. सर्व मजकूर समजला. बंदोबस्त नीटच आहे. परंतु फार कान जाले. त्यावरून चित्तास प्रशस्त वाटत नाहीं. वर्कड

सरकारांत काहीं गुंता नाहीं जर गोष्ट फायापांत आली, त्यास त्यास समजेल तो फुटला तर पथ(त)च गेली पुन्हा सबंध व समक्ष बोलावें हें राहिलें सरकारास काये ? सर्व नीटच आहे । धर्मच होये । वर्कड मध्य पागणारास महत् संकट दुरदेशीनें पाहतां याचा विचार पडतो मळम ळित सारखें वाटतें, यास कसें करूं ? याचें समर्पक उत्तर यावें वरकड सर्व नीटच आहे क्रम चा(ल)ला आहे करतों, दस्तकही घेतों बाळाजी व्यंकटेश कोंकणचा ! निश्चयेंकरून आपलें उत्तर पावतेक्षणीं यावें ह्मणान लिहों त्यास तुह्मीं लिहिला पर्याय इतकाही खरा परंतु असीही गोष्ट येखादे वेळेस करणें प्राप्त होतें तेव्हां छातिही केली पाहिजे केवळ लोभा वरच प्रकार नाहीं फार कान जाले ह्मणोन लिहों त्यास जे जरूर या कामांत आहे त्यांस क(ळ)ल्या वेगळ कसें होतें ? दोघे, तिघे आपलेकडीलच आहेत येक मुतसदी तेथून त्यांनीं रवाना तुम्हाकडे विश्वासूक केला त्याची बाळाजी व्यंकटेश यांची गांठ वाटेंत पडली नाहीं तो महस्य तुम्हासीं येऊन भेट घेतली, तुह्मांस ताकीदपत्राच्या दस्तकाचा भ॥र पुसिला तुह्मीं त्यास उत्तर केलें कीं हे आह्मास काहीं वाकाफ नाहीं हें वर्तमान मुख्याकडून आम्हांस कळलें त्यास तुह्मीं आंगानिराळें टाकलें बरें केलें । त्यास कोणी यांतून फुटल्यास आमचा काय दस्तऐवज दाखविणार आहे ? दस्त ऐवज दाखविल्यास बोलावयास जागा नाहीं ऐसें ह्मणतील ती गोष्ट तर नाहीं मग काय चिंता आहे ? श्रीमंताचे प्रतापावर यांत आम्ही आहों येक आपलेच सामर्थ्यावर नाहीं ईश्वर पार पाडणार आहे । सर्व सिधता जाली हें सेमटास न्यावें कोंकणांतील ठिकाणांत प्रवेश गुप्तरूपें जाला पाहिजे याची तरतूद कसी केली ? तें लिहावी उभयेतांसीं ऐवजाचा काये करार ? तुम्हीं काये केला ? हें लिहिलें नाहीं तर जरूर कळवावें यास घटिकेचा विलंब न करावा हिशेव समजला पाहिजे ह्मणोन लिहों आहे याचे उत्तराकडे द्रिष्ट लागली आहे तर लवकर उत्तर यावें, आळस न करणें, न करणें रा॥ ३ १६ मोहरम हे विनंति

श्री.

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५.

विनंति. उपरि, राजश्री राव रभाजी निंबाळकर याचा ऐवज त्यांजकडील रंगराव दिवाण याजकडे तहरीरबाबत येणे. त्यास मा।रनिलेवर तहरीरीचे ऐवजीं अडीच हजार रुपयाची वरात रावरभा यानीं दिल्ही. आणि येथें मारवाडी यांचे देण्याबाबद ताण मोठा ह्मणून आह्मांपासून आडीच हजार रु॥ यानीं घेतले. रोखा सदरहूचा लिहून दिल्हा. करार केला आहे कीं रंगराव याजकडून ऐवज पावले त्याची पावती ये तोपर्यंत व्याज देत जावे. याप्र॥ करून यानीं वरात आडीच हजाराची रंगराव याजवर दिल्ही ती पाठविली आहे. सदरहू वरातीप्र॥ ऐवज मा।रनिले पासून घेऊन इकडे लिहून पाठवावे. रा। छ १६ मोहरम. हे विनंति.

श्री.

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५.

रुजू आसे. २५००

( मोहर पारसी )

राजश्री रंगराव रामचंद्र दिवाण गोसावी यांस,

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री॥ रावरभाजी जयवंत निंबाळकर दंडवत विनति. उपरि तुह्मांकडील तहरीरीचा ऐवज येणे त्या ऐवजीं येथे राजश्री गोविंदराव बापू याजपासून रु॥ २५०० आडीच हजार घेऊन हे चिठी केली आहे. त्यास राजश्री गोविंदराव भगवंत यांसीं रु॥ आडीच हजार देऊन, पावती बापूचे नावे पाठवून देणे. ऐवज देण्यास दिवसगत लागलिया व्याज तुह्मांस देणे येईल. तर पत्र पावताच रु॥ देऊन पावती पाठवावी. र॥ छ ४ माहे मोहरम ऊर्फ श्रावण मास हे विनति.

राजे भारामल यांचे मागितल्यावरून पत्र छ, १८ मोहरम.

श्री

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१५

राजश्रीया विराजितें राजमान्यराजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी,

पा। गोविंदराव कृष्ण सां नमस्कार, विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लिहीत असिलें पाहिजे विशेष, राजश्री राजे तेजवंत बाहादूर यांजकडोन नवाब बंदगान आली यांचें सरकारांतून फौजेचे व जातीचे सरंजामांत पा। धारुरपैकी कसबें आंतूर वगैरे देहात व पा। चाळीसगांव पैकीं कसबे मजकूर वगैरे देहात जागीर जाले आहेत राजे मा।र यांणी सनदा महालीं आमीलासमागमें पाठविल्या आमीलांनीं माहालचें वर्तमान लिहिलें कीं कसबें चाळीसगांव वगैरे पाच गांव आह्माकडे पैकीं तीन गांव आबाद व दोन गांव हीन-कुल वैराण, व मौजे गणेशपुर, व मौजे गणपूर दोन गांव राणोजी पवार मोकासदार यांजकडे, व मौजे टाकळी व मौजे खडकी, व मौजे पिंपरी सिवराम पंत सरदेशमुख यांजकडे, व मौजे पासोडे व मौजे तुन्हठी व मौजे खरजाई व मौजे वाकडी हे च्यार गांव माधवराव रामचंद्र पागावाले यांजकडे ये।। नव गांव परभारें वहिवटतात आह्मांस दखल देत नाहींत आखर सालीं हात उचलोन काय देणें तें देतील प्रस्तुत मोकासदार यांजकडील गांवास फर्मास चिठी केली होती त्यांचें उत्तर त्याणीं जमीदाराचे नांवें पाठविलें त्याची नकल पाठविली आहे, त्याजवरून कळेल, आह्मी मोकासदार व सरदेशमुख व पागावाले यांस ह्मटलें कीं आमचे गांव सोडोन द्यावें आह्मी आपले देखरेख करून घेऊ तुह्मीं आपला हिसा ध्या। आकारा प्रो। च्याव्या त्यास ते ऐकत नाहींत त्यास याचा बंदोबस्त जाला पाहिजे ह्मणोन आमीलाचे लिहिल्यावरून राजे मा।रनिले याणीं आह्मांस सर्व मजकूर सांगितला, व बंदोबस्ताविसीं रा मानांस, व तात्यांस, व गोविंदराव यांस पत्रें यावीं व तरफ आंतूर पा। धारुर येथील मोकासा येशवंतराव वाबने व पर्वतराव यांजकडे याचाही उपद्रव बे।जम।। आहे त्यास तरफ मारचा मस्ता सरकारांतून करार करून

दिल्यास आम्ही साहुकारी निशा देतों. त्याप्रों साल बसाल ऐवज पावता करून देत जाऊं. अथवा चाकरीस स्वार म्हटल्यास देऊं. निदान ह्या गोष्टी न घडल्यास मोकासदार यास निक्षून ताकिदा याव्या कीं स्वराज्याचा अमल वाजवी मामुलप्रों घेत जावा. ज्यादा तलबी न करावी. याप्रों दोन्ही माहालचा बंदोबस्त करून देवावा तरीच आमची स्थित राहील. नाहीं तरी बखेडाच आहे. या प्रकारें फार बाजीद होऊन बोलिले. त्याजवरून राजश्री नानांस व तात्यांस पत्रें तुमचे पत्रावर हावाला घालून लिहिलीं आहेत. त्यांस पत्रें प्रविष्ट करून पत्रान्वयें विनंति करून जाबसाल ठराऊन परगणे चाळीसगांव व तरफ ओतुरें येथील मोकासदार, व सरदेशमुख, व पागावाले यांस निक्षून ताकीदपत्रें देवावीं कीं गांव याचे आमीलाचे हावालीं करतील व मामूलप्रमाणें आपला अमल कच्या आकाराप्रमाणें घेतील. कोणतेही गोष्टीची दिकत न राहे असें करवावें. राजे मा॥निले प्रहस्त थोर मनुष्य जाणून लिहिलें आहे. येविसीं तुम्हास वारंवार स्मरण देण्याविसीं मारनिलेनीं रामकृष्णराव देवाजी यांस लिहिलें आहे. ते स्मरण देत जातील. याप्रों सरकारातून बंदोबस्त करून देवावा. रा॥ छ ११ मोहरम बहुत काय लिहिणे ? लोभ कीजे हे विनंति.

श्रीनिवास प्रा. नकल.

राजश्री देशमुख व गबाजी व्यंकटेश देशपांडिये प॥ चाळीसगांव गोसावी यासी,

श्रो बापूजी हरि आ॥ व नमस्कार विनंति. उपरि तुम्ही जागीरीकडून नवा अमल आहे त्यास खडकी वगैरे, गांवास फर्मासीच्या चिठ्या करून देऊन मौजे मा॥रीं उपद्रव आरंभिला आहे, म्हणोन कळलें. ऐसियास पेशजीं आमल होऊन गेले त्यांणीं फर्मासीची वगैरेची चिठी कांहीं केली नाहीं, हें तुम्हास माहित असतां तुम्हीं हालीं त्यास मिळोन गावावर चिठ्या करून दिल्या. त्यास जागीरदार यांचे चित्तांत कटकट करून बखेडा करावयाचा.

असल्यास तसेंच लिहिणें म्हणजे त्यासारखे येथून स्वार प्यादे रवाना करावे यास येतील मग तुम्हांसीच गांठ ! तुमची व कसन्याची खर्चोकडोन खराबा होईल हें समजोन तुम्हीं त्यास च्यार गोष्टी रीतीच्या सांगोन न ऐकेत तरी तैसेंच पत्राचें उत्तर पाठवणें म्हणजे करणें तें करावयास येईल पत्राचें उत्तर लौकर पाठवणें रा। छ २ माहे जिल्हेज बहुत काये लिहिणें ? लोभ करणें हे आशीर्वाद

भावसिंग चौधरी यांनी सांगितलें सबब छ १९ मोहरम

( श्रावण वद्य ६ मंगळ शके १७१९ )

श्री

श्रावण वद्य ३ शनिवार शके १७१९

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव पो स्वामीचे सेवेसी—

गोविंदराव कृष्ण सा। नमस्कार, विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लिा जावें विशेष शंकरदास साहू यांजकडे राजश्री गोपाळराव वानवळे यांचा कर्जाऊ ऐवज मुदल सतरासें रु।। येणें याजकरितां मारनिलेनीं शंकरदासाच्या पुत्र मनुलाल यास पेठण येथें कैदेंत ठेविलें त्याच सुटकेविषीं तीन च्यार वेळां पेशजी पत्रें पाठविलीं त्यानंतर मनुलाल यास येथें पाठवावें म्हणजे सतरासें रु।। याचा फडच्या होईल त्याप्रों साहूकारी खातरजमा करून घेऊन मुजरद जासुदाबरोबर पत्र पों त्यास सांप्रत गोपाळराव पुणियास मनुलाल याजला समागमें घेऊन गेले म्हणून कळलें, त्यावरून लि।। असे तरी वानवळे मारनिलेस ताकीद करून मनुलाल याजला येथें पाठवावयाचें करावें मनुलाल येथें येऊन पोंचल्यानंतर सतराशाचा फडच्या साहुकाराकडून त्यांस देवितील त्याजकडे करून देव घ्यात येईल येविषयीं दौलतराव व भावसिंग चोधरी यांचें सांगणें बहुत यास्तव लिा असे रा छ १९ मोहरम बहुत काये लिहिणें ? लोभ कीजे हे विनंति.

टपाल रवाना पुणें, छ २२ मोहरम

श्री.

श्रावण व. ९ शुक्रवार शके १७१५.

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसीं.

विनंति. उपरि. तुम्ही छ १९ मोहरमचीं पत्रें जुजवियातचे आठ फर्दा समेत पाठविलीं तीं छ २१ माहे मिनहूस पावलीं. मजकूर समजला. त्याचीं उत्तरें मागाहून लिहिण्यांत येतील. सांप्रत कांहीं वर्तमान समजलें तें आलाहिदा लिहिलें आहे. त्याजवरून कळेल. रा छ २२ मोहरम. हे विनंति.

श्री.

श्रावण व. ४ शुक्रवार शके १७१५.

विनंति. उपरि. राजश्री बाबाराव यांस इतके दिवस पाटिल बावाजवळ ठेविलें यांतील प्रधान हेतू हा कीं येक आपला पुत्र हिंदुस्थानांत घेऊन जावा, त्यास वजारतीवर कायम करावें, त्यानें पाटील बावाचे ऐक्यतेंत असावें. म्हणजे गोडीचे पोटांत पातशाहींत आपला पाय कायम जाहला. दक्षणची सुभेदारी आहेच. यास च्यार रु॥ खर्च जाले तरी चिंता नाहीं. आपण नबाबाचे कारपरदाज जाहलों यांत खाविंदाचे दौलतीची तरकी करून पाया मजबूत केला. असें कोणे कारपरदाजानें केलें नाहीं. तें आपण करून दाखविलें ऐसें होतें. आणि रावं पंतप्रधान, आदिकरून सर्व रइसावर दाब ! ऐसी मसलहत बांधून नबाबाचे मनात ही गोष्ट भिवऊन, परवानगी घेऊन मध्यस्तांनीं राजकराण सुरु केलें. पाटीलबावा यासीं करारमदार ठरला कीं या प्रकर्णीं पातषाहाची नजर येक करोड ठरली. त्यांतील करार असा आहे कीं पुणियास गेलियावर तेथील वंदोबस्त खातरखा करून हिंदुस्थानांत गेलियावर हें कार्य सिद्ध करावें, येथें फौजेचें खर्चास ऐवज लागेल तो पुरवावा. आणि अनकूळ असावें. नबाबाचे पुत्रास वजिरीवर कायम करावें. त्याची नियाबत पाटील बावानीं करावी, याप्रमाणें करार. त्यास पुणियास

झाले पैक्याविसी आणि मसलहतीविषई आम्ही अनुकूळ असतां आज पर्येत आपला बंदोबस्त काय केला ? की ज्या बंदोबस्ताचे भरवसियावर हिंदुस्थानांतील कामें खातरखा करावीं हें अद्याप कांहींच दिष्टीस पडत नाहीं करोड रुपये देण्याचा करार पैकीं चाळीस लाखपर्येत आजपावेतों पोंचून चुकलें बाकी साठ लाख रु॥ राहिले अद्याप कोणतेही उपयोगाचें लक्षण दिसत नाहीं केवळ सुस्त होऊन बसला ! यांस काय म्हणावे ? याप्रमाणें बाबाराव यांस छेडणी फार आहे बाबाराव यांचे सांतवन करतात की सुस्ती धरून बसले आहेत यांतच काम आहे लौकिकांत भावका उठल्या, त्याजवर कित्तेकांचे अतःकर्णात संशय यांत कांहीं विपरीत दिसल्यानें अधिक सावधगिरि जाली म्हणजे गोष्ट बहकण्यांत येऊन आफ्तरी होईल, याज करितां पड घेऊन नरम चालीनें संशयनिवृत्ति करून सुस्तीखालें टाकल्यावर कारस्थान चालेल नाहीतर सर्व आफ्तरी होईल याजकरितां च्यार दिवस दम धरून नंतर काय होतें तें पहावें याप्रमाणें विप्र खातर जमा करित आहेत त्यास ही बातनी आत्मिका करून कळली नाहीं विप्राचे घरांतील बारीक बातनी ऐकिला ती लिहिली आहे या गोष्टीस खरें खोटें दोन्ही म्हणतां येत नाहीं राजकारणाचा ग्रंथ जसा सिध केला तसा होतो. याजकरितां जें ऐकिलें तें लिहीं आहे मननांत असल्यानें बहुत उपयोग, हुषयारी तर राहिल ? यास्तव ही पुरवणी राजश्री नानास दाखवा वी यांचे उत्तर विशेष लिहूं नये आमके तारखेचीं पत्रें पा तीं पावलीं, श्रीमंतांस दाखविलीं, इतकीच सूचना पुरे. रा॥ छ २१ मोहरम हे विनंति

श्री

श्रावण व ९ शुक्रवार शके १७१५

विनंति उपरि अलीस्कांनीं सांगितलें कीं मध्यस्त आपले घरीं कोणा येकासीं बोलत होते कीं हजरतीचा निरोप दो महिन्यांचा

घेऊन पुण्यास जावयाचें: त्या ग्रहस्तानें पुसिलें कीं मग हजरतीपासीं कोण आहे ? आणि जावयाचे प्रयोजन कोणते ? याचे उत्तर मध्यस्तांनीं केलें कीं पटणचे मोहिमेस गेलो ते वेळेस हजरतीपासीं आपले नियाबतीवर गफूरजंग याचे पुत्रास ठेविले, त्यास ठेऊन पुणियास जावें. मदारुलमहाम याचे मनांत संशये आले ते काढून दोन्हीं सरकारचीं ऐक्यता करून लवकर यावें असें मनांत आहे. याप्रमाणे बोलण्याचा उद्गार निघाला. पुढे पहावें काय ठरते ? जाहीरदारींत तर ऐसे आहे. मनांतील बेत काय असेल तो असो ! त्यास असाच विचार ठरविल्यास मध्यस्ताचे बोलण्यात येईल. ही गोष्ट झांकून रहावयाची नाहीं. काय ठरतें हें समजेल. रा॥ छ २१ मोहरम. हे विनंति.

श्री.

श्रावणव. ९ शुक्रवार शके १७१५.

विनंति. उपरि जुजयातच्या आठ फर्दा ठरल्या, त्याच्या नकला राजश्री रघोत्तमराव यांनीं मध्यस्ताकडे पाठविल्या; त्याचे पारसी तरजुमे करून पाहिले. नतर बाबाराव यांस बोलाविले. बाबाराव यांस समाधान वाटत नाहीं परंतु तसेंच यावे म्हणोन हुकूम गेला, तेव्हा गेले. तिथे जण साहा घटिका बसून खलबत केले. आठ फर्दांच्या नकला करून पाटिल बावाकडे पाठऊन याचा जबाब लवकर आणवावा ऐसें सागितले. त्या फर्दा-नकला तयार करून रवाना जाल्या. कलम.———————— १

इंग्रजांकडून साता कलमाची याद तहनाम्याची आली. त्याजवर विचार होऊन येक फर्द पुणियाहून ठरून आली. त्याची भवति न भवति करून श्रीमंतास उत्तर लिहावयासी आम्हांस सागितले· त्या पुरवणीवर नवाबाचे दसखत करून घेतलें. नंतर श्रीमंतांस पुरवणी लिहिली. त्याची नकल मध्यस्ता जवळ होती ती नकल करून पाटीलबावाकडे पाठवावयासी बाबा-राव यास सांगितलें. कलम.———————— १

पटणास टिपूसीं तहनामा जाला त्याची नकल करून पाटीलबाबा कडे पाठवावयाकारितां बाबाराम यांस दिल्ही कलम. ——————— १

तीन कलमें

बाबाराम लाखोटा देतील तो टप्यावर पांच दिवसांत पावता व्हावा, आणि पांचा दिवसांत उत्तर व्वकर यावें, ऐसी रवानगी जल्द व्हावी म्हणोन मानें दरोब समापत यांस मध्यस्तानीं ताकीद केली याप्रों बातमी कळली ती लिहिली असे सारांश सर्व इतल्या गुप्त मार्गे पाटीलबाबाकडे होती हें ध्यानांत असावें, रा॥ छ २२ मोहरम हे विनंति

श्री

श्रावण वद्य ९ शुक्रवार शके १७१५

विनंति उपरि व्यंकट रामदीक याजकडून चिनापटणची अखबार व राजश्री नानाचे नांवें पत्र आलें तें पाठविलें आहे, प्रविष्ट करावें अखबारांत श्रीमंत पंतप्रधान यांजकडील तिसरी किस्त पावती जाली नाहीं असें असावें तेथें सेना साहेब सुभा यांचें नांव हस्तदोषें करून पडलें असें वाटतें पाहिल्यावर समजण्यांत येईल व्यंकट रामदीक उमेदवार आहे याज करितां त्याची नेमणूक सरकारांतून व्हावी ह्मणजे स्वरूपवृदोचा संतोष होऊन सरकार कामाचे उपयोगीं पडेल याविषई विनंति करावी सर्फराज करणें खावंदाकडे आहे रा॥ छ २२ मोहरम हे विनंति,

श्री

श्रावण वद्य ९ शुक्रवार शके १७१५

विनंति उपरि. कुशलपुरी यानें राजश्री रघोतमराव व रामचंद्र दादो यांचे नांवें दोन लाखोटे पाठविले त्यांस पावते करून जाब घेऊन पाठवावें रा॥ छ २१ मोहरम हे विनंति.

छ २९ मोहरम टपा रवाना पुण्यास,

श्री.

भाद्रपद शु १ शुक्रवार शके १७१५

राजश्री गोविंदराव स्वामीचे सेवेसी विनंति. उपरि. तुमचीं पत्रें छ १५ मोहरमचीं छ २१ मनें मार्गी पावलीं. लिहिल्याप्रा।। मा।।र सर्व समजला. त्याचीं उत्तरें नामन लिहिलीं आहेत. त्यावरून कळेल. इकडील सविस्तर मजकूर श्रीमंताचे पत्रावरून समजण्यात येईल. राजश्री नाना यासही सरासरी पत्र लि।। आहे. चनापटणाहून अखबार आली ते व नानाचे पत्राचा खलिता पाठविला आहे. सर्व पत्रें श्रीमंतासहित नाना यास दाखऊन त्यांचे आज्ञेप्रमाणें श्रीमंताचे सेवेसीं प्रविष्ट करावीं, उत्तरें घेऊन वरचेवर रवाना करावीं. रा।। छ २९ मोहरम. हे विनंति.

श्री.

भाद्रपद शु १ शुक्रवार शके१७१५.

विनंति. उपरि. जुजयातच्या फर्दा आठ पाठविल्या. या प्रथम मध्यस्तास दाखवाव्या. नंतर दुसरे दिवशीं राजश्री बाबाराव यास बोलाऊं पाठऊन आणवावें, आणि फर्दा दाखवाव्या. बोलावें कीं तुमची गाठ मध्यस्ताचे घरीं पडावी तेथें आम्ही बोलतों. तुम्हीही बोलून सरकारलिहिल्याप्र।। बोलून ठराव करावा, ऐसें त्यास घेऊन बोलणें व्हावें. ऐसी राजश्री नानाची आज्ञा, त्याजवरून लिहिलें असें आपण ह्मणतील बाबाराव येथें असतां त्याचें बोलणें कीं:— काये जाबसाल असतील ते मला समजाऊन दिल्यास मी मध्यस्तासीं बोलून सर्व उगरून देतों. यास्तव त्यास घेऊन करावें ह्मणोन श्रीमंतानीं आज्ञा केली कीं बोलण्याचा उपर कशास ठेवावा ? यास्तव घेऊन बोलावें, हा यांतील खुलासा ह्मणोन लि।।. त्यास फर्दा पावल्यानंतर ध्यमस्ताकडे गेलों. फर्दाही दाखविल्या. याच फर्दाच्या नकला रघोतमराव याजकडून आल्या, त्या अक्षरशा पाहिल्या. त्यावरून पुर्त्या नेहनानिषीन

जाहल्या आहेत याचे जबाबाचे पर्याय दो ती दिवसांनंतर तुह्मासीं सर्व बोलण्यात येईल बाबाराव यांजकडे सांगून पाठविलें होतें त्याचा मा॥र आह्माहिदा पुरवणी पत्रीं लिहिला आहे त्याजवरून कळेल. र॥ छ २९ मोहरम हे विनंति

श्री

भाद्रपद शु १ शुक्रवार शके १७१५

विनंति उपरि — र॥ बाबाराव यांजकडे कोनेर बाबुराव यांज बरोबर सांगून पाठविलें कीं जुजयातीच्या फर्दी सरकारच्या आल्या ह्मणजे आह्मास कळवावें, ऐसें तुमचे बोलण्यांत पेशजी होतें त्यास, हालीं फर्दी पाहल्या, नतर तुमचे आमचे विच्यारें मध्यस्तासी मा॥र व्हावा त्यास प्रथम बाबाराव बोलले कीं मला दुखण्यामुळें सामर्थ्य येण्याचें नाही कसें करावें ? तेव्हां कोनेरपंत त्यांसी बोलले कीं तुमच्या बोलण्यांत आले होतें याजकरितां बापूंनीं मला तुह्माकडे पा॥ आहे त्यास येवत नाही असें ह्मणू नये, पालखींत बसून यावें, बहुत बसवेना तर तेथेंच भामळसें ल्यावें, घर आहे चिंता नाहीं याजवर बोलिले कीं — मध्यस्ताचे परवानगी वेगळ येतां नये, कसें करावें ? त्यास उदईक मी सांगून पाठवितों, नंतर येईन याप्रमाणें निरोप आला मध्यस्तास पुसल्यासिवाये येत नाहींत ऐसें समजलें तेव्हां आपणही मध्यस्ताकडे याचा इतला कां न सांगून पाठवावा ? ह्मणोन मध्यस्ताकडे आह्मीं सांगून पा॥ कीं — फर्दी आल्यानंतर आह्मास कळवाव्या ह्मणोन पहिलें बाबाराव आह्मांसीं बो ( ल ) ले होते, त्यावरून आह्मीं त्यांजकडे सांगून पाठविलें कीं फर्दी आल्या आहेत. तुह्मीं येऊन पाहाव्या याजवरून मध्यस्त बोलिले जे — बाबा राव यांनीं काल हा मजकूर लिहून पाठविला नंतर कांहीं बोलावयाचें आहे, असें लिहिलें होतें त्यास आज दोन प्रहरीं मीं त्यास बोलावलें आहे त्यांचें बोलणें ऐकून घेऊन आपल्याकडे जावें ह्मणोन सांगतों. याप्रा॥ मध्यस्ताचें

बोलण्याचा सार. त्यानंतर दुसरे दिवशीं बाबाराव यांचा निरोप आला कीं:— परवानगी आली. आज आमावास्येची रात्र, उदईक ग्रहण, परवा वार; याजकरितां द्वितीयेस येतो. त्यास, ते आल्यावर याजला फर्दा दाखऊन मध्यस्तासीं कसे बोलणे होईल ते लिहून पाठऊं. रा॥ छ २९ मोहरम हे विनंति.

श्री.

भाद्रपद शु॥ १ शुक्रवार शके १७१५

विनंति. उपरि-बाबाराव याजकडे कोनेरपंत बोलविण्याकारितां गेले होते. त्याजपाशी बोलिले कीं:— आम्हीं येऊन काय करावें? करावयाचे—ही मोठीं मोठीं कामे! याचे उलगडे होणे मुष्कील; तेव्हा आम्ही काय करावयाचें? याजवर हरराव बोलिले कीं:— नानाचा कारभार फार शोधक, तेव्हा फडचे कसे होतात? याचें उत्तर बाबाराव यांनी त्यास केले कीं.— ग्रहस्त शोधकपणास काय कमी आहेत? कीं त्याचा दोष तुम्हीं काढता? या प्रा॥ परस्पर आपल्यात बोलत होते. रा॥ छ २९ मोहरम. हे विनंति.

श्री

भाद्रपद शु. १ शुक्रवार शके १७१५

विनंति. उपरि. प्रथम मध्यस्तास फर्दा दाखविल्या; ते वेळेस याची उत्तरें काये? ऐसें आम्हीं पुसिल्यावर मनात कोडून काहीं गोष्टी बोलिले. त्यात निश्चयाची गोष्ट ल्याहावया जोगती येकही नाहीं. काहीं उत्तर करावें म्हणोन कालवाकालव करून बोलिले. सेवटीं बोलिले कीं:— दोचौ दिवसा याजविषईं तुह्मासीं बोलूं. बलकी मीं येखादे पत्र ल्याहावे असे ठरल्यास लिहून देईन व तुम्हासही ल्याहावयास सागेन. त्या प्रा॥ लिहून उत्तर आलियावर मग फर्दांचे ठरेल. या बोलण्याचा अर्थ आमचे मनात आला जे:— फर्दांचा मजकूर ज्यास लिहिला तिकडून उत्तर आलियावर निश्चय बोलणें तो बोलावा. तो परियेत काहीं दिवस काळहरण करावे. याजवरही यांची उत्तराविसीं निकडच लागल्यास काहीं येक उत्तर

पर्याय लाऊन घावें म्हणजे च्यार दिवस काळहरण जाहलें, आशा लगली तिकडील उत्तर आलियावर बोलणें तें बोलावें आसा बेत ठरला आहे यास दुसरें प्रदर्शन —बाबाराव यांचा निरोप आला त्यांत ग्रहणाचे संबंधीचें निमित्य आणि मध्यस्त पाठ सांगतील त्या धोरणानें आम्हासीं बोलतील असें वाटतें त्यास, आज उद्यां दोन दिवस ग्रहणाचे गेले म्हणजे आम्हीं मध्यस्तासीं जाऊन बोलतों म्हणजे काये ते समजेल त्यासारखें लिहिण्यांत येईल रा॥ छ २९ मोहरम हे विनंति

श्री

भाद्रपद शु १ शुक्रवार शके१७१५

विनति उपरि —तफावत कांही ऐवजाची आहे. त्याचे रुजुवातीविषई हालींच्या मुन्यास नवाजपनामा पाठविला परंतु आमका ऐवज आमके दिवसांत देणें ऐसें जगधन साहुकार यास पत्र नाहीं याविषई दिकत पडेल ह्मणोन लि॥ त्यास, येकंदर तनस्यापैकीं एक लाख येकावन हजार दोनसें रु॥ सवा तेरा आणे १५१२०० ०॥।–। राव पंत प्रधान यांचे संरकारात वसूल जाहला म्हणोन आहसनुदौला, कृपावत या उभयतांनीं आपले मोहरेनसीं वसुलाची फर्द पाठविली परतु वसुलाप्र॥ रसीदा असाव्या त्या नाहींत च्यार रसीदा मात्र आल्या त्या यांणीं दिल्या यांत १६७९५ ॥।–। सोळा हजार सातसें पंच्याणव रु॥याची रसीद नाहीं त्यावरून मध्यस्तासीं आमचें म्ह ( ण ) णें पडलें कीं —सदरहूची रसीद द्यावी, अथवा रसीद नाहीं तरी ऐवज द्यावा यांचें ह्मणण्यांत ऐवज पावला आहे तेव्हां उभयतांनीं आपले मोहरांनसीं दस्तऐवज पाठविला आमचे म्ह ( ण ) ण्यांत ऐवज पावला नाहीं असी दोनच्यार दिवस घिष्ट पिष्ट जाली तेव्हां मध्यस्त बोलिले कीं —– ऐवज तो पावलाच आहे नसेल पावल्यास या ऐवजाचा जिमा आहसनुदौला व कृपावत यांचा त्यास आमचें ह्म ( ण ) णें —– कृपावत आटकेंत आहेत त्याजवरून मध्यस्तांनीं आहस

नुद्दौला याचे नांवें पत्र करून दिल्हें कीं तुम्हीं गेल्या त्यास येकावन हजार सातशें पंच्याणव रु॥ मता नेग आणे याची फर्द मोहरी लिहून पाठविली, त्यास सोळा हजार सातशें पच्याण्णव रु॥ मता सोळा आणे वसी येतात, याची रसीद नाहीं, याज करितां रावपंत प्रधान याचे सरकारचे मुतसद्दी तकरार करून कबूल करीत नाहींत. त्यास, तुम्हीं त्यास सदरहू रु॥ दिल्हे असतील त्याची रुजुवात करून द्यावी. अथवा सदरहू रु॥, जे ऐवज मागा-हून येतील, त्याचे पदरीं घालून रसीद घेऊन पाठवावी. म[illegible] याचे [illegible] (ण) णे— हे रुपये पावलेच आहेत. त्यास गुंता नाहीं. मगर तुमचा आग्रह की रु॥ पावले नाहींत. याज करितां हें पत्र लिहिलें आहे. हें पत्र आहमदनुदौलास पावतें करून याचें उत्तर आणणावें लागेल समजेल त्याकरून हे पत्र घेऊन पाठविलें आहे. आहमदनुदौल्या यांजकडे रवाना करावें. त्यांनीं रुजुवात करून दिल्यास गुंताच उरला. रुजुवात न जाल्यास यांजपासोन ऐवज घ्यावा. ऐवज न दिल्यास उत्तर लिहून पाठवावें. म्हणजे यास कायेल करून, जगजन याचे दुकानची चिठी घेऊन पाठवावयास येईल. सोळा हजार ऐवज घावाच असें ठरलें नाहीं. सबब जगधनावर चिठी नाहीं. आहम-नुद्दौल्या यास मात्र पत्र की ऐवज दिल्हा नसल्यास तुम्हीं देणे त्यास ऐवज आहमदनुदौलाच देतील. त्याणीं अनमान केल्यास लवकर लिहिले यावें. रा॥ छ २९ मोहरम हे विनंति.

श्री

भाद्रपद शु॥ १ शुक्रवार शके १७१५

विनंति. उपरि:—ऐवज क्षेपनिक्षेप पदरीं पडे ऐसीं परभारें आणिक पत्रें जावीं. इकडे पाठवावयाचीं असतील तें पाठवावीं. याविसीं स्वस्त असों नये. पैक्यास लावण पडों नये ऐसे व्हावें म्हणोन लि॥. त्यास तनख्याचे ऐवजाची तपसिलाची याद लिहिलीच आहे. निकी बाकी.

२८० ७९० ॥ सिघाली याची चिठी-रोपनराप यांचे मोहरची, सगवम यांचे दुकानीं इ॥ छ २० जिल्हेज पासोन दोन महिन्यांत यावे याप्रा खचित चिटी आहे तथापि तुमचे लिहिल्यावरून मागाहून आणिक ही परभारें ताकीद लिहिविण्यात येईल हाळीं फखरदौला नवे सुभेदार यांचे पत्र मध्यस्तास आलें कीं -- सखोपंडत-रावपंतप्रधान याजकडील-तनख्याचे ऐवजाचे वसुलास येथें आहेत हे खर्चास मागतात यांस फार तसदी आहे दोनदिवस विलकुल यांस कांहीं मिळालें नाहीं तिसरें दिवशीं पन्नास बैल गेल्याचे रसदेचे घऊन नेऊन रोजमरा केला याजबराबर जम येतही आहे त्यास, आज्ञा आल्यास कांहीं ऐवज द्यावयास येईल त्यावरून मध्यस्तांनीं आम्हांसी सदरहू मा॥र केला, आणि बोलिले कीं — तनख्याचें बाकीचे ऐवजाची चिठी जगधन याचे दुकानीं करून दिली त्यापर्क्षी आम्हीं ऐवज् का द्यावा ? आणि ते प्रहस्त खर्चाविन हैराण आहेत जर तुम्हीं कांहीं ऐवज देत असाल तरी आम्ही जगधन याचे दुकानींहून देवितों, नाहीं तरी जबाब साफ लिहिलें असे, व रसीदीचाही नकल पा॥ आहे रा॥ छ २९ मोहरम हे विनंति

श्री

नकल

राजश्रिया विराजित राजमान्य रा॥
बाजीराव आमील व तिमाराव दे
शपांडे प॥ वसमत स्वामीचे सेवेसी

पो॥ गोविंदराव कृष्ण सा॥ नमस्कार विनंति उपरि प॥ उमरखेड यामा हाला पासोन शाहमिर्जा यांनीं ऐवज घेतला तो नबाबाचे सरकारांतून येणें त्या ऐवजीं पा॥मा॥रचे ऐवजीं चाळीस हजार रुपयांची तनखा आमची तुम्हांवर आली त्याचे ननाजपनामें दोन पैकीं आवल हप्ता आहे रा॥ चल आखरचे वायद्याचे रा॥ २०,००० वीस हजार सद

रहू वीसे हजार रु॥ म॥ मेहरबान सैद मुजवरखान आमील प॥ मा॥र दिल्हे ते पावले आहेत. छ जा॥ खरी सु॥ सलास तिसैन मया व आलफ, सन १२०२. वहुत काय लि॥? हे विनति.

श्री.

भाद्रपद शु १ शुक्रवार शके १७१५.

विनति. उपरि. तेजसिगाकडील जागिरीचे माहाल येहतपाम जंगाकडे जाले. येविषि रा॥ नाना तुम्हासीं बोलले कीं:- सरकारचा ऐवज खदारकराकडे येणे. -त्या ऐवजीं करडखेल, होकरणे हे माहाल लाऊन दिल्हे असता दरमियान फौज पाठऊन घेतले. ते समई हिसेबी ऐवज निवेल त्यास नादापुर लाऊन देण्याचा करार असतां वलीजंगास नांदापुर देऊ लागले. ते समई मध्यस्तासी नादापुर आमचे ऐवजी केले असता यास कसे देता ? हे बोलावे कीं नाहि ? व जग घराउ पुसो लागले त्यास तुम्हीं नादापुर कवूल करू नका असे म्हणावे कीं नाहीं ? हे गोष्ट कसी राहिली ? इत्यादिक तों लि॥. त्यास करडखेल राज्याजीकडे जागीर होऊन तालुक्याचे दखलास याजकडील फौज गेली ते समई याचे बोलणें कीं:--खदारकराकडे येकदर स्वराज्याचा ऐवज तुमचा येणे, त्या ऐवजीं करडखेल व होकरण्याचा वसूल काय पावला व वाकी काय राहिली याचे हिसेब आणवावे. अजरये मवाजा हिसेबी ऐवज निवेल त्यास नादापुर हा महाल-खदारकर तेजासिगाचे जागिरीचा—लाऊन देता येईल. आमचे म्ह (ण) णे कीं:— सेवाले हा महाल उमरखेडालगता. तो ऐवजी लाऊन द्यावा, ऐसें बोलणें. त्याजवर हिसेब येऊन ठराव व्हावा तो काहींच जाला नाहीं. खदारकराबावत ऐवजाचा फडच्या करून द्यावा. सेवाले नादापुर आमचे ऐवजी माहाल. हे हमेषा मध्यस्तासीं बोलण्यात येतच आहे याचे विस्मरण कसें होईल ? येहतपामजगास जागीर होण्याचे पूर्वी मध्यस्तासी बोलणें जालें. याचे म्ह (ण) णे कीं:—तुमचे सरकारचा ऐवज बाकी काय ? याचा हिशेब

आणावया सेंवाले नांदापुराचाच आग्रह काय आहे याजवी बाकी निघेल त्याचा फडच्या तेजसिंगाकडून करउन देउं, आगर नांदापुर छाउन देणें जाल्यास तस घड्रेल हिसेब यावा ऐवज तादाप काय राहिला ? हें मुख्य यांचे बोलण्यांतील रहस्य त्यास, हालीं तुम्हीं लिहीं कीं हिसेबही मागाहून पाठवितों फार उत्तम आहे हिसेब पाठउन यावे म्हणजे मध्यस्तासीं बोलण्यांत येईल मध्यस्ताचे म्ह ( ण ) णें – सेंवाले नांदापुर हे सरकारांतच आहत जंगासीं दिल्हे म्हणोन कोठें गेलें नाहींत, तुम्हांस आपले फडच्याची गरज, तालुक्यामी काय कारण ? ऐसें म्ह ( ण ) णें यास विचार पाहतां माहाल आपले सरकारांत छाउन देणें ते समई जंगाकडून देवण्यास काय उशीर आहे ? येहतपामजंग घराउं पुसों लागले ते समई नांदापुर घेऊं नका ऐसे त्यास म्हणावें कीं नाहीं ? ऐसा लेख त्यास, आह्मीं जंगास म्हणावें, याणीं महाल टाकावा, मध्यस्तांनीं त्यास विचारावें, तेव्हां आम्हीं सांगितलें हें बोलणें प्राप्त, इत्यादिक लांबच लांब बखेडा पडतों आणि जंगास तुम्हीं माहाल हा नका घेऊं म्हंटल्यांत फळही नाहीं हें बोलणें मध्यस्तासी त्यांज कडूनच होणें तें व्हावें याचें त्यांसी हमेषा बोलणें होतच आहे हिसेब आणवावा ऐसें म्हणतात त्यास हिसेब पाठवावा त्याप्रा॥ बोलतां येईल रा॥ छ २९ मोहरम हे विनंति

श्री

भाद्रपद शु १ शुक्रवार शके १७१५

विनंति उपरि–मौजे वाघोली पा॥ धारूर हा गांव गणपतराव माधव यांजकडे हालीं राजे तेजवंत यांस जागीर जाला त्यांजकडून राये लक्ष्मा चद आले त्याणीं ठाण्यास उपद्रव दिल्हा आणि यास लिहीं कीं – ठाणें खालीं करून देणें, व्यर्थ खर्चाखालीं न येणें याचा हुजूर जलसा होऊन राजश्री गोविंदराव कृष्ण यांणीं साफ सांगितलें कीं – तुम्हीं आपलें

ठाणें तुम्हांस देणें. या प्रा। लक्ष्मीचंद यांणी पत्र लिहिलें त्याची नकल पा।, त्यावरून आम्हांस गेलें. ना मजकूर आनंदराव गणपतराव याजकडील. फौजेची अंमल नाटशी गावास जमत नाहीं लिहिलें कीं येकदम न देणें. त्याजवरून आम्हीं त्यांस लिहिलें यांचे नांवें पत्र लिहून दिलें कीं.—तुमचे खर्चाविसींचा भार पत्करीला याने रु॥ करून मध्यस्थांनी आम्हांस सांगितलें. त्यास, तुम्हांस खर्चाची रक्कम पावल्यास जगजीवन याने हुंडणावळीन तीन हजार रु॥ चाळीस पावली त्यांनी वजा करून तीन हजार सातसे नव्वद रु॥ यांस आम्ही पाठविली, ती तुम्हांस रवाना केली आहे. परभारें तुम्हांस पावेल. या मजकूर तीन हजार घ्यावे ते गुजरा यावे म्हणोन पत्र लिहून याचे हुंडणावळ सांगितल्यावरून दिल्हें आहे. याचा हवाला तुम्हांस आम्हांस म्हणोन लिहिलें आहे. रा। छ॥ २९ मोहरम. हे विनंति.

श्री.

भाद्रपद शु ९ शुक्रवार शके १७१५.

विनंति. उपरि. उमरखेड बाबत पा॥ वसमत येथें चाळीस हजाराची तनखा मध्यस्थानीं देविली. त्यांपैकीं वीस हजाराची पावती तुम्हीं दिल्ही. त्यास त्या पावतीन चाळीस हजारपैकीं ऐसा उच्चार मात्र नसावा.; म्हणोन राजश्री नाना याचे पत्रीं आज्ञा व सदरहूआन्वयें तपसिलें तुम्हीही लिहिलें. त्यास चाळीस हजाराचा उच्चार रसीदेंत न येतां पा॥ उमरखेडचे ऐवजीं वीस हजार दिल्हे ते पावले या प्रो पहिल्यानें आम्हीं रसीद वसमतकरास घावयास लागलों, परतु सदरहूप्रो रसीद घेईनात. त्याचे म्ह (ण) णे कीं:— चाळीस हजाराची तनखा जाली त्यापक्षीं चाळिस हजारापो वीस हजार पावले. ऐसा उच्चार रसीदेंत आणोन रसीद द्याल तर घेऊ. याप्रों मोठा घोळ पडला. तेव्हा आपला दस्तऐवज न गुते, आणि वसमतकराची

समजूत निघे आशा तऱ्हेची रसाद दिल्ही कीं -- पा। उमरखेड या महालापासोन शाहमिर्जानें ऐवज घेतला तो नबाबाचे सरकारांतून येणें त्या ऐवजींवस मतेवर चाळीस हजाराची तनखा दिल्ही त्यापैकीं वीस हजार पावले यामा। रसीदींत लेख तेव्हां शाहमिर्जानें उमरखेडचा ऐवज घेतला तो नबाबाकडून येणें त्या ऐवजीं चाळीस हजाराची तनखा ऐसें लिहिल्यांत, त्या अर्थी चाळीस हजारावर ठराव जाला ऐसा आर्थ कांहीं रसीदींत परिच्छिन्न निघत नाहीं त्या ऐवजीं ऐसा शब्द, येणें करून जो शाहमिर्जानें नेला नसेल त्या ऐवजीं यामा। स्पष्टार्थ आहे वसमनकराची तर समजूत चाळीस हजाराचे तनखापैकीं वीस पावले हें लिहिल्यावरून जाली आणि आपला तर चाळसावरच ठराव जाला, ऐसें नाहीं पुढें बोलण्यास, जावसालास जागा राखूनच रसीद सदरहू प्र। देण्यांत आली तुह्मास सविस्तर समजावें सबब लिहिलें असें नानास सांगितलें नानानी मला आज्ञा केली कीं -ठाणें तुम्हीं घेणें ऐसें गोविंदराव कसें बोलले ? भीं जाब दिल्हा कीं - असी गोष्ट कसी घडेल ? हीं अक्षरें त्यांचे मुखावाटे निघणारच नाहींत लक्ष्मीचंदानें आपल साधनाकरितां लाऊन लिहिलें आहे परंतु यांजकडोन असें घडणार नाहीं यामा। जालें फर्चे समजावें ह्मणोन विनंति लि। मध्यस्तांसीं बोलोन गांवास उपसर्ग न होये आसें घडावें तेजवंत यांसही सांगावे -हें काम जावसाली, यास लढाई व मोर्चे कारण नाहीं बाजवा जावसालानें ठरेल तसें येका चिठी वर होण्याचें काम । सध्यां उपसर्ग गांवास न लागे, आसें मध्यस्तांसीं बोलोन करावें, ह्मणोन लिहिलें त्यास, मौजे वाघोली हा गांव तेजवंत यांस जागीर जाल्या नंतर त्यांणीं आपल्याकडोन आनंदराव केशव वकील यांस 'आम्हांकडे पाठविलें कीं - हा गांव आम्हाकडे जागीर जाला नाहीं आपण आपलें पत्र द्यावें ते समई आह्मीं यास उत्तर साफ दिलें कीं -हा गांव सरकारचा याचें नांव तुम्हीं न घ्यावं, कदाचित गांवास उपसर्ग कराल तर परिणाम लागणार नाहीं, आम्हासही मध्यस्तांसीं बोलोन हें कामें जावसा

समजूत निघे आशा तऱ्हेची रसाद दिल्ही कीं —— प॥ उमरखेड या महाला-पासोन शाहमिर्जानें ऐवज घेतला तो नवाबाचे सरकारांतून येणें त्या ऐवजींवस मतेवर चाळीस हजाराची तनखा दिल्ही त्यापैकीं वीस हजार पावले याप्र॥ रसीदींत लेख तेंव्हां शाहमिर्जानें उमरखेडच्या ऐवज घेतला तो नवाबाकडून येणें त्या ऐवजीं चाळीस हजाराची तनखा ऐसें लिहिल्यांत, त्या अर्थी चाळीस हजारावर ठराव जाला ऐसा आर्थ कांहीं रसीदींत पारिच्छिन्न निघत नाहीं त्या ऐवजीं ऐसा शब्द, येणें करून जो शाहमिर्जानें नेला नसेल त्या ऐवजीं याप्र॥ स्पष्टार्थ आहे वसमनकराची तर समजूत चाळि हजाराचे तनखा पैकीं वीस पावले हें लिहिल्यावरून जाली आणि आपला तर चाळसांवरच ठराव जाला, ऐसें नाहीं पुढें बोलण्यास, जावसालास जागा राखूनच रसीद सदरहू प्र॥ देण्यात आली तुह्मास सविस्तर समजावें सबब लिहिलें असें नानास सांगितलें नानानीं मला आज्ञा केली कीं —ठाणें तुम्हीं घेणें ऐसें गोविंदराव कसें बो ( ल ) ले ? मीं जाब दिल्हा कीं — असी गोष्ट कसी घडेल ? हीं अक्षरें त्यांचे मुखावाटे निघणारच नाहींत लक्ष्मीचंदानें आपल साधनाकारितां लाऊन लिों आहे परंतु यांजकडोन असें घडणार नाहीं याप्र॥ जालें कचें समजावें ह्मणोन विनंति लि॥ मध्यस्तांसीं बोलोन गांवास उपसर्ग न होये आसें घडावें तेजवंत यांसही सांगावे —हें काम जावसाली, यास लढाई व मोर्चे कारण नाहीं वाजवा जोवसालानें ठरेल तसें येका चिठी पर होण्याचें काम ! सध्या उपसर्ग गांवास न लागे, आसें मध्यस्तांसीं बोलोन करावें, ह्मणोन लिों त्यास, मौजे वाघोली हा गांव तेजवंत यांस जागीर जाल्या नतर त्यांणीं आपल्याकडोन आनंदराव केशव वकील यांस आम्हां-कडे पाठविलें कीं — हा गांव आम्हाकडे जागीर जाला नाहीं आपण आपलें पत्र द्यावें ते समई आह्मीं यास उत्तर साफ दिलें कीं —हा गांव सरकारचा याचें नांव तुम्हीं न घ्यावें, कदाचित गांवास उपसर्ग कराल तर परिणाम लागणार नाहीं, आम्हांसही मध्यस्त[illegible] हें कामें जावसा